शोधप्रकाशन ग्रंथमाला- १००

# श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल

'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या कन्नड ग्रंथाचा
परिष्कृत व परिवर्धित मराठी अनुवाद

संपादक
**डॉ. शेषनारायण देवाप्पा पसारकर**

संपादन सहाय्य
**सौ. उषा शेषनारायण पसारकर**

मराठी अनुवाद
**डॉ. इरेश सदाशिव स्वामी**
**सौ. वसुधा इरेश स्वामी**
**एम्. एम्. हिरेमठ**

**शैवभारती शोधप्रतिष्ठान**
जंगमवाडी मठ, वाराणसी (उ.प्र.)
इ.स. २०२०

श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल
संपादक : डॉ. शे. दे. पसारकर

Shree Kashi Vishwaradhya Gurukul (Marathi)
Edited by Dr. S. D. Pasarkar

ISBN 978-93-82639-40-4

प्रकाशक :
शैवभारती शोधप्रतिष्ठान,
डी. ३५/७७, जंगमवाडी मठ,
वाराणसी (उत्तर प्रदेश) २२१००१
दूरभाष : 07084321008

संगणकीय अक्षरलेखन :
सौ. उषा पसारकर
श्रीविश्वाराध्य अक्षररचना, 'पसारकर भवन',
केकतउमरा, ता.जि. वाशीम ४४४५०५ (महाराष्ट्र)
चरभाष : 09518599152



मुद्रक :
बाबूराव कोरे
शिवानंद प्रिंटर्स, J-34, एम.आय.डी.सी., कुपवाड ब्लॉक,
सांगली ४१६४३६ (महाराष्ट्र). स्थिरभाष : 0233 - 2643255

प्रथमावृत्ती : १९ जानेवारी २०२०

प्रती : १०००

मूल्य : ३०० रुपये

# ◂ समर्पण ▸













श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचे संस्थापक पूर्व पंचाचार्य







विद्यमान जगद्गुरू पंचपीठाधीश्वर

## श्रीकाशीजंगमवाडी मठात आणि श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अध्ययन केलेले श्री पंचपीठाधीश्वर























# ग्रंथदानी



लिंगैक्य ष.ब्र.श्री. १०८
सद्‌गुरू निरंजन शिवाचार्य महाराज

## हिरेमठ संस्थान
## औसा



ष.ब्र.श्री १०८
निरंजन शिवाचार्य महाराज



ष.ब्र.श्री. १०८
डॉ. शांतवीरलिंग शिवाचार्य महाराज
संचालक, वखार महामंडळ, आसाम व ७ राज्य
केंद्रीय ग्राहक संरक्षण, अन्न व सार्वजनिक
वितरण मंत्रालय, भारत सरकार

'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या कन्नड ग्रंथाचे प्रारंभीचे पृष्ठ

Research Publications Series - 52



Karnataka Government, Department of Archives Vidhana Soudha, Bangalore

# ŚRĪ KĀSHĪ PĪṬHA
# JÑĀNAGAṄGĀ

*Chief Editor*

**Dr. K. V. Ramesh**
Joint Director General
Archaeological Survey of India and Director,
Dept. of Ephigraph, New Delhi (Retd.)

*Editorial Board :*



SHAIVA BHARATI SHODHA PRATISHTHANAM
D. 35/77, Jangamawadimath, Varanasi - 221 001

# अनुक्रमणिका

श्रीमत्काशीज्ञानसिंहासनाधीश्वर

श्री १००८ जगद्गुरू

**डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी**

जंगमवाडी मठ, श्री क्षेत्र काशी, वाराणसी (उ.प्र.)



# शुभाशीर्वचन

श्री काशी विश्वाराध्य गुरुकुलाच्या शतमानोत्सवाच्या निमित्ताने प्रस्तुत 'श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल' हा डॉ. शे. दे. पसारकर यांनी संपादित केलेला मराठी ग्रंथ शैवभारती शोधप्रतिष्ठानच्या ग्रंथमालेचे १०० वे पुष्प म्हणून प्रकाशित करताना महासन्निधींना अत्यंत आनंद होत आहे.

भारतामध्ये प्राचीन कालापासून गुरुकुल पद्धतीचे शिक्षण देण्याची परंपरा चालत आलेली आहे. गुरुकुल म्हणजे गुरूचे घर. तेथे अध्ययनासाठी येणारा शिष्य आपल्या परिवाराचा आणि घराचा त्याग करून गुरूंच्या परिवाराचा सदस्य बनून राहतो आणि त्यांची आप्त, अंग, स्थान आणि सद्भावनारूपी चतुर्विध सेवा करून त्यांच्याकडून ज्ञान संपादन करतो. असे ज्ञानप्राप्तीचे जे श्रेष्ठ स्थल ते गुरुकुल होय. गुरू शिष्याच्या मनात दडलेला अज्ञानरूपी अंध:कार आपल्या उपदेशाने दूर करतो, म्हणून त्याला गुरू असे म्हटले जाते. प्राचीन काळी आपल्या देशामध्ये अशी अनेक गुरुकुले होती. तेथे राजा आणि प्रजा यांची मुले शस्त्रविद्या आणि शास्त्रविद्या प्राप्त करून घेत असत. शिष्याकडून कोणत्याही मोबदल्याची अपेक्षा न ठेवता गुरू विद्यार्थ्यांना विद्यादान करीत असत. महर्षी वाल्मीकी, कण्व, सांदिपनी आदी ऋषिगणांनी आपल्या विद्यार्थ्यांना गुरुकुलात विद्यादान केले, असे पुराणेतिहासामध्ये प्रसिद्ध आहे. नंतरच्या काळात नालंदा आणि तक्षशिला येथेसुद्धा गुरुकुल पद्धती अस्तित्वात होती, असा इतिहास आहे.

विद्यानगरी काशीक्षेत्रांमध्ये देखील अशा पद्धतीची गुरुकुल पद्धती अनादिकालापासून चालत आलेली आहे. काशीक्षेत्री अशी अनेक गुरुकुले आहेत. त्या गुरुकुलांमध्ये 'जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन' हे अत्यंत प्राचीन गुरुकुल मानले जाते. या गुरुकुलाची स्थापना द्वापरयुगामध्ये जगद्गुरू विश्वकर्ण शिवाचार्य भगवत्पादांकडून झाली असून या गुरुकुलाचे पहिले विद्यार्थी दुर्वास ऋषी हे होत. दुर्वासांच्या क्रोधामुळे त्या काळात सर्वजण त्रस्त झाले होते. आपला क्रोध शांत व्हावा यासाठी ते शिवाकडे गेले असताना त्यांनी त्यांना विश्वकर्ण शिवाचार्यांकडे पाठवले. दुर्वासांनी विश्वकर्ण शिवाचार्यांकडून 'शिव एवात्मा' हा पंचवर्ण उपदेश घेतला आणि त्यांच्या मनातला क्रोध समूळ नष्ट झाला. त्यानंतरच्या काळात देखील सर्व जगद्गुरूंनी आपापल्या शिष्यांना अशाच प्रकारे ज्ञानदान केले. विश्वकर्ण शिवाचार्यांनंतर काशीपीठावर आजपर्यंत ८५ जगद्गुरू होऊन गेले. ते सगळे विश्वाराध्य ज्ञानसिंहासन गुरुकुलाचे विद्यार्थी होते. जगद्गुरू आपले पीठ सोडून बाहेर कुठेही जाऊ शकत नव्हते. म्हणून ते स्वतः विद्यार्थ्यांची पीठामध्ये निवासाची व भोजनाची व्यवस्था करून त्यांना ज्ञानदान करीत असत. कालांतराने लोकसंपर्क वाढल्यावर जगद्गुरूंना बाहेर जावे लागले. तेव्हा काशीतील विविध विद्वानांकडे ते विद्यार्थ्यांना शिक्षणासाठी पाठवू लागले. अशा विद्वानांचा महाशिवरात्रीच्या पर्वकाली त्यांना पीठामध्ये आमंत्रित करून महावस्त्र, दक्षिणा, फल, तांबूल देऊन त्यांचा गौरव करण्याची परंपरा सुरू झाली. आज देखील काशीपीठात महाशिवरात्रीला सर्व विद्वानांचा अशाप्रकारे गौरव करण्याची परंपरा चालू आहे. अशा पद्धतीने या गुरुकुलातील विद्यार्थ्यांना ज्यांनी शिकवले त्या गुरुवर्यांची नावे पुढीलप्रमाणे होत.

महामहोपाध्याय पंडित शिवकुमार मिश्र, महामहोपाध्याय पं. देवीप्रसाद शुक्ल, पं. यागेश्वर पाठक, पं. गौरीनाथ पाठक, पं. शिवदत्त मिश्र, पं. ताराचंद्र भट्टाचार्य, पं. गुरुदेव मिश्र, पं. देवनारायण तिवारी, पं. चंद्रशेखर शास्त्री, हरियाणा, पं. शिवशंकर भट्टाचार्य, पं. वामाचरण भट्टाचार्य, पं. गुलाब झा, पं. बाळकृष्ण मिश्र, पं. शंकर भट्टाचार्य, पं. गोपीनाथ

कविराज, पं. शिवनारायण तिवारी, पं. शशिकांत शास्त्री, पं. बलदेव उपाध्याय, पं. देवस्वरूप मिश्र. पं. रेवाप्रसाद द्विवेदी, पं. व्रजवल्लभ द्विवेदी, पं. श्यामनारायण दीक्षित, पं. गंगाधर शास्त्री अनुगोंड, पं. शरणय्या शास्त्री अचलेरी इत्यादी. या विद्वानांनी काशी ज्ञानपीठ गुरुकुलात अध्ययन केलेल्या विद्यार्थ्यांना प्रीतिपूर्वक विद्यादान केले आहे. काशीपीठात राहून विविध गुरूंच्या घरी जाऊन अनेक शास्त्रांमध्ये पांडित्य मिळविलेल्या हजारो विद्यार्थ्यांनी कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र, तेलंगणा इत्यादी प्रदेशांमध्ये विविध गुरुकुलांत प्राध्यापक म्हणून सेवा केली आहे. संस्कृत शास्त्रांच्या रचनांमध्ये वीरशैव विद्वानांचे खूप मोठे योगदान आहे.

इ.स. १९८९ मध्ये आम्ही काशीपीठाच्या जगद्गुरुपदाचा अधिकार स्वीकारल्यानंतर पीठाची जुनी कागदपत्रे चाळत असताना 'विश्वाराध्य गुरुकुला'च्या स्थापनेपूर्वी शिकून गेलेल्या व गुरुकुलाच्या स्थापनेनंतर शिकलेल्या विद्यार्थ्यांचे प्रवेशअर्ज असलेली एक मोठी वही आमच्या दृष्टीस पडली. त्याचे साद्यंत परिशीलन केल्यानंतर लक्षात आले की, एवढ्या सर्व महान व्यक्तींनी काशीपीठातून शिक्षण घेतलेले आहे. ही गोष्ट यापूर्वी कोणालाही माहीत नव्हती. म्हणून हे सर्व व्यवस्थितपणे क्रमबद्धपणे लिहून काढून ग्रंथरूपाने ते प्रसिद्ध करावे, असा मनात विचार आला. तेव्हा श्रीपीठाचे माजी ज्येष्ठ संशोधक विद्यार्थी असलेल्या आजच्या तुमकूर मठाच्या श्री ष.ब्र. डॉ. शिवानंद शिवाचार्य स्वामीजींवर या कार्याची जबाबदारी सोपवण्यात आली व जुन्या विद्यार्थ्यांशी पत्रांद्वारे संपर्क साधून माहितीचा संग्रह करण्यास सांगण्यात आले. श्रीस्वामीजींनी अनेक जुन्या विद्यार्थ्यांशी संपर्क साधून पुरेशी माहिती संग्रहित केली. त्यानंतर पुढे थोड्याच दिवसांनी तुमकूर हिरेमठाचे ते पट्टाधिकारी झाले. त्या मठाच्या धार्मिक व शैक्षणिक अभिवृद्धीकडे त्यांनी संपूर्ण लक्ष घातल्यामुळे हे कार्य तेथेच थांबले. त्यानंतर मठाचे दुसरे ज्येष्ठ संशोधक बबलेश्वर बृहन्मठाचे श्री ष.ब्र. डॉ. महादेव शिवाचार्य स्वामीजींनी दोन वर्षे सतत परिश्रम घेऊन सर्व कागदपत्रे गोळा करून श्रीसन्निधींच्या मार्गदर्शनाखाली त्या विद्यार्थ्यांच्या परिचयात्मक

लेखनाची संपूर्ण सिद्धता केली.

सन २००७ च्या २९ नोव्हेंबर रोजी श्रीपीठामध्ये श्रीसन्निधींच्या षष्ठ्यब्दी महोत्सवाचे आयोजन केले होते. त्याच्या आदल्या दिवशी, श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचा अमृतमहोत्सव साजरा करण्यात आला व गुरुकुलाच्या विद्यार्थ्यांच्या स्मरणग्रंथाचे प्रकाशन करण्याची योजना आखली गेली.

संपादक मंडळाच्या तीन विद्वान व्यक्तींनी विद्यार्थ्यांच्या प्रवेशाच्या आधारे क्रमानुसार त्यांचा परिचय ग्रथित केला. मुद्रणाशी संबंधित सर्व जबाबदारी समर्थपणे पार पाडून त्यांनी कन्नड ग्रंथ सर्वांगसुंदरपणे मुद्रित होण्याकामी अमूल्य साहित्यिक सहकार्य केल्याबद्दल श्रीसन्निधींना अत्यंत आनंद झाला. 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' हा कन्नड ग्रंथ म्हणजे श्री काशीपीठाची परंपरा, इतिहास आणि येथील गुरुकुल स्थापनेपूर्वीची अध्ययनव्यवस्था आणि त्यानंतरची व्यवस्था, तेथे शिकून गेलेल्या सर्व विद्यार्थ्यांची सविस्तर माहिती व पीठाशी संबंधित इतर सर्व ऐतिहासिक पुरावे असलेला एक श्रेष्ठ ग्रंथ होय. श्रीपीठाच्या धार्मिक, शैक्षणिक, साहित्यिक व सांस्कृतिक कार्याविषयी अध्ययन करण्याची ज्यांची इच्छा आहे, त्यांच्यासाठी हा अत्यंत उपयुक्त असा महत्त्वपूर्ण ग्रंथ ठरणार आहे हे सांगायला अभिमान वाटतो.

श्रीपीठामध्ये उपलब्ध असलेले इ.स. ५७४ चे जयनंददेव महाराजांचे दानशासनपत्र आणि इ.स. १५३० ते १६६८ पर्यंतच्या मुस्लिम चक्रवर्तींच्या सर्व फर्मानांचे आणि त्यावरून अलाहाबाद उच्च न्यायालयाच्या निर्णयाचे सूक्ष्म परिशीलन करून डॉ. के. व्ही. रमेश यांनी श्री काशीपीठ हे दस्तऐवजांच्या आधारे सहाव्या शतकापेक्षाही प्राचीन असल्याचे आपल्या संपादकीय लेखात म्हटले आहे. अत्यंत विद्वान असलेल्या व दस्तऐवजांचे तज्ज्ञ असलेल्या डॉ. के. व्ही. रमेश यांचा संपादकीय लेख अत्यंत महत्त्वाचा आहे. काशीपीठाचे सर्व प्राचीन ऐतिहासिक पुरावे पाहून संतुष्ट झालेल्या डॉ. के. व्ही. रमेश यांनी काशीपीठाची परंपरा आणि इतिहासाबद्दल 'Shri Kashi Peeth : Tradition and History' नावाचा इंग्रजी भाषेत स्वतंत्र

ग्रंथ लिहिलेला आहे. ऐतिहासिक क्षेत्रातील तो एक आदर्श दीपस्तंभ आहे. अशा प्रकारे डॉ. के. व्ही. रमेश यांच्या प्रधान संपादकत्वाखाली तयार झालेला संपादक मंडळातील पाच विद्वानांच्या परिश्रमाचे दृश्य फळ म्हणजे 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' हा सर्वांगसुंदर ग्रंथ होय.

श्रीकाशीक्षेत्र हे ज्ञाननगरी म्हणूनच प्रसिद्धी पावलेले आहे. संस्कृत भाषा व त्या भाषेतील साहित्य आणि सर्व दर्शनशास्त्रांचा अभ्यास करण्यासाठी देश-विदेशांतील विद्यार्थी अनादी कालापासून या क्षेत्राकडे येत असतात. प्राचीन काळात प्रत्येक विद्वान आपापल्या घरी विद्यार्थ्यांना ठेवून घेऊन त्यांना विद्यादान करीत आलेले आहेत. कालांतराने पुढे अनेक पाठशाळा निर्माण झाल्या. सध्या विश्वविद्यालयाच्या पातळीपर्यंत त्या विद्येचा विकास झालेला आहे. अशा प्रकारे ज्ञानार्जनाला अत्यंत उपयुक्त असलेल्या श्रीकाशीक्षेत्रात सनातन वीरशैवधर्माच्या पंचपीठांपैकी एक पीठ 'श्रीकाशी ज्ञानसिंहासन महापीठ' हे अनादी काळापासून अस्तित्वात असून आपल्या नावाप्रमाणेच ज्ञानार्जनासाठी आलेल्या विद्यार्थ्यांमध्ये कोणताही भेदभाव न करता त्यांना विनामूल्य भोजन-निवासाची सोय करून देऊन ज्ञानदानाचे कार्यही करत आलेले आहे. काशीपीठाच्या परंपरेत आजवर ८५ पीठाधिपती होऊन गेल्याची नोंदसुद्धा श्रीपीठामध्ये सापडते. या पीठाचे पीठाधिपतिपद भूषविलेले सर्व जगद्गुरू या पीठाचे माजी विद्यार्थीच होते, हे एक वैशिष्ट्य होय. यावरून काशीपीठात विद्यार्थ्यांसाठी भोजन-निवासाची व्यवस्था व ज्ञानदानाची परंपरा अनादी काळापासून चालत असल्याचे आपल्याला समजते.

शिवाय, केदारपीठाचे अनेक जगद्गुरू हे काशीपीठाचे विद्यार्थीच होते. ही परंपरा आजपर्यंत चालत आलेली आहे. काशीपीठामध्ये अध्ययन करून उच्चविद्याविभूषित झालेल्या केदारपीठाच्या परंपरेप्रमाणे चेलासंस्कार देऊन त्यांना पीठाधिपती म्हणून नेमण्यात आलेले आहे. उपलब्ध पुराव्यांवरून सांगावयाचे झाल्यास श्री १००८ जगद्गुरू रावल नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू रावल कैलासलिंग शिवाचार्य

महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू रावल चिद्घनलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू रावल शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी आणि विद्यमान श्री १००८ जगद्गुरू रावल भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी हे सगळे काशीपीठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थी आहेत. त्याचप्रमाणे रंभापुरीपीठाचे श्री १००८ जगद्गुरू वृषभ राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी तसेच श्रीशैलपीठाचे श्री १००८ जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी व श्री १००८ जगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी, उज्जयिनीपीठाचे श्री १००८ जगद्गुरू चन्नबसव शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी व श्री १००८ जगद्गुरू मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी असे पंचपीठांच्या परंपरेत येणारे सर्व पीठाचार्य काशीपीठाच्या श्रीविश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थीच होत.

त्याचप्रमाणे गरगचे श्री मडिवाळ शिवयोगी, मतकूरचे श्री नंजुंड शिवयोगी, चित्रदुर्ग बृहन्मठाचे श्री ज. जयदेव मुरुघराजेंद्र महास्वामीजी, हुबळी मूरूसाविर मठाचे श्री. ज. वैयाकरणी गंगाधर महास्वामीजी, निडसोसी सिद्धसंस्थान मठाचे दर्शनविशारद न्याय-वैशेषिकाचार्य श्री. ज. चतुर्थ शिवलिंगेश्वर महास्वामीजी, हावेरी-हुक्केरी मठाचे श्री शिवबसव महास्वामीजी, आनंदपूर मुरुघामठाचे श्री. ज. लिंग महास्वामीजी, कमतगी-कोटेकल्लू हुच्चेश्वर मठाचे १० वे हुच्चेश्वर स्वामीजी, कोप्पळ गविमठाचे श्री म.नि.प्र. मरिशांतवीर महास्वामीजी, बेंगळूर सर्पभूषण मठाचे श्री म.नि.प्र. महादेव महास्वामीजी, मैसूर गविमठाचे श्री म.नि.प्र. गौरीशंकर महास्वामीजी, कित्तूर कल्लुमठाचे श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध महास्वामीजी, यमकनमरडी हुणसीकोळ्ळ मठाचे श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध महास्वामीजी, तरळबाळु बृहन्मठाचे श्री ज. शिवकुमार महास्वामीजी, इलकल महांतेश्वर संस्थानमठाचे श्री म.नि.प्र. महांत

स्वामीजी, मुरुगोडचे श्री म.नि.प्र. नीलकंठ महास्वामीजी आणि बेळगाव रुद्राक्षी मठाचे श्री म.नि.प्र. सिद्धराम महास्वामीजी हे सर्व निरंजनमूर्ती काशीपीठाचे विद्यार्थीच होते, ही खास उल्लेखनीय बाब आहे.

तसेच तर्कतीर्थ श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य, हूली; विद्यावाचस्पती श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी, हुल्याळ; श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य, अब्बिगेरी; श्री ष.ब्र. डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी, अहमदपूर (महाराष्ट्र) इत्यादी विद्वान शिवाचार्य आणि तसेच अब्बेतुमकूरचे विश्वाराध्य सिद्धसंस्थान मठाचे श्री विश्वाराध्य स्वामीजी, गदगच्या शिवानंद मठाचे षड्दर्शन शिरोमणी श्री सदाशिवानंद स्वामीजी, बीदरच्या चिदंबर आश्रम सिद्धारूढ मठाचे श्री श्रो.ब्र. शिवकुमार स्वामीजी, विजयपूरच्या षण्मुखारूढ मठाचे श्री श्रो.ब्र. अभिनव शिवपुत्र स्वामीजी, लक्कवळ्ळी जैनमठाचे श्री. वृषभेषण भट्टारक स्वामीजी, महाराष्ट्राच्या रसाळ संप्रदायाचे श्री दिनेश महाराज, मराठा संप्रदायाचे श्री मंजुनाथ स्वामीजी अशा विभिन्न संप्रदायांचे अनेक स्वामीजन श्री काशीपीठाचे विद्यार्थी होते.

त्याचप्रमाणे रोण येथील शिवानंद मठाचे पंडित बसवराजेंद्र स्वामीजी, नागनूर बृहन्मठाचे पं. काशीनाथ शास्त्री, सुणकल्लु बिदरी आराध्यमठाचे पंडित हरेश्वर शास्त्रीजी, उमचिगे मळेमठाचे पंडित शंकरशास्त्रीजी, मणूरचे पंडित मल्लिकार्जुन शास्त्रीजी, धारवाडचे पंडित नागभूषण शास्त्रीजी, गुंचिगनूरचे पंडित गौरीशंकर शास्त्रीजी, इटगीचे पंडित चन्नबसव शास्त्रीजी, जैनापूरचे पंडित मल्लिकार्जुन शास्त्रीजी, बारडगीचे पंडित फालाक्ष शास्त्रीजी, पडेकनूरचे पंडित रेवणसिद्ध शास्त्रीजी, गंवारचे पंडित बसवलिंग शास्त्रीजी इत्यादी शेकडो शास्त्रीजन श्रीपीठाचेच विद्यार्थी होते, ही अत्यंत अभिमानाची गोष्ट आहे.

तसेच प्रा. करवीरप्पा शिवप्पा हडपद (तबलावादक), धारवाडचे डॉ. मल्लिकार्जुन तर्लगट्टी (सितारवादक), अळूरचे श्री. काशीलिंग मठ (सतारवादक) इत्यादी अनेक कलाकारांनी सुद्धा श्रीजगद्गुरू विश्वाराध्यांच्या आश्रयाखाली राहून कलाक्षेत्रामध्ये अप्रतिम प्राविण्य मिळविलेले आहे.

अशाप्रकारे वर उल्लेखिलेल्या सर्व स्तरांवरील व सर्व संप्रदायांच्या विद्यार्थ्यांसाठी श्री काशीपीठाने मोफत अन्न, निवास आणि शिक्षणाची सोय केलेली असून सर्व संप्रदायांच्या मठांच्या स्तुती व गौरवाला ते पात्र ठरलेले आहे. काशी उच्च विद्याभ्यासाचे केंद्र असल्यामुळे उच्च व्यासंगासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांना प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक स्तरांपर्यंत शिकण्यासाठी अनुकूल व्हावे या उद्देशाने कर्नाटक, महाराष्ट्र व आंध्र प्रदेशांतील अनेक शिवाचार्य, निरंजनमूर्ती व वीरशैव समाजातील प्रतिष्ठित सद्भक्तांनी आपापल्या भागांत अनेक संस्कृत, वैदिक पाठशाळा सुरू करून विद्यार्थ्यांची सोय केलेली आहे. काशीला अध्ययनासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांच्या शाळा सोडल्याचा दाखल्यांवरून आम्हाला अनेक पाठशाळांची नावे ज्ञात झालेली आहेत. ती अशी–

धर्मवीर वीरसंगप्पा यांची वीरशैव संस्कृत–वैदिक पाठशाळा, मैसूर; श्रीमद्वीरशैव वारद संस्कृत पाठशाळा, सोलापूर; वीरशैव संस्कृत पाठशाळा, बागलकोट; श्री बसवेश्वर संस्कृत पाठशाळा, बागलकोट; श्री मोटगी संस्कृत पाठशाळा, बागलकोट; सांगत्रय पाठशाळा, कंपली; श्रीमद्वीरशैव शिवयोग मंदिर, बदामी; सक्री करडेप्पा यांची चौकी पाठशाळा, बळ्ळारी; काशी वीरशैव संस्कृत पाठशाळा, पुणे; भाषोज्जीविनी पाठशाळा, मैसूर; तोंटदार्य संस्कृत पाठशाळा, गदग; संस्कृत पाठशाळा, गंवार; दुरदुंडेश्वर संस्कृत पाठशाळा, निडसोसी; संस्कृत पाठशाळा, विरक्त मठ; निरगुंदी; श्रीमल्लणार्य संस्कृत पाठशाळा, अब्बिगेरी; संस्कृत पाठशाळा, नायीकल; श्रीहुच्चेश्वर संस्कृत पाठशाळा, कोटेकल; हुंडेकारमठाची संस्कृत पाठशाळा, बागलकोट; संस्कृत पाठशाळा, गुळेद्गुड्ड; संस्कृत पाठशाळा, शलवडी; श्रीमद्वीरशैव गुरुकुल, होटगी मठ, सोलापूर; श्रीशिवानंद संस्कृत पाठशाळा, गदग; श्रीशिवानंद संस्कृत पाठशाळा, रोण; श्रीमुरुघेंद्र शिवयोगी स्मारक संस्कृत पाठशाळा, अथणी; हुक्केरी मठाची संस्कृत पाठशाळा, हावेरी; श्रीउज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळा, कोट्टूर; संस्कृत पाठशाळा, होसपेट; संस्कृत पाठशाळा, हुनगुंद; हूलीमठ संस्कृत पाठशाळा, धारवाड;

संस्कृत पाठशाळा, हिरेबेंडीगेरी; संस्कृत पाठशाळा, कुंदगोळ; संस्कृत ज्योतिष वैदिक पाठशाळा, बंकापूर; संस्कृत पाठशाळा, मुरुघामठ, धारवाड; श्रीशंकर संस्कृत महाविद्यालय, यादगिरी; श्रीखास्‌गतेश्वर संस्कृत पाठशाळा, ताळीकोट; श्रीचन्नवीरेश्वर संस्कृत पाठशाळा, अक्की आलूर; केळदी संस्थान संस्कृत पाठशाळा, केळदी; संस्कृत पाठशाळा, बळगानूर; अन्नदानेश्वर संस्कृत पाठशाळा, मुंडरगी; अन्नदानेश्वर संस्कृत पाठशाळा, हाळकेरी; अडवी स्वामी मठ संस्कृत पाठशाळा, बागलकोट; संस्कृत पाठशाळा, इलकल; गद्दिगे मठ संस्कृत पाठशाळा, कलबुर्गी; रुद्राक्षीमठ संस्कृत पाठशाळा, हुब्बळी; संस्कृत पाठशाळा, निडगुंदी कोप्प; विरक्तमठ संस्कृत पाठशाळा, हुक्केरी; श्रीजगद्‌गुरू गंगाधर संस्कृत महाविद्यालय, मूरुसाविर मठ, हुबळी; सिद्धसंस्थान संस्कृत पाठशाळा, निडसोसी; श्रीगविसिद्धेश्वर संस्कृत पाठशाळा, कोप्पळ; श्रीशिवरात्रेश्वर संस्कृत पाठशाळा, मैसूर; श्रीचन्नमल्लिकार्जुन संस्कृत वैदिक पाठशाळा, होन्नाळी; श्रीगुरू करबसव शिवाचार्य वैदिक संस्कृत गुरुकुल, बरडोल; सिंदगी हिरेमठाची श्रीकुमारेश्वर धार्मिक पाठशाळा, हावेरी; श्रीगुरुमठकल संस्कृत पाठशाळा, सेडम; संस्कृत वैदिक पाठशाळा, आलमपल्ली; श्री सिद्धलिंगस्वामी संस्कृत पाठशाळा, निरडगुंब; श्री वीरशैवानंद आश्रम संस्कृत पाठशाळा, बिरूर; संस्कृत पाठशाळा, इंगळेश्वर; श्रीगुरुबसवमठ संस्कृत पाठशाळा, कलबुर्गी; संस्कृत पाठशाळा, इटगी; जयचामराजेंद्र संस्कृत पाठशाळा, बेंगळूरु; संस्कृत पाठशाळा, कोरवार; संस्कृत पाठशाळा तिप्पीमठ, बैलहोंगल; श्रीसिद्धलिंगेश्वर संस्कृत पाठशाळा, हुन्नूर (ता. मुधोळ); श्रीनीलकंठेश्वर संस्कृत पाठशाळा, रामपूर (ता. मुधोळ); श्रीजगद्‌गुरू पंचाचार्य फ्री बोर्डिंग संस्कृत वैदिक पाठशाळा, महंतर मठ, बेंगळूरु; श्रीजगद्‌गुरू पंचाचार्य संस्कृत वेद-आगम-ज्योतिष-योग पाठशाळा, गदग; श्रीसिद्धलिंगेश्वर संस्कृत वेद पाठशाळा, सिद्धगंगा, तेग्गिनमठ; संस्कृत पाठशाळा, हरपनहळ्ळी आणि होन्नाळी श्रीचन्नमल्लिकार्जुन स्वामी संस्कृत प्रसार परिषदेची श्रीजगद्‌गुरू वागीश पंडिताराध्य धार्मिक पाठशाळा, राणेबेन्नूर; श्री जगद्‌गुरू पंचाचार्य वेद-

आगम-संस्कृत-संगीत-योग पाठशाळा, बिसनळ्ळी, जि. हावेरी आणि श्री ज. पंचाचार्य वेद-आगम संस्कृत पाठशाळा, शादनगर (तेलंगणा).

अशा प्रकारे राज्याच्या मध्यभागी अनेक पाठशाळा कार्यान्वित होत्या. आजही त्यांपैकी अनेक पाठशाळा व्यवस्थितपणे विद्यादानाचे कार्य करीत आहेत. या व्यतिरिक्त इतर अनेक पाठशाळा या प्रदेशांमध्ये असू शकतील. आम्ही या ठिकाणी नमूद केलेली शाळांची नावे केवळ विद्यार्थ्यांच्या दाखल्यांच्या आधारे संग्रहित केलेली आहेत.

या सर्व वस्तुस्थितीवरून एक गोष्ट निश्चितपणे लक्षात येते की, संस्कृत भाषा आणि शास्त्रांच्या संरक्षणासाठी व त्याच्या प्रचार-प्रसारासाठी वीरशैव मठाधिपतींनी व समाजप्रेमी सद्भक्तांनी संस्कृतसंवर्धनाचे कार्य अत्यंत आस्थेने व कळकळीने केलेले आहे. या सर्व घटनांवरून संस्कृत भाषेच्या रक्षणकार्यामध्ये वीरशैवधर्माचे अमूल्य योगदान असल्याचे स्पष्ट होते. वीरशैवधर्माचे मूळ साहित्य संस्कृत भाषेतच असल्यामुळे प्रत्येकाला संस्कृत भाषेचा अभ्यास करणे गरजेचे आहे, ही या सर्व प्रयत्नांची पार्श्वभूमी असल्याचे ध्यानात घ्यावे. संस्कृत भाषेचा अभ्यास केल्यानंतर वीरशैव शास्त्रग्रंथ नीटपणे समजून घेऊन शरणांच्या विपुल अनुभाव साहित्याचा त्यांच्याबरोबर समन्वय साधणे सुलभसाध्य होणार आहे. शिवाय समाजात आज दिसून येणारी फाटाफूट नाहीशी करून समाज एकसंध करण्याची ती नांदी ठरू शकेल.

बाराव्या शतकातील बसवादी शिवशरणांनी कर्नाटकाला विपुल वचनसाहित्य दिलेले आहे. ते वीरशैवधर्माचे अनुभाव साहित्य म्हणूनच सुप्रसिद्ध आहे. अशा या विपुल वचनसाहित्यात अनेक शिवशरणांनी आपल्या वचनांमध्ये संस्कृत सूक्तींचा भरपूर प्रमाणात वापर केला आहे. अशाप्रकारे वचनांमधून आलेल्या संस्कृत सूक्तींचे व वचनांच्या आध्यात्मिकतेचे योग्य प्रकारे आकलन करून घेण्यासाठी संस्कृत भाषेचा आणि वीरशैव संस्कृत शास्त्रग्रंथांचा अभ्यास करणे अनिवार्य आहे. समाजातील प्रत्येकाला संस्कृत भाषा शिकणे ही तितकीशी सोपी गोष्ट नाही. म्हणूनच समाजाचे प्रतिनिधी

असलेल्या पट्टाधिकाऱ्यांना व निरंजन (विरक्त) मूर्तींना समाजातील सद्भक्त सर्व सोयीसुविधा करून देऊन संस्कृतच्या उच्च अभ्यासासाठी काशीक्षेत्राला पाठवून देत असत. ती परंपरा आजही अस्तित्वात आहे. अशा रीतीने संस्कृतचे अध्ययन केलेल्या आणि सध्या करत असलेल्या सर्व वीरशैव मठाधिपतींनी वीरशैव शास्त्रग्रंथांच्या पार्श्वभूमीवर वचनांमध्ये असलेले अध्यात्मज्ञान स्वत: समजून घेऊन शास्त्र व अनुभावांमध्ये असलेल्या समन्वयाचा प्रचार केल्यास वीरशैवधर्मात निर्माण झालेल्या सर्व समस्यांना परिहार सापडेल व या सर्व पाठशाळांचे प्रयोजनही सिद्ध होईल.

अशाप्रकारे काशीमहापीठाने अनादी काळापासून संस्कृत भाषा व शास्त्रांच्या अध्ययनासाठी सर्वांना संधी प्राप्त करून दिली असून ते सनातन वीरशैवधर्माचे संरक्षणही करत आलेले आहे. अलीकडे गुरुकुलाच्या विद्यार्थ्यांना भोजन–निवासाच्या व्यवस्थेबरोबर शिष्यवृत्ती देण्याची सोयसुद्धा करण्यात आलेली आहे. समाजातील प्रतिभासंपन्न गरीब विद्यार्थ्यांना वैद्यकीय व अभियांत्रिकी शिक्षणासाठी शिष्यवृत्ती देण्यात येत आहे. पर्यटनासाठी येणाऱ्या सर्व धर्मांच्या भक्तांना येथे राहण्याची व महाप्रसादाची व्यवस्थादेखील करण्यात आलेली आहे. याशिवाय पुणे व लातूर या शहरांत विद्यार्थी वसतिगृहेसुद्धा सुरू करण्यात आलेली आहेत. तसेच प्राचीन शिवागमांचे संपादन करून व संशोधन करून राष्ट्रीय व आंतरराष्ट्रीय भाषांमध्ये त्यांचा अनुवाद व त्यांचे मुद्रण करून समाजामध्ये त्यांचा प्रचारही करण्यात येत आहे. अशा रीतीने काशीमहापीठ धर्म, शिक्षण, साहित्य आणि सामाजिक कार्ये करीत आज सर्व धर्मीयांच्या प्रशंसेला पात्र झालेले आहे.

या ग्रंथात काशीपीठाची परंपरा आणि ऐतिहासिक दाखल्यांचा समावेश केला गेलेला आहे. या व्यतिरिक्त गुरुकुलात शिकून गेलेल्या सर्व विद्यार्थ्यांची विस्तृत माहिती येथे देण्यात आलेली आहे. या ग्रंथाच्या परिशिष्टामध्ये श्री काशीपीठातील सर्व दानपत्रांचा इंग्रजी अनुवाद देण्यात आला आहे. काशीपीठाचा विश्वकोश असलेल्या या ग्रंथामध्ये जिज्ञासूंना विपुल माहिती मिळू शकेल यात शंका नाही.

काशी ज्ञानपीठ हे सर्वश्रेष्ठ गुरुकुल मानले जाते. अनादी कालापासून चालत आलेल्या ज्ञानपीठाच्या या विद्यादान परंपरेचे इ.स. १९१८ मध्ये तत्कालीन जगद्‌गुरू पंचाचार्यांनी एकत्र येऊन 'श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे नामकरण केले. त्या नामकरणाचा शतमानोत्सव समारंभ आता साजरा होत आहे. २००७ मध्ये श्रीकाशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या षष्ठ्यब्दिपूर्ती महोत्सवाच्या निमित्ताने गुरुकुलाचा अमृत महोत्सव साजरा करण्यात आला. त्यावेळी गुरुकुलातील विद्यार्थ्यांचा परिचयात्मक ग्रंथ 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या नावाने कन्नड भाषेमध्ये २००८ मध्ये प्रकाशित करण्यात आला. त्या ग्रंथाच्या निर्मितीमध्ये श्री ष.ब्र. डॉ. महादेव शिवाचार्य स्वामीजी (बबलेश्वर), श्री ष.ब्र. डॉ. शिवानंद स्वामीजी हिरेमठ (तुमकूरु), प्रो. ए. एस. हिरेमठ (राणेबेन्नुरू), श्री. एम.पी. एम. शांतवीरय्या (हरपनहळ्ळी), श्री. महाबळेश्वर बिळगी (हुब्बळी), या सर्व विद्वानांनी श्रीकाशीजगद्‌गुरू महास्वामीजींच्या नेतृत्वाखाली सर्वांचा परिचय मागवून घेऊन त्याला ग्रंथरूप दिले. या ग्रंथाचे मुख्य संपादक म्हणून डॉ. के. व्ही. रमेश, माजी निदेशक व केंद्र सरकारचे जॉइंट डायरेक्टर, सेंट्रल अर्कलॉजिकल सर्वे ऑफ इंडिया अँड डायरेक्टर डेप्युटी डिपार्टमेंट ऑफ ॲफिग्राफ, न्यू दिल्ली हे त्याचे प्रधान संपादक होते. त्यावेळी या ग्रंथाची मराठी आवृत्ती करणे शक्य झाले नव्हते. आता गुरुकुलाच्या शताब्दी महोत्सवाच्या निमित्ताने ती मराठीमध्ये प्रसिद्ध करीत आहोत.

लिं. प्राचार्य एम. एम. हिरेमठ यांनी आणि डॉ. इरेश स्वामी यांनी त्यांच्या धर्मपत्नी सौ. वसुधा इरेश स्वामी यांच्या सहकार्याने कन्नड ग्रंथाचा मराठी अनुवाद केला आहे. त्याचे संशोधन व परिष्करण करून २००८ ते २०२० पर्यंत नवीन प्रवेश घेतलेल्या विद्यार्थ्यांची माहिती आणि जुन्या विद्यार्थ्यांची अधिक मिळालेली माहिती हे सर्व त्यामध्ये समाविष्ट करून मराठी साहित्याचे गाढे अभ्यासक, शिवकवी डॉ. शेषनारायण देवाप्पा पसारकर यांनी अत्यंत परिश्रमाने या मराठी ग्रंथाचे संपादन केले आहे. या

संपादनकार्यामध्ये त्यांच्या सुविद्य पत्नी सौ. उषा पसारकर यांचे मोलाचे सहकार्य लाभले आहे. हा ग्रंथ प्रकाशित करताना पूर्वीच्या 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या नावात परिवर्तन करून 'श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल' या नावाने या ग्रंथाचे आम्ही प्रकाशन करीत आहोत. कन्नड ग्रंथातील प्रारंभीच्या भागाचा मराठी अनुवाद केलेले प्राचार्य एम. एम. हिरेमठ आणि उर्वरित भागाचा अनुवाद केलेले डॉ. इरेश स्वामी व त्यांच्या सुविद्य धर्मपत्नी सौ. वसुधा यांना अनंत मंगलाशीर्वाद प्रदान करीत आहोत.

या मराठी ग्रंथाचे अत्यंत परिश्रमाने शुद्धीकरण, परिष्करण व परिवर्धन करणारे डॉ. शे. दे. पसारकर व त्यांच्या सुविद्य धर्मपत्नी सौ. उषा या दांपत्याला अनंत मंगलाशीर्वाद प्रदान करीत आहोत. श्री जगद्गुरू विश्वाराध्य, काशी विश्वनाथ व माता अन्नपूर्णा या सर्वांना उत्तम आरोग्य उदंड आयुष्य प्रदान करोत हा मंगलाशीर्वाद!

अशा रीतीने अनेक लोकांच्या बौद्धिक परिश्रमामुळे प्रकाशित झालेल्या 'श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल' या ग्रंथाच्या वाचनाने प्रत्येक जिज्ञासू मराठी वाचक आपली ज्ञानतृष्णा भागवून तृप्त होवो, असा शुभाशय व्यक्त करून आम्ही आशीर्वचनाला विराम देतो.

।। ॐ शांतिः शांतिः शांतिः ।।

—इत्यनंत शिवाशिषः

१ जानेवारी २०२०
श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन,
जंगमवाडी मठ, श्रीक्षेत्र काशी, वाराणसी

# संपादकीय

## ('श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या कन्नड ग्रंथाचे संपादकीय)

'न हि ज्ञानेन सदृशं पवित्रमिह विद्यते।', 'ज्ञानं विज्ञानसहितं' या सूक्ती आम्ही भारतीय पुन:पुन्हा ऐकत आहोत, त्याला अनुमोदनही देत असतो. युगायुगापासून हे चालत आलेले आहे. गंगानदीच्या प्रवाहाप्रमाणे! भारताचे आंतरिक सत्त्व व स्वत्व हे धर्मनीती, ऋत, तप, अध्यात्म, मोक्ष मिळविण्याची तळमळ, त्याचबरोबर वेदागम, साहित्य, काव्य, नाटक, ललित कला, शौर्य, 'जितेन लभ्यते लक्ष्मी, मृतेनापि सुरांगना क्षणविध्वंसिनी काये का चिन्ता मरणे रणे' म्हणण्याचे धैर्य, अशाप्रकारे वैविध्य-वैशिष्ट्यमय असलेले या भूमीचे गुणविशेष लक्षणीय आहेत, गतकाळात जगामध्ये अन्य काही नसलेल्या गतकाळाच्या अनेक शतकांमध्ये आमच्यामधील प्रचलित सर्व वैभवाची नागरिकता (Civilization), त्याला आधारभूत ठरलेली मूल्याधारित संस्कृती (Culture), सामाजिक व वैयक्तिक मूल्ये, अशा प्रकारची अनेक श्रेष्ठ गुणवैशिष्ट्ये आमच्यात अभिमान निर्माण करणारी आहेत. मोक्ष हा सर्व भारतीयांना हवा असलेला अत्युच्च प्रकारचा पुरुषार्थ होय. या गोष्टीला आमच्या देशाची तीर्थक्षेत्रे, पूरक, पोषक, साहाय्यक असून त्याचे सोपान आहेत. मुख्यत: काशीक्षेत्र हे मुमुक्षू लोकांना (मोक्ष मिळवण्याची अपेक्षा असलेल्यांना) मुक्तिदायक पुण्यक्षेत्रच आहे. काशी हे जगातील अती प्राचीन शहर आहे, ते अविमुक्तक्षेत्र आहे. भगीरथाच्या तपश्चर्येमुळे गंगा उत्तरेकडून दक्षिणेकडे वाहात येऊन काशीमध्ये पुन: उत्तराभिमुखी होऊन वाहात असल्याचे या क्षेत्राचे वास्तुवैशिष्ट्यच होय. गंगानदीच्या पश्चिम किनाऱ्यावर काशी शहर आणि पूर्वदिशेला विशाल असे मोकळे क्षेत्र आहे. विश्वेश्वर, अन्नपूर्णा, सर्वमंगला, बिंदुमाधव यांशिवाय आदिशंकराने स्तुती केलेले काशीपुराधिनाथ कालभैरव- या देवतांच्या आलयाचे हे स्थान आहे. व्यासकाशी, मणिकर्णिका, हरिश्चंद्र घाट इत्यादी स्वर्गाचे दार उघडायला लावणारी स्नानाची पवित्र स्थळे

आहेत. अशा या सर्व स्थानांमध्ये ज्याचा समावेश होतो ते महत्त्वाचे स्थळ म्हणजे 'श्रीकाशीजंगमवाडी मठ' या नावानेच प्रसिद्धी पावलेले श्री काशीपीठ होय. हे संस्थान चरित्रे आणि इतिहासाच्या दृष्टिकोनातून अत्यंत प्राचीन आहे. शिवध्यानाचे मोक्षपर महत्त्व पूर्णपणे सत्यात उतरविण्याऱ्या जंगमांचे, तपस्व्यांचे, साधकांचे, विद्वानांचे व संस्कृतीच्या दैवी चेतनेचे प्रतिनिधित्व करणारे पवित्र स्थान हे श्रीपीठ आहे. आमच्या धार्मिक परंपरेने प्रतिध्वनित केल्याप्रमाणे ऐतिहासिक युगाच्या श्री काशीपीठाने प्रतिनिधित्व केलेल्या वीरशैवधर्माचा प्रचार कृतयुगातच प्रारंभ झालेला होता. काशीपीठाच्या परंपरेप्रमाणे कृतयुगात पंचाक्षरी शिवाचार्य, त्रेतायुगात पंचवक्त्र शिवाचार्य, द्वापरयुगात विश्वकर्ण शिवाचार्य, कलियुगामध्ये विश्वाराध्य शिवाचार्य यांनी प्रागैतिहास कल्पांमध्ये वीरशैवधर्माची संस्थापना करून तेव्हापासून ते बोध करीत आलेले आहेत. कलियुगातील विश्वाराध्य शिवाचार्यांचा अवतार म्हणजे एक प्रकारे काशीपीठाचे भावी ऐतिहासिक भवितव्यच, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही. कारण विश्वाराध्यांनी काशीच्या विश्वप्रसिद्ध विश्वेशलिंगातून अवतार घेऊन आपल्या धार्मिक कार्याचा प्रारंभ त्यांनी काशीक्षेत्रातच केला.

हा मुळीच आश्चर्यकारक अथवा अनैतिहासिक विषय नाही. कारण काशीक्षेत्र काही प्रागैतिहासिक व ऐतिहासिक दृष्टीने जगाच्या काही मोजक्या अतिप्राचीन धार्मिक क्षेत्रांपैकी एक आहे. इतिहासाच्या दृष्टीने निश्चितपणे सांगावयाचा सत्यांश म्हणजे वीरशैव पंचपीठांपैकी एक असलेल्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाच्या जंगमवाडी मठाने म्हणजेच काशीपीठाने खास अशी प्राचीन ऐतिहासिक परंपरा जपली आहे. काशीपीठात उपलब्ध असलेल्या ऐतिहासिक पुराव्यांच्या आधारे सांगावयाचे झाल्यास हे काशी ज्ञानपीठ सहाव्या शतकाच्या पूर्वीपासून कार्यरत होते हे मात्र नक्की. ही सत्य घटना आम्हाला ज्ञात झाल्याबद्दलचा पुरावा म्हणजे काशी नरेश जयनंददेव याने विक्रम संवत ६३१ मध्ये (म्हणजे इ.स. ५७४ मध्ये) त्या प्रदेशात उत्तराभिमुखी वाहत असलेली गंगानदी व कर्दमेश्वर देवालय यांच्यामधील विशाल

मोकळा भूभाग काशीपीठाला दान म्हणून दिलेला होता, हे ऐतिहासिक सत्य आहे. त्या वेळी काशीक्षेत्र ज्ञानपीठ अलंकृत केलेले जंगम जगद्गुरू श्रीमल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य महास्वामीजी हे होत (मल्लिकार्जुन जंगम). यांनी इ.स. ५५३ ते ६७४ पर्यंत १२१ वर्षांपर्यंत हे पीठ भूषविले. अशा रीतीने ५१व्या जगद्गुरूंचा कालखंड जर इतका पूर्वीचा असेल तर काशीपीठ अत्यंत प्राचीन असल्याचे शतश: सिद्ध होत नाही काय? या प्राचीनतेला अलाहाबाद हायकोर्टाचा दुजोरा मिळाला ही गोष्ट आणखीनच पुष्टी देणारी आहे. ज्यावेळी या न्यायालयाचा शतकोत्सव समारंभ सन १९६५च्या डिसेंबर २५, २६ व २७ रोजी साजरा केला गेला त्यावेळी मागील अभिलेखांचे (रेकॉर्डस्‌चे) प्रदर्शनही भरविण्यात आले होते. काशीपीठाला काशीच्या जयनंददेव या राजाने दिलेले दानपत्रही या प्रदर्शनात ठेवले होते हे विशेष होय (१९६५च्या एप्रिलमध्ये प्रकाशित झालेल्या सन्मार्गपत्रिकेवरून संग्रहित केलेली माहिती).

जेथे पावन गंगा उत्तराभिमुख होऊन वाहते, ब्राह्मीमुहूर्तावर स्नान करून तेथे तिच्या काठावर बसून लिंगपूजा (अथवा संध्यावंदन) करताना सूर्याचे पहिले किरण अनायासे त्या व्यक्तींवर पडतात. अशाप्रकारे काशीक्षेत्राला नैसर्गिक अशा वास्तुशास्त्राची अनुकूलता लाभलेली आहे. अशा पुण्यक्षेत्री अनादी काळापासून कार्यरत असलेल्या जंगमवाडी श्री काशीपीठाला खरोखरच ऐतिहासिक महत्त्व आहे. वाराणसी क्षेत्रात ह्या जंगमपीठाची स्थापना झाल्याची संगती वैशिष्ट्यपूर्ण आहे. 'ज्ञानमिच्छेत्तुशंकरात्' या उक्तीप्रमाणे ज्ञानदायक, सर्वज्ञ व जगद्गुरू असलेल्या शिवाचा येथे नित्य निवास असल्यामुळे, ती ज्ञाननगरी म्हणूनच ख्याती पावलेली आहे. देशाच्या अनेक भागांतून आणि परदेशातूनसुद्धा उच्च संस्कृत विद्याभ्यासासाठी अनेक जण भूतकाळापासून अव्याहतपणे या ज्ञाननगरीला येतच असतात. जगात कोठेही संस्कृत भाषेच्या माध्यमातून अभ्यास केला तरी शेवटी काशीला येऊन विद्याभ्यास केल्यासच त्याला पूर्णत्व येते. म्हणूनच आदिशंकराचार्य व रामानुजाचार्य यांनीसुद्धा काशीला येऊन उपनिषदांवर आणि ब्रह्मसूत्रांवर सिद्धान्तपर भाष्ये लिहिली.

आधुनिक काळात ब्रिटीश आणि जर्मनांनी सुद्धा काशीक्षेत्रात येऊन संस्कृतचे अध्ययन करून वैदिक साहित्याचे भाषांतर इंग्रजी व जर्मन भाषांत केलेले आहे. एवढेच नव्हे तर मुसलमान लोकांनीसुद्धा संस्कृत शिकून उपनिषदांचा अभ्यास केलेली नगरी म्हणजेच काशी! म्हणूनच मॅक्सम्युलरसारख्या जगप्रसिद्ध विद्वानांनी या विद्यानगरीची प्रशंसा करणे साहजिकच आहे.

अशा जगप्रसिद्ध विद्यानगरी काशीमध्ये असलेल्या वीरशैव पंचपीठांपैकी एक असलेले श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन काशीइतकेच प्राचीन आहे. या ज्ञानसिंहासनामध्ये अनादी काळापासूनच अनेक विद्यार्थी विविध शास्त्रे, कला व संस्कृत भाषा शिकून गेलेले आहेत. काशीपीठ हे अती प्राचीन असल्याकारणाने, त्या विद्यापीठात पूर्वीपासून शिकून गेलेल्या विद्यार्थ्यांची संपूर्ण माहिती, यादी किंवा त्यांच्या जीवनाबद्दलचे विवरण उपलब्ध होऊ शकत नाही, यात आश्चर्य नाही. तथापि काशीपीठात प्रवेश घेतलेल्या सर्व विद्यार्थ्यांना अध्यापनाबरोबरच भोजन व वसतीची व्यवस्था उपलब्ध होती ही अत्यंत प्रशंसनीय बाब होय.

आताच सांगितल्याप्रमाणे काशीपीठातील सर्व विद्यार्थ्यांची सविस्तर माहिती उपलब्ध होऊ शकत नसली तरी, मिळालेल्या त्यांच्या दाखल्यांवरून (Leaving Certificates) काही जणांची माहिती मिळविण्याचा प्रयत्न पुढे केलेला आहे. या पीठाचे अध्यक्षपद भूषविलेल्या आतापर्यंतच्या सर्व ८५ जगद्गुरूंचे परंपरागत दाखले या पीठामध्ये आहेत. बहुतेक हे सर्व जगद्गुरू काशीज्ञानपीठाच्या जंगमवाडी मठातच शिकलेले होते. या गोष्टीला पुरेशी कारणेही आहेत.

**जंगमवाडी मठातील विद्यार्थ्यांचे उपलब्ध दाखले**

काशीपीठाचे ८२ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामींनी सन १८८५ पासून ते १८९७ पर्यंत १२-१३ वर्षे अत्यंत यशस्वीपणे शिकून शिक्षण पूर्ण केले. एवढेच नव्हे तर सन १९०७ मध्ये काशीपीठाच्या जगद्गुरुपदावर विराजमान झाले. ते केवळ परंपरागत संस्कृत विद्वान होते. इतकेच नव्हे, तर ते ऐतिहासिक प्रज्ञा असलेले सुद्धा होते.

म्हणूनच त्यांनी त्यावेळी काशीपीठात उपलब्ध झालेले सर्व दाखले गोळा करून ते प्रसिद्ध करण्याचे कार्य हाती घेतले. आपल्या पूर्वी काशीजंगमवाडी मठात राहून शिकलेले आणि आपल्यासमवेत राहून शिकलेले विद्यार्थी पुढे भविष्यात कोठे कोठे मठाधिपती झाले किंवा शास्त्री बनले याबद्दलची माहिती संग्रहित करून त्यावेळी त्यांनी त्यांचा प्रचार व प्रसार केलेला आहे.

त्यांनी प्रसिद्ध केलेले दाखले मैसूरच्या 'पंचाचार्यप्रभा' पत्रकात आणि काशीपीठाने काढलेल्या जाहिरातपत्रकामध्ये आजही पाहावयास मिळतात. शिवाय श्रीगुरुदर्पण (श्रीपंचाचार्य इलेक्ट्रिक प्रेस, मैसूर, १९५३), बेळगु (सुवर्ण महोत्सव समिती, शिवयोगमंदिर, १९६०), पुण्यश्लोक वारद (ना. रा. बामणगावकर, वारद स्मारक मंडळ, सोलापूर, १९४९) आणि बबलेश्वर शिवयोगीगळु (डॉ. ज. च. नि., श्री. ब. शि. ग्रंथप्रकटन समिती, श्री गुरुपादेश्वर बृहन्मठ, बबलेश्वर, १९७६) या ग्रंथांमध्येही काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन केलेल्या विद्यार्थ्यांचे पुरावे आजही पाहावयास मिळतात. या सर्व पुराव्यांच्या आधारे संग्रहित केलेल्या जगद्गुरूंची, मठाधिपतींची, शास्त्रींची व कलाकारांची नावे आणि त्यांचे विवरण येथे देणे अप्रस्तुत ठरणार नाही. (या संपादकीय लेखानंतर मुद्रण झालेल्या पृष्ठांमध्ये काशीपीठाच्या विद्यार्थ्यांची प्रदीर्घ यादी व विवरण देण्यात आल्यामुळे, येथे फक्त काही जणांच्या संबंधीच सविस्तर माहिती दिलेली आहे.)

आम्हाला मिळालेल्या दाखल्यांवरून १८०१ साली गरगचे श्री मडिवाळ शिवयोगी यांनी काशी जंगमवाडी मठात प्रवेश घेऊन १० वर्षांपर्यंत विविध शास्त्रांचा अभ्यास करून अतिशय पांडित्य संपादन करून कित्तूरला ते परत आले. वीर, वैराग्यशील अशा त्या शिवयोगींनी अनेक चमत्कार केल्याबद्दल कर्नाटकाला त्यांचा अभिमान वाटतो. अशाप्रकारे आपल्या तपःसामर्थ्याने व ज्ञानाने काशीपीठाला त्यांनी कीर्ती मिळवून दिली आहे.

१८५६ साली काशी जंगमवाडी मठात राहून शिकलेले बळ्ळारी जिल्ह्यातील हरपनहळ्ळी तालुक्याच्या गजापूर गावाचे सुलीपल्लदेव मठाचे वे. शांतवीरय्या आणि सौ. पार्वतम्मा यांचे सुपुत्र गजापूर कोट्रप्पय्या शास्त्रीजी

पुढे रंभापुरी पीठाचे ११६ वे पीठाधिपती झाले आणि ते श्रीजगद्गुरू वृषभराजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी म्हणून प्रसिद्ध झाले, ही काशीपीठाला अभिमानाची गोष्ट आहे.

त्याचप्रमाणे बळ्ळारी जिल्ह्याच्या कूड्लगी तालुक्यातील तुंबरगुद्दी गावचे पं. विरूपाक्ष शास्त्रीजींनी १८८१ मध्ये जंगमवाडी मठात राहून अध्ययन केले. १९०६ मध्ये उज्जयिनी महापीठाचे १०७ वे स्थिर पट्टाधिकारी होऊन श्री १००८ जगद्गुरू चन्नबसव शिवाचार्य महास्वामीजी या नावाने प्रसिद्ध झाले.

नंतर पं. नीलकंठ शास्त्री, विजयपूर; पं. शंकर शास्त्री, हुब्बळ्ळी; पं. काशीनाथ शास्त्री, अब्बीगेरी; पं. पंचाक्षरी शास्त्री, कोल्हापूर; पं. नंजुंड स्वामी, बेंगळूरु; पं. नागलिंग शास्त्री, सोलापूर; पं. सिद्धशास्त्री, सोलापूर; पं. सोमनाथ शास्त्री, तल्लूर; श्री संगनबसव स्वामी, हुळकेरी; चरमूर्ती स्वामी, गुळेद्गुड्ड; वीरभद्र शास्त्री, जालवाडिगी इत्यादी सर्वजण काशी जंगमवाडी मठात राहून पांडित्य संपादन करून प्रख्यात झालेले आहेत.

याचप्रकारे काशीपीठात शिकलेले अनेक शास्त्रसंपन्न स्वामीजी सुप्रसिद्ध विरक्त आणि गुरुस्थलमठांचे अधिपती झाले आहेत. त्यांच्यापैकी गदगचे पं. जयदेव शास्त्रीजी चित्रदुर्ग बृहन्मठाला, मंगळूरचे पं. वीरप्पा शास्त्रीजी, हुबळ्ळी मूरुसाविर मठाला, पं. लिंगमरीदेव अनंतपूरच्या चित्रदुर्ग मुरुघा विरक्त मठाला, पं. भीमाशंकर शास्त्रीजी उमरावतीच्या गुरुस्थलमठाला, पं. हुच्चप्पादेवरू हुच्चेश्वर कमतगी विरक्त मठाला, पं. चंद्रशेखर शास्त्रीजी अब्बीगेरीच्या गुरुस्थल मठाला, पं. महालिंग शास्त्रीजी यमनूर, कडेनंदीहळ्ळी गावच्या गुरुस्थलमठाला पं. नंजुंड शास्त्रीजी निड़ुमामिडीच्या करबसवस्वामी मठाला मठाध्यक्ष झाले व त्यांच्या कार्यकाळामध्ये त्यांनी मोठ्या प्रमाणात धर्मजागृतीचे कार्य केलेले आहे.

याशिवाय काशीपीठात अध्ययन केलेल्या बेनकनहळ्ळीचे विद्वन्मणी वे.पं. गुरुमूर्ती शास्त्रीजी हे बागलकोटच्या बसवेश्वर संस्कृत पाठशाळेमध्ये, वे.पं. अप्पय्या शास्त्रीजी हे हावेरी पाठशाळेमध्ये, वे.पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी

हे गदग पाठशाळेमध्ये, पडेकनूर वे.पं. रेवणसिद्ध शास्त्रीजी हे अब्बीगेरीच्या संस्कृत पाठशाळेमध्ये, नालवारचे वे.पं. जगदीश शास्त्रीजी मणूर आणि वे.पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी सोलापूरच्या श्रीमद्वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेमध्ये, कोंगवाडचे वे.पं. वीरभद्र शास्त्री कोप्पळीच्या पाठशाळेत, इटगीचे वे.पं. सोमनाथ शास्त्रीजी व उमचिगीचे वे.पं. शंकरशास्त्रीजी श्रीमद्वीरशैव शिवयोगमंदिर पाठशाळेमध्ये, वे.पं. जगन्नाथ शास्त्रीजी कंप्लीच्या सांगत्रय पाठशाळेमध्ये, कोडीकोप्पचे वे.पं. बसवराज शास्त्रीजी हालकेरी पाठशाळेमध्ये आणि हुक्केरीचे पं. सदाशिव शास्त्रीजी निडसोसी पाठशाळेमध्ये प्राध्यापक म्हणून आपली सेवा रुजू करून जगन्मान्य झाले आहेत.

अज्जंपूरचे वे.पं. उमापती शास्त्री, हरिहरचे वे.पं. चिदानंद शास्त्रीजी, नलवडीचे वे.पं. श्रीकंठ शास्त्री, तेलगीचे वे.पं. चंद्रशेखर शास्त्री व वे.पं. रुद्रप्पा शास्त्री, यलगोडचे वे.पं. शिवशंकर शास्त्री, मुनवळ्ळीचे वे.पं. चन्नबसव शास्त्री, नंदीकोट्कूरचे वे.पं. नीलकंठ शास्त्री, महाराष्ट्राचे वे.पं. बापूशास्त्री सेलू, आलदकट्टीचे वे.पं. बसवराज शास्त्री, इटगीचे राचोट शास्त्री, बाडचे रुद्रप्पा शास्त्री, शिकारीपूरचे वे.पं. गुरुशांत शास्त्री, करडीचे वे.पं. इंदुधर शास्त्री, मरिगुड्डीचे वे.पं. शंकर शास्त्री, चिक्कबळ्ळापूरचे वे.पं. शंकर शास्त्री, कोंगवाडचे वे.पं. गंगाधर शास्त्री हे सगळे काशी जंगमवाडी मठातच शिकून, तेथून परत गेल्यानंतर त्यांनी आपापल्या क्षेत्रांत पाठ-प्रवचन-पुराण इ. सांगत जीवनभर धर्मजागृतीचे कार्य केलेले आहे.

आणखी सांगावयाचे झाल्यास, यक्कुंडीचे श्री वे.पं. गुरुसिद्धदेव, ममदापूरचे वे.पं. महादेव मरीदेव, हुलीचे वे.पं. चरमूर्ती स्वामीजी, सूडीचे पं. श्रीकंठ शास्त्रीजी, त्याच सूडीचे वे.पं. उमापती शास्त्रीजी, नागनूरचे वे.पं. काशीनाथ शास्त्रीजी, सुणकल् बिदरीचे वे.पं. हरेश्वर शास्त्री, मल्लापूरचे वे.पं. राजेश्वर शास्त्री, मैसूरचे वे.पं. गौरीशंकर शास्त्री, कोतबाळचे वे.पं. नागभूषण शास्त्री, सावळगीचे वे.पं. शिवलिंगदेव, कोंडगलचे वे.पं. विरूपाक्ष शास्त्री, पगडदिन्नीचे कलीगणनाथ शास्त्री, नांदेडचे वे.पं. सोमनाथ शास्त्री, आप्सरीचे वे.पं. विश्वनाथ शास्त्री, दोड्डेरीचे बसवराज शास्त्री, जिंतूरचे वे.पं. सांब मरीदेव,

पुण्याचे वे.पं. विश्वनाथ शास्त्री, मसगुप्पीचे वे.पं. संगमेश्वर शास्त्री, कोंकणच्या कापीचे वे.पं. शिवशंकर शर्मा इत्यादी अनेक विद्वान काशीक्षेत्री येऊन, येथील जंगमवाडी मठात राहून अनेक शास्त्रांचा अभ्यास करून आपापल्या भागांमध्ये भविष्यात मठाधिपती, सुप्रसिद्ध शास्त्री झाले व समाजाला धर्म, संस्कृती व तत्त्वशास्त्राविषयी ज्ञान देण्याचे महान कार्य केले.

### गुरुकुलाचे नामकरण

प्राचीन काळापासून देशाच्या विविध भागांतून असंख्य विद्यार्थी काशीक्षेत्रात येत. प्रख्यात अशा काशीपीठात प्रविष्ट होऊन वेद-वेदांगांच्या बरोबर संगीत व नृत्यकलेचे उच्च शिक्षण घेत. त्यांना अनुकूलता मिळावी या हेतूने त्या विद्यार्थ्यांना वसती व भोजनाची व्यवस्था काशीपीठाने केली, ही अती महत्त्वाची विद्यासेवाच म्हणावी लागेल. काशीजंगमवाडी मठात राहून अध्ययन केलेल्या वरील अनेक पीठाचार्यांची, मठाधिपतींची व प्रसिद्ध शास्त्रीजनांची यादी पाहिल्यास असे दिसून येते की, या ज्ञानपीठाने एवढ्या विद्यार्थ्यांना आश्रय देऊन त्यांना ज्ञान प्रदान केल्यामुळे त्याचे 'ज्ञानपीठ' हे नाव खरोखर सार्थ आहे, हे सत्य कुणीही नाकारू शकत नाही. वर उल्लेखिलेल्या स्वामी व विद्वानांपैकी अनेक जण सन १९१८ पूर्वीच काशीच्या जंगमवाडी मठात राहून अध्ययन पूर्ण करून गेलेले आहेत.

हा विषय लक्षात घेऊन काशीपीठाचे ८२ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांनी नवीन योजना आखण्याचा निर्णय घेतला. त्यांच्या योजनेप्रमाणे काशी जंगमवाडी मठात विद्यार्थी शिकून गेले, असे म्हणण्यापेक्षा काशीपीठाच्या गुरुकुलातून शिकून गेले, असे म्हणणे अधिक अर्थपूर्ण होईल असा त्यांचा विचार होता. आपल्या योजनेला प्रत्यक्ष रूप देण्यासाठी सन १९१० मध्ये महाशिवरात्रीच्या धर्मसभेमध्ये पीठाधिपतींनी श्रीकाशी वीरशैव विद्याधर्माभिवृद्धी फंड या नावाने आर्थिक संस्था स्थापन केल्याचे जाहीर केले. एवढेच नव्हे तर त्या निधीला काशीपीठाकडून १०,००५ रुपये आशीर्वादरूपाने दिले. त्यांच्या

योजनेप्रमाणे काशी जंगमवाडी मठात आणि कर्नाटक, महाराष्ट्र व आंध्रप्रदेश इ. मठांतसुद्धा गुरुकुल किंवा पाठशाळा स्थापन करण्यासाठी या निधीचा वापर करावयाचा होता. या बृहद्योजनेला हवा असलेला निधी संग्रह करण्याची जबाबदारी त्यावेळी मठात राहून अध्ययन करीत असलेल्या श्री गुरुसिद्ध शिवाचार्य पारगाव, श्री गंगाधर शिवाचार्य मालगाव, श्री हुच्चेश्वर स्वामी कमतगी, श्री गुरुसिद्धदेव यक्कुंडी, पं. सदाशिव शास्त्री अब्बीगेरी, पं. कलिगण शास्त्री, पगडदिन्नी आणि पं. भालाक्ष शास्त्री या सर्वांवर सोपवून, त्यांना समितीचे व्यवस्थापक सदस्य म्हणून नेमून विद्याधर्माभिवृद्धीच्या निधीच्या (फंडाच्या) कार्याला उत्तेजन दिले.

पुढे इ.स. १९१८ साली काशी महापीठामध्ये भरलेल्या श्रीजगद्गुरू पंचाचार्यांच्या संमेलनाचे स्मारक म्हणून श्रीजगद्गुरू पंचाचार्यांच्या अमृतहस्ते दि. २३.३.१९१८ रोजी पीठातील प्राचीन गुरुकुलाचे 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे विधिवत् नामकरण करण्यात आले. या गुरुकुलाने तेव्हापासून आजवर अनेक महान पंडितांना तयार करण्याकामी महत्त्वाची भूमिका वठविली आहे.

या गुरुकुलाचे नामकरण होऊन ८९ वर्षे पूर्ण झाली आहेत. त्याकरिता त्याचा अमृतमहोत्सव अत्यंत भव्य रीतीने साजरा करून, त्यानिमित्ताने एक स्मरणग्रंथ प्रसिद्ध करण्याच्या हेतूने हा उपक्रम हाती घेण्यात आलेला आहे. या ग्रंथात सन १९१८ पूर्वी शिकलेल्या विद्यार्थ्यांचे आणि १९१८ मध्ये गुरुकुलाचे नामकरण झाल्यानंतर येथून शिकून गेलेल्या विद्यार्थ्यांचे दाखले विविध स्रोतांकडून संग्रहित करून छापण्यात आले आहे. यांपैकी काही जणांची संपूर्ण माहिती उपलब्ध झाली आहे, तर इतर काही जणांची अपूर्ण स्वरूपात माहिती मिळाली आहे आणि आणखी अनेकांचे कोणतेही विवरण उपलब्ध न झाल्यामुळे फक्त त्यांच्या नावांची नोंद या ठिकाणी करण्यात आली आहे. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचा दाखलात्मक ग्रंथ आता पहिल्याच वेळी येत असल्यामुळे आतापर्यंत मिळालेली माहिती संग्रहित करून या ठिकाणी तिचा समावेश करण्यात आला आहे. हे कार्य

येथेच न थांबवता नंतरच्या भविष्यात तेथून सोडून गेलेल्या इतर व्यक्तींची माहितीसुद्धा गोळा करण्याचा प्रयत्न करून त्याचे पुनर्मुद्रण करण्याचा उद्देश तर आहेच. सध्या मिळालेल्या गुरुकुलाच्या विद्यार्थ्यांची माहिती, गुरुकुलातील त्यांच्या प्रवेश घेतलेल्या वर्षांच्या आधारे, त्याची क्रमबद्ध मांडणी करण्यात आली आहे.

हे संपादकीय लेखन वाचलेल्यांना काशीमहापीठाच्या गुरुकुलाच्या नामकरणापूर्वी व नामकरणानंतरच्या प्रदीर्घ काळामध्ये वीरशैवधर्माची व इतर शास्त्रे आणि कवि–काव्य–कलेची वृद्धी करण्याकामी काशीपीठाने केलेल्या अमूल्य सेवेची माहिती झाल्याशिवाय राहणार नाही. प्राचीन काळापासूनच काशीनगरीने 'विद्यानगरी' म्हणून नाव संपादिलेली घटना अन्वर्थक अशी आहे. त्यामागे काशीपीठाची अथक साधना आहे.

'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या महत्त्वाच्या कृतीच्या प्रधान संपादकत्वाची जबाबदारी सोपवल्याबद्दल श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींना मी कृतज्ञतापूर्वक भक्तिवंदन समर्पित करतो. या कार्यात अतिशय कष्ट घेऊन श्रद्धेने सेवा केलेल्या संपादक मंडळाचे सदस्य श्री ष.ब्र. डॉ. महादेव शिवाचार्य स्वामीजी, बबलेश्वर; श्री ष.ब्र. डॉ. शिवानंद शिवाचार्य स्वामीजी, तुमकूर; प्रा. अ. सि. हिरेमठ, राणेबेन्नूर; श्री. एम. पी. एम. शांतवीरय्या, हरपनहळ्ळी; श्री. महाबळेश्वर बिळगी, नवनगर, हुब्बळी या सर्वांना धन्यवाद!

मैसूर, १४.५.२००८

**के. व्ही. रमेश**
माजी निदेशक,
निवृत्त संयुक्त महानिदेशक
भारतीय पुरातत्त्व सर्वेक्षण, दिल्ली

# संपादकीय भूमिका

रंभापुरी, उज्जयिनी, केदार, श्रीशैल आणि काशी ही पंचपीठे समस्त वीरशैवांची श्रद्धास्थाने होत. काशी ही विद्या आणि धर्म यांची नगरी आहे, अशी प्राचीन काळापासून काशीची ख्याती आहे. त्यामुळे आद्य शंकराचार्य, रामानुज या दाक्षिणात्य तत्त्ववेत्त्यांनी काशीत येऊन आपल्या भाष्यांची रचना केली आणि ती जगन्मान्य झाली. महाराष्ट्रातील संत एकनाथांनी देखील काशीत राहूनच मराठीत आपल्या भागवताची (एकनाथी भागवत) रचना केली आणि काशीच्या पंडितांनी त्या रचनेची प्रशंसा करून तिला मान्यता दिली. मराठी कवी शिवदास गोमा याने 'काशीखंड' नामक ओवीबद्ध ग्रंथाची रचना करून काशीचे माहात्म्य महाराष्ट्रातील लोकांच्या मनांवर ठसवले. त्यामुळे सर्व पीठे श्रद्धास्थाने असली तरी मराठी वीरशैवांची धाव काशीपीठाकडे अधिक असते. एकदा काशीयात्रा केली की आपण धन्य झालो, अशीच भावना मराठी लोकांच्या मनीमानसी सदैव नांदत असते. काशीपीठात मराठी माणसांचा आणि मराठी भाषेचा अधिक वावर आहे, याचे हे कारण होय. त्यामुळेच महाराष्ट्रात अन्य जगद्गुरूंपेक्षा श्रीकाशी- जगद्गुरूंचा धर्मप्रसार दौरा अधिक प्रमाणात होताना दिसतो.

कर्नाटक, आंध्र, तेलंगणा, महाराष्ट्र या विविध प्रदेशांतून आलेले आणि श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अध्ययन करून विविध शास्त्रांत विद्वत्ता संपादन केलेले अनेक शिवाचार्य काशीपीठाच्या जगद्गुरुपदी विराजमान झाले. त्यांनी त्यांच्या काळात केलेले कार्य उल्लेखनीय आहे. काशीपीठाचे ८२ वे जगद्गुरू श्री शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी हे सोलापूरचे होते. त्यांच्या कार्यकाळात काशीत जगद्गुरू पंचाचार्य संमेलन, गुरुकुलाचे नामकरण, काशी हिंदू विश्वविद्यालयाला भूमिदान इ. घटना घडल्या. त्यांच्यानंतर त्यांचे शिष्य ८३ वे जगद्गुरू श्री पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी हे तासगाव (जि. सांगली) येथील होते. त्यांनी काशीपीठाला मिळालेली

दानपत्रे अलाहाबाद हायकोर्टात सादर करून काशीपीठाची सर्व मालमत्ता लिलाव होण्यापासून वाचवली.

काशी ही विद्यानगरी आहे, पण त्याबरोबरच ती भारताची सांस्कृतिक राजधानीदेखील आहे. अशा नगरीत स्थित असलेले 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन' हा सर्व भारतीय आणि अन्य देशीय वीरशैवांच्या अत्यंत श्रद्धेचा विषय आहे. या पीठावर होऊन गेलेले सर्व जगद्गुरू ज्ञानी, तपस्वी आणि भक्तवत्सल होते. विद्यमान श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या रूपाने सर्व पूर्व जगद्गुरूंचे ज्ञान, तपस्या आणि भक्तवत्सलता समूर्त झालेली आपण पाहत आहोत. धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक, सांस्कृतिक अशा विविध अंगांनी काशीपीठाचे कार्य विस्तारलेले आहे. परंतु काशीपीठ हे ज्ञानसिंहासन असल्यामुळे ज्ञानसंवर्धनाचे कार्य या पीठाकडून अधिक घडलेले आहे. 'श्री काशी विश्वाराध्य गुरुकुल' हे त्याचेच मूर्तिमंत उदाहरण होय.

'गुरूचे घर म्हणजे विद्येचे आगर' या दृढ भावनेमुळे गुरूच्या घरी जाऊनच विद्या ग्रहण करण्याची प्राचीन काळात पद्धत होती. गुरुकुलाचा उगम त्यातूनच झाला. ज्ञान आपल्यापर्यंत सहज येत नाही, तर आपल्यालाच ज्ञानापर्यंत जावे लागते. म्हणजेच ज्यांनी ज्ञान संपादन केलेले आहे अशा गुरूपर्यंत जावे लागते. अशा गुरूंचा निवास जेथे जेथे आहे तेथे तेथे गुरुकुले निर्माण झाली. काशीपीठाने तर ज्ञानदानाचा वसाच घेतला होता. साहजिकच श्रीकाशीजगद्गुरूंच्या चरणांशी नतमस्तक होऊन विद्या ग्रहण करण्याची परंपरा काशीपीठात प्राचीन कालापासून अस्तित्वात आली. त्यावेळी गुरुकुलाला वेगळे नाव नव्हते. परंतु ज्ञानदानाची अक्षुण्ण धारा तेथे प्रवाहित होतीच. काशीपीठाचे ८२ वे जगद्गुरू श्री शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांनी इ.स. १९१८ मध्ये काशीपीठात 'जगद्गुरू पंचाचार्य संमेलन' घेतले, त्यावेळी त्या संमेलनाचे स्मारक म्हणून काशीपीठातील प्राचीन गुरुकुलाचे 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे नामकरण करण्यात आले आणि 'गुरुकुलम्' अशी अक्षरे कोरलेली शिला जगद्गुरू पंचाचार्यांच्या अमृतहस्ते

स्थापिली गेली.

हे नामकरण होण्यापूर्वीही अनेक विद्यार्थी काशीपीठातील गुरुकुलात शिकून गेले. त्यानंतरच्या काळातही शिकून गेले आणि आजदेखील शिकत आहेत. जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी त्यावेळी गुरुकुलात शिकून गेलेल्या विद्यार्थ्यांची एक यादी मैसूरच्या 'पंचाचार्य प्रभा' या नियतकालिकात प्रकाशित केली होती. काशीपीठातील गुरुकुलाचा इतिहास संग्रहित करण्याचा तो पहिला प्रयत्न होता. त्या प्रयत्नालाच विद्यमान श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी प्रस्तुत ग्रंथाच्या रूपाने सुघटित रूप दिले आहे.

२००७ मध्ये श्रीकाशीमहास्वामीजींचा षष्ठ्यब्दिपूर्ती समारंभ काशीपीठात साजरा झाला. त्या निमित्ताने गुरुकुलातील विद्यार्थ्यांची सर्व माहिती संग्रहित करून, ती व्यवस्थित संपादित करून 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' हा कन्नड ग्रंथ २००८ मध्ये शैवभारती शोधप्रतिष्ठानने प्रकाशित केला. कन्नड वाचकांपर्यंत ही माहिती पोहोचली, परंतु ती मराठी वाचकांपर्यंत पोहोचली पाहिजे अशी श्रीकाशीमहास्वामीजींची तीव्र इच्छा होती. कन्नड लिपी आणि भाषा अवगत नसल्यामुळे आम्ही हतबल होतो. परंतु कन्नड-मराठी अभ्यासकांकडून श्रीसिद्धरामेश्वरांच्या निवडक कन्नड वचनांचा मराठी अनुवाद करवून घेऊन, तो संस्कारित करून संपादित करण्याचा अनुभव माझ्या गाठीशी होता.[१] त्यामुळे परमपूज्य महास्वामीजींनी हे काम माझ्यावर सोपवले. एखाद्या कन्नड जाणकाराला हा ग्रंथ दाखवून 'अनुवाद कराल का?' असे विचारल्यावर तो त्या ग्रंथाची जाडी पाहूनच 'नाही जमणार' असे सांगत असे.

अखेर पुण्याच्या श्री. भीमाशंकर सोलापुरे यांनी एका कन्नड विद्यार्थ्याला तो ग्रंथ वाचायला सांगून त्याने सांगितलेल्या मराठीत सर्व माहिती लिहून काढली. ते सर्व हस्तलिखित बाड पूज्य महास्वामीजींनी २००९ मध्ये माझ्याकडे सोपवले. ते चाळल्यावर मी थक्क झालो. सोलापुरे काका खरे तर

---

१. श्री सिद्धरामेश्वरांची वचने, खंड १,
श्रीसिद्धेश्वर देवस्थान पंचकमिटी, सोलापूर, १९९८

छान मराठी लिहिणारे. परंतु त्यांना कन्नड विद्यार्थ्यांनी ज्या मराठीत सांगितले ते त्याच भाषेत जसेच्या तसे काकांनी लिहून काढले होते. तो सर्व मजकूर शुद्ध करणे अशक्य होते. पूज्य महास्वामीजींना मी तसे सांगितले आणि ते काम बाजूला पडले.

त्यानंतर श्री. रे. रा. मगाई आणि श्री. शिवशरण कंबाळेमठ या स्नेह्यांसोबत चर्चा करून मैंदर्गी (ता. अक्कलकोट, जि. सोलापूर) येथील प्राचार्य एम्. एम्. हिरेमठ यांच्याशी संपर्क साधला. ते कन्नड–मराठीचे जाणकार होते. त्यांनी हे काम स्वीकारले आणि पूज्य महास्वामीजींचे आशीर्वचन, डॉ. के. व्ही. रमेश यांचे संपादकीय आणि 'श्री काशीपीठ : परंपरा आणि इतिहास' हे पहिले प्रकरण एवढ्या भागाचा त्यांनी उत्तम मराठी अनुवाद करून दिला. दुर्दैवाने ते मेंदूच्या आजाराने ग्रस्त झाले आणि 'यापुढे माझ्याकडून अनुवाद होणे अशक्य' असे सांगून त्यांनी अनुवादित मजकूर आणि कन्नड ग्रंथ हे साहित्य परत केले. आम्ही पुन्हा काळजीत पडलो. श्री. ए. जी. पाटील यांच्या संतोषनगरातील घरी पूज्य महास्वामीजींचा मुक्काम होता. त्यांच्याकडे जाऊन मी सर्व हकीकत सांगितली. तेथे सोलापूर विद्यापीठाचे त्यावेळी नुकतेच निवृत्त झालेले कुलगुरू डॉ. इरेश स्वामी बसलेले होते. त्यांनी 'माझ्या पत्नीला कन्नड वाचता येते, तिच्याकडून वाचून घेऊन, ते ऐकून मी लिहून काढू शकेन' असे सांगितल्यावर 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' हा कन्नड ग्रंथ मी त्यांच्या हाती सोपवला. खरोखरच पुढे साधारणतः दोन–तीन महिन्यांत त्यांनी टप्प्याटप्प्याने संपूर्ण लेखन माझ्या स्वाधीन केले. २५ जून २०१० रोजी त्यांनी आपले लेखन पूर्ण केल्याची नोंद केली आहे.

तो सगळा मजकूर कंपोज होऊन हाती आल्यावर लक्षात आले की, यातील मराठी भाषादेखील बरीचशी कन्नड वळणाची आहे. लिंग, वचन, विभक्ती यांमध्ये बराच अनियमितपणा आहे. ती भाषा संस्कारित करण्याची जबाबदारी आलीच. मुलीचे लग्न, माझी ॲंजिओप्लास्टी इत्यादी माझ्या कौटुंबिक व्यवधानांमुळे ते काम बाजूलाच राहिले. २०१२ पासून पूज्य महास्वामीजींनी मला लेखनात पार गुंतवून ठेवले. श्रीसिद्धान्तशिखामणि–

तत्त्वामृत, श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा, श्री जगद्गुरू पंचाचार्य विजय, रेणुकगीताई, वीरशैव तत्त्वदर्शन इत्यादी ग्रंथांचे लेखन आणि काशीपीठाचे मुखपत्र 'विभूतिवैभव'चे संपादन यांमुळे अन्य बाबींकडे लक्ष देण्यास वेळच मिळाला नाही. श्रीविश्वाराध्य गुरुकुलाचा शतमानोत्सव साजरा करण्याचे निश्चित होऊन हा ग्रंथ प्रकाशित करायचा असे ठरल्यावर मी या ग्रंथाकडे गंभीरपणाने वळलो. मी आणि माझी पत्नी सौ. उषा अशा दोघांनी चार महिने काम करून या ग्रंथाचे पूर्ण शुद्धीकरण केले. यातील बराचसा भाग नव्याने कंपोज करावा लागला. अखेर हे काम एकदाचे पूर्ण झाले.

१० सप्टेंबर २०१९ रोजी आम्ही दोघे काशीला गेलो. तेथे पूज्य महास्वामीजींना कंपोज केलेला मजकूर वाचून दाखविणे, त्यात दुरुस्त्या करणे इत्यादी कामे सुरू झाली. पंधरा दिवसांनंतर मी एकाएकी भयानक आजारी पडलो. काम सोडून आम्ही ताबडतोब महाराष्ट्रात परत आलो. अकोल्याच्या हॉस्पिटलमध्ये मला ॲडमिट करण्यात आले. वैद्यकीय उपचार सुरू झाले. काही दिवसांनी वाशीमला वैद्यकीय उपचारासाठी माझे भाऊ श्री. अशोकअप्पा पसारकर यांच्याकडे आम्हाला मुक्काम करावा लागला.

या काळात ग्रंथाची सर्व जबाबदारी माझ्या पत्नीने सांभाळली. तिने मोबाईलवरून ग्रंथाचा उरलेला भाग प.पू. महास्वामीजींना वाचून दाखवला आणि त्यात दुरुस्त्या केल्या. तासन् तास दिवसभर, कधी कधी रात्री बारा–साडे बारापर्यंत महास्वामीजी मोबाईलवरून पुढील नवा मजकूर सांगत. तो ऐकता ऐकताच तिने संगणकावर कंपोज केला. या ग्रंथसंपादनकार्यात तिचा मोलाचा वाटा आहे. तिचे सहकार्य मिळाले नसते तर हा ग्रंथ प्रकाशित होणे शक्य झाले नसते.

या ग्रंथासाठी परमपूज्य श्रीकाशीमहास्वामीजींनी अतिशय परिश्रम घेतले. ते काशीला होते आणि आम्ही वाशीमला होतो. त्यावेळी दिवसभर ते आमच्याशी फोनसंपर्क ठेवून होते. नंतर कर्नाटकात दौरा करताना, प्रवासात असताना देखील ते सतत फोनसंपर्क ठेवून होते. फोनवरूनच ते सगळ्या दुरुस्त्या आणि नवा मजकूर सांगत असत. त्यांच्या दृढ संकल्पाचे आणि

अथक प्रयत्नांचे पाठबळ असल्यामुळेच सर्व अडथळ्यांची शर्यत पार करून हा ग्रंथ सिद्ध झाला. अन्यथा हे काम अशक्यप्राय होते. त्यांच्या चरणी अनंत प्रणाम!

प्रस्तुत ग्रंथ हा 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' ह्या कन्नड ग्रंथाचा मराठी अनुवाद असला तरी त्या ग्रंथापेक्षा या ग्रंथात अधिक भर पडलेली आहे. २००७ ते २०२० पर्यंतच्या गुरुकुलात शिकणाऱ्या विद्यार्थ्यांच्या माहितीची यात भर घातली आहे. याशिवाय जुन्या विद्यार्थ्यांची नव्याने माहिती मिळाली ती यामध्ये समाविष्ट करण्यात आली आहे. परिशिष्टात आवश्यक ते बदल करण्यात आले आहेत. मूळ कन्नड ग्रंथाच्या आधारे सिद्ध झालेला हा परिष्कृत व परिवर्धित असा नवा ग्रंथ आहे, असेच म्हणावे लागेल.

ज्यांचे ज्यांचे 'श्री काशीपीठ ज्ञानगंगा' या कन्नड ग्रंथाच्या सिद्धीसाठी हातभार लागले, त्या सर्वांचे मन:पूर्वक आभार. भीमाशंकर सोलापुरे यांनी सर्वप्रथम या ग्रंथाचा मराठी अनुवाद केला. रे. रा. मगाई आणि शिवशरण कंबाळेमठ हे दोघे मला या कामासाठी प्राचार्य एम्. एम्. हिरेमठ यांच्यापर्यंत घेऊन गेले. प्राचार्य हिरेमठांनी आणि ग्रंथाच्या प्रारंभीच्या भागाचा उत्तम अनुवाद करून दिला. दुर्दैवाने हे चौघेही आज हयात नाहीत. त्यांच्याप्रती मी मनोमन कृतज्ञता व्यक्त करतो.

डॉ. इरेश स्वामी यांनी त्यांच्या धर्मपत्नी सौ. वसुधा स्वामी यांच्या सहकार्याने अतिशय परिश्रम घेऊन ग्रंथाच्या उर्वरित भागाचा मराठी अनुवाद करून दिला. या उभयतांना मी कृतज्ञतापूर्वक वंदन करतो. आमचे परम मित्र पं. शिवाप्पा खके (चारठाणा, जि. परभणी) यांनी अनेक वेळा दूरध्वनीवरून माझ्या शंकांचे निरसन करून या ग्रंथनिर्मितीला सहाय्य केले. त्यांच्याविषयी कृतज्ञता. कर्नाटकातील गदग येथील त्वरित मुद्रणालयाच्या संचालकांनी कन्नड ग्रंथातील छायाचित्रे आणि इंग्रजी मजकूर पाठवून दिला. जंगमवाडी मठातील वास्तव्यात श्रीमती नलिनी चिरमे वहिनी आणि सर्वश्री. शिवानंद हिरेमठ व माधव स्वामी या सर्वांनी माझी काळजी वाहिली. या सर्वांविषयी कृतज्ञता. या ग्रंथाचे सुबक मुद्रण करून देणारे श्री. बाबूराव कोरे, सांगली

यांचे मन:पूर्वक आभार. माझी पत्नी सौ. उषा हिने जिद्दीने ग्रंथाचे काम पुढे नेले. तिच्या दृढ निश्चयाची या ठिकाणी नोंद करणे आवश्यक आहे. वाशीमच्या वास्तव्यात माझे धाकटे बंधू श्री. अशोकअप्पा, भावजय सौ. कालिंदी यांनी सर्वतोपरी माझी काळजी वाहिली. माझा पुतण्या चि. अभिजित याने भुसावळपर्यंत येऊन आम्हाला घेऊन जाणे, अकोल्याला डॉक्टरांकडे दाखविणे, औषधपाणी इत्यादीची सर्व व्यवस्था करणे अशी सर्व शुश्रूषा केली. दुसरा पुतण्या सारंग, सौ. भारती व सौ. संध्या ह्या सुना या सर्वांनी माझी काळजीने देखभाल केली. चि. वेदांत, कु. श्रावणी व कु. आर्या या लहानग्या नातवंडांनी आजारपणातही मला हसत-खेळत प्रसन्न ठेवले. हे सगळे घरचेच लोक. म्हणून त्यांचे आभार न मानता केवळ उल्लेख केला.

श्रीकाशीमहास्वामीजींचा संजीवक कृपास्पर्श हा माझ्या आयुष्यातील अमृतयोगच! 'खला येते साधुत्व संतसंगे । फुलासंगे मातीस वास लागे' या उक्तीप्रमाणे पूज्य महास्वामीजींच्या सान्निध्यात माझे अवघे जीवनच सुगंधित होऊन गेले. काशीपीठावर होऊन गेलेले सर्वच जगद्गुरू हे अत्यंत तपस्वी आणि महान होते. त्यांनी आपापल्या काळात काशीपीठाची उन्नती केली. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी काशीपीठावर आरूढ झाल्यापासून काशीपीठाचा सुवर्णकाळ आला आहे. हा सुवर्णकाळ डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहणारे आपण साक्षीदार आहोत यापेक्षा अधिक धन्यता कोणती असेल? जगद्गुरू श्रीविश्वाराध्य आणि श्रीकाशीमहास्वामीजी यांना वंदन करून संतशिरोमणी श्रीमन्मथस्वामींच्या शब्दांत समारोप करतो-

**अवघ्या शकुनाचा शकुन । झाले दर्शन संतांचें ।।**
**पाप ताप दैन्य नासें । सुखा फुटें हो दोंदलें ।।**
**होय जन्माचें सार्थक । एकाएकीं समसाम्य ।।**
**मन्मथ म्हणे फळा आले । मागील केलें सुकृत।।**


१ जानेवारी २०२०
'पसारकर भवन',
केकतउमरा, ता.जि. वाशीम ४४५५०५ (महाराष्ट्र)

**शे. दे. पसारकर**
चरभाष : 9420 780 570

# श्री काशीपीठ : परंपरा आणि इतिहास

**भा**रत देशातील अत्यंत प्राचीन तीर्थक्षेत्रांमध्ये व मोक्षदायक अशा सप्तपुऱ्यांमध्ये काशी हीच प्रमुख होय. 'काश्यते प्रकाश्यते इति काशी।' म्हणजे आपल्या सर्वोत्कृष्ट वैशिष्ट्याने प्रकाशमान झालेल्या या पुण्यनगरीला काशी हे पवित्र नाव प्राप्त झाले आहे. काशीक्षेत्रापासून दूरवर आपापल्या गावात राहूनच भक्तिपूर्वक भावनेने 'काशी काशी' म्हणून दोन वेळा स्मरण केल्यानेच त्या भक्तांची पापे नष्ट होतात, अशी ख्याती काशीक्षेत्राची आहे. त्यासाठी काशीक्षेत्राला आलेच पाहिजे असेही नाही.

भारत देशातील सर्व प्रांतांचे, सर्व भाषांचे व सर्व धर्मांचे अनुयायी अनादी काळापासून काशीमध्येच राहतात. एकाच गावात राहून संपूर्ण भारत देशाचे दर्शन घेण्याची इच्छा बाळगणाऱ्यांनी काशी हे एकच क्षेत्र पाहणे पुरेसे आहे. म्हणूनच परदेशातून भारताला येणारे यात्रेकरू पहिल्यांदा काशीक्षेत्रालाच भेट देतात.

काशीक्षेत्रात विभिन्न संप्रदायांचे ३०० मठ आणि १५५० देवस्थाने आहेत. काशीच्या जनगणनेप्रमाणे प्रत्येक २४० व्यक्तींमागे एक संन्याशी, याप्रमाणे अनेक जण साधुसंत येथे वास करीत आहेत. यांच्यापैकी जास्तीत जास्त शिवभक्तच आहेत. आजपर्यंत अस्तित्वात असलेल्या काशीतील सर्व मठांमध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाचे जंगमवाडी महापीठ हेच अतिशय प्राचीन आहे. ही माहिती श्री वैद्यनाथ सरस्वती नावाच्या लेखकाने 'स्वतंत्र भारत' या हिंदी दैनिकाच्या दि. २६.११.१९८६ च्या अंकात खास लेख लिहून प्रसिद्ध केलेली आहे. त्या लेखामध्ये श्रीकाशीमध्ये असलेल्या सर्व मठांमध्ये वीरशैवधर्माचा जंगमवाडी मठ सहाव्या शतकापेक्षा पूर्वीचा आहे. तेथील इतर धर्मांचे मठ सन १८०१ ते १९९८च्या दरम्यान स्थापित झालेले आहेत, असा उल्लेख करण्यात आला आहे.

येथील श्रीविश्वेश्वर ज्योतिर्लिंग देवस्थानच्या जवळच श्रीजंगमवाडी मठ शोभून दिसतो. स्थानिक आणि परगावचे यात्रेकरू दररोज या मठातील

कर्तृसमाधी आणि तेथील लक्षावधी शिवलिंगांच्या दर्शनासाठी सतत येतच असतात. विशेषत: महाशिवरात्रीच्या पर्वदिनी लक्षावधी भक्तगण दर्शन घेतात.

श्रीजंगमवाडी मठ हे गोधुलिया सर्कलपासून काशी हिंदू विश्वविद्यालयात जाणाऱ्या मुख्य रस्त्याच्या वर अंदाजे २०० मीटर अंतरावर आहे. या मठाच्या अस्तित्वामुळेच या गल्लीला 'जंगमवाडी मोहल्ला' असे नाव पडलेले आहे. वाराणसी रेल्वे स्टेशनपासून ६ कि.मी. अंतरावर आणि काशीच्या बाबतपूर विमानतळापासून २५ कि.मी. अंतरावर हा मठ आहे. सर्व प्रकारची वाहने मठाच्या महाद्वारापर्यंत सरळ येतात. यात्रेकरूंना मठापर्यंत येऊन पोहोचण्यास कोणतीही अडचण किंवा त्रास होत नाही.

जंगमवाडी मठाचा अंतर्भाग अंदाजे ५०,००० चौरस फूट असून बाहेरील बाजूस मठाच्या डाव्या व उजव्या भागाला 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य बाजार' बांधण्यात आलेला आहे. हा बाजार अंदाजे २३००० चौ. फुटांइतका विस्तारित झालेला आहे. याशिवाय मठाच्या समोरील रस्त्याच्या पलीकडे सुमारे २०००० चौ. फुटांइतकी खुली जागा असून त्या ठिकाणी व्यावसायिकांसाठी दुकाने, पाठीमागे पार्किंग आणि त्यावर भक्तनिवास निर्मिलेले आहे. पार्किंग सभामंडपासारखे असून त्यामध्ये ५००० लोक बसू शकतात.

मठाच्या आतल्या खुल्या जागेत महाद्वार, धर्मरत्न कल्याणी महाद्वार, कैलासमंटप, श्रीजगद्गुरू विश्वाराध्य मंदिर, श्रीजगद्गुरूंचा दरबार हॉल, श्रीजगद्गुरू वीरभद्र स्मृतिभवन, जगद्गुरू पंचाचार्य भवन, बाजूला प्रथम मल्लिकार्जुन भक्तनिवास, श्रीजगद्गुरू हरेश्वर मंदिर, ज्ञानमंदिर ग्रंथालय, श्रीजगद्गुरू वीरेश्वर नित्य अन्नदान छत्र, श्रीजगद्गुरू विश्वाराध्य भक्तनिवास, श्रीजगद्गुरू हरेश्वर भक्तनिवास, श्रीजगद्गुरू वीरभद्र भक्तनिवास, श्रीजगद्गुरू राजेश्वर भक्तनिवास, श्रीजगद्गुरू शिवलिंग भक्तनिवास, श्रीजगद्गुरू पंचाक्षर भक्तनिवास आणि श्रीजगद्गुरू विश्वेश्वर भक्तनिवास ही बांधकामे विशेषकरून शोभतात. याशिवाय ऑफिसरूम, गणेश हॉल,

विश्वनाथ मंदिर व सभामंटपसुद्धा मठाच्या आवाराची शोभा वाढवत आहेत.

यात्रेनिमित्त येणाऱ्या भक्तादिकांना आणि अध्ययनासाठी येणाऱ्या बटूंना वास्तव्य व महाप्रसादाची मोफत व्यवस्था करण्यात आली आहे. येथील भक्तनिवासामध्ये १३० पेक्षा अधिक सुसज्ज अशा खोल्या आहेत. याव्यतिरिक्त मोठे मोठे सार्वजनिक अनेक हॉलसुद्धा असल्यामुळे हजारोंच्या संख्येने भक्तगण एकाच वेळेस आले तरीसुद्धा कोणतीही गैरसोय होत नाही.

तेथील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलासाठी स्वतंत्र खोल्यांची व्यवस्था आहे. तेथे ५० विद्यार्थी या गुरुकुलामध्ये शिकत असून संस्कृत भाषा व या भाषेच्या माध्यमातून विविध शास्त्रांचे अध्ययन करण्यासाठी सोय आहे.

**काशीपीठाची प्राचीनता**

सनातन वीरशैवधर्माची स्थापना प्रत्येक युगात श्रीजगद्गुरू पंचाचार्यांकडून करण्यात आल्याचे प्रतिपादन सर्व शिवागम करतात. पंचपीठांपैकी एक असलेला श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाचा जंगमवाडी मठसुद्धा त्याच प्राचीन परंपरांपैकी एक आहे. या पीठाचे मूळ कलियुगातील आचार्य श्रीजगद्गुरू विश्वाराध्यांनी कृतयुगापासून कलियुगापर्यंतच्या चार युगांत अवतार घेऊन वीरशैवधर्माची प्रतिष्ठापना केलेली आहे.

कृतयुगात पंचाक्षर शिवाचार्य, त्रेतायुगामध्ये पंचवक्त्र शिवाचार्य, द्वापरयुगामध्ये विश्वकर्ण शिवाचार्य आणि कलियुगामध्ये विश्वाराध्य शिवाचार्य या नावाने त्यांनी अवतार घेतलेला आहे. कलियुगातील अवताराविषयी ते म्हणतात:-

> काश्यां विश्वेशलिंगाच्च विश्वाराध्यस्य संभवः।
> स्थानं श्री काशिका क्षेत्रे श्रृणु पार्वती सादरम्।। (स्वायंभुवागम)

> स्कंदगोत्रादि नाथश्च महासिंहासनाग्रणीः।
> विश्वाराध्य इतिख्यातो जगद्गुरुत्तमश्च सः।। (सुप्रबोधागम)

या आगमोक्तींच्या प्रमाणानुसार काशीचे सुप्रसिद्ध ज्योतिर्लिंग असलेल्या विश्वेश्वरलिंगातून महाशिवरात्रीच्या पर्वकालाच्या दिवशी श्रीजगद्गुरू विश्वाराध्यांनी दिव्यदेहधारी होऊन अवतार घेतला.

एते युगचतुष्टे तु पंचाराध्या यथा निधि।
मम लिंगमुखोद्भूता लोकविस्तृत कीर्तय:।। (स्वायंभुवागम)

या आगमप्रमाणानुसार शिवाचे ईशानमुख संजात, स्कंद गोत्राधिपती, विश्वकर्ण शाखानुवर्ती असलेल्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य भगवत्पादांनी चार युगांमध्ये भिन्न भिन्न नावांनी अवतार घेऊन वीरशैवधर्माची स्थापना केलेली आहे.

काशीज्ञानसिंहासनाचे द्वापरयुगाचे आचार्य श्रीजगद्गुरू विश्वकर्ण शिवाचार्यांनी दुर्वास महर्षींना पंचवर्ण महासूत्राच्या सहाय्याने वीरशैव तत्त्वोपदेश केलेला आहे. म्हणूनच काशीपीठाचे सूत्र 'पंचवर्ण सूत्र' म्हणून प्रसिद्ध आहे. या सूत्राविषयी हूली पंचवण्णिगे मठाच्या श्री सिद्धनंजेश्वर शिवाचार्यांनी भाष्य लिहिले आहे. हे सूत्र व भाष्य दोन्ही काशीजंगमवाडी मठाच्या शैवभारती शोधप्रतिष्ठानच्या वतीने प्रसिद्ध करण्यात आले आहे.

त्याकाळी श्रीजगद्गुरू विश्वकर्ण भगवत्पादांनी श्री दुर्वासांना उपदेश केलेल्या स्थानाला 'ज्ञानपीठ' म्हटले जाते. काशीक्षेत्राच्या केदारखंडाच्या हरिकेशनंदन वनातील जंगमवाटिकेमध्ये म्हणजेच सध्या प्रसिद्ध असलेल्या जंगमवाडी मठामध्ये हे ज्ञानपीठ आजही विराजमान आहे.

श्रीकाशीज्ञानपीठाचे कलियुगातील आचार्य श्रीजगद्गुरू विश्वाराध्य यांनी युगारंभी अवतार घेऊन १००० वर्षांपर्यंत अनेक लीला, चमत्कार केले. वीरशैव तत्त्वसिद्धान्ताची शिकवण लोकांना देऊन, अवताराच्या परिसमाप्तीच्या समयी श्रीमल्लिकार्जुन नावाच्या आपल्या परम शिष्याला ज्ञानपीठाचे अधिकार देऊन ते स्वत: पुन्हा विश्वेश्वर ज्योतिर्लिंगातच अंतर्धान पावले.

श्रीजगद्गुरू विश्वाराध्य भगवत्पादानंतर अधिकारपदावर आलेले श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य महास्वामीजी हे इ.स. २०४० मध्ये पीठाधिकारी असल्याचे काशीपीठाच्या जगद्गुरूंच्या यादीवरून म्हणजेच

वंशावळीवरून समजते. आपल्या शिवयोगशक्तीने ३११ वर्षांपर्यंत पीठाध्यक्षपदी राहून शेवटी त्यांनी शिवयोग समाधी घेतली. त्यांच्या या कर्तृसमाधीची सध्या नित्यपूजा केली जाते.

श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य महास्वामीजी हे अत्यंत महिमाशाली पुरुष असल्यामुळे या पीठाला त्यापुढील काळात उत्तराधिकारी म्हणून आलेल्या महास्वामीजींनासुद्धा त्यांचेच नाव ठेवण्याची पद्धत रूढ झाली. त्यामुळे त्यांच्यानंतर या पीठावर आलेल्या ७७ महास्वामीजींच्या नावांची 'श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य' अशीच या पीठाच्या गुरुपरंपरेमध्ये नोंद करण्यात आली आहे.

काशी जंगमवाडी मठात परंपरागत दाखल्याव्यतिरिक्त महत्त्वाचे ऐतिहासिक दाखले सुद्धा आहेत. या पीठात असलेल्या अनेक दानपत्रांमध्ये काशीचा राजा जयनंददेव यांनी दिलेले दानपत्र अत्यंत प्राचीन आहे. या पीठाच्या परंपरेतील ५१ वे पीठाधिपती श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य महास्वामीजी (मल्लिकार्जुन जंगम) हे सन ५५३ ते ६७४ पर्यंत म्हणजे १२१ वर्षांपर्यंत पीठाध्यक्ष होते. त्यांच्या काळातच काशीचा मांडलिक राजा श्रीजयनंददेव याने विक्रम संवत् ६३१ (इ.स. ५७४)च्या प्रबोधिनी एकादशी (कार्तिक शुद्ध ११) रोजी श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य महास्वामीजींना भूदान करून रीतसर दानपत्र लिहून दिले आहे. आजमितीस १४४६ वर्षे प्राचीन असलेले हे दानपत्र श्रीजंगमवाडी मठामध्ये आजही सुरक्षितपणे ठेवण्यात आलेले आहे.

प्राचीन हिंदीमध्ये असलेल्या या दानपत्राचा आशय असा आहे:-

*राजाधिराज श्री श्री श्री महाराज जयनंददेव या काशीनरेशाच्या आदेशाप्रमाणे श्री विश्वाराध्य सिंहासनाच्या गोसायी मल्लिकार्जुन जंगम यांना कर्दमेश्वर महादेव मंदिर व गंगानदीच्या मध्ये असलेल्या विशाल भूभागापैकी पूर्व-पश्चिम ८०० परग आणि उत्तर-दक्षिण ८०० परग या मापाची जमीन गायींना चारण्यासाठी दानरूपाने देण्यात आली आहे.*

*या भूमीमध्ये पिकणाऱ्या सर्व प्रकारच्या पिकांचा उपभोग घेण्याचा*

*अधिकार श्री मल्लिकार्जुन जंगम संप्रदायवाल्यांसाठी राखून ठेवण्यात आलेला आहे. जे कुणी ही जमीन अन्यायाने व दुर्बुद्धीने बळकावण्याचा प्रयत्न करतील, त्यांचा नाश अटळ आहे.*

हे दानपत्र त्यावेळच्या जुन्या कागदावर लिहिलेले आहे. कालांतराने ते जीर्ण होऊन नाश पावेल या विचाराने काशीनरेशांचे वंशज प्रभुनारायणसिंह या काशीनरेशांनी विक्रम संवत् १९८२ (इ.स. १९२५) आषाढ वद्य अष्टमी या दिवशी त्या प्राचीन कागदावर लिहिलेला दानपत्राचा मजकूर जसाच्या तसा दानपत्रावर लिहून, त्यावर आपले हस्ताक्षर करून ते प्रमाणित केलेले आहे. हा ताम्रपट त्या कागदावर लिहिलेल्या दानपत्राची प्रतिलिपीच आहे. ते मी स्वत: प्रत्यक्ष पाहून, अत्यंत जीर्ण अवस्थेत असल्याची खात्री करून घेऊन, तेच पुन: यथावत् ताम्रपटावर लिहून दिले आहे असा मजकूर सुद्धा प्रभुनारायणसिंह काशीराजाने लिहिलेला आहे.

इ.स. ५७४ मध्ये काशीचा राजा असलेल्या श्रीजयनंददेव यांच्याकडून देण्यात आलेल्या दानपत्रामध्ये त्या भूभागाची चतु:सीमा व मापाबद्दल या ठिकाणी एक चिंतन करण्यात आले आहे. ते म्हणजे, काशीमधील कर्दमेश्वर महादेव मंदिर हे पंचक्रोशीतील यात्रेमधील एक महत्त्वाचे शिवदेवालय होय. त्या देवालयापासून पूर्वेकडे गेल्यास तेथे गंगानदी लागते. कर्दमेश्वर महादेव मंदिरापासून गंगानदीच्या तीरापर्यंत त्या वेळी संपूर्णपणे मोकळी जागा होती. अशा या विशाल भूभागामध्ये कर्दमेश्वर महादेव मंदिराच्या पूर्वेस, म्हणजे पूर्व-पश्चिम ८०० परग आणि उत्तर-दक्षिण ८०० परग भूभाग दान केल्याचा उल्लेख आहे.

येथे परग म्हणजे एखादा माणूस तो स्वत: उभा असलेल्या जागेवरून एक पाय उचलून पुढे ठेवल्यास, त्या दोन्ही पावलांमधील जमिनीवरील अंतरास परग असे म्हणतात. पावलाच्या साहाय्याने जमिनीचे मोजमाप करण्याची पद्धत फार जुनी आहे. वामन अवतारामध्ये विष्णू भगवान याने बली राजाला तीन परग भूमी दान म्हणून मागितली. त्याला बलीने संमती दिली. तेव्हा भगवंताने आपल्या एका पावलाने संपूर्ण स्वर्गादी लोक,

दुसऱ्या पावलाने हे समस्त भूमंडळ व्यापून (मोजून), तिसरे पाऊल बलीच्या मस्तकावर ठेवून त्याला पाताळात दाबून पाताळलोकसुद्धा आपल्या पावलाने मोजल्याची कथा पुराणात प्रसिद्ध आहे. येथे वामनाने स्वत: उभा असलेल्या जागेवरून आपले पाद उचलून ठेवून स्वर्ग, मर्त्य व पाताळ लोक मोजल्याचा विषय आम्हाला ज्ञात आहे. हीच पद्धत भविष्यकाळात रूढ झाली. एखाद्या माणसाने दुसऱ्यांना भूमी मोजून देताना याच पद्धतीचा अवलंब करण्यात येऊ लागला. मोजमापाची (मापनाची) अन्य साधने उपलब्ध नसताना माणूस आपल्या पाद-हस्तादींच्या साहाय्याने मोजमाप करण्याच्या पद्धतीचा अवलंब करत आला आहे. हे मोजमापसुद्धा आजही माणसे वापरतात.

वरील प्राचीन मोजमापाची परंपरा आधारभूत मानूनच आताच्या फुटाचे प्रमाण अस्तित्वात आले. इंग्रजीमध्ये पायाला (पादाला) 'फूट' म्हणतात. या देशावर ब्रिटिशांचे राज्य असताना त्यांनी जुन्या पद्धतीला पादाच्या मापाचा दंडक स्वीकारून त्याला फूट म्हणून संबोधून त्याच्या साहाय्याने मोजण्याची एक नूतन पद्धत रूढ केली. सध्या जगामध्ये सर्वत्र हीच फूट पद्धत वापरण्यात येते.

काशी महापीठाला राजा जयनंददेव या काशीनरेशाने भूदान करताना तत्कालीन पद्धतीने पूर्व-पश्चिम ८०० परग व दक्षिण-उत्तर ८०० परग भूमी दान म्हणून दिल्याचा उल्लेख यापूर्वीच करण्यात आला आहे. ते जुने मोजमाप आजच्या मापाने मोजल्यास किती एकर जमीन होऊ शकेल? एखाद्या माणसाने एका जागेवरून आपले पाऊल उचलून ठेवल्यास त्याच्या दोन्ही पावलांमधील अंतर ५ फूट होऊ शकेल. म्हणजे काशी राजाने दिलेल्या जमिनीचे आजच्या फुटाच्या मापाने मोजमाप केल्यास ते पूर्व-पश्चिम ४००० फूट व उत्तर-दक्षिण ४००० फूट होईल. चौरस फुटांमध्ये याचा हिशोब केल्यास ते एकूण १ कोटी ६० लक्ष चौरस फूट इतके होईल.

अशा प्रकारे काशी नरेश जयनंददेव याने इ.स. ५७४ मध्ये केलेल्या दानपत्राप्रमाणे तत्कालीन काशीपीठाधिपती ५१ वे श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य (मल्लिकार्जुन जंगम) महास्वामीजींना ३६५ एकर

भूमी जमीन दान दिल्याचे निश्चित होते. त्यावेळी त्या स्थानामध्ये एका जंगमपुराची स्थापना करण्यात आली होती. तेथील या भूमीची मशागत व पेरणीची कामे जंगमपुरातील आपल्या सेवक वर्गाकडून त्यानंतर आलेले मठाधिपती करवून घेत असत. त्या जंगमपुरातील जमिनीमध्ये त्या पूर्वीच्या अनेक पीठाधिपतींच्या समाध्या बांधण्यात आलेल्या आहेत. अशा प्रकारे काशीक्षेत्रात जंगमवाडी मठाच्या आधीन एक जंगमपूर कार्यरत होते असे समजते.

इ.स. १९१६ मध्ये महामना पं. मदनमोहन मालवीय यांनी काशीमध्ये हिंदू विश्वविद्यालय स्थापन करण्याचा संकल्प केला. या संकल्पाच्या सिद्धीसाठी अनेक जमीनदारांकडून जमिनी घेतल्या आणि राजे-महाराजे यांच्याकडून अपार निधी जमविला. त्यांच्या या परिश्रमाचे फळ म्हणूनच आज विश्वविख्यात काशी हिंदू विश्वविद्यालय हे काशीक्षेत्रात चमकत आहे.

महामना पं. मदनमोहन मालवीय यांनी काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या स्थापनेसाठी निरनिराळ्या जमीनदारांकडून एकूण १२१५-५३ एकर जमीन संपादन केली. त्याचे विवरण खालीलप्रमाणे-

| | |
|---|---|
| नगवा दरबार | ३७.८४ एकर |
| भगवानपूर दरबार | १४.४६ एकर |
| भगवानपूर | ७०.४२ एकर |
| नरिया | २९५.३१ एकर |
| धनंजयपूर | १२२.९३ एकर |
| खिजराही | ५२.०० एकर |
| जंगमपूर | ७५.६८ एकर |
| सुस्वाही | १३३.०१ एकर |
| सीर गोवर्धनपूर | १२४.५३ एकर |
| छित्तूपूर | १९१.२८ एकर |
| एकूण- | १२२५.५३ एकर |

अशा प्रकारे वेगवेगळी गावे आणि जमीनदारांकडून मिळालेल्या जमिनीच्या दाखल्यासंबंधीचा उल्लेख 'History of the Banaras Hindu University' (१९६६, पृ. २३४, ४०५) या ग्रंथात आहे. नगवा परिसरातील जमिनीचे मालक

१. महाराज बहादूर ऑफ बनारस

२. राजा मुन्शी मधोलाल

३. बाबुतेज नारायणसिंह

४. महंत जंगमवाडी मठ

अशा चौघांकडून भूमी मिळविल्याबद्दलचा उल्लेख वरील ग्रंथात आहे.

या दाखल्यांवरून समजून येते की सहाव्या शतकात काशीनरेशांनी जंगमवाडी मठाला दिलेल्या जंगमपूरच्या ३६५ एकर जमिनीपैकी मा. पंडित मदनमोहन मालवीय यांच्या अपेक्षेप्रमाणे इ.स. १९१६ मध्ये त्या वेळचे काशीचे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू महंत शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी ७५.६८ एकर जमीन हिंदू विश्वविद्यालयाच्या स्थापनेसाठी दिलेली आहे. काशीक्षेत्राच्या एका फार मोठ्या शैक्षणिक कार्यासाठी जंगमवाडी महामठाकडून ही अपार देणगी मिळाली आहे.

या विश्वविद्यालयाच्या आवाराच्या आत, बिर्ला मंदिराच्या पाठीमागे, पूर्वीच्या मठाधीशांचे समाधिमंदिर आहे. त्याच्या शेजारी एक जुने विशाल पिंपळाचे झाड असून त्याच्या खाली एक शिलालेख आहे. त्या लेखात काशीचे नरेश जयनंददेव यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य सिंहासनाचे श्री मल्लिकार्जुन जंगम यांना भूदान केल्याचा शिलालेखही कोरण्यात आलेला आहे. विश्वविद्यालयाच्या आवाराच्या बाह्य भागावर ते प्राचीन जंगमपूर आजही अस्तित्वात आहे.

या जंगमपूरचे श्रद्धाळू भक्तगण विश्वविद्यालयामध्ये असलेल्या काशी–जगद्गुरूंच्या समाधी मंदिराला 'जंगमबाबा मंदिर' असेच म्हणतात. आपापल्या घरांमध्ये विवाहादी मंगलकार्ये असल्यास त्या समाधीवरील शिवलिंगाची पूजा करून पहिली लग्नपत्रिका त्या समाधीला अर्पण करण्याची पद्धत

आजही अनुसरत आले आहेत. अलीकडे सध्याचे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी त्या समाधिमंदिराच्या भोवती भिंत बांधून आत गुरेढोरे इत्यादींचा प्रवेश न होईल अशी व्यवस्था केलेली आहे. तेथील पिंपळाच्या झाडाच्या भोवती विशाल कट्टा बांधून तेथे भक्तादी लोकांनी अधिक संख्येने जमून भजन, पूजा करण्यासाठी त्यांना सोय करून देण्यात आलेली आहे. हे कार्य करण्यासाठी विश्वविद्यालयाचे प्राध्यापक डॉ. रामाश्रय प्रसाद सिंग यांची सेवा लक्षणीय आहे.

या समाधिमंदिराच्या दोन्ही बाजूस विश्वविद्यालयाच्या अध्यापकांच्या निवासासाठी इमारती बांधण्यात आलेल्या असून त्या परिसराला हैदराबाद कॉलनी असे म्हणतात. या कॉलनीतील लोकसुद्धा या जंगमबाबा समाधिमंदिराला निरंतर भक्ती समर्पण करून आपले अभीष्ट पूर्ण करून घेत आहेत.

काशीनरेशांनी दिलेल्या भूदानाच्या लेखाच्या आधारे काशीचा श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाचा श्रीजंगमवाडी मठ सहाव्या शतकापूर्वीचा असल्याचे ऐतिहासिक पुराव्याने सिद्ध होते. अलाहाबादच्या 'व्योमकेश' या कविनामाच्या संशोधक लेखकाने मुंबईच्या भारती विद्याभवनाच्या 'नवनीत' या हिंदी मासिकामध्ये 'जंगमवाडीमठ काशीमे सुरक्षित १४ सौ वर्ष पुराना शासनादेश' नामक शीर्षकाचा एक लेख प्रसिद्ध केलेला आहे. या लेखामध्ये सदाधरभट्ट यांनी रचलेल्या 'विजय वज्रविलास' नामक पुस्तकाच्या आधारे सहाव्या शतकात श्रीजयनंददेव हा काशीचा मांडलिक राजा होता, असे सिद्ध केले आहे. त्याच्याकडून देण्यात आलेल्या दानपत्राच्या आधारे, काशी जंगमवाडी मठ सहाव्या शतकापूर्वीचा असल्याचे सिद्ध होते.

याशिवाय, नेपाळ देशातील भक्तपूर (भातगाव) येथे सुद्धा काशी जंगमवाडी मठाचा एक शाखामठ आहे. त्याला तेथे 'जंगम मठ' असेच म्हणतात. विक्रम संवत् ६९२ (इ.स. ६३५) ज्येष्ठ शुद्ध अष्टमी या दिवशी नेपाळराजे श्री विश्वमल्ल याने या पीठाचे ५१ वे पीठाधिपती श्री १००८

जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य (मल्लिकार्जुन जंगम) महास्वामीजींना भूदान देऊन एक शिलालेखसुद्धा कोरून ठेवला आहे. हा शिलालेख नेपाळच्या जंगमवाडी मठात आजही अस्तित्वात आहे.

अशाप्रकारे काशीच्या जयनंददेवाकडून आणि नेपाळच्या विश्वमल्ल राजाकडून उपलब्ध झालेल्या या लेखांच्या आधारे हा मठ सहाव्या शतकापेक्षा पूर्वी अत्यंत प्रभावी धर्मपीठ होता, यात तिळमात्र संदेह नाही. नेपाळचा जंगमवाडी मठ आजही काशीच्या जंगमवाडी मठाच्या धार्मिक व्यवस्थापनाखाली कार्य करत आहे. तेथील सर्व जंगम काशीपीठातूनच दीक्षा व अय्याचार संस्कार घेतात. श्रीपीठाच्या आदेशाप्रमाणे तेथील सर्व जंगम गृहस्थाश्रमी आहेत. श्री गोविंद हरी जंगम यांचे सुपुत्र राममणी जंगम, भरतमणी जंगम व पुष्करमणी जंगम हे या मठाचा योगक्षेम पाहत आहेत. तेथील मंदिरांच्या पूजेसाठी वैदिक विद्येमध्ये पारंगत असलेले श्री वे.पं. गुरुसिद्धय्या हिरेमठ नामक अर्चकाला काशीपीठाने पाठवले होते. ते गदगला परतले असून सध्या नेपाळचे भरत जंगम हे तेथील व्यवस्था पाहतात. तेच पूजादी सर्व धार्मिक कार्यक्रम यथावत् चालवीत आहेत.

**मोगल बादशहांची फर्माने**

श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाच्या जंगमवाडी महामठाला ज्याप्रमाणे हिंदू राजे-महाराजांकडून मानसन्मान प्राप्त झाले, त्याप्रमाणे मुसलमान बादशहांकडून सुद्धा सन्मान प्राप्त झाले आहेत. इ.स. १५३० ते १६६८ पर्यंत आमच्या देशावर अंमल गाजविलेले मोगल चक्रवर्ती हुमायून, अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब, दारा शिकोह आणि महमदशहा बादशहा यांनी काशी जंगमवाडी मठाला भूदान देऊन त्यांनी लिहून दिलेली फर्माने अर्थात् दानपत्रेसुद्धा या पीठामध्ये सुरक्षित आहेत. या सर्व फर्मानांमध्ये उल्लेख केलेल्या दानाची जमीन ३८४ बिघा इतकी होते. १ बिघा म्हणजे २० गुंठे = अर्धा एकर. या प्रमाणानुसार मोघल बादशहांनी दान दिलेल्या भूमीचे एकूण क्षेत्र १९२ एकर इतके होते. ही भूमी काशी, चुनार (मिर्झापूर जिल्हा), अलाहाबाद आणि गया या क्षेत्रांमध्ये आहे.

पंधराव्या आणि सोळाव्या शतकामध्ये चुनार, अलाहाबाद आणि गया या क्षेत्रांमध्ये श्रीकाशीजगद्गुरू यांचे अनुयायी (शिष्य) असलेले अनेक यशस्वी जंगम संन्यासी अधिक संख्येने राहात होते. या सर्व जंगम संन्याशांच्या योगक्षेमासाठी मुस्लिम बादशहा यांनी फर्मान काढून भूदान दिलेले आहे. प्रत्येक फर्मानामध्ये आपल्या शासनाविषयी जंगमांचा अनुग्रह असावा यासाठी सर्व बादशहांनी विनंती केली आहे.

वरील सर्व दानपत्रे काशी महापीठाचे ७१, ७२, ७३, ७४, ७५ व ७६ वे पीठाधिपती श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य (मल्लिकार्जुन जंगम) महास्वामीजींना देण्यात आलेली आहेत. या पीठाच्या ७७ श्रीजगद्गुरूंना श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन हेच नाव देण्यात आले होते, हे या ठिकाणी लक्षात घ्यावे.

काशी विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाचे सर्व पीठाधिपती तपस्वी, शिवयोगसिद्ध होते. आकाशगामी होऊन नेपाळ, अलाहाबाद व गया क्षेत्रांमध्ये संचार करण्याचे सामर्थ्य त्यांच्या अंगी होते. हे सामर्थ्य जाणून हुमायून इत्यादी मोगल बादशहांनी या मठाला भूदान दिलेले आहे. या मठाला एकूण १०५४ एकर मालकीची जमीन आहे. या मठाचे मूळ कर्तृ पुरुष गुरू श्रीजगद्गुरू विश्वाराध्य होते. त्यांच्यानंतर आलेले श्री मल्लिकार्जुन जगद्गुरू यांनी जिवंत समाधी घेतली आहे. हा मठ औरंगजेबाच्या काळाच्या पूर्वीचा असल्याचा उल्लेख बनारस गॅझेटियरमध्ये पुढीलप्रमाणे आलेला आहे:-

In Paragana Mahwari there is a state of two villages and a part covering 1054 acres.. which belongs to the Jangambari Shri Math of which the first mahant was shri Biswadhar Swami who with his successor, Mallikarjuna Swami, is believed to be memorial and to have been burried alive in the Jangambari. The math received various gifts of land in the city from Humayun and his decendants... the mahants are credited with the power of performing miracles

and it was through the display of this power in the shape Journey through the air to Nepal and elewhere before Aurangjeb that the math building was preserved.

(Nevil, H. R. : District Gazetteers of the united provinces of Agra and Oudh, Vol. XXVI, Benares, Lucknow :Government Press, 1922, p. 123)

मोघल बादशहांमध्ये अत्यंत क्रूर आणि हिंदूद्वेषी म्हणून प्रसिद्ध असलेल्या औरंगजेबाने काशीच्या विश्वेश्वर मंदिराचा विध्वंस करून जवळच्या जंगमवाडी मठालासुद्धा वेढा घातला व आक्रमण केले. परंतु त्याने महाद्वारातून जेव्हा प्रवेश केला, त्यावेळी तेथे एक विशालकाय अशा काळ्याकुट्ट छायेने आपल्या डोळ्यांतून विस्तवाच्या ठिणग्या बाहेर फेकत त्याला रोखले. त्यामुळे औरंगजेब भयभीत झाला, तो शरण आला आणि त्याने मठाला पुरेशा जमिनीचे दान देऊन त्याबद्दलचा लेखही लिहून दिलेला आहे. पर्शियन भाषेत असलेला औरंगजेबाचा हा लेख (फर्मान) जंगमवाडी मठात आजही सुरक्षित ठेवण्यात आला आहे.

वरील सर्व दानपत्रे व मोगल चक्रवर्तींची फर्माने हे सर्व जंगमवाडी मठाच्या एका बँकेच्या खटल्याच्या संदर्भात (बनारस जिल्हा कोर्ट व अलाहाबाद हायकोर्टामध्ये) त्यांची शहानिशा करून १९३२-३३ मध्ये त्यांची पडताळणी करून कोर्टाच्या निकालपत्रात त्याचा उल्लेख करण्यात आला आहे. विशेष म्हणजे ही सर्व दानपत्रे आणि फर्माने जंगमवाडी मठाच्या संबंधित हायकोर्ट जजमेंटच्या ग्रंथात इंग्रजी भाषेत अनुवाद करून छापण्यात आली आहेत.

### श्रीकाशीपीठाची आचार्यपरंपरा

सनातन वीरशैवधर्माच्या पंचपीठांपैकी एक असलेल्या काशी ज्ञानसिंहासन महापीठाची आचार्यपरंपरा युगयुगांतरापासून चालत आली आहे.

कलियुगाचे आचार्य श्रीजगद्गुरू विश्वाराध्यांच्या नंतर या पीठावर आरूढ झालेल्या श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्यांनी

शिवयोगसिद्धी प्राप्त करून घेतल्यामुळे त्या योगसामर्थ्यामुळे ३११ वर्षांपर्यंत ते पीठाध्यक्षपदावर राहून शेवटी त्यांनी जिवंत समाधी घेतली. त्यांची ही समाधीच आज काशी जंगमवाडी मठामध्ये कर्तृसमाधी म्हणून पूजनीय ठरली आहे. या समाधीचीच काशी जंगमवाडी मठात नित्यपूजा करण्यात येते.

हे सर्व थोर आचार्य अत्यंत महिमाशाली असल्याकारणाने, त्यांच्यानंतर पीठावर आलेल्या आचार्यांना त्यांचेच नाव वारंवार देण्याची परंपरा प्रचारात रूढ झाली. म्हणूनच त्या पीठाच्या ७७ जगद्गुरूंचे 'श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य' म्हणून नामकरण झाले, हे पीठामध्ये लिहून ठेवलेल्या आचार्यांच्या यादीवरून समजते.

पीठावर आलेल्या ७८ व्या पीठाचार्यांपासून आजपर्यंतच्या सर्व जगद्गुरूंना परंपरागत मल्लिकार्जुन शिवाचार्य या नावाबरोबर ऊर्फ अर्थात्, द्वितीय नावाचा वापर करण्याची पद्धत प्रचारात रूढ झाली आहे. म्हणूनच ७८ व्या पीठाधिपतींना (ऊर्फ द्वितीय नाम श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य) म्हणूनच त्यांच्या नावाचा वापर केल्याचे दिसून येते.

### ७७ वे श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य महास्वामीजी

या पीठाचे ७७ वे पीठाधिपती श्री १००८ मल्लिकार्जुन शिवाचार्य महास्वामीजी शिवयोगसिद्धी प्राप्त होते. म्हणून त्यांनी आपल्या जीवितावस्थेत श्रीपीठात अध्ययन करीत असताना श्री शिवलिंग देवरू नावाच्या बटूस १७५० मध्ये स्वत: आपल्या अमृतहस्ते पट्टाधिकार दिला. त्यांचे परंपरागत श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य नामकरण केले. आपल्या पूर्वाश्रमीचे शिवलिंग नाव होते म्हणून 'श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य' अशी नूतन नावाची घोषणा केली. इ.स.१७१० पासून १७५० पर्यंत, ४० वर्षेपर्यंत पीठाचार्य म्हणून पीठाची परंपरा, सर्व धार्मिक व्यवहार पूरेपूर निभावून नेला. इ.स.१७५० मध्ये श्री शिवलिंग शिवाचार्यांना अधिकार दिल्यानंतर स्वत: आपल्या योगसामर्थ्याने जिवंत समाधी घेतली.

### ७८ वे श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य महास्वामीजी
### (ऊर्फ प्रथम शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी)

७८ वे श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू प्रथम शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी हे काशीपीठाचे ७८ वे पीठाधिपती झाले. त्यांनी आपल्या गुरूंच्या आदेशानुसार पीठपरंपरा चालवीत इ.स. १७५० पासून १८२५ पर्यंत ७५ वर्षेपर्यंत पीठाचार्य म्हणून कार्य पाहिले. यांनी देखील आपल्या गुरूंच्या कडून प्रेरणा घेऊन आपण जिवंत समाधी घ्यावी अशी उत्कट इच्छा मनात बाळगून आपला उत्तराधिकारी निवडण्याची प्रक्रिया आपल्या मनात प्रारंभिली. तेव्हा काशीपीठात अनेक विद्यार्थी उच्च संस्कृत शिक्षण घेत होते. त्यांच्यात सिद्धलिंग देवरू यांच्या सुलक्षण मेधावी, योगात अभिरुची असलेली पाहून श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी १८३५ इ.स.त आपल्या अमृतहस्ते श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य नामकरण करून श्री सिद्धलिंग देवरूंना पीठाधिकार संस्कार परंपरागत पद्धतीने दिले. तसेच द्वितीय नामकरण श्री १००८ जगद्गुरू हरेश्वर शिवाचार्य असे नूतन नामकरणही केले. पुढे काही

महिन्यांनी आपले गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्यांप्रमाणे स्वत: क्रियासमाधी घेतली. काशीपीठाच्या ७७ व्या तसेच ७८ व्या पीठाधिपतींनी जिवंत समाधी घेतल्याचे २००५ मध्ये पीठाच्या जीर्णोद्धाराचे काम चालले असताना निदर्शनास आले. २००५ मध्ये नूतन ग्रंथालयाच्या निर्माण कार्यास प्रारंभ झाला. त्यावेळी या पीठाच्या ७७ आणि ७८ व्या पीठाधिपतींच्या समाधींचा जीर्णोद्धार करण्याचे कामही सुरू झाले. तेव्हा त्या समाधिमंदिराच्या पायऱ्या उतरून खाली जाऊन त्या क्रियासमाधीच्या त्रिकोणाच्या दरवाजाला लावलेली शिला कामगारांच्या साहाय्याने काढून व्यवस्थापक श्री. गंगाधर चिरमे यांनी पाहिले की या दोन्ही क्रियासमाधींत शिवयोगमुद्रेत बसलेले दोघेही जगद्गुरू परिपूर्ण अस्थिपंजर होते.

याशिवाय आणखी मुख्य दृश्य नजरेस पडले म्हणजे या दोन समाधींच्या आतून बांधलेल्या भिंतीतून वरच्या कुंबीपर्यंत तीन इंची तांब्याचे पोकळ भांडे (पाईप) जोडलेले होते आणि त्याच्या खालच्या आणि वरच्या तोंडाला तांब्याचे दोन छिद्र असणारे लोटे झाकून घेतलेले होते. यांतून ही गोष्ट लक्षात येते की या जगद्गुरुद्वयांनी शिवयोगसिद्धी प्राप्त करून घेतली होती. म्हणून आपल्या अंतिम काळात स्वत:च क्रियासमाधी निर्माण करून आत बसल्यानंतर श्वासोच्छ्वासास अनुकूल व्हावे म्हणून तांब्याचा पाईप तयार करून त्याच्या तोंडाला तांब्याचे छिद्र असणारे भांडे झाकून घेण्याची व्यवस्था केल्याची दिसून येते. या दोघा पीठाचार्यांनी जिवंत समाधी घेतल्याचे स्पष्ट होते. या समाधीचे सर्वेक्षण केल्यानंतर त्यांच्या शिला पूर्ववत बसवून या दोन्ही समाधीच्या वरच्या भागावर दोन शिवलिंगांची स्थापना केली आहे. या शिवलिंगाभोवती यात्रेकरू आपल्या पूर्वजांच्या पुण्यस्मृतीसाठी शिवलिंगाची स्थापना करीत असतात. आजमितीला ती सहस्रावधी स्थापिल्याचे दिसून येतात.

काशीपीठाचे मूळ कर्तृपुरुष प्रथम श्रीमल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य महास्वामीजींनी जिवंत समाधी घेतल्याचे पाहून त्यांच्या प्रेरणेने पुढील पीठाचार्यांनी तशी समाधी घेतल्याचे प्रत्यक्ष प्रमाणांच्या आधारे सांगू शकतो.

### ७९ वे श्रीजगद्गुरू
### हरेश्वर (सिद्धलिंग) शिवाचार्य महास्वामीजी



काशी महापीठाचे ७९ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू हरेश्वर (सिद्धलिंग) शिवाचार्य महास्वामींनी इ.स. १८२५ मध्ये आपले गुरू श्री १००८ जगद्गुरू प्रथम शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींकडून पीठाधिकार प्राप्त करून घेतला. हे आजानुबाहू होते. सुलक्षणी जटाजूटधारी होते. उच्च शिक्षणाकरिता या पीठात राहून इथल्या विद्वानांकडून विविध शास्त्रांचा त्यांनी अभ्यास केला. त्यांचे पांडित्य, सरळ स्वभाव आणि त्यांच्याठायी असणारी शिवयोगनिष्ठा पाहून श्रीजगद्गुरू प्रथम शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या हयातीत त्यांना जगद्गुरू पट्टाधिकार करविला होता.

श्री हरेश्वर महास्वामीजी आपली तपश्चर्या आणि विद्वत्तेच्या प्रभावाने सर्वत्र प्रख्यात झाले होते. यांची ख्याती ऐकून तत्कालीन मैसूरचे महाराज मुम्मडी श्री कृष्णराज वडियर यांनी यांना सकल बिरुदांनी सन्मानित करून मैसूरला निमंत्रित केले. पीठाच्या पद्धतीनुसार आडवी पालखी शोभायात्रा काढून त्यांना छत्रचामर आणि चांदीचा धर्मदंडादी भक्तिपूर्वक समर्पिले. त्या सर्व सामग्रीवर श्री महाराजांनी श्रीकृष्ण म्हणून हस्ताक्षर केले आहे. मैसूर येथे या पीठासाठी भूदान केले आहे. आज या भूमीवर काशी विश्वेश्वर मंदिर बांधले आहे. एवढेच नव्हे तर त्याच्या भोवती मोकळी जागा आहे.

मुम्मडी श्रीकृष्णराज वडेयर यांनी श्री हरेश्वर (सिद्धलिंग) महास्वामीजींना सर्व प्रकारचे गौरव देऊन एका ताम्रपटावर दानदेखील लिहून दिले आहे. दानपत्रात– प्रति दिवस काशीत १२ माहेश्वर लोकांची प्रसाद व्यवस्था करावी म्हणून खर्चासाठी प्रतिवर्षी जन्मदिवशी हुंडीच्या द्वारे ६०० चांदीचे

रुपये पाठविण्याची व्यवस्था करावी, असा उल्लेख दानपत्रात आहे. दि. १०.७.१९४६ मध्ये हा ताम्रपट लिहून श्री महाराजांनी आपले हस्ताक्षर करून या पीठास समर्पिले आहे. वरील हे दान आपल्या देशातील संस्थाने विलीन होईपर्यंत निरंतर या पीठास येत होते. मैसूरच्या मुम्मडी श्री कृष्णराज वडेयर यांचे हे दानपत्र आजदेखील मठात सुरक्षित आहे.

या पद्धतीने श्रीहरेश्वर महास्वामीजींनी आपल्या शिवयोगसामर्थ्याने राजे-महाराजांवर अनुग्रह करून त्यांच्याकडून दानादी प्राप्त करून श्री पीठास समृद्ध केले. याप्रमाणे त्यांनी १८२५ पासून १८७९ पर्यंत म्हणजे ५४ वर्षापर्यंत पीठाचार्य म्हणून धर्मकार्य केले.

५४ व्या वर्षी म्हणजे इ.स. १८६५ मध्ये काशी जंगमवाडी महामठात अभ्यास करणाऱ्या अनेक विद्यार्थ्यांमधील बुद्धिमान, व्यवहारकुशल जबाबदारीपूर्वक कार्य करण्याची क्षमता असणाऱ्या आंध्र प्रदेशच्या बोधन नगरच्या पट्टाध्यक्ष असणाऱ्या श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्यांना आपला उत्तराधिकारी म्हणून नेमस्त केले. त्यांना पीठाचे चराधिकार दिले. या अनुग्रह समारंभात पांढुर्णा वीरशैव संस्थान मठाचे चरमूर्ती श्री ष.ब्र. शंकरय्या स्वामी, पांड मठ (?) संस्थानचे चरमूर्ती नागलिंग स्वामी, बोधन मठ संस्थानचे शिवलिंग स्वामी, सोलापूरचे देशिक नागलिंग स्वामी, आष्टी संस्थान मठाचे देशिक सदाशिव स्वामी, कित्तुर मठाचे देशिक मूर्ती श्री गुरुपादय्या स्वामी, त्याच कित्तुरचे देशिक बसवलिंगय्या स्वामी, पारेकर रामलिंगय्या स्वामी, चिक्कलगूढचे सिद्रामय्या स्वामी, कवळासद मडिवाळय्या शास्त्री, नागपूरचे काशीनाथय्या स्वामी, पांढुर्ण्याचे नागलिंगय्या स्वामी, हानगली महाराज मठाचे शिवलिंगय्या स्वामी, श्री शरभय्या, श्री चनबसय्या, श्री राजेश्वर आणि श्री विश्वनाथ स्वामी व त्यावेळी मठात राहून अभ्यास करणारे विविध मठांचे मठाधिपती उपस्थित होते.

श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी आपले गुरू हरेश्वर (श्री सिद्धलिंग) शिवाचार्य महास्वामीजींच्या आदेशानुसार पीठाचे सर्व व्यवहार पाहू लागले. यांची व्यवहारकुशलता पाहून महास्वामीजींनी ९.३.१८७२

रोजी यांच्या नावाचे विधिवत् इच्छापत्र करून अधिक जबाबदारी सोपविली.

पुढे एक दोन वर्षांत विधिवत् आपल्या अमृतहस्ते पट्टाधिकार कार्यक्रम घेऊन त्यांना १००८ श्री मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य ऊर्फ वीरभद्र शिवाचार्य नामकरण करून आशीर्वाद दिले. त्यानंतर १८७९ मध्ये श्री १००८ जगद्गुरू हरेश्वर शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य झाले. जंगमवाडी मठातील त्यांच्या क्रियासमाधी मंदिरास 'हरेश्वर मंदिर' असे म्हणतात.

---

Will by Mahant Sidhling Alias Hareshwar Jangmwadi to Mahant Virbhadra record of Proceding to the High Court of Judicature at Allahabad, 1937, PP. 439-41.

## ८० वे जगद्गुरू
## (प्रथम) वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी



हे पूर्वाश्रमीचे आंध्रप्रदेशचे निजामाबाद जिल्ह्यातील बोधन नगराचे मठस्थ. इ.स. १८४३ मध्ये यांचा जन्म झाला. स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. पुढे बोधन मठाचा पट्टाधिकार स्वीकारून उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १८६३ मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती १००८ जगद्गुरू हरेश्वर महास्वामीजींच्या अनुज्ञेने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

पुढे काशीक्षेत्रीच्या विविध विषयांच्या विद्वानांकडून व्याकरण, साहित्य आणि न्याय, वेदान्त इ. शास्त्रांचा अभ्यास केला. दीर्घकाय, कुशाग्र बुद्धी, आकर्षक व्यक्तिमत्त्व असणारे हे श्री १००८ जगद्गुरू हरेश्वर महास्वामीजींचे अत्यंत प्रिय शिष्य होते. १८६५ मध्ये जगद्गुरू हरेश्वर महास्वामीजींनी श्रीपीठाचा उत्तराधिकार संस्कार देऊन त्यांना विधिवत् शिष्य करून घेतले.

त्यानंतर श्री वीरभद्र स्वामीजी या पीठाचे अधिकाधिक कार्य करीत असल्याचे पाहून श्री हरेश्वर जगद्गुरूंनी दि. ९.३.१८७२ पासून यांच्या नावे इच्छापत्रही केले. पुढे एक-दोन वर्षांत पीठाचे जगद्गुरू म्हणून हरेश्वर महास्वामीजींकडून जबाबदारी घेतली. याप्रमाणे काशीपीठाचे ८० वे जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी १८७९ पासून १८९१ पर्यंत म्हणजे १२ वर्षांपर्यंत पीठाध्यक्ष राहून पीठाच्या विकासाबरोबर धार्मिक कार्यक्रम केले. यांच्या अधिकारात कोडगीचे चिक्कवीरराजेंद्र तसेच त्यांचे संपूर्ण परिवाराचे सदस्य काशीत राहत होते.

हे राजे काशीपीठाचे शिष्य असल्यामुळे श्रीपीठाच्या विकासाकरिता आणि धार्मिक कार्यासाठी कोडगीच्या महाराज्ञींकडून श्रीपीठास देणगी प्राप्त

झाली. त्यानुसार वीरभद्र महास्वामीजींनी कोडगीच्या महाराणींच्या नावाने एक राणीछत्र बांधून त्यांच्या नावाने दासोह (अन्नदान) देखील सुरू केला. या शिवाय श्रीवीरभद्र महास्वामीजींच्या कार्यकाळात त्यांनी आपले गुरू श्रीहरेश्वर जगद्गुरूंच्या समाधीच्या ठिकाणी एक सुंदर शिलामंटप बांधून काढला. तोच आज 'श्रीहरेश्वर मंदिर' म्हणून प्रसिद्ध आहे. त्याशिवाय यांनी शिलाखांबावर एक विशाल दरबार हॉल तयार करून त्याच्या वरील भागात एक चित्रशाळा आणि गणेश हॉल निर्माण केला आहे. श्रीपीठाच्या पश्चिम दिशेस महाद्वाराच्या आतील भागात प्रवेश केल्यानंतर उजव्या हातास दिसणारे सुंदर खांब हे वीरभद्र जगद्गुरूंच्या कर्तृत्वशक्तीचा परिचय करून देतात.

कोडगीच्या राजघराण्याची सेवा या पीठास प्राप्त झाल्याने श्रीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींनी त्या राजास आणि त्यांच्या परिवारास स्मारक मंदिर बांधण्यास या पीठात संधी उपलब्ध करून दिली. कोडगीच्या महाराज्ञी नंजम्माजी यांनी विलायतेत (इंग्लंड) मृत्यू पावलेल्या आपल्या पतीचे– चिक्कवीर राजेंद्र यांचे पार्थिव शरीर बोटीने भारतात आणून काशीक्षेत्री असणाऱ्या जंगमवाडी मठातील परिसरात त्यांची समाधी केली. त्यावर दि. १२.२.१८६२ या दिवशी एक सुंदर शिलामंदिर निर्माण करून त्या मंदिरातील समाधीवर एक शिवलिंग स्थापून त्या लिंगाचे वीरेश्वर असे नामकरण करण्यात आले.

हे समाधिमंदिर मूकचंद नावाच्या गवंड्याने निर्मिले, असे त्या भिंतीवर कन्नड व हिंदीत कोरले आहे. हे सुंदर प्राचीन मंदिर श्रीपीठाचे एक आकर्षणकेंद्र झाले आहे. या मंदिरातील शिवलिंग भग्न झाल्याने २००२ मध्ये विद्यमान पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी त्या मंदिरात नूतन शिवलिंगाची प्रतिष्ठापना करून त्याला अतिरुद्र अभिषेक करवून सर्वांना पूजेस अनुकूल करून दिले आहे.

श्रीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी आपल्या कालावधीत राजघराण्यांकडून पूजित झाले. त्या घराण्यांना अनुग्रहीत करून

दि. १७.८.१८९१ रोजी एकमेव प्रिय शिष्य असणाऱ्या राजेश्वर स्वामीजींना आपला उत्तराधिकारी म्हणून त्यांच्या नावाने इच्छापत्र केले. अंतिम समयी कॉलरा रोगाने ग्रस्त झाल्याने आपले उत्तराधिकारी नेमलेल्या दुसऱ्या दिवशी म्हणजे दि. १८.८.१८९१ म्हणजे वयाच्या ४८ व्या वर्षी लिंगैक्य झाले. यांची समाधी हरेश्वर मंदिरात केली आहे.

लिं. श्री वीरभद्र जगद्गुरू अत्यंत प्रभावी व्यक्तिमत्त्व असलेले होते. तेव्हा ब्रिटीश शासन काळात बनारसला येणारे प्रत्येक जिल्हाधिकारी (कलेक्टर) जंगमवाडी मठात येऊन श्री वीरभद्र जगद्गुरूंचे दर्शन आशीर्वाद घेत असत. यांच्या काळात जंगमवाडी मठात आलेल्या यात्रेकरू तसेच संस्कृत अध्ययनास येणारे विद्यार्थी यांच्यासाठी प्रसादव्यवस्था केली होती. श्रीवीरभद्र जगद्गुरू केवळ १२ वर्षे पीठाधिपती होते. या अल्पकाळात काशीपीठात त्यांनी लक्षणीय सुधारणा केली.

---

Will by Mahant Birbhadra Jangam to Rajeshwar Swami Record of Proceeding in the High Court of Judicature at Allahbad 1937. PP. 481-82.

## ८१ वे श्रीजगद्गुरू
## राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजी



काशीपीठाचे ८१ वे पीठाधिपती श्रीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजी हे पूर्वाश्रमीचे आंध्रप्रदेशातील पूर्व गोदावरी जिल्ह्यातील राजमंड्री नगरचे. इ.स. १८४५ मध्ये त्यांचा जन्म झाला. आपल्या गावी प्राथमिक अध्ययन पूर्ण करून उच्च अभ्यासाकरिता ते काशीक्षेत्रास आले. तत्कालीन पीठाधिपती १००८ जगद्गुरू हरेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने विश्वाराध्य सिंहासनाच्या महामठात १८६५ मध्ये प्रवेश घेतला.

शांतमूर्ती, सरळ स्वभावाच्या राजेश्वरांनी तेव्हा काशीच्या विद्वानांकडून साहित्य, शास्त्र, व्याकरणादी विषयांचा अभ्यास केला. अध्ययनकाळात एकांतवास तसेच तपस्येकडे ते अधिक लक्ष देत. ते जगद्गुरू प्रथम वीरभद्र शिवाचार्यांचे अत्यंत प्रिय शिष्य होते. वीरभद्र जगद्गुरूंना कॉलरा झाला असताना १७.८.१८९१ रोजी त्यांनी श्री राजेश्वर स्वामीजींच्या नावे उत्तराधिकारी म्हणून इच्छापत्र लिहून ठेवले. दुसऱ्याच दिवशी म्हणजे १८.८.१८९१ मध्ये श्री वीरभद्र जगद्गुरू लिंगैक्य झाले. श्रीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी काशीपीठाचे ८१ वे जगद्गुरू म्हणून अधिकार ग्रहण केला. श्री राजेश्वर महास्वामीजी उदार अंतःकरणाचे असल्याने कोणीही आले तरी ते रिकाम्या हाताने परत पाठवत नसत. त्यांच्या औदार्याने मोहित झालेले काशीवासी त्यांना 'जंगमराजा' असे म्हणत.

श्रीजगद्गुरू राजेश्वर महास्वामीजी स्वतः विद्वान होते. विद्वानांना बोलावून त्यांचा गौरव करीत. यांच्या कालावधीत काशीक्षेत्री साक्षात् विश्वनाथ प्रतिरूप म्हणून नावारूपाला आलेले म.म. पंडित शिवकुमार मिश्र हे श्री राजेश्वर जगद्गुरूंवर अपार श्रद्धा ठेवून होते. वरचेवर ते या पीठात येऊन महास्वामीजींचे आशीर्वाद घेऊन जात. एकदा पोटदुखीमुळे ते पीठात आले नाहीत. हे माहीत झाल्यानंतर श्री राजेश्वर गुरुजींनी आपल्या इष्टलिंगपूजेत

लिंगास वाहिलेले बिल्वपत्र शिवकुमार शास्त्रीजींकडे पाठवून दिले. शास्त्रीजींनी ते निर्माल्य भक्तीने स्वीकारल्यानंतर त्याच दिवशी त्यांची पोटदुखी कमी झाली. तेव्हा आनंदित झालेल्या शास्त्रीजींनी दर्शन घेऊन आपण पाठविलेले बिल्वदल कोणत्या शिवलिंगास वाहिले म्हणून विचारले. तेव्हा महास्वामीजींनी ती बिल्वदले इष्टलिंगास वाहिली होती असे सांगितले. हे ऐकून शास्त्रीजींच्या मनात इष्टलिंगाविषयी भक्ती उदित झाली. पं. शिवकुमार स्वामीजींनी श्रीनंदिकेश्वर शिवाचार्यविरचित 'लिंगधारणचंद्रिका' ग्रंथावर संस्कृत भाषेत शरत् नावाचे व्याख्यान लिहून श्रीराजेश्वर महास्वामीजींना समर्पिले. या शरत् व्याख्यानासह 'लिंगधारणचंद्रिका' ग्रंथ इ.स. १९०५ मध्ये काशीपीठाद्वारे प्रकाशित झाला. पं. शिवकुमार मिश्रांनी व्याख्यान लिहिल्यामुळे काशी विद्वानाकडून हा ग्रंथ आदरास पात्र झाला.` श्रीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींकडून काशीपीठास विद्वानांचा संपर्क दिवसेंदिवस वाढत गेला. श्री राजेश्वर जगद्गुरूंनी काशीस येणाऱ्या कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र इ. प्रांतांच्या विद्यार्थ्यांना विशेष सुविधा प्राप्त करून दिल्या.

त्यावेळी अनेक विद्यार्थी या पीठात राहून व्याकरण, तर्क, साहित्य तसेच वेदान्तादी शास्त्रांत प्रगल्भ, प्रखर पांडित्य प्राप्त करून घेते झाले. श्रीजगद्गुरू राजेश्वर महास्वामीजी वयाच्या ५२ व्या वर्षी दि. २.७.१८९७ मध्ये काशीपीठात अध्ययन करीत असणाऱ्या सोलापूरच्या शिवलिंग स्वामीजींच्या नावाने इच्छापत्र लिहून त्यांना श्रीपीठाचा पट्टाभिषेक करून श्री १००८ जगद्गुरू (द्वितीय) शिवलिंग शिवाचार्य म्हणून नामकरण केले. तेव्हापासून मठाची विशेष व्यवहाराची जबाबदारी शिवलिंग शिवाचार्यांवर सोपविली. श्री राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजी १६ वर्षेपर्यंत पीठाध्यक्ष होते. वयाच्या ६२ व्या वर्षी दि. ३१.७.१९०७ दिवशी ते लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी जंगमवाडी मठात हरेश्वर मंदिरात केली गेली.

---

Will by Mahant Rajeshwar Swami in favour of Sheoling Jangam Record of Proceeding in the High Court of Judicature at Allahabad, 1937, PP. 535-36.

## ८२ वे श्रीजगद्गुरू
## (द्वितीय) शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी



काशीपीठाचे ८२ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य ऊर्फ श्रीजगद्गुरू (द्वितीय) शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी पूर्वाश्रमीचे महाराष्ट्रातील सोलापूरच्या एका माहेश्वर कुटुंबात इ.स. १८६५ मध्ये जन्मले. प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण तेथेच पूर्ण केले. सोलापूरच्या पश्चिम मंगळवार पेठेतील मीठ गल्लीत असणाऱ्या शिवानुभव मंगलकार्यालयाशेजारच्या विरक्त संप्रदायाच्या लाळगुंडी मठावर त्यांना उत्तराधिकारी म्हणून नेमले होते.

त्यानंतर त्यांनी तेथील सुप्रसिद्ध मद्वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत अध्ययनासाठी प्रवेश घेतला. पंचकाव्यांचा अभ्यास केल्यानंतर श्री वारद मल्लप्पा यांच्या प्रेरणा आणि प्रोत्साहनाने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १८८५ मध्ये काशी जंगमवाडी महामठात प्रवेश घेतला. काशीक्षेत्रीच्या पंडितांकडून व्याकरण, साहित्य, न्यायशास्त्र इ.चा पूर्ण अभ्यास केला. विशेषकरून न्यायशास्त्रात प्रखर पांडित्य मिळवले. तेव्हा काशीपीठात अध्ययन करणाऱ्या अनेक मेधावी विद्यार्थ्यांमध्ये हे आपल्या विद्यावैभवाने श्रेष्ठ ठरले.

ते अध्ययनासोबत श्रीपीठाच्या विविध सेवाकार्यांत अहमहमिकेने भाग घेत असत. यांचे विद्यानैपुण्य, व्यावहारिक कार्यकुशलता आणि पीठाची सेवा करण्याची वृत्ती पाहून पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या मनात यांना उत्तराधिकारी म्हणून निवडण्यास योग्य आहेत असा निश्चय केला. त्यांची ती धारणा पुढे पक्की होत गेली. दि. २.७.१८९७ रोजी श्रीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी श्री शिवलिंग स्वामीजींना काशीपीठाचे उत्तराधिकारी म्हणून

पट्टाभिषेक केला. त्यांचे श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू महंत शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी असे नामकरण करून इच्छापत्र लिहून ठेवले.

पीठाधिकार प्राप्त झाल्यापासून दि. ३१.७.१९०७ पर्यंत १० वर्षांचा काळ आपले गुरू श्री राजेश्वर महास्वामीजींच्या अनुमतीने पीठाच्या धार्मिक कार्यासोबत व्यावहारिक कार्याकडेदेखील ते लक्ष देऊ लागले. श्रीपीठात विश्वाराध्य बँक स्थापून त्या माध्यमातून आर्थिक व्यवहार सुव्यवस्थितपणे चालू ठेवले. आपल्या बँकेतील ठेवी सुरक्षित ठेवून ठेवीदारांना ते योग्य व्याज देत होते. यांच्या काळात ही बँक काशीक्षेत्री खूप प्रसिद्धी पावली. पुढे १९०७ मध्ये श्रीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर श्रीकाशीपीठाचे पूर्णाधिकार प्राप्त झाल्यावर त्यांनी १९३२ पर्यंत म्हणजे २५ वर्षेपर्यंत पीठाची सर्वांगीण अभिवृद्धी करण्यासोबत अनेक महत्त्वपूर्ण कार्ये केली.

**श्री काशी वीरशैव विद्या धर्माभिवृद्धी फंड स्थापना**

श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी उच्चविद्याविभूषित होते. ते गरीब परिस्थितीतून पुढे आले होते. आर्थिक अडचणीमुळे अनेक लोक विद्येपासून वंचित होतात हे लक्षात घेऊन यावर एक शाश्वत उपाय ते शोधत होते. १९१० ई. शा.श. १८३२ माघ मास कृष्णपक्ष १४ सोमवार- महाशिवरात्रीच्या धर्मसभेत श्री महास्वामीजींनी हा विषय सांगितला. त्यावेळी सभेत उपस्थित असणाऱ्या विविध मठाधिपती, भक्तांनी या विषयासंबंधी गंभीरपणे विचार करून ही समस्या दूर कण्यासाठी आपण सर्व तनमनधनाने सेवा करू म्हणून आश्वासन दिले.

मठाधिपती आणि भक्तांचा उत्साह पाहून श्रीमहास्वामीजींनी विद्येच्या प्रसार व प्रसारार्थ एक स्थायी निधी स्थापावा म्हणून निर्धार केला. त्याच सभेत श्री 'काशी वीरशैव विद्या धर्माभिवृद्धी फंड' नावाची एक संस्था स्थापिली आणि त्या संस्थेस श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन संस्थाना कडून १०,००५/- (दहा हजार पाच) रुपये आशीर्वाद रूप दिले. तेव्हा

त्या सभेत अतनूर मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य स्वामीजी- १०१ रु., मालगावी मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गंगाधर स्वामीजी- १०१ रु., निडसोसी श्रीनीलकंठप्पा- २५ रु., श्री गुरुलिंगप्पण्णा सत्यण्णा पांगे नागाविकर- १००१ रु., श्री बापुराव थोबडे- १०० रु., श्री रामप्पा भोगडे- ५१ रु., श्री भीमण्ण सोलापूर- २५ रु., अशा देणग्या महास्वामीजींना सभेमध्ये समर्पित केल्या. दुसऱ्या दिवशी धर्मसभेत माणूरमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. श्रीगिरी शिवाचार्य स्वामीजी- १०१ रु., बळ्ळारीचे श्री गुरुलिंगय्या ओड्डिनशेट्टी- २५ रु., श्री महारुद्रप्पा खेणी, हैदराबाद- १००० रु. फंडास समर्पिले आणि महास्वामीजींच्या कृपेस पात्र झाले.

श्री महास्वामीजींनी हा फंड संग्रह करण्यासाठी आणि संग्रहित झालेला निधी संस्थेस वितरण करण्यासाठी एक व्यवस्थापक मंडळ स्थापन केले. त्या समितीत श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य स्वामीजी, पारगाव, श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामीजी, मालगाव, श्री म.नि.प्र. दहावे हुच्चेश्वर स्वामीजी, कमतगी, श्री वे. गुरुसिद्ध देवरू, एकुंडी, श्री वे. शिवलिंग देवरू, होळल्, श्री वे. चंद्रशेखर शास्त्रीजी, देवी होसुरू, श्री वे. पंडित सदाशिव शास्त्री, अब्बिगेरी, श्री वे. कलिगणनाथ शास्त्री, पगडदिन्नी, बंगालचे श्री विश्वेश्वर विद्यारत्न भट्टाचार्यजी, श्री मल्लिकार्जुन बापूअय्या खातुगावकर, श्रीकंठशास्त्री सूडी, श्री गुरुसंग शास्त्री, मुद्दाबळ्ळी, गौरीशंकर शास्त्री, मैसूर, शंकर शास्त्री, पुणे आणि विश्वाराध्य ज्ञानसिंहासन संस्थानचे सर्वाधिकारी असणारे पं. भालाक्ष शास्त्रीजी या सर्वांना व्यवस्थापक सभासद करून घेतले.

### फंडाचे उद्देश

काशीक्षेत्र सकल विद्येचे मूल केंद्र असण्याने नाना देशीचे व प्रांतांचे विद्यार्थी विद्याध्ययनासाठी येत असत. श्री काशी वीरशैव विद्याधर्माभिवृद्धी फंड ही संस्था काशी जंगमवाडी मठातच राहणार होती. कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र इ. प्रांतांत संस्कृत आणि वैदिक पाठशाळा स्थापून श्रीकाशीमहास्वामीजींना अथवा व्यवस्थापक मंडळाने विनंती अर्ज

पाठविल्यास त्या पाठशाळेस योग्य अध्यापक काशीहून पाठवून त्या अध्यापकाचे मासिक वेतन वरील फंडातून पाठविण्याची व्यवस्था केली. हा उद्देश पूर्ण करण्यासाठी पूज्य महास्वामीजींनी भरपूर परिश्रम घेतले. याशिवाय त्यांच्याकडून घडलेली विशेष कामे अशी–

**काशी हिंदू विश्वविद्यालयास भूमिदान**

महामना मदनमोहन मालवीयजींनी विद्यानगरी काशीक्षेत्री दि. ४.२.१९१६ शुक्रवारी तत्कालीन ब्रिटीश व्हाइसराय लॉर्ड हार्डिंज यांच्या करकमलाने काशी हिंदू विश्वविद्यालयाची प्रतिष्ठापना केली. आज विश्वविख्यात असणाऱ्या या विश्वविद्यालयाची स्थापना होण्यापूर्वी त्याला हवी असणारी जमीन तसेच धनराशीच्या संग्रहाकरिता श्री मालवीयजींनी अनेक जमीनदारांकडे तसेच राजे–महाराजांकडे जाऊन भू–धनादीचे दान प्राप्त केले. सर्वप्रथम भूमी मिळविण्याच्या उद्देशाने त्यांना अपेक्षित असणाऱ्या भूमीसाठी जमीनमालकांकडे गेले आणि जमीन संपादिली. तसेच एक दिवस मालवीयजी जंगमवाडी महामठास आले आणि तत्कालीन काशी ज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य यांच्याकडे जंगमपूरच्या जमिनीसाठी विनंती केली.

इ.स. ५६४ मध्ये तत्कालीन विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाधिपती ५१ वे श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य (मल्लिकार्जुन जंगम) महास्वामीजींना काशी नरेश जयनंददेवजीने स्वतःला तसेच स्वतःच्या वंशस्थाना शिवकृपा प्राप्त व्हावी म्हणून जंगमवाडी मठाच्या गायीना चरण्यासाठी म्हणून ३६५ एकर जमीन दान दिली होती. त्या भूमीत तेव्हा तत्कालीन जगद्गुरूंकडून जंगमपूरची प्रतिष्ठापना केली होती. त्या जंगमपूरची जमीन विश्वविद्यालयाच्या स्थापनेसाठी उपयुक्त आहे असे वाटल्याने मदनमोहन मालवीय यांनी ती मागितल्यावर श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी ७५.६८ एकर जमीन काशी हिंदू विश्वविद्यालयाकरिता सहर्ष देऊ केली. काशीपीठाचे श्रीजगद्गुरू महंत शिवलिंग शिवाचार्यांकडून जंगमपूरची ही जमीन काशी हिंदू विश्वविद्यालयास दिलेली बाब 'History of the

Banaras Hindu University' यात उल्लेखित आहे. हे उद्धरण या ग्रंथात या मागे दिलेले आहे. याप्रमाणे श्री १००८ जगद्गुरू महंत शिवलिंग शिवाचार्यजींनी विश्वविद्यालयास भू-दान करून काशीच्या शैक्षणिक क्षेत्रात एक आदर्श निर्माण केला आहे. काशीपीठास ही अत्यंत अभिमानाची गोष्ट झाली आहे.

**काशीत श्रीजगद्गुरू पंचाचार्य प्रथम संमेलन,**

**श्री काशीपीठातील गुरुकुलाचे नामकरण**

श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी धार्मिक, सामाजिक तसेच शैक्षणिक समस्यांविषयी निरंतर चिंतन करीत. या तिन्ही क्षेत्रांतील समस्यांवर पंचपीठाच्या समान पीठाचार्यांशी चर्चा करून ठराव पारित करून पीठाचार्यांकडून सर्वसंमत निर्णय घेऊन कार्य करण्यासाठी त्यांनी काशीपीठात १९१८ इ.च्या मार्च महिन्यात महाशिवरात्री शुभदिनी श्रीजगद्गुरू पंचाचार्य संमेलन भरविले. काशीपीठाचे आमंत्रण स्वीकारून श्रीमद् रंभापुरी वीरसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीमद् उज्जयिनी सद्धर्मसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्रीमद् गिरिराज ऊर्फ सूर्यसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू वीरभिक्षावर्ती शिवाचार्य महास्वामीजी काशीक्षेत्रास समयानुसार आले होते. केदारपीठास आमंत्रण दिले असूनही तत्कालीन पीठाचार्य हिमवत्केदार वैराग्यसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू रावल विश्वलिंग शिवाचार्य महास्वामीजी प्रकृती अस्वास्थ्यामुळे येऊ शकले नाहीत. तरी त्यांनी काशीपीठात झालेले समान पीठाचार्यांचे निर्णय आम्हास मान्य असतील असे पत्र लिहून काशीजगद्गुरूंना पाठवून दिले होते.

आपल्या आमंत्रणानुसार आलेल्या सर्व पीठाचार्यांना स्वत: श्रीजगद्गुरु शिवलिंग शिवाचार्यांनी त्यांच्या निवासस्थानी जाऊन माल्यार्पण केले. काशीक्षेत्री चारही जगद्गुरूंची अभूतपूर्व आडवी पालखी शोभायात्रा दि. १०.३.१९१८ रोजी रविवारी सायंकाळी ३.३० वा. निघून नगरीच्या प्रमुख रस्त्याने रात्री ८.३० वा. जंगमवाडी मठात येऊन पोहोचली. या उत्सवात

काशीमहास्वामीजींकडून आणि विजयनगरच्या महाराजांकडून पाठविलेले आठ हत्ती, विविध वाद्यवृंद, तसेच कर्नाटक, महाराष्ट्रादी प्रांतांतील हजारो भक्त सहभागी झाले होते. काशीवासीयांना हा एक अभूतपूर्व उत्सव पाहायला मिळाला.

दुसऱ्या दिवशी दि. ११.३.१९१८ सोमवार महाशिवरात्रीनिमित्त नव्याने तयार केलेल्या चांदीच्या रथात विश्वाराध्यांची उत्सवमूर्ती ठेवून रथोत्सव सोहळा पार पडला. मध्ये एक दिवस सोडून मार्च १३, १४, १५, १६ तारखेस श्रीजगद्गुरू पंचाचार्यांचा संमेलन कार्यक्रम विधिवत् पार पडला. या तीन दिवसांच्या संमेलनात धार्मिक तसेच सामाजिक विषयांवर महत्त्वपूर्ण निर्णय घेण्यात आले. पुढे दि. २२.३.१९१८ पासून श्रीजगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या अध्यक्षतेखाली एक विद्वत्सभा बोलावण्यात आली. या सभेत काशी महामहोपाध्यायादी अनेक पंडित सहभागी झाले होते. सभेत शास्त्रार्थ झाला. शेवटी सर्व विद्वानांचा सन्मान करून दक्षिणातांबुलादी देऊन सत्कार करण्यात आला.

दि. २३.३.१९१८ पासून जगद्गुरू पंचाचार्य संमेलनाचे स्मारक म्हणून पीठातील प्राचीन गुरुकुलाचे 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे नामकरण करण्यात आले. श्रीमद् जगद्गुरू पंचाचार्य संमेलनाचे स्मारक म्हणून 'गुरुकुलम्' अक्षरे कोरलेला शिलालेख पंचाचार्यांच्या अमृतहस्ताने स्थापिला गेला. या संदर्भात श्री १००८ काशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी गुरुकुलभवन निर्माण करण्यासाठी ७५,००० रुपये खर्च करण्याची योजना आखली. अन्य पीठाचार्यांनी विद्यार्थी तसेच ग्रंथखरेदी, प्रसादव्यवस्थेसाठी आपापल्या पीठाकडून आर्थिक साहाय्य करण्याचे आपल्या आशीर्वचनांत आश्वासन दिले.

याप्रमाणे श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्यांच्या नेतृत्वाखाली श्रीजगद्गुरू पंचाचार्यांचे प्रथम संमेलन काशीक्षेत्री अभूतपूर्वरित्या पार पडले. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल विधिवत् स्थापिले गेले. नागनूर बृहन्मठाचे पंडित काशीनाथ शास्त्रीजी या संमेलनाचे कार्याध्यक्ष होते. धारवाडचे वे.

एच. एस. शिवलिंग शास्त्रीजींनी पंचाचार्य संमेलनाचा वृत्तांत मुद्रित करून प्रसिद्ध केला. तो संपूर्ण आढावा या ग्रंथाच्या परिशिष्टात यथावत् संग्रहित केला आहे. जिज्ञासू तो पाहू शकतात.

**श्रीकाशीक्षेत्री अग्निकुंड**

१९२९ मध्ये प्रयागक्षेत्री १२ वर्षांनंतर येणारा पूर्णकुंभ कार्यक्रम होता. त्या निमित्ताने श्री १००८ शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी काशी जंगमवाडी मठात दक्षब्रह्म यज्ञकुंडाच्या विध्वंसनाच्या प्रतीकात्मक अग्निकुंड कार्यक्रमाचे आयोजन केले. या कार्यक्रमास कर्नाटक तसेच महाराष्ट्रातून अनेक पुरवंतांनी भाग घेतला होता. ते सारे पारंपरिक वेशभूषेत वीरभद्राचे वडप सांगत. जयघोष करीत. त्यांनी धगधगत्या अग्नीतून चालून आपल्या गाल, ओठ, जिभेतून तांब्याचे तसेच चांदीचे शस्त्र आरपार घालून दर्शकांना आश्चर्यचकित केले. वीरभद्रभक्त पुरवंतांचे हे पराक्रम पाहून काशीचे नागरिक तसेच विद्वान आजही ते आठवून रोमांचित होतात. दक्षिण भारताच्या या वीरभद्राचे चमत्कार उत्तर भारतीयांना दाखविण्याकरिता म्हणून श्रीशिवलिंग जगद्गुरूंनी हा कार्यक्रम तेव्हा आयोजित केला होता असे वाटते.

**परळी क्षेत्री महारुद्राभिषेक**

बारा ज्योतिर्लिंगांपैकी परळीचे वैद्यनाथ हे एक होय. आंध्र प्रदेशीचे श्री वे. शिवकोटी वीरभद्रस्वामीजी इ.स. १९२४ मध्ये वैद्यनाथास महारुद्राभिषेक करण्याच्या उद्देशाने परळी क्षेत्री गेले. तेथील माहेश्वर (जंगम) पुरोहितांना घेऊन वैद्यनाथास महारुद्राभिषेक करावा असा निश्चय केल्यानंतर स्थानिक ब्राह्मण वैदिकांनी त्यात सहभागी होण्याची इच्छा व्यक्त केली. पण परम शिवभक्त असणारे शिवकोटी वीरभद्रजी त्यास राजी झाले नाहीत. तेव्हा वैदिक ब्राह्मणांनी यांना महारुद्राभिषेक करू देऊ नये या उद्देशाने माहेश्वरांना वेद वाचण्याचा अधिकार नाही, म्हणून यांच्याकडून पूजाविधी केली जाऊ नये असा निजाम सरकारच्या न्यायालयात अर्ज केला. तेव्हा याविषयी सुमारे ६ वर्षे पर्यंत केस चालली. पक्षकाराच्या विद्वानांकडून निजाम सरकारच्या न्यायालयात आपापली बाजू मांडली. शेवटी वेदतीर्थ पं. विरूपाक्ष ओडेयर

यांच्या तर्कपूर्ण वादानंतर परळी प्रकरणात वीरशैवांचा विजय झाला. या विजयात समाजातील अनेक गणमान्य व्यक्ती तसेच मठाधिपतींनी महत्त्वपूर्ण असे सहकार्य दिले होते. विरक्ताग्रगणी श्री म.नि.प्र. हानगल कुमारस्वामीजींनी देखील अनेक भक्तांकडून व विद्वानांकडून मिळवलेले संपूर्ण सहकार्य व त्यासाठी त्यांनी घेतलेल्या परिश्रमाचा या ठिकाणी कृतज्ञतापूर्वक उल्लेख करणे अत्यंत गरजेचे आहे.

या प्रकारे संपूर्ण वीरशैव समाजास मिळालेला गौरवपूर्ण विजयोत्सव अत्यंत उत्साहात साजरा करण्यासाठी परळीत वीरशैव महारुद्राभिषेक कमिटीची स्थापना करण्यात आली. सिंदखेडच्या श्रीमान विश्वनाथप्पा करबसप्पा हत्ते यांची त्या कमिटीचे अध्यक्ष म्हणून सर्वानुमते निवड करण्यात आली. श्रीमान विश्वनाथप्पा हत्ते यांनी परळी वैद्यनाथास वैभवाने महारुद्राभिषेक केला आणि श्री वे. शिवकोटी वीरभद्रय्या स्वामीजींनी संकल्प पूर्ण करण्याचा निश्चय केला.

यानुसार शालिवाहन शके १८३० पासून २२.५.१९३० पासून पूर्ण ११ दिवस एक बृहत् समारंभ योजून तो पार पाडला. या समारंभास काशीपीठाचे श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी, चौडदानपूरचे वेदतीर्थ प्रो. श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य ओडेयर, विजयपूरचे पं. श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी, काशीचे श्रेष्ठ विद्वान वेदतीर्थ चिदरेमठाचे वीरभद्र शर्मा यांना तसेच देशातील अनेक विद्वानांना, कविकलाकारांना, प्रतिष्ठित सद्भक्तांना बोलाविण्यात आले होते.

या निमित्ताने दि. १२.५.१९३० पासून २२.५.१९३० पर्यंत विजयपूरच्या पं. श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या विद्वतापूर्ण धार्मिक प्रवचनाचे आयोजन करण्यात आले होते. यात दि. १९.५.१९३० पासून २१.५.१९३० पर्यंत तीन दिवस वेदतीर्थ प्रो. श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी ओडेयर यांच्या अध्यक्षतेखाली विविध विषयांवर चर्चासत्रे घेण्यात आली.

याप्रमाणे विद्वानांची चर्चासत्रे, सार्वजनिक सभेचे आयोजन करण्यात आले. त्या दरम्यान मंदिरात वेदतीर्थ पं. चिदरेमठाचे वीरभद्र शर्मा यांच्या

नेतृत्वाखाली वैद्यनाथ महादेवन यांच्या मस्तकावर सहस्रधारापात्रामधून पंडित वीरमाहेश्वर वैदिक सस्वर रुद्रपठणपूर्वक महारुद्राभिषेक करीत होते. याप्रमाणे परळी क्षेत्री बृहत् प्रमाणात धार्मिक कार्यक्रम चालू असताना या सर्व कार्यक्रमाचा मुकुटप्राय असणारा कार्यक्रम म्हणजे काशीजगद्गुरूंचा अद्भुत आडवी पालखी शोभा महोत्सव होय. पूर्वनियोजित निश्चय केल्याप्रमाणे वैशाख वद्य पंचमी दि. १८.५.१९३० शनिवारी श्रीमत्काशी श्रीज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू महंत शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींचा आडवी पालखी महोत्सव समस्त बिरुदावलीसह नगरीच्या प्रमुख रस्त्याने वैभवपूर्वक संपन्न झाला. या उत्सवात जनकलश (कुंभ) मस्तकी धारण करून असंख्य सुहासिनी सहभागी झाल्या होत्या. उत्सवाच्या अग्रभागी वेगवेगळे वाद्यवृंद आणि मंदगती गजराज शोभून दिसत होता. या उत्सवात अपार भक्त सहभागी झाले होते. त्याशिवाय देशमुख, देशपांडे, पाटील, कुलकर्णी, वकील, बॅरिस्टर आणि सरकारी अधिकारी सहभागी झाले होते.

या उत्सवानंतर श्री महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात दि. २०.५.१९३० पासून २२.५.१९३० पर्यंत तीन दिवसपर्यंत विशेष धार्मिक महासभेचे आयोजन करण्यात आले होते. या सभेत शिवकोटी वीरभद्र स्वामीजींसह परळीच्या न्यायप्रकरणात सहकार्य केलेल्या विद्वानांना तसेच प्रतिष्ठित नागरिकांना श्रीमहास्वामीजींच्या अमृतहस्ते गौरवांकित करून आशीर्वाद दिले. अनेक पंडितांना, कवि-कलाकारांना दि. २१.५.१९३० च्या महासभेत काशी महास्वामीजींच्या अमृतहस्ते विविध पदव्यांनी अलंकृत करण्यात आले. परळीत श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात पार पडलेला परळीचा महारुद्राभिषेक विविध धार्मिक कार्यक्रम आजदेखील जनमानसात कोरलेला आहे.

### श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्यांना उत्तराधिकार-पट्टाभिषेक

श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी १९०७ पासून १९३२ पर्यंत म्हणजे अखंड २५ वर्षे अत्यंत समर्थपणे पीठाचे सर्व व्यवहार पार पाडले. धार्मिक तसेच शैक्षणिक जागृती निर्माण करून समाजातील जनता

सन्मार्गावर चालावी असे कार्य केले. त्रिकाल लिंगपूजानिष्ठ असणारे हे दररोज मेण्यामध्ये बसून गंगा नदीत स्नान करून येत. असे आपले दैनंदिन कार्य करीत असताना वृद्धापकाळ आणि अनारोग्य कारणाने त्यांच्या मनात या पीठाच्या पुढील व्यवस्थेचा विचार आला. त्या काळी काशी जंगमवाडी मठातील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अनेक विद्यार्थी विविध शास्त्रांचा अभ्यास करीत होते. त्यात सुशील, सुलक्षणी, विद्याविभूषित असणारे महाराष्ट्रातील तासगाव हिरेमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजींना उत्तराधिकार देण्याविषयी दि. २३.६.१९१२ रोजी एक इच्छापत्र लिहिले. दि. ६.१२.१९१९ मध्ये दुसरे इच्छापत्र लिहिले. पुढे फार दिवसांनंतर शालिवाहन शके १८५३ मास शुद्ध द्वादशी शुक्रवार मध्यास ११.३० वा. दि. १९.२.१९३२ इ. आपण पूर्वी रोज दोन वेळा लिहून ठेवलेल्या इच्छापत्रानुसार तासगाव हिरेमठाचे श्री मल्लिकार्जुन शिवाचार्य ऊर्फ श्री पंचाक्षर शिवाचार्यांना आपल्या अमृतहस्ते विधिवत् पट्टाभिषेक केला. त्यांचे श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी असे नामकरण केले.

यावप्रमाणे श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी सुदीर्घ काल पीठाची अखंड सेवा करून श्रांत झाले. ६७ व्या वर्षांचे वय असताना म्हणजे शा.श. १८५३ फाल्गुन मास कृष्णपक्ष ३० अमावस्या दि. ५.४.१९३२ रोजी मंगळवारी लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी कैलास मंटपाच्या नैर्ऋत्य दिशेस असून या समाधीवर चंद्रमौळीश्वर लिंग प्रतिष्ठापिले आहे. या लिंगाच्या नर्मदेश्वर बाणात स्वाभाविक असणाऱ्या अर्धचंद्र आणि गंगाधार चिन्ह उठून दिसतात.

---

(1) Will by Shivling Swami Jangam Record of proceeding in the High Court of Judicature at Allhbad 1937, PP 619-20.
(2) Will by Shivling Swami in th favour Mallikarjun Recording in the High Court of Judicature at Allhbad 1937, PP 659-61.

## ८३ वे श्रीजगद्गुरू
## पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी



श्रीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन जंगमवाडी मठाचे ८३ वे पीठाधिपती म्हणजे श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी. हे पूर्वाश्रमीचे महाराष्ट्रातील सांगली जिल्ह्यातील तासगावचे हिरेमठ. या हिरेमठास पट्टाधिकार तसेच चराधिकार दोन्ही असतात. काशीपीठानुवर्ती असणारा हा मठ पुत्रवर्गी मठ आहे.

या हिरेमठाच्या श्री वे. विरूपाक्ष स्वामी जंगम आणि सौ. शिवलिंगव्वा या माहेश्वर दम्पतीच्या पुण्यगर्भी शा.श. १८२१ भाद्रपद शुक्ल पक्ष षष्टी तिथीला दि. १५.७.१८९९ इ. सोमवारी मिरज येथे यांचा जन्म झाला. पुढे यांचे अप्पय्य म्हणून नामकरण करण्यात आले. चिरंजीव अप्पय्याने तासगावच्या दोन नंबर शाळेत ५ वी पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. तासगावचे पट्टाध्यक्ष लिंगैक्य झाल्यामुळे त्या पुत्रवर्ग परंपरा असणाऱ्या मठास मठाचे शिष्य आणि वंशज चिरंजीव अप्पय्य यांचा १९११ मध्ये पट्टाभिषेक केला. त्यांचे त्यावेळी श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले.

त्यानंतर संस्कृत अध्ययनाकरिता गावच्या भक्तांनी यांना काशीक्षेत्री पाठवून दिले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात १९११ मध्ये प्रवेश घेतला. केवळ १२ वर्षे वय असणारे, अत्यंत सुंदर दिसणारे तासगावचे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य काशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्यांचे अत्यंत प्रिय शिष्य झाले. श्री महास्वामीजी यांच्या अध्ययनाकडेही अधिक लक्ष देत असत.

श्रीजगद्गुरूंचे मार्गदर्शन, विद्वानांचे सान्निध्य, विद्यार्थी मित्रांच्या सहकार्यामुळे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्यांनी संस्कृत, साहित्य तसेच व्याकरणशास्त्राचा अभ्यास पूर्ण केला. यांचे बालपणातील आकर्षक व्यक्तित्व

आणि अध्ययनप्रवृत्तीमुळे श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी दि. २३.६.१९१२ रोजी यांचे नाव आपले उत्तराधिकारी म्हणून गुप्तपणे लिहून ठेवले.

याप्रमाणे ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजी अनेक मित्रांसोबत उत्तम रीतीने अध्ययन पूर्ण करीत होते. अभ्यासातून फुरसतीच्या काळात श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी अनुमती दिल्यानुसार श्रीपीठाचे सर्व तऱ्हेचे कार्य अत्यंत दक्षतेने करीत होते. श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजी इ.स. १९११ पासून १९३२ पर्यंत २० वर्षे काशीक्षेत्री राहून अनेक शास्त्रांत पारंगत झाले. श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी यांना बालपणापासूनच आपले उत्तराधिकारी म्हणून करायचे ठरविले होते, त्यानुसार इच्छापत्रदेखील करून ठेवले होते.

**पट्टाधिकार समारंभ**

श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजी काशीक्षेत्री अध्ययन करण्यास आले होते तेव्हा अत्यंत लहान होते. काशीला आल्यानंतर विद्येत निपुण होत वयस्कर झाले. यांचे सर्व सामर्थ्य बालपणापासून पाहत आलेल्या श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी शा.श. १८५३ माघ मास शुक्ल पक्ष द्वादशी दि. १९.२.१९३२ शुक्रवार मध्यान्ही ११.३० वा. या शुभमुहूर्तावर कैलासमंटपातील ज्ञानपीठावर बसवून सकल वैदिक विधिविधान विधिवत् पार पाडून आपल्या अमृतहस्ते पट्टबंधन करून, दंड, कमंडलू अनुग्रहीत करून काशीपीठाचे ८३ वे जगद्गुरू म्हणून अधिकार दिला. तेव्हा त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य शिवाचार्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण केले.

या समारंभास काशीचे अनेक विद्वान उपस्थित होते. तत्कालीन या पीठाचे प्रबंधक श्री रामचंद्र प्रसाद यांनी देखील समारंभात सहभागी होऊन सर्वांची सर्व तऱ्हेने व्यवस्था केली. याप्रमाणे श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींचा पट्टाधिकार महोत्सव गुरूंच्या सान्निध्यात संपन्न झाला.

### श्रीजगद्गुरू विश्वाराध्य बँक व हायकोर्टाचा निर्णय

श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या कार्यकाळात पीठात 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य बँक' स्थापिली होती. बँकेचा संपूर्ण कारभार ते स्वत: पाहत होते. बँकेच्या ठेवीदारांना अधिक व्याज देत असत. काही लोक बँकेकडून घेतलेले कर्ज व्याजासह परत करण्यात असमर्थ होते. अशा रीतीने वसुलीचे काम व्यवस्थित पार पडत नव्हते. त्यामुळे हळूहळू बँक तोट्यात जाऊ लागली. श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्यांच्या कालावधीत बँक क्षीण अवस्थेला पोहोचली होती. त्याशिवाय बँकेत ठेवलेल्या ठेवी कमी होत चालल्या. तरीही जगद्गुरू शिवलिंग महास्वामीजी ठेवीदारांना नियमानुसार व्याज देत होते. परंतु त्यांच्या कालावधीतच बँक डबघाईला आली होती हे कोणाच्या लक्षातच आले नव्हते.

ते लिंगैक्य झाल्यानंतर नूतन जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी ते सर्व व्यवहार आपल्या हाती घेतले. त्यावेळी ठेवीदारांना व्याज द्यावे म्हटले तर बँकेत तेवढी रक्कम नसल्याचे पाहून ते आश्चर्यचकित झाले. बँकेत ठेवलेल्या आपल्या ठेवी सुरक्षित नाहीत हे ठेवीदारांना कळाले, तेव्हा बँकेतल्या ९४ लोकांनी बँकेविरुद्ध बनारस कनिष्ठ न्यायालयात दि. १४.३.१९३२ रोजी १२ नंबरचा दावा दाखल करून मठाची स्थिर-चर मालमत्ता विकून आमच्या ठेवी सव्याज परत कराव्यात, अशी कोर्टाला विनंती केली.

दि. २७.११.१९३३ रोजी कनिष्ठ न्यायालयातील न्यायाधीश श्री विंध्यवासिनी प्रसाद यांनी जंगमवाडी मठातर्फे मतदानासाठी उपस्थित राहून काशीनरेश जयनंददेवांच्या दानपत्राची सत्यप्रत दिली. ते स्वीकारून देखील मठाच्या काही मालमत्तेचा लिलाव करून ठेवीदारांना त्यांची रक्कम द्यावी, असा निर्णय झाला. तेव्हा जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी कनिष्ठ न्यायालयाच्या निर्णयाविरुद्ध अलाहाबाद हायकोर्टात दि. १९.२.१९३४ रोजी ५८ वे अपील केले.

या अपिलाविषयी अलाहाबाद उच्च न्यायालयात १० वर्षेपर्यंत केस

चालून दि. ६.२.१९४२ रोजी मुख्य न्यायाधीश मा. सर इकबाल अहमद व न्यायमूर्ती मा. एस. के. धर यांनी एक ऐतिहासिक निर्णय दिला. त्या निर्णयात जंगमवाडी मठासाठी केलेले अपील, श्रीमठाची प्राचीनता, वीरशैवधर्माची परंपरा आणि मठाला मिळालेली दानपत्रे यांची विश्वसनीयता पाहून न्यायाधीशांनी जंगमवाडी मठ ही एक प्राचीन धार्मिक संस्था असल्याने हिच्याशी संबंधित मालमत्ता, दानदक्षिणादीचा लिलाव करू नये, तरीही मठाला येणाऱ्या उत्पन्नातून, मठाची व्यवस्था पाहून शिल्लक राहिलेल्या रकमेतून कोर्टाच्या माध्यमातून विश्वाराध्य बँकेच्या ठेवीदारांना त्यांच्या ठेवी परत कराव्यात, असा निर्णय दिला. या व्यवहाराकरिता एका रिसिव्हरची नेमणूक करण्यात आली.

**काशीपीठाच्या दानशासनास उच्च न्यायालयाची मान्यता**

काशीपीठाच्या इतिहासात दि. १४.३.१९३२ पासून ६.२.१९४२ पर्यंतचा काळ अत्यंत सत्त्वपरीक्षेचा काळ होता. या काळात विश्वाराध्य बँकेच्या व्यवहारात १ लक्ष ८६ हजार रुपयांचा कर्जाचा डोंगर एकदम पीठावर येऊन पडल्याने पीठाच्या अस्तित्वाविषयी प्रश्नचिन्ह उभे राहिले. तेव्हा जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी अशा संकटसमयी धैर्य न सोडता श्रेष्ठ कायदेतज्ज्ञांचा सल्ला घेऊन ९४ वादींविरुद्ध त्यांच्याविरुद्ध वीर अभिमन्यूप्रमाणे कायद्याच्या संग्रामास सामोरे गेले.

हा कायद्याचा संग्राम दहा वर्षे चालला. या युद्धात पीठाच्या सर्व दानशासनांनी कवचकुंडले होऊन पीठाचे रक्षण केले. काशीमहापीठात इ.स. ५७४ पासून इ.स. १६६८ पर्यंत विविध काळात काशीनरेश जयनंददेवांसह मोगलचक्रवर्ती हुमायून, अकबर, जहांगीर, शहाजहान, औरंगजेब, दारा शिकोह आणि महमदशाह इ.कडून मिळालेली दानपत्रे सुरक्षित ठेवली गेली आहेत. वरील बँकेच्या व्यवहाराच्या संदर्भात श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी ही सर्व दानपत्रे अलाहाबाद कोर्टास सादर केली. आम्ही बँकेच्या ठेवीमधून कुठलीही जमीन खरेदी केली नाही.

मठाशी संबंधित सर्व भूमी राजे–महाराजांकडून दानरूपात प्राप्त झाली. त्यांनी दिलेल्या त्या दानास ही दानपत्रे प्रत्यक्ष प्रमाण असून श्रीजगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी हायकोर्टात अपील केले.

अलाहाबाद कोर्टाचे मुख्य न्यायाधीश मा. सर इक्बाल अहमद आणि न्यायमूर्ती मा. श्री एस. के. धर यांनी दानपत्रे पाहिली. त्यांची सत्यता पडताळून पीठाच्या प्राचीनतेने प्रभावित होऊन दि. ६.२.१९४२ रोजी एक महत्त्वपूर्ण ऐतिहासिक निर्णय दिला. त्या निर्णयामुळे पीठावर पडलेल्या विपत्तीचा डोंगर दूर झाला. त्यामुळे निर्णयामुळे दि. ६.२.१९४२ तारीख काशीपीठाच्या इतिहासात सुवर्णाक्षराने लिहून ठेवण्यासारखी ठरली. याचे संपूर्ण श्रेय श्री १००८ जगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्यांनाच जाते. त्यामुळे हे जगद्‌गुरू पीठाच्या इतिहासात चिरस्मरणीय झाले आहेत.

काशीपीठाचे पूर्वाचार्य अत्यंत तपस्वी होते. शिवयोगसिद्ध होते. लोककल्याणकर्ते होते. याशिवाय अनेक पीठाचार्यांनी जिवंत समाधी घेतली आहे. त्यांची तप:शक्ती म्हणजे काशीपीठाचे रक्षाकवचच होती. या पीठावर आलेली गंडांतरे दूर झालेली पाहिल्यावर सर्व त्या पूर्वाचार्यांच्या तप:श्चर्येचेच पुण्य आहे असे वाटते.

**ऋणपरिहार**

अलाहाबाद हायकोर्टाच्या निकालाने पीठावर आलेल्या संकटाचा पर्वत वितळला, तरी १ लक्ष ८६ हजार रुपयांच्या कर्जाचा ब्रह्मराक्षस तोंड वासून बसला होता. श्रीजगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी यालाही न भिता पूर्वाचार्यांचे स्मरण करीत पीठाला मिळणाऱ्या दुकान तसेच घराचे भाडे, भूमिभाडे, यात्रेकरूंकडून मिळणाऱ्या गुरुदक्षिणा आणि मठाच्या शेतीतून मिळणारे उत्पन्न यातून अत्यंत कमी प्रमाणात खर्च करून उरलेली रक्कम श्रीपीठात नियुक्त झालेल्या रिसीव्हर श्रीमान टंडन यांच्या माध्यमातून भरत होते.

**उत्तराधिकाऱ्यासंबंधीचा निर्णय**

याप्रमाणे श्रीजगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींना १९३२ पासून

चाललेल्या कोर्टाच्या व्यवहारात खूप मानसिक त्रास सहन करावा लागला. त्यामुळे त्याचा प्रभाव त्यांच्या शारीरिक तसेच मानसिक स्वास्थ्यावर झाला. तेव्हा ते श्रीपीठाच्या पुढील योगक्षेमार्थ योग्य बटूच्या निवडीचा विचार करू लागले. काशीपीठाचे श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अध्ययन करून प्रखर पांडित्य संपादन केलेले त्यावेळी कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र इत्यादी प्रदेशांत प्रख्यात झालेले चिदरेमठाचे श्री वीरभद्र शर्माजी श्री महास्वामीजींना योग्य वाटले. त्या काळी ते काशी सोडून सिकंदराबादमध्ये एक गुरुकुल स्थापून अध्यापनाचे कार्य करीत होते.

श्री वीरभद्र शर्मा हे बहुमुखी व्यक्तित्व होते. श्रीपंचाक्षर जगद्गुरूंनी आपल्या अंतकाळी दि. २०.४.१९४४ रोजी पं. वीरभद्र शर्मा यांचे नाव आपला उत्तराधिकारी म्हणून इच्छापत्रात लिहिले व ते दि. २९.४.१९४४ मध्ये लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी हरेश्वर मंदिरात करण्यात आली.

लिंगैक्य श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी १८९९ मध्ये जन्मास आले आणि वयाच्या बाराव्या वर्षी संस्कृताध्ययनासाठी काशीक्षेत्रास आले. तत्कालीन पीठाध्यक्षांच्या कृपेस पात्र होऊन दि. १९.२.१९३२ पासून काशीपीठाचा जगद्गुरुत्वाधिकार प्राप्त केला. पुढे १२ वर्षेपर्यंत पीठाध्यक्ष म्हणून पीठाच्या रक्षणाकरिता अत्यंत महत्त्वाची कार्ये पार पाडून दि. २६.४.१९४४ मध्ये म्हणजे आपल्या वयाच्या ४४ व्या वर्षी लिंगैक्य झाले. यांचा कार्यकाळ हा पीठाच्या इतिहासातला महत्त्वपूर्ण काळ होता.

## ८४ वे श्रीजगद्‌गुरू
## (द्वितीय) वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी



हे पूर्वाश्रमीचे आंध्रप्रदेशच्या नलगोंडा जिल्ह्यातील चर्लपल्ली नावाच्या छोट्या गावातील चिदरेमठाचे होत. श्री वे.पं. नागभूषण शास्त्रीजी आणि सौ. श्यामलांबादेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी शालिवाहन शके १८२६, श्रावण मास पौर्णिमेच्या दिवशी दि. २५.८.१९०४ रोजी सकाळी ११ वाजून ४५ मि.नी त्यांचा जन्म झाला. पुढे यांचे गुरय्या असे नामकरण करण्यात आले. चर्लपल्ली चिदरेमठ पांडित्यपरंपरा असणारा मठ होय. या मठाच्या वंशजांमध्ये श्री वे.पं. शिवलेंकय्या, वे.पं. प्राणलिंगय्या, वे.पं. गंगाधरय्या आणि वे.पं. नागभूषण शास्त्रीजी ह्या सर्व प्रमुख व्यक्ती होत्या. अशी पांडित्यपरंपरा असणाऱ्या वंशात चि. गुरय्या अर्थात् वीरभद्र यांचा जन्म झाला.

वीरभद्रय्यांनी आपले जन्मस्थान चर्लपल्ली आणि नलगोंडा येथे तेलुगू सातवी इयत्तेपर्यंत शिक्षण पूर्ण केले. 'ओदु ओक्कालु बुद्धी मुक्कालु' (अभ्यास एकपट, प्रतिभा तिप्पट) या म्हणीनुसार प्राथमिक शाळेत शिक्षण घेत असतानाच श्री वीरभद्र स्वामीजी कविता करीत होते. त्यांच्या बाळपणीच त्यांच्या ठिकाणी असणारी प्रतिभा पाहून त्यांना बालकवी अशी प्रसिद्धी मिळाली. चि. वीरभद्रय्या १३ वर्षांचे असताना त्यांचे आईवडील लिंगैक्य झाले.

प्राथमिक शिक्षण पूर्ण होत असतानाच ते अनाथ झाले. तेव्हा पुढील शिक्षण घेण्याकरिता अनुकूल परिस्थिती नसल्याने शिक्षणास तिलांजली देऊन प्राथमिक शिक्षक होऊन सेवा करू लागले. एक वर्षापर्यंत प्राथमिक शाळा शिक्षक म्हणून त्यांनी कार्य केले. त्यांना अध्ययनात विशेष रुची असल्याने शिक्षकी नोकरीचा राजीनामा देऊन इ.स. १९१९ मध्ये

ज्ञानार्जनासाठी ते हैदराबादला आले. तेथील संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन अमरकोश, शब्दरूपावली आणि प्रारंभिक ज्योतिषशास्त्राचा अभ्यास करीत असताना तेलुगू आणि उर्दू या भाषांचा अभ्यास केला. पुढील संस्कृतच्या अभ्यासाकरिता त्यांनी आंध्रप्रदेशच्या निरडगुंब आणि रामगड्डे येथे असणाऱ्या श्री सिद्धलिंग स्वामी संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. इ.स. १९२० पासून १९२२ पर्यंत तीन वर्षांपर्यंत तेथे पुढील शिक्षण घेतले.

त्यानंतर निजामाबाद जिल्ह्याच्या नारायणपेठेच्या श्री चोळेंद्र संस्कृत पाठशाळेत १९२२ मध्ये प्रवेश घेतला. तेथे देखील १९२५ पर्यंत म्हणजे तीन वर्षांपर्यंत रघुवंश, कुमारसंभव, किरातार्जुनीय, शिशुपालवध, नैषधीय चरित्र, पंचकाव्याचा आणि संस्कृत नाटकांचा त्यांनी परिश्रमपूर्वक अभ्यास केला.

या अवधीत तेलुगू, कन्नड, संस्कृत या भाषांत ओजस्वी बोलण्याची कला त्यांनी आत्मसात केली. १९२४ मध्ये निजामराज्याच्या इटगी ग्रामीच्या गुरुमठकल मठाचे श्री म.नि.प्र. शांतवीर स्वामीजींच्या प्रयत्नांनी 'पहिले आंध्र वीरशैव संमेलन' भरविण्यात आले. या संमेलनात धारवाडचे मुरघामठचे म.नि.प्र. मृत्युंजय स्वामीजी, कर्नाटक गांधी श्री हर्डेकर मंजप्पा उपस्थित होते. हैदराबाद हायकोर्ट वकील मा. श्री. बापुराव देशमुख यांनी कार्यक्रमाचे अध्यक्षस्थान भूषविले होते. त्या सभेत अनेक विद्वानांना भाषणाकरिता संधी मिळाली होती. वीरभद्रय्यांनाही त्यात बोलण्याची संधी मिळाली. त्या सभेत वीरभद्रस्वामीजींनी वीरशैवधर्माची प्राचीनता आणि त्याची श्रेष्ठता याविषयी आपल्या ओजस्वी व प्रवाही वाणीने तेलुगू भाषेत स्पष्ट भाषण केले. लहान वयातील या बालकाचे ओजस्वी भाषण ऐकून श्रीमान बापुराव देशमुख प्रभावित झाले. इतकेच नव्हे तर उत्साहित झालेल्या श्रोत्यांनी त्यांना प्रोत्साहनपर धन दिले. त्या सभेत वीरभद्रय्या यांना ८० रुपये प्राप्त झाले. तेव्हा बापुराव देशमुखांनी हा बालक अनाथ आहे हे कळल्यानंतर पुढील शिक्षणाकरिता हा जर काशीला जाऊ इच्छीत असेल तर त्याच्या शिक्षणाचा संपूर्ण खर्च मीच करेन अशी सभेत घोषणा केली.

### उच्च शिक्षणाकरिता काशीक्षेत्रास गमन

श्रीमान बापुराव देशमुखांच्या उदार आश्रयाखाली चिदरेमठ वीरभद्र शर्माजी अत्यंत संतुष्टचित्त होऊन काशीक्षेत्री उच्च अध्ययनाकरिता जाण्यास सिद्ध झाले. त्याच वेळी हैदराबादमध्ये परळी रुद्राभिषेक दावा प्रारंभ झाला होता. वीरशैवांना वेदाध्ययनाचा अधिकार आहे की नाही? याविषयी चर्चा होत होती. ही परिस्थिती जाणून घेऊन काशीक्षेत्री जाऊन वेदाध्ययन करण्याचा त्यांनी दृढ संकल्प केला. पुढे ते नलगुंडचे गाजलु तोटेयगारू नावाच्या सुप्रसिद्ध बांगड्याचे व्यापाऱ्यांचे शिफारसपत्र घेऊन काशीक्षेत्री गेले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्‌गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १३.१२.१९२५ रोजी गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्रीच्या वेदविद्वान पं. योगेश्वर पाठक यांचे शिष्य होऊन निरंतर पाच वर्षांपर्यंत वेदाध्ययन करून, कलकत्ता, बंगाल, संस्कृत असोसिएशनच्या वेदतीर्थ परीक्षेत १९३० मध्ये ते उत्तीर्ण झाले. वीरशैव समाजात चौडदानपूरचे पं. विरूपाक्ष वोडेयर हे सर्वप्रथम वेदतीर्थ परीक्षा उत्तीर्ण झाले होते. पं. वीरभद्र शर्माजींनी तीच पदवी प्राप्त केली.

### परळीच्या महारुद्राभिषेकाचे नेतृत्व

पं. वीरभद्र शर्मांनी काशीक्षेत्री वेदाध्ययन करून वेदतीर्थ ही पदवी १९३० मध्ये प्राप्त केली. त्याचवर्षी परळी प्रकरणात वीरशैवांना वेदाधिकार आहे असा निर्णय झाला. या विजयोत्सवाच्या निमित्ताने परळी क्षेत्री दि. १२.५.१९३० ते २२.५.१९३० पर्यंत ११ दिवस महारुद्राभिषेक, श्रीकाशीजगद्‌गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींचा आडवी पालखी महोत्सव आणि धार्मिक महासभा समारंभ परळी वीरशैव महारुद्राभिषेक कमिटीने आयोजित केला होता. या समारंभास वेदतीर्थ पं. विरूपाक्ष स्वामी ओडेयर आणि श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी, विजयपूर हे आमंत्रित होते.

याच संदर्भात वेदतीर्थ उपाधी प्राप्त करून घेतलेले पं. चिदरेमठ वीरभद्र शर्मा यांना देखील निमंत्रिले होते. पं. वीरभद्र शर्मा हे काशीमहास्वामीजींच्या

दिव्य सान्निध्यात चाललेल्या तेथील धार्मिक महासभेत दि. १५.५.१९३० या दिवशी 'तरुणांची कर्तव्ये', दि. १६.५.१९३० रोजी 'वीरशैव आद्य कर्तव्य' आणि दि. २१.५.१९३० रोजी 'वीरशैवधर्म' विषयांवर प्रभावी पद्धतीने प्रवचने देऊन प्रशंसेस पात्र झाले. या तिन्ही दिवसांच्या सभेस सोलापूरच्या होटगी मठाचे वीरतपस्वी चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी तसेच तत्कालीन पालिकोप्पचे पट्टाध्यक्ष (लिं. रंभापुरी जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजी) उपस्थित होते, ही विशेष उल्लेखनीय बाब होय.

### विविध विषयांतील पांडित्य

पं. वीरभद्र शर्मांनी काशीक्षेत्रात १९२५ पासून १९३५ पर्यंत १०-११ वर्षे निरंतर अभ्यास करून १९३० मध्ये वेदतीर्थ, १९३१ मध्ये काव्यतीर्थ, १९३४ मध्ये स्मृतितीर्थ व १९३५ मध्ये सर्वदर्शनतीर्थ या पदव्या संपादन करून विविध विषयांत प्रगल्भ पांडित्य प्राप्त केले. याशिवाय मथुरा व्रज मंडळाच्या साहित्यविशारद आणि धर्माचार्य या पदव्या देखील त्यांनी संपादन केल्या. त्यांचे विविध विषयांतील पांडित्य पाहून काशीला संस्कृत साहित्य समाज संस्थेत दि. २.३.१९३५ मध्ये संस्थेच्या दहाव्या वार्षिक महोत्सवात महामहोपाध्याय पंडित मुकुंद झा यांच्या अध्यक्षतेखाली पंडित वीरभद्र शर्मा यांना 'विद्यारत्न' ही पदवी प्रदान करण्यात आली. त्याच वर्षी श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी यांनी त्यांना 'विद्यानिधी' ही प्रशस्ती देऊन त्यांचा सन्मान केला. पं. वीरभद्र शर्मा हे अत्यंत बुद्धिमान होते. संस्कृत, प्राकृत, पाली, तेलुगू, कन्नड, हिंदी आणि मराठी या भाषांवर त्यांनी प्रभुत्व संपादिले होते. त्याशिवाय उर्दू, बंगाली, तमिळ तसेच इंग्रजी या भाषादेखील त्यांना अवगत होत्या. समाजाला जागृत करण्यासाठी लेखन, भाषण आणि ग्रंथनिर्माणकार्यात त्यांनी स्वतःला गुंतवून घेतले होते.

### पुरातत्वपंडित

श्री चिदरेमठ वीरभद्र शर्माजी केवळ बहुभाषाविशारदच होते असे नव्हे तर देशातील ४० प्राचीन लिप्यांत ते तज्ज्ञ असून त्यांनी पुरातत्वविभागात

नावलौकिक मिळविला होता. उत्तरकाशीच्या शक्तिस्तंभावर कोरलेली एक प्राचीन लिपी वाचून त्याचा अभिप्राय बिहार प्रदेशच्या 'पुरातत्वांक' नावाच्या हिंदी पत्रिकेत प्रसिद्ध केला होता. पं. वीरभद्र शर्माजींचे लिपीपांडित्य इतिहासतज्ज्ञांनी मान्य करून त्यांची प्रशंसा केली. एवढेच नव्हे तर रॉयल एशियाटिक सोसायटीने त्यांची स्तुती केली आहे. एक विशेष म्हणजे १९३३ पर्यंत त्यांनी वाचून अर्थ सांगेपर्यंत त्या लेखाचा अर्थ कोणासही पूर्णपणे कळाला नव्हता. असे अगाध लिपीज्ञान असणारे पं. वीरभद्र शर्मा यांनी विजयादित्याच्या अम्मणगी ताम्रशासनावर एक लेख लिहून प्रसिद्ध केला. हा लेख इतिहासतज्ज्ञ म.म. रा.ब. पं. गौरीशंकर हिराचंद ओझा यांच्या 'भारतीय अनुशीलन' या गौरवग्रंथात वि.सं. १९९१ (इ.स. १९३४) मध्ये प्रसिद्ध झाला आहे.

**संघटनाचातुर्य**

पं. वीरभद्र शर्मा अध्ययनासोबत संघशक्तीला देखील महत्त्व देत असत. म्हणून काशीत उच्च अध्ययनाकरिता आलेल्या विविध प्रांतांच्या, विविध संप्रदायांच्या स्वामींना, शास्त्रींना व कलाकारांना एकत्र करून त्यांनी १९३४ मध्ये 'काशी वीरशैव विद्वत् संघा'ची स्थापना करून कार्य केले. तो संघ आजदेखील कार्यरत आहे.

**वीरशैव गुरुकुलाची स्थापना**

श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी पं. वीरभद्र शर्मा १९३५ मध्ये अध्ययन पूर्ण करून मातृभूमीला परत जात असताना 'विद्यानिधी' प्रशस्ती देऊन त्यांना निरोप दिला. पं. चिदरेमठ वीरभद्र शर्माजी काशीतील अध्ययन पूर्ण करून आंध्रप्रदेशास परतल्यानंतर यादगिरीच्या शंकर संस्कृत कॉलेजच्या कमिटीने १९३५ मध्ये त्यांना आपल्या कॉलेजात प्राचार्य म्हणून नियुक्त केले. तेथे एक वर्षापर्यंत त्यांनी अध्यापन केले. पुढे सिकंदराबादचे मठम् नागय्या यांनी त्यांना आपले एक घर देऊन तेथे एक गुरुकुल स्थापण्याची विनंती केली. श्री. नागय्या यांच्या विनंतीनुसार पं. वीरभद्र शास्त्रीजींनी १९३६ च्या सप्टेंबर महिन्यात तेथे वीरशैव गुरुकुल

स्थापन केले. स्वत: तेथे प्राध्यापक होऊन विद्यार्थ्यांच्या योगक्षेमाची जबाबदारी स्वीकारली. त्याच भवनात 'शैवभारती' नावाचे ग्रंथालय स्थापून आपल्या अध्ययनकाळात संग्रहित केलेले ताडपत्रावरील ग्रंथ, मुद्रित ग्रंथ एकत्र करून अपूर्व असे ग्रंथालय निर्माण केले. सर्व भाषा तसेच सर्व विषय यांचे सहस्रावधी ग्रंथ संग्रहित केले. निजाम प्रांतातील ते एक प्रमुख ग्रंथालय म्हणून नावाजले गेले. एका संस्थेकडून संग्रहित व्हावेत एवढे ग्रंथ एकट्या पं. वीरभद्रशास्त्रीजींनी संग्रहित केलेले पाहून ते सामान्य व्यक्ती नव्हेत हे लोकांच्या लक्षात आले.

घरोघरी तत्त्वप्रचार करण्याकरिता पुस्तकापेक्षा नियतकालिक अधिक योग्य ठरेल असा विचार करून त्यांनी तेलुगू भाषेत 'विभूति' नावाचे मासिक काढले. स्वत: त्याचे संपादक होऊन कार्य करू लागले. विभूति पत्रिकेतील त्यांचे संपादकीय लेखन, पुस्तकपरीक्षण, तसेच वेळोवेळी समयोचित समाजास केलेले प्रबोधन आजदेखील उपयुक्त आहे. तिरुपती विश्वविद्यालयाच्या संस्कृत विभागाचे प्राध्यापक डॉ. के. प्रताप यांनी चिदरेमठ वीरभद्र शर्मा यांच्या समग्र कृतींचा एकत्र संग्रह केला आहे. त्यांचे साहित्य १००० पृष्ठांहून अधिक आहे. त्या साहित्याची उपयुक्तता जाणून विद्यमान काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी २००८ मध्ये जंगमवाडी मठाच्या शैवभारती शोधप्रतिष्ठानकडून ते प्रसिद्ध केले आहे.

**काशीज्ञानसिंहासनारोहण**

चिदरेमठाचे पं. वीरभद्र शास्त्रीजी १९३५ पासून १९४४ पर्यंत दहा वर्षे सिकंदराबाद वीरशैव गुरुकुलाचे अध्यापक, विभूति पत्रिकेचे संपादक आणि विविध धार्मिक समारंभांत उपदेशक असे कार्य करीत आंध्र वीरशैवांना अत्यंत प्रिय झाले. त्यांची ख्याती संपूर्ण आंध्रप्रदेशात झाली. श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी प्रकृती अस्वास्थ्यामुळे दि. २०.४.१९४४ रोजी पं. वीरभद्र शास्त्रीजींच्या नावाने पीठाचे उत्तराधिकारी म्हणून इच्छापत्र लिहिले व ते दि. २६.४.१९४४ रोजी लिंगैक्य झाले.

आपल्याला काशीपीठाचे उत्तराधिकारी ठरवले असे कळल्यानंतर पं. वीरभद्र शास्त्रीजी दि. ३.५.१९४४ रोजी काशीपीठास आले. दि. ८.५.१९४४ रोजी लिं. जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींचा पुण्याराधना समारंभ विधिवत् पार पडला. पुढे दि. २०.५.१९४४ रोजी पं. वीरभद्र शास्त्रीजी सिकंदराबादला जाऊन तेथील ग्रंथालयातील सर्व ग्रंथ तसेच आपले सर्व सामान घेऊन काशीक्षेत्रास दि. १०.८.१९४४ ला परत आले. त्यावेळी पीठावरील ऋणभाराने जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलातील विद्यार्थ्यांची प्रसादव्यवस्था खंडित झाली होती. हे समजल्यावर पं. वीरभद्र शास्त्रीजींनी अत्यंत धैर्याने गुरुकुल भोजनव्यवस्था दि. १४.८.१९४४ रोजी पुन्हा सुरू करून गुरुकुलाच्या सर्व विद्यार्थ्यांना संतुष्ट केले.

याप्रमाणे पं. वीरभद्र शास्त्रीजींनी पीठाच्या व्यवस्थेतील दोष आपल्या अधिकारात दूर केले. याशिवाय आपल्या पट्टाभिषेकाकरिता स्वतः व्यवस्था केली. काशीपीठातून अध्ययन करून गेलेले तत्कालीन रंभापुरी पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजींना या पीठास बोलावून त्यांच्याकडूनच जगद्गुरू पट्टाधिकार घ्यावा असा निश्चय केला आणि विधिवत् रंभापुरी पीठाच्या जगद्गुरूंना आमंत्रण देऊन बोलावून घेतले. पूज्य रंभापुरी महास्वामीजी काशीपीठाच्या आमंत्रणानुसार रंभापुरीपीठाहून आपल्या वाहनातून लवाजम्यासह ठिकठिकाणी वास्तव्य करीत कर्नाटक, महाराष्ट्र, मध्यप्रदेश या सर्व प्रांतांतील भक्तांना दर्शन-आशीर्वाद देत दि. २२.९.१९४४ रोजी काशीपीठास येऊन पोहोचले. तेव्हा काशीपीठाचे उत्तराधिकारी पं. वीरभद्र शास्त्रीजींनी अनेक पट्टाध्यक्षांसह पाद्य-अर्घ्य-आचमनाने पादपूजा करून श्रीमहास्वामीजींना माल्यार्पण करून पीठात त्यांचे स्वागत केले. श्रीकाशीपीठाच्या पट्टाभिषेकासाठी दि. २२ पासून २७.९.१९४४ पर्यंत सर्व प्रांतांतून १० हजारांहून अधिक लोक काशीक्षेत्री आले होते. आलेल्या भक्तांना श्रीपीठाच्या विशालभवन, सनातन धर्म हायस्कूल, रामापूर धर्मशाळा, रायबहादूर भवन, जंबू बोर्डिंग, दशाश्वमेध पोस्ट ऑफिस आणि साक्षी विनायक मंदिर येथे उतरण्याची व्यवस्था केली

होती. काशीत जिकडे पाहावे तिकडे वीरशैवच दिसत होते.

श्रीमनृपशालिवाहन शक १८६६ तारणनाम संवत्सर, आश्विन मास, शुक्ल पक्ष, विजयादशमी दि. २७.९.१९४४ बुधवारी ब्राह्मी मुहूर्तावर कैलासमंटपात विश्वाराध्याच्या कर्तृगादीच्या दिव्य सान्निध्यात वेदपंडित गुरुलिंग शास्त्रीजी, वेदपंडित गंगाधर शास्त्रीजी आणि वेदपंडित नंजुंडाराध्य शास्त्रीजी इ. पुरोहितांच्या आधिपत्याखाली पुण्याहवाचन, नांदी समाराधना, देवता मंडपपूजा, अंकुरार्पणा इ. पूजा विधिवत् सुरू झाल्या. काशी वीरशैव विद्वत्संघाचे विद्यार्थी आणि नाना प्रदेशांतून आलेल्या वीरशैव सुहासिनी रजतकुंभांत गंगातीर्थ मंगलवाद्यांसह वाजत गाजत घेऊन आल्या. काशीपीठात जिकडे तिकडे वेदघोष ऐकू येत होते. अशा मंगलमय वातावरणात श्रीमद् रंभापुरी वीरसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजींचे मुहूर्तावर स्वागत केले. काशीपीठातील कैलासमंटप साक्षात् कैलास भासत होता. पं. वीरभद्रशास्त्रीजींना ज्ञानपीठावर बसवून श्रीरंभापुरी जगद्गुरूंनी आपल्या अमृतहस्ते गंगाजल, सुवर्ण तसेच नवरसांनी आणि नवरत्नांच्या जलाने विधिवत् अभिषेक केला. त्या समयी वैदिक सस्वरात रुद्रपाठ करीत होते.

याप्रमाणे अभिषेकविधी संपल्यानंतर पूर्वी निश्चित केलेल्या मध्याह्न काळी १ वा. २० मि. धनुर्लग्नी श्री रंभापुरी महास्वामीजींनी पं. वीरभद्र शास्त्रीजींना श्रीपीठाचे परंपरागत पट्टबंधन करून मणिखचित सुवर्णकिरीट त्यांच्या मस्तकी ठेवून त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य ऊर्फ श्री वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण केले. तेव्हा उपस्थित भक्तसमूहाने काशीपीठाच्या नूतन जगद्गुरूंचा तसेच रंभापुरी पीठाच्या जगद्गुरूंचा जयजयकार केला. त्यानंतर उभय जगद्गुरूंनी विश्वाराध्यांच्या कर्तृगादीचे दर्शन घेऊन चित्रभवनात आसनस्थ होऊन भक्तांना दर्शन–आशीर्वाद दिले.

सायंकाळी ७ वा. दरबारहॉलच्या समोरच्या मोकळ्या पटांगणात धर्मसभा भरली. या सभेत हुबळी, बंगळुरू, होटगी, परंडा, जमखंडी, बिळगी,

हुली, जैनापूर, कोळी, मानूर, नवलगुंद, मळली, जेवरगी, गिरिसागर, शिग्गावी, सूडी, रौडकुंदी, रायचूर, मुळ्ळूरू, मरब, कडकोळ, अळवंडी, ब्याहट्टी, बिचकुंदा, क्यासंपेट, सोलापूर, वैराग, जत, उमरावती, नागपूर, नाशिक आणि कोट्टूरू इ. गावांतील चरपट्टाधिकारी व देशिक उपस्थित होते.

याप्रकारे बेंगळूरु, दावणगेरे, शिवमोग्गा, चित्रदुर्ग, बीरूरू, हासन, तरिकेरे, गदग, बिजापूर, कोट्टूरू, बळ्ळारी, कलबुर्गी, हैदराबाद, सिकंदराबाद, बैजवाड, गंजाम, विशाखपट्टणम्, रामनाथ, बीड, लातूर, बार्शी, पंढरपूर, नागपूर, खामगाव, पुणे तसेच मुंबई इ. दक्षिण देशीचे सर्व नगरचे वीरशैव प्रमुख, शेठ, देसाई, वकील, अपार अभिमान असणारा भक्तसमूह सभेत उपस्थित होता. या सभेत पंडितांची भाषणे, शिवाचार्यांचे धर्मसंदेश शेवटी उभय जगद्गुरूंची आशीर्वचने रात्री ११ पर्यंत चालली.

दुसऱ्या दिवशी दि. २८.९.१९४४ रोजी गुरुवारी सकाळी १० वाजता काशीक्षेत्रीच्या प्रमुख रस्त्याने नूतन काशीजगद्गुरूंचा आडवी पालखी महोत्सव वैभवपूर्ण पद्धतीने काढण्यात आला. त्याच दिवशी सायंकाळी ६ वाजता पुन्हा धर्मसभा घेण्यात आली. या पट्टाभिषेक समारंभास येऊ न शकलेल्या अनेक गणमान्यांनी आपले शुभसंदेश पाठविले होते. विविध भाषांतील ४५० संदेश आलेले पाहिल्यास नूतन काशीजगद्गुरूंचा प्रभाव तसेच लोकप्रियता किती होती हे लक्षात येते.

बिळगीच्या पट्टाध्यक्षांनी कन्नड संदेश, श्री. बंडारू लिंगमूर्ती यांनी तेलुगू संदेश, हायकोर्ट वकील बिरूर शिवरुद्रप्पांनी हिंदी अभिनंदन पत्र वाचून अर्पण केले. श्रीशैल जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींनी पाठविलेला संदेशसुद्धा वाचण्यात आला. हूलीचे तर्कतीर्थ श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य, असगोडचे श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य, अमरावतीचे ना. रा. बामणगावकर, गद्वाल डिस्ट्रिक्ट जज्ज वाचस्पती गुंडेराय, बेंगळूरुचे व्ही. के. रुद्राराध्य, रौडकुंदीचे श्री सिद्धराम शिवाचार्य आणि एस. एम. मरिसोमराध्य, बंगळूरूच्या सर्व महनीय व्यक्तींनी संस्कृत भाषेत संदेश पाठविले होते. याशिवाय चिफ जस्टिस श्री पी महादेवय्यन, श्री बाबासाहेब

वारद, श्री नागप्पा काडादी, सोलापूर, हैदराबादचे वकील पंडित जी. रामाचार्य, हायकोर्ट वकील जनार्दन देसाई, कोप्पळचा वीरशैव तरुण संघ, गदगचा वीर माहेश्वर संघ, उदगीरचे प्रभुराव वकील, वैद्यनाथ सेठ मोमिनाबाद आणि राज मंड्रीचे जंगम संघाचे कार्यदर्शी या सर्वांनी इंग्रजीत तारेने संदेश पाठविले होते.

त्याचप्रमाणे मास्ती वेंकटेश अय्यंगार, पं. शिवरुद्र स्वामीजी तुमकुरू, सराफ बसप्पजी बंगळुरू, वेदमूर्ती कोट्टरेश्वर शास्त्री कुम्मुरू, श्री ष.ब्र. मृगेंद्र शिवाचार्य कोडनुरू आणि दानगौड पाटील निडसोसी हे आणि तसेच अनेकांनी कन्नडमध्ये शुभसंदेश पाठविले होते.

तत्कालीन सभेत मैसूरचे डॉ. नंजप्पा, श्री सिद्रामप्पा चप्पळगी, सोलापूर, श्री नागप्पण्णा अफजलपुरकर, सोलापूर, श्रीमती गंगव्वाबाई मडकी, सोलापूर, श्रीमती भागीरथीबाई कटाप, श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य परंडकर, श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य होटगी, तसेच दावणगेरे सन्मार्गदर्शक पत्रिकेचे संपादक वे.मू. अन्नदानय्यजी या सर्वांनी वीरशैवधर्म, षट्स्थलसिद्धान्त, काशीपीठाची परंपरा आणि नूतन काशीजगद्गुरूंचे व्यक्तित्व इ. विषयांवर भाषणे केली. शेवटी रंभापुरी जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या धीरगंभीर वाणीने संस्कृत भाषेत उपदेश प्रारंभ करून शेवटी कन्नड भाषेत आशीर्वचन दिले.

ते आपल्या आशीर्वचनात म्हणाले, 'आज विजयादशमीचा सण, आजच या पीठाचा नूतन पट्टाधिकार समारंभ झाला हा योगायोग, त्यामुळे 'या मी तुम्हाला ज्ञान देतो' असे म्हणत जणू काशीपीठाने सर्वांना बोलावून घेतले असा भास होतो आहे! आम्ही गेल्या दोन महिन्यांपासून अस्वस्थ होतो. तरी त्याकडे लक्ष न देता रंभापुरी पीठाहून दीर्घ प्रवास करून काशीपीठास आलो. येण्याचा उद्देश म्हणजे श्रीविश्वाराध्यांच्या समीप १०-१२ वर्षे राहून ज्ञानार्जन केले होते. त्यांच्या प्रसादानेच आम्ही रंभापुरी पीठाचे जगद्गुरू होऊन आज असा गौरव आणि सन्मान मिळवीत आहोत. त्यामुळे आमच्यावर या पीठाचे कर्ज आहे. आम्ही काहीही करून या ऋणातून मुक्त

होणे शक्य नाही. तरीही किंचित् ऋणातून मुक्त होण्यासाठी आलो आहोत. येथे आम्ही एकटेच नाही. चित्रदुर्ग, हुब्बळी, कोप्पळ स्वामीजी हेदेखील येथे अध्ययन करून गेले आहेत. अध्ययन करून त्यांनी मोठमोठी स्थाने प्राप्त केली आहेत. आजचे नूतन काशीजगद्गुरू देखील येथेच अध्ययन करून उच्च विद्वान झाले आहेत. पीठाचार्यपद नको म्हणून हट्ट धरून बसले होते. आम्ही त्यांना समजावल्याने हे येथे आले. नूतन जगद्गुरूंचे नाम परिवर्तन करू नये म्हणून अनेकांनी आम्हाला आग्रहपूर्वक सांगितले. आम्हाला ते योग्य वाटले. यापूर्वी या पीठास आंध्रप्रदेशातून आलेले एक वीरभद्र जगद्गुरू होऊन गेले आहेत. आज तेच पुन्हा परत आले आहेत असे आमच्या अंतरात्म्याने सांगितल्याने त्यांचे नाव बदलण्याचा अधिकार आमचा नाही. म्हणून महाराजांचे पूर्वनाम घोषित करण्यात येत आहे. यांच्या कार्यकाळात वीरशैव समाज अती उच्च स्थान प्राप्त करेल, गुरुकुलाचा विकास होईल.'

शेवटी नूतन जगद्गुरू श्री १००८ जगद्गुरू महंत वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींनी सामवेदातील मंत्राने मंगलाचरण म्हणून संस्कृत, हिंदी, कन्नड, तेलुगू आणि मराठी या पाच भाषांतून आशीर्वचनपर भाषण केले. वीरशैव सृष्टी, प्राकृत सृष्टी, ज्ञानकर्मसमुच्चय, समाजात गुरूंचे कर्तव्य इत्यादी विषयांवर क्रमाने अस्खलितपणे आशीर्वचनपर भाषण करून प्रयागमध्ये तीन नद्यांचा संगम झाल्याने त्रिवेणी संगम असे त्यास म्हणतात. परंतु आज काशीपीठात पाच भाषा बोलणारे भक्त एकत्र आले असल्याने आज काशीपीठ हे 'पंचवेणी संगम' झाला आहे. हे पीठ अत्यंत प्राचीन आहे. परब्रह्मतत्त्वास अविद्येचे आवरण असल्याप्रमाणे या पीठास देखील अनेक संकटांनी ग्रासले होते. ज्ञानाने ही आवरणे दूर होऊन श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या परिश्रमाने काशीपीठावर आलेली सर्व संकटे आज दूर झाली आहेत. श्रीपीठाचे अस्तित्व स्थिर झाले आहे. श्री पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी माझ्यावर विश्वास ठेवून या पीठाचा भार सोपविला आणि आम्ही तो स्वीकारला आहे. त्यांच्या कृपेने ती

जबाबदारी पूर्ण करण्याचा प्रयत्न करीत आहोत. स्वामींवर दोषारोप होत असताना भक्तांनी हात बांधून गप्प बसू नये. सांसारिक जबाबदारीतून मुक्त झालेल्यांनी गावातील मठाधिपतींना सहकार्य केल्यास वाटेल तेवढे धार्मिक तसेच सामाजिक कार्य प्रत्येक मठाकडून होऊ शकेल. म्हणून भक्तांनी दोषारोपात मग्न न होता स्वामीजींना सहकार्य करावे, असे नूतन काशीजगद्‌गुरू समस्त सभेला उद्देशून बोलले. असा काशीजगद्‌गुरूंचा पीठारोहण समारंभ संपन्न झाला. आलेल्या भक्तांच्या महाप्रसादाची व्यवस्था केली होती. या समारंभास आलेल्या मठाधिपतींना, पंडितांना तसेच तनमनधनाने सेवा समर्पित केलेल्या भक्तांना श्रीपीठाकडून गौरविले गेले.

**काशीच्या पंडितांकडून नूतन जगद्‌गुरूंचे अभिनंदन**

दि. ६.१०.१९४४ रोजी जंगमवाडी मठात श्री १००८ जगद्‌गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात एक विद्वत् सभा बोलावली होती. या सभेत पं. गौरीनाथ पाठक, पं. चिन्नस्वामी शास्त्री, पं. बलदेव उपाध्याय, पं. यागेश्वर पाठक, पं. रजनीकांत भट्टाचार्य, पं. रामचंद्र दीक्षित, पं. पट्टाभिराम शास्त्री, पं. मूलशंकर व्यास, पं. ताराचरण भट्टाचार्य, पं. नारायणशास्त्री खिस्ते, पं. रघुनाथ शर्मा, पं. गणपती शास्त्री मुकाटे, पं. बाळकृष्ण पंचोली, पं. विंध्येश्वरी प्रसाद शास्त्री आणि पं. शिवमंगल त्रिवेदी इ. काशीचे पंचावन्न मूर्धन्य विद्वान पंडित सभेस उपस्थित होते. त्या सभेत व्याकरण, साहित्य, न्याय, मीमांसा, वेदान्त या शास्त्रांविषयी शास्त्रार्थ झाला. त्यासाठी सर्व विद्वानांनी आपल्या हस्ताक्षरात संस्कृत भाषेत लिहिलेले अभिनंदनपत्र श्रीमहास्वामीजींना समर्पिले. शेवटी श्रीपीठाकडून सर्व विद्वानांचा सत्कार करून श्रीमहास्वामीजींनी आशीर्वचनपर भाषण दिले.

**ज्ञानमंदिर ग्रंथालयाची स्थापना**

श्री १००८ जगद्‌गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी उच्चविद्याविभूषित श्रेष्ठ संशोधक आणि विविध लिपितज्ज्ञ होते. त्यामुळे काशीज्ञानसिंहासन महापीठात एक संशोधनकेंद्र स्थापावे अशा विचाराने त्याला पूरक ग्रंथालयाचे निर्माणकार्य त्यांनी प्रथम हाती घेतले. ते स्वतः विद्यार्थिजीवनात

अध्ययनाकरिता संग्रहित केलेले सर्व ग्रंथ पुन्हा काशीक्षेत्रास घेऊन आले. त्यांच्या सुरक्षिततेसाठी एक ग्रंथालयवास्तू निर्माण व्हावी म्हणून त्यांनी निर्धार केला. त्यांनी पीठाचा अधिकार स्वीकारला तेव्हा पीठास खूप मोठी आर्थिक अडचण होती. तरी धैर्याने ज्ञानमंदिर ग्रंथालयाच्या बांधकामाची सुरुवात १९.८.१९४५ रोजी भूमिपूजन करून केली. केवळ सहा महिन्यांत ग्रंथालयाचा पहिला मजला निर्माण केला. दि. २.३.१९४६ रोजी महाशिवरात्रीच्या पर्वकाळी त्याचे उद्‌घाटन केले.

ग्रंथालयाचे पूर्ण निर्माण, संशोधनकेंद्र, मुद्रणालय या सर्वांकरिता ३ लक्ष रुपयांचे बजेट करून त्यातील १ लक्ष रुपये श्रीपीठाकडून व राहिलेली रक्कम दानशूरांकडून उभी करण्याची योजना महास्वामीजींनी तयार केली होती. १००८, ५०८, २०८, १५१, १११, १०८ रुपयांपैकी आपापल्या शक्त्यनुसार देणगी समर्पिलेल्या दानींची नावे ग्रंथालयाच्या भिंतीवर कोरली जाणार जातील, अशी पत्रे श्रीपीठाकडून पाठवली गेली. महास्वामीजींच्या आवाहनानुसार अनेक भक्तांनी त्याला चांगला प्रतिसाद दिला आणि आपल्या देणग्या श्रीपीठास दिल्या. याप्रमाणे दानींमध्ये लिं. विरूपाक्षगौड मठमारी आणि शिग्लीच्या श्री वे. सिद्धम्मा कूडलमठ या दोघांनी प्रत्येकी १००८ रुपये श्रीपीठास दान दिले. त्याचप्रमाणे नारायणपेठचे गंदे शिवशंकरप्पा, हलगलीचे रावबहाद्दूर शिवसिद्धप्पा सरनाईक, सोलापूरचे सिद्रामप्पा बिज्जरगी, हिरेहडगलीचे नंदीहळ्ळी कोट्रप्पा इत्यादींनी प्रत्येकी ५०८ रु. दान केले. श्री ए. एम. शिवलिंगाराध्य, कित्तुर, मुद्दमल्लप्पा सावकार, विकाराबाद यांनी २०८ रु. दान दिले. या तऱ्हेने अनेक भक्तांनी आपल्या देणग्या देऊन महास्वामीजींच्या ज्ञानप्रसारकार्यात सहकार्य केले. याप्रमाणे पुढे एका वर्षातच ग्रंथालयाचा वरील मजला पूर्ण करून त्यांनी सिकंदराबादहून आणलेले स्वतःचे सर्व ग्रंथ ग्रंथालयात ठेवून त्याचे 'ज्ञानमंदिर ग्रंथालय' असे नामकरण केले. या ग्रंथालयात ११००० हून अधिक मुद्रित ग्रंथ, हजाराहून अधिक ताडपत्रावरील ग्रंथ संग्रहित केले आहेत.

काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कन्नड विभागाचे प्रमुख लिं. डॉ. व्ही.

शिवानंद यांनी या ग्रंथालयातील हस्तलिखित ग्रंथांची यादी विवरणासह लिहून प्रकाशित केली आहे. मैसूर विश्वविद्यालयातील प्राच्यविद्या संशोधनालयाने या ग्रंथालयातील अनेक महत्त्वपूर्ण ताडपत्रावरील ग्रंथ Micro Film करून ते घेऊन गेले आहेत.

### शिवधर्म ग्रंथमालेचा शुभारंभ

काशी जंगमवाडी मठात 'शिवतत्त्व ग्रंथमाला' नावाची एक ग्रंथमाला पूर्वी स्थापिली होती. पूज्य जगद्गुरू वीरभद्र महास्वामीजींनी त्याचे 'शिवधर्म ग्रंथमाला' असे नामपरिवर्तन करून अनेक ग्रंथ त्या मालेतून प्रसिद्ध केले. वीरशैव विश्वकोश निर्माण करण्याची एक बृहत्योजना पूज्य महास्वामीजींनी हाती घेतली. याशिवाय नागनूर बृहन्मठाध्यक्ष पं. काशीनाथ शास्त्रीजींच्या अभिनंदनाकरिता 'वीरशैव विज्ञान' नामक १०८ विषय असणारा एक बृहत् ग्रंथ प्रकाशित करण्याचा एक महान संकल्प केला. परंतु त्या दोन्ही कल्पना साकार झाल्या नाहीत. हे कार्य पूर्ण करणे अत्यंत आवश्यक आहे. भविष्यात याविषयी एक योजना साकार करण्याचा संकल्प केला आहे.

### ऋणविमोचन

श्रीजगद्गुरू वीरभद्र महास्वामीजींनी पीठारोहण केले त्यावेळी १ लक्ष ८० हजार रुपयांचे ऋण या पीठावर होते. ते फेडण्यासाठी अलाहाबाद उच्च न्यायालयाने या पीठावर एक रिसीव्हर नेमला होता. तो मठाला येणाऱ्या विविध उत्पन्नांतून मठाच्या दैनंदिन खर्चास रक्कम देऊन बाकीची रक्कम कोर्टात जमा करीत होता. काही वेळा रिसीव्हर आणि महास्वामीजी यांच्यात मतभिन्नता निर्माण होत असे. एकाच संस्थेवर दोघांचा अधिकार झाला की अव्यवस्था निर्माण होणे स्वाभाविक असते. वीरभद्र जगद्गुरूंनी बँकेच्या व्यवहाराचे ऋण आम्हीच शक्य तितक्या लवकर भरतो म्हणून तुम्ही नेमलेल्या रिसीव्हरचा हुद्दा आम्हालाच द्यावा, अशी कोर्टाला विनंती केली. त्यांची विनंती कोर्टाने मान्य करून श्री वीरभद्र महास्वामीजींना रिसीव्हरपद प्रदान केले.

त्यानंतर श्री वीरभद्र जगद्गुरू महास्वामीजींनी ऋणपरिहाराकरिता एक योजना तयार केली. काही धनिकांकडून व्याज न घेता कर्ज, काहींच्या कडून ऋणपरिहारार्थ देणगी घेऊन कर्जभार अत्यंत शीघ्रतेने कमी करून घेतला. महास्वामीजींनी निर्व्याज कर्जाकरिता केलेल्या आवाहनानुसार श्रीरंभापुरी पीठाचे जगद्गुरू, सोलापूरचे श्री नागप्पा अफजलपूरकर, नारायणपेठचे गंधी चनबसप्पा, गांधी सिद्धप्पा आणि कृष्णप्पा, नवलगुंद हिरेमठाचे पट्टाध्यक्ष, सैदापूरचे आसफली वीरभद्रप्पा, देवरपल्लीचे कुंकलगुंट कोटय्या, सोलापूरचे श्री मल्लिकार्जुनप्पा गंभीरे यांनी कर्ज देऊन पीठाच्या ऋणमुक्तीसाठी केलेल्या सहकार्याचा निर्देश करणे अगत्याचे आहे. यानुसार अनेक भक्तांनी ऋणमुक्तीसाठी देणग्या देऊन सहकार्य केले आहे. त्यामध्ये येम्मिगनूरचे वज्रगिरी राचोटप्पा, श्री नवली कैरूपळप्पा, श्री जी. एम. शरभण्णा, श्री वज्रगिरी गुरुलिंगप्पा, देवी होसूरचे उळागड्डी रुद्रप्पा, कुंदगोळ हिरेमठाचे श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्यजी, कोट्टरचे तुलहळ्ळी, शेट्टर चनबसप्पा, हुब्बळी हिरेमठाचे सोमनाथय्या, रौडकुंदीचे विरूपाक्ष गौड, माळकवठ्याचे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य, हत्तुर बृहन्मठाचे श्री ष.ब्र. बसवलिंग शिवाचाय, इंचगेरीचे श्री ष.ब्र. करिबसवेंद्र शिवाचार्य, जमखंडीचे मुत्तिनकंती हिरेमठाचे श्री ष.ब्र. अन्नदान शिवाचार्य, हिरेहडलगीचे सोंडुरू मल्लप्पा, हूविनहडलगीचे गुग्गरी हुचप्पा, हिपटुरचे श्री ए. एम. शिवलिंगाराध्य, बिरूरचे एम. व्ही. मुद्दुवीरय्या, शिरोळचे परय्या हिरेमठ, नरगुंदचे करिबसप्पा नागठाण, श्री ष.ब्र. मृगेंद्र शिवाचार्य कोप्पुर, हुब्बळी हन्न्यारडु मठाचे श्री ष.ब्र. चरमूर्ती स्वामीजी, हिरेहडलगीचे गुरुपाददेव मठाचे हालस्वामी, होळगुंदीचे सद्भक्त, एच. वीरापूरचा वीरशैव समाज आणि रौडकुंदी हिरेमठ श्री ष.ब्र. शिवयोगी शिवाचार्य हे प्रमुख होत. हे वृत्त 'पंचाचार्यप्रभा' पत्रिकेत प्रसिद्ध झाले आहे.

याप्रमाणे श्रीवीरभद्र जगद्गुरूंनी मठाच्या उत्पन्नातून तसेच विविध मार्गांनी धनसंग्रह करून बँकेच्या कर्जातून काशीपीठास ऋणमुक्त केले. याशिवाय श्रीपीठाचे गुरुकुल तसेच अन्नछत्र सुसज्ज केले.

## महाशिवरात्र वार्षिक गुरुदक्षिणा योजना

जगद्गुरू श्री वीरभद्र महास्वामीजींनी अत्यंत संकटकाळी काशीपीठाचे जगद्गुरुत्व स्वीकारले होते. कुठलेही कार्य करायचे म्हटले तर आर्थिक संकट त्यांच्यासमोर उभे राहत असे. प्रतिवर्षी महाशिवरात्रीस श्रीजगद्गुरू विश्वाराध्य जयंती, श्रीपीठात रथोत्सव, सामूहिक इष्टलिंगपूजा, आलेल्या भक्तांना प्रसाद यासाठीच अधिक खर्च होत असे. तो करण्यासाठी त्या काळात पीठास कठीण जात होते. म्हणून श्री महास्वामीजींनी 'महाशिवरात्र वार्षिक गुरुदक्षिणा योजना' प्रारंभ केली. काशीला आलेल्या यात्रेकरूंना ही योजना समजावून सांगून त्यांच्याकडून ते शक्त्यनुसार वाग्दान घेत असत. अशा रीतीने यात्रेकरू यशाशक्ती वाग्दानानुसार प्रत्येक वर्षी मनिऑर्डरने गुरुदक्षिणा पाठवीत होते. देणगीदारांच्या नावाने विश्वनाथ व विश्वाराध्यांच्या नावे अभिषेक करून पोस्टाने प्रसाद पाठवून देत असत. या योजनेनुसार आलेल्या उत्पन्नातून श्री काशीपीठाचा खर्च पूर्ण होऊन भक्तांना काशीपीठाचा प्रसादही प्राप्त होत होता. त्या योजनेत भक्तांनी ५, १०, २५, ५०, १०१ रुपये वाग्दान केल्यानुसार त्यांचे वंशज ही रक्कम पाठवीत आले आहेत.

यानुसार ८४ वे पीठाधिपती १००८ जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी आंध्रप्रदेशच्या चर्लपल्ली या छोट्या गावच्या गरीब माहेश्वर कुटुंबात जन्माला येऊन आपल्या भाग्याशी संघर्ष करीत क्रमशः विद्यासंपादन करून विद्येचा महामेरू होऊन ज्ञानपीठाचे अधिपती झाले. श्रीपीठावर आलेल्या अनंत संकटांतून पार पडत त्यांनी श्रीपीठास ऋणभारातून मुक्त केले. ज्ञानपीठास अत्यंत समर्पक असणाऱ्या ज्ञानमंदिरात देणग्या मिळविल्या. ते फक्त ३ वर्षे, ३ महिने, २१ दिवस पीठाध्यक्ष होते. तरी शंभर वर्षांपर्यंत जे करता येणे शक्य ते काम त्यांनी करून दाखविले. पुढे वयाच्या ४४ व्या वर्षी त्यांनी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अध्ययन करीत असलेल्या शिवमोग्गा जिल्ह्यातील सोरभ तालुक्यातील क्यासनुरू हिरेमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. जयगुरू शिवाचार्यांच्या नावाने ७.१.१९४८ रोजी आपला उत्तराधिकारी म्हणून इच्छापत्र केले.

पुढे स्वास्थ्य दिवसेंदिवस क्षीण होत दि. २५.१.१९४८, पौष शु. १४ या दिवशी सायंकाळी ७.२० वा. लिंगैक्य झाले. आपल्या जीवनाच्या अंतिम श्वासापर्यंत अनेक लोककल्याणकारी कामे हाती घेऊन आपले जीवन सर्वांना आदर्शवत् करून, शास्त्र तसेच साहित्य क्षेत्रांत निरंतर नाव करून महाचैतन्यात समरस पावले. त्यांच्या पार्थिव शरीराची क्रियासमाधी हरेश्वर मंदिरात करण्यात आली.

## ८५ वे श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी



काशीपीठाचे ८५ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी हे पूर्वाश्रमीचे धारवाड जिल्ह्यातील हिरेकेरूर तालुक्यातील मदग मासूर गावचे. या गावात मदगच्या श्रीमती केंचम्मा नावाच्या एक शरणी होऊन गेल्या. आपल्या बलिदानाने त्या अमर झाल्याने या गावास 'मदग मासूर' असे म्हणतात. कन्नड देशीचे सुप्रसिद्ध कवी सर्वज्ञांचे हे जन्मगाव होय. याप्रमाणे इतिहासप्रसिद्ध मदग मासूरचे हिरेमठदेखील आपल्या परंपरेमुळे आजुबाजूच्या गावांचे श्रद्धास्थान झाले होते. या मठाचे वे. परमेश्वरय्या त्रिकाल लिंगपूजानिष्ठ, धर्मपरायण होते. त्यांचा विवाह हावेरी जिल्हा ब्याडगी तालुक्यातील सिडेनूर गावच्या केंडदमठाच्या वीरप्पय्या यांची ज्येष्ठ सुपुत्री रुद्रम्मा हिच्याशी झाला. वे. परमेश्वर व सौ. रुद्रम्मा या माहेश्वर दंपतींना गंगाधरय्या, नीलकंठय्या, सिद्धलिंगय्या, बसवराजय्या, मृत्युंजय आणि शिवमूर्तय्या अशी सहा मुले तसेच बसवण्णम्मा, महादेवम्मा, महानंदम्मा या तीन मुली अशी संतती झाली. यांच्यात सिद्धलिंगय्या हेच काशीपीठाचे जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य म्हणून प्रसिद्धी पावले.

श्री सिद्धलिंगय्या शा.श. १८३८ अनल नाम संवत्सरात फाल्गुन मास, कृष्ण पक्ष द्वादशी, दि. २०.३.१९१७ रोजी मंगळवारी सूर्योदयसमयी जन्मास आले. त्यावेळी मदग मासूर गावी प्लेग हा साथीचा रोग पसरल्याने सौ. रुद्रम्मा मुलाच्या बाळंतपणासाठी आपल्या नातलगाच्या रट्टीहळ्ळी गावच्या कब्बिनकंती मठास आल्या. मुलाचा जन्म रट्टीहळ्ळी येथेच झाला. बाराव्या दिवशी सिद्धलिंगय्या असे नामकरण करण्यात आले. तेव्हा रट्टीहळ्ळी कब्बिनकंती मठास श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य नावाचे पट्टाध्यक्ष होते. चि. सिद्धलिंगय्याचा योगक्षेम श्री सिद्धलिंग शिवाचार्यांच्या छत्रछायेत झाला.

चि. सिद्धलिंगय्यांनी रट्टीहळ्ळी येथे कन्नड चौथीपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. नंतर रट्टीहळ्ळीच्या पट्टाध्यक्षाने संस्कृत अध्ययनाकरिता त्यांना शिवमोग्गा जिल्ह्यातील शिकारीपूर तालुक्यातील कडेनंदीहळ्ळी गावास पाठविले. कडेनंदीहळ्ळी गावचा श्री होळीहंपेश्वर मठ रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील आहे. त्या मठात तेव्हा काशी विश्वाराध्य गुरुकुलात शिक्षण घेतलेले घनविद्वान वे.पं. गुरुमूर्ती शास्त्रीजी संस्कृत पाठशाळा चालवीत होते. विद्यार्थ्यांना स्वत:च शिकवीत होते. चि. सिद्धलिंगय्यांनी पं. गुरुमूर्ती शास्त्रीजींचा अत्यंत प्रिय शिष्य होऊन तेथे संस्कृत अध्ययनास सुरुवात केली. या पाठशाळेत सतत आठ वर्षेपर्यंत त्यांनी अमरकोश, शब्दरूपावली, समासचक्र, रघुवंश आणि कुमारसंभव आदी काव्यांचा पूर्णपणे अभ्यास करून संस्कृत भाषेत प्राविण्य प्राप्त केले. त्यावेळी शिवमोग्गा जिल्ह्याच्या क्यासनुरू गावचा श्रीशैलपीठाचा शाखामठ रिक्त होता. त्या गावच्या वे. परमेश्वरय्यांनी सिद्धलिंगय्यांना क्यासनूर मठावर उत्तराधिकारी म्हणून येण्याविषयी विनविले. श्री परमेश्वरय्यांनी पं. गुरुमूर्ती शास्त्रीजींशी संवाद साधून चि. सिद्धलिंगय्यांना क्यासनूर हिरेमठाचा पट्टाधिकारी होण्यास सहर्ष स्वीकृती दिली.

क्यासनूरु हिरेमठ पुत्रवर्गपरंपरेचा मठ असल्याने त्या मठाच्या वंशजांची यास संमती मिळाली नाही. पट्टाभिषेकाला वंशजांनी विरोध केल्याने गावच्या लोकांनी एकत्र येऊन श्रीशैलपीठाची उपशाखा गुंतकल मठात श्री १००८ जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात १९३६ मध्ये त्यांना विधिवत् पट्टाधिकार देण्यात आला. त्यावेळी चि. सिद्धलिंगय्यांचे 'श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

इकडे क्यासनूरु हिरेमठाच्या वंशजांनी गुंतकल येथे झालेला क्यासनूरु हिरेमठ पट्टाभिषेक आम्हाला मान्य नाही अशी न्यायालयात हरकत घेतली. याप्रमाणे क्यासनूरु मठाच्या पट्टाभिषेकासंबंधी न्यायालयात वाद सुरू झाल्याने या वादाचा प्रभाव श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्यांवर पडू नये या

उद्देशाने त्यांना संस्कृतच्या पुढील अध्ययनासाठी १९३७ मध्ये सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पाठविले. तेथे श्री वेदपंडित जगदीश शास्त्रीजी नालवार यांचा शिष्य होऊन श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्यांनी पुढील संस्कृत अध्ययन पूर्ण केले. क्यासनूरु मठाच्या वादाचा निर्णय तालुका तसेच जिल्हा कोर्टात श्री स्वामीजींच्या बाजूने झाला. त्यानंतर क्यासनूरु मठाचे वंशज हायकोर्टात गेले. उच्च न्यायालयात क्यासनूरु मठाच्या वंशजांना अनुकूल असा निर्णय लागला. तेव्हा श्री ष.ब्र. जयगुरू वृषभाचार्यांना खूप दु:ख झाले. इकडे घरी जाता येईना, तिकडे मठात जाता येईना.. अशा विचित्र मानसिकतेमध्ये राहावे लागले.

याच काळात १९४२ मध्ये श्रीशैलजगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींचा आडवी पालखी महोत्सव तसेच धर्मसमारंभ क्यासनूरुमध्ये आयोजित केला गेला होता. त्यावेळी श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्य स्वामीजींनी महास्वामीजींच्या दर्शनास जाऊन मठाची परिस्थिती त्यांच्या कानांवर घातली. त्यावेळी श्रीशैलमहास्वामीजींनी त्यांना त्या मठाचा नाद सोडून द्या. अभ्यासाचे तुमचे वय, म्हणून तुम्ही उच्च शिक्षणासाठी काशीक्षेत्रास जा, असा त्यांना सल्ला दिला. श्रीशैलमहास्वामीजींच्या आदेशानुसार अध्ययनाकरिता काशीक्षेत्री जाण्याची इच्छा झाली तरी आर्थिक अडचणीमुळे त्यांच्या उत्साहावर विरजण पडत होते. याच वेळी सोलापुरात असणारे त्यांचे सहाध्यायी १०-१२ बटू काशीक्षेत्रास जायला तयार झाले होते. त्यांच्या सोबत त्यांचे आप्त-मित्र श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य स्वामीजी, संस्थान हिरेमठ, जत यांनी श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्यांना काशीला येण्याचा आग्रह केला. त्याबरोबर आपल्या मठाकडून येणाऱ्या धन-सहाय्यातील अर्धे धन त्यांना देण्याचा भरवसा दिला आणि त्यांना काशीस घेऊन गेले.

काशीपीठाधिपती १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९४३ मध्ये प्रवेश घेतला. त्याच काळात १९४४ मध्ये जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य

महास्वामीजी लिंगैक्य झाले होते. श्री वीरभद्र जगद्गुरू पीठाचार्य झाले होते. येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयाच्या न्यायशास्त्राचे प्रथानाध्यापक पं. शिवदत्त मिश्र यांच्याकडून न्यायशास्त्र तसेच टिकमणी संस्कृत महाविद्यालयाच्या साहित्याचे प्रधानाध्यापक ताराचरण भट्टाचार्यांकडून त्यांनी साहित्यशास्त्राचा अभ्यास केला.

या पद्धतीने दोन वर्षेपर्यंत शास्त्राध्ययन करीत असतानाच तत्कालीन पीठाधिपती विद्यानिधी श्रीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी प्रकृती अस्वास्थ्यामुळे दि. २५.१.१९४८ रोजी काशीक्षेत्री लिंगैक्य झाले. लिंगैक्य होण्यापूर्वीच त्यांनी श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्य स्वामीजींचे आकर्षक व्यक्तित्व, अध्ययनशीलता आणि सच्चरित्राने प्रभावित होऊन या पीठास या विद्यार्थ्यांमध्ये हेच सुयोग्य आहेत असा निर्णय घेऊन दि. ७.१.१९४८ रोजी त्यांच्या नावे इच्छापत्र लिहून ठेवले होते.

पुढे लिं. वीरभद्र जगद्गुरूंची क्रियासमाधी पूर्ण होत असताना तत्कालीन व्यवस्थापक श्री रामचंद्र प्रसाद यांनी इच्छापत्र जाहीर करून समक्ष ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्य यांना काशीपीठाचे पुढील पीठाधिपती म्हणून घोषित केले. तेव्हा उपस्थित असणाऱ्या विद्यार्थ्यांनी, भक्तांनी आणि श्रीपीठाच्या सेवकांनी टाळ्या वाजवून भावी पीठाचार्यांचा जयघोष केला. पुढे श्रीपीठाचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. जयगुरू वृषभ शिवाचार्य स्वामीजींनी पीठाची सूत्रे हाती घेऊन पीठपरंपरा आणि सर्व व्यवहार यथावत् चालू ठेवले.

त्यानंतर शुभमुहूर्तावर पट्टाधिकार महोत्सव करण्याच्या उद्देशाने स्वतः श्री ष.ब्र. वृषभ शिवाचार्य स्वामीजींनी रंभापुरी, उज्जयिनी, श्रीशैल या पीठांस जाऊन पीठाचार्यांना विधिवत् आमंत्रण दिले. येताना सर्व भागांत संचार करून पट्टाभिषेकाचा प्रचार केला. तसेच पट्टाभिषेकाच्या सामग्रीचा संचय केला. पुढे शा.श. १८७० सर्वधारीनाम संवत्सर कार्तिक मास शुक्लपक्ष त्रयोदशीला (धनत्रयोदशी) दि. १४.११.१९४८ रविवारी सकाळी ९.४३ पासून ९.५७ पर्यंत असणाऱ्या धनुर्लग्न सिंहांश मुहूर्तावर पट्टाभिषेक

करण्याचा निर्णय घेऊन आमंत्रण पत्रिकेच्या माध्यमाने सर्वत्र प्रचार करण्यात आला. या पट्टाभिषेक समारंभास पंचपीठांच्या समस्त समान पीठाचार्यांना आमंत्रण होते. समारंभास श्रीसद्धर्म सिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी तसेच श्रीमद् रंभापुरी वीरसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर राजेंद्र शिवाचार्य भगवत्पाद हे कार्यक्रमापूर्वी श्री काशीपीठास आले होते. कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र, मध्यप्रदेश आणि उत्तरप्रदेशातून हजारोंच्या संख्येने भक्त आले होते. याशिवाय श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी, होटगी मठ, सोलापूर; श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी, बिळगी; श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी, रौडकुंदी; श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजी, शिखरमठ, रायचूर; श्री सिद्धलिंग देवरू, पंचग्रह हिरेमठ, कुंदगोळ; नियोजित पट्टाध्यक्ष आणि मणूरचे मठाध्यक्ष वे.पं. मल्लिकार्जुनशास्त्रीजी इ. अनेक शिवाचार्य आणि शास्त्रीजींच्या उपस्थितीत दि. १४.११.१९४८ का. शु. १३ रविवारी प्रात:काळी ९.४३ पासून ९.५७ पर्यंत धनुर्लग्नाच्या सिंहांशात रंभापुरी आणि उज्जयिनी जगद्गुरूंच्या अमृतहस्ते विधिवत् अभिषेक, पट्टबंधन, किरीटधारण, मुद्राप्रदान तसेच दंडकमंडलू आदी धार्मिक विधिविधान वेळेवर पार पडून नूतन महास्वामीजींचा सिंहासनारोहण कार्यक्रम शास्त्रोक्त पद्धतीने संपन्न झाला. त्यावेळी काशीपीठाचे ८५ वे पीठाधिपती नूतन महास्वामीजींचे 'श्री १००८ जगद्गुरू मल्लिकार्जुन विश्वाराध्य ऊर्फ विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी' असे नूतन नाम जयघोषासहित घोषित करण्यात आले.

सायंकाळी ६ वा. धार्मिक महासभेच्या निमित्ताने नूतन महास्वामीजी तसेच रंभापुरी व उज्जयिनी जगद्गुरूंचे सिंहासनारोहण होऊन धार्मिक महासभा वैभवपूर्ण पद्धतीने संपन्न झाली. दुसऱ्या दिवशी कार्तिक मास चतुर्दशी दि. १५.११.१९४८ सोमवारी सकाळी १० वा. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा वैभवपूर्ण आडवी पालखी महोत्सव काशीनगरीच्या प्रमुख रस्त्याने पार पडला. या वैभवपूर्ण उत्सवात विभिन्न

प्रांतांतून आलेले हजारो भक्त सहभागी झाले होते. त्याचप्रमाणे विविध वाद्यवृंद, पारंपरिक भजनवृंद पारंपरिक वेशभूषेत सहभागी झाले होते. हा नयनमनोहर उत्सव पाहून आनंदित झालेले नगरवासी मोठ्या संख्येने त्यात सहभागी झाले होते.

काशी जंगमवाडी मठासंबंधी नगरवासियांना पूर्वीपासून आदरभावना होती. असे उत्सव काशीवासियांना पाहायला मिळतात. काशीतील भक्तसमूह उत्सव चालू असताना आपापल्या घराच्या समोर सडासंमार्जन करून, महास्वामीजींना पुष्पमाला समर्पित करून, फलादी आशीर्वादरूपाने प्राप्त करून घेणारी दृश्ये भक्ती वृद्धिंगत करीत होती. हा उत्सव सायंकाळी पाच वाजता परत आला. परत आल्यानंतर सायंकाळी सहा वाजता नूतन महास्वामीजी तसेच रंभापुरी व उज्जयिनी सन्निधींच्या दिव्य सान्निध्यात धर्मजागृती महासंमेलन संपन्न झाले. या महासंमेलनात अनेक विद्वान, कवी, कलाविद व शिवाचार्य यांनी आपली विद्वत्ता, कला, वाक्चातुर्य अभिव्यक्त केले. या सभेत देशातील गणमान्यांना, विद्वानांना, आलेल्या शिवाचार्यांना गुरुरक्षा आशीर्वाद देऊन त्यांचा सन्मान नूतन जगद्गुरूंच्या अमृतहस्ते करण्यात आला. शेवटी महास्वामीजींच्या मंगलाशीर्वचनाने सर्व कार्यक्रम संपन्न झाला.

याप्रमाणे वैभवपूर्ण चाललेल्या पट्टाभिषेक समारंभात सहस्रावधी भक्त प्रत्यक्ष सहभागी होऊन आनंदित झाले. ज्यांना येणे शक्य झाले नाही त्यांनी आपले संदेश पाठविले. त्याशिवाय अनेक महनीयांनी आपले संदेश पाठवले. त्यांच्यात प्रमुख म्हणजे नागनूर बृहन्मठाचे वे. काशीनाथ शास्त्री, मैसूर; श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी, सावीरदेवर संस्थानमठ बिच्याळी; ॲड्. श्री पी. आय. हिरेमठ, हुब्बळी; श्रीयुत मुरगप्पय्या सिद्धप्पयय्या कूडलमठ, शिग्ली; टी. सिद्धलिंगय्या, ल. टी. हनुमंतप्पा बेंगळूरु; के. एफ. पाटील ब्याडगी, टी. एच. एम. चंद्रशेखर आचार्य, बी. ए. बी. एल. संचालक, नवसंदेश पत्रिका, बळ्ळारी; एस. एस. माळवाड, एम. ए., धारवाड; फ. गु. हळकट्टी, बी.ए., एल्.एल्.बी. ॲड्. संपादक, शिवानुभव

पत्रिका, विजयपूर; कीर्तनकेसरी कविभूषण श्री शिवरुद्र शास्त्रीजी गुब्बी, मेजर जनरल दीवाण बहादुर आ. एस. हिरेमठ कुलाबा, डी. एस. गुरुबसप्पाजी असिस्टंट सुपरिटेंडेंट, गव्हर्मेंट प्रेस, मैसूर; एम. व्ही. मरुळसिद्धय्या, बर्मा सेल एजंट, शिवमोग्गा; ॲड्. व्ही. टी. कित्तूर बी.ए., एल्.एल्.बी., बेळगाव; सद्भक्त मंडळी, अळवंडी; श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी, संस्थान कट्टीमनी हिरेमठ, अळवंडी; डॉ. वीरय्या देवरू, शिवानंदाश्रम, रायवरम्; आस्थान विद्वान व्ही. शिवमूर्ती शास्त्रीजी, संपादक, स्वतंत्र कर्नाटक व शरण साहित्य, बेंगळूरु; श्री षडक्षरी हिरेमठ (बिळगी), हेडमास्तर इंग्लिश हायस्कूल हुनगंद, वे.पं. जगदीश शास्त्री (नालवार), श्रीमद् वीरशैव गुरुकुल प्राध्यापक, सोलापूर; वे.पं. मरुळाराध्य शास्त्री, मालिक आझाद हिंद प्रिंटिंग प्रेस, बागलकोट; ॲड्. जे. मल्लिकार्जुनराव बेजवार, डॉ. दासण्णाचार्य (अध्यक्ष, काशी कर्नाटक संघ) काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी; श्री शिवण्णा नेश्वि, हंसभावी, श्री एस. एम. फताटे, सोलापूर; के. जी. वडेयर, सागर, वे.पं. विरूपाक्ष शर्मा, सुनकल्, बिदरे-आराध्यमठ दावणगेरे; श्रीमान सज्जेद लिंगप्पजी होसपेट आणि के. काशीनाथ किशनगंज इत्यादींनी आपले शुभसंदेश पत्राने तसेच तारेने पाठवून आपला श्रद्धाभाव समर्पित केला.

या रीतीने श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा पट्टाभिषेक, आडवी पालखी महोत्सव आणि धार्मिक समारंभ अत्यंत वैभवपूर्ण रीतीने संपन्न झाला. या समारंभात सहभागी झालेल्या मठाधिपतींचा, पंडितांचा, कविकलाविदांचा तसेच कार्यक्रमात तनमनधनाने सेवा समर्पिलेल्या भक्तांचा श्रीपीठाकडून सन्मान होऊन आशीर्वाद प्राप्त झाले.

काशीपीठाचे ८५ वे पीठाधिपती म्हणून अधिकार ग्रहण केलेले श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी दि. १४.११.१९४८ पासून २.१०.१९८९ पर्यंत म्हणजे ४१ वर्षांपर्यंत पीठाध्यक्ष म्हणून कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र या प्रदेशांत संचार करून धर्मजागृतीसोबत सामाजिक तसेच शैक्षणिक कार्य करून अत्यंत लोकप्रिय झाले. त्यांनी आपल्या कालावधीत

केलेल्या महत्कार्याचा या ठिकाणी उल्लेख करावयाचा आहे.

श्री महास्वामीजींनी पीठाधिकार स्वीकारला तेव्हा पीठाचा ऋणभार बहुतेक कमी झाला असला तरी राहिलेल्या अल्प ऋणातून त्यांनी श्रीपीठास पूर्णपणे मुक्त केले. काशीपीठाचा ऋणभार तीन जगद्गुरूंना फेडावा लागला. यानुसार ऋणमुक्तीचे संतोषाचे दिवस येत असतानाच जमीनदारी पद्धती रद्द करणारा कायदा १९५६ मध्ये उत्तरप्रदेशात अंमलात आला.

**पीठाची जमीन रयतेला मिळाली**

अनेक राजे-महाराजांनी आपापल्या राजवटीच्या कालावधीत अत्यंत श्रद्धाभक्तिपूर्वक श्रीकाशीजगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाच्या जंगमवाडी मठास पूर्णांशाने भूमिदान केले होते. या जमिनी काशीत जंगमवाडी, मानसरोवर, नर्मदेश्वर, दोंडिया वीर, लक्ष्मणपुरा (गोदोलिया), साक्षी विनायक, हनुमान फाटक आणि पियरी मोहल्ला (गल्ली) यांमध्ये मोकळी जमीन तसेच बांधलेली हजारो घरे आहेत.

त्याचप्रमाणे बनारस जिल्ह्यातील छित्तुपूर, जंगमपूर, भवानीपूर, पट्टिलेश्वर भोलपूर, उद्दुपूर, मह्वरकला, मीरपूर, बलुवा, चक्कदा, चक्कभोजतया आणि कटरवा इ. गावांत हजारो एकर जमीन होती. या सर्व जमिनी जंगमवाडी मठाच्या मालकीच्या होत्या. त्या त्या गावातील शेतकऱ्यांना कसण्यासाठी दिल्या होत्या. ही जमीनदारी पद्धती १९५५ पर्यंत चालत आली होती. पुढे ही पद्धत रद्द करून कसणाऱ्याची जमीन मालकी (Tenancy Act) १९५६ मध्ये अंमलात आला, तेव्हा मठाच्या मालकीची हजारो एकर जमीन कुळाच्या मालकीची झाली. अशा पद्धतीने श्रीपीठाचे फार मोठे उत्पन्नाचे साधन संपुष्टात आले. असे एका विपत्तीतून श्रीपीठ पार पडते म्हणेपर्यंत दुसऱ्या भयंकर संकटात सापडले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी धैर्य न सोडता आलेल्या समस्यांना सामोरे जाऊन त्यांचे निराकरण केले. या पद्धतीने शाश्वत उत्पन्नाच्या अभावामुळे या पीठास भक्तांच्या देणग्यांवर अवलंबून राहावे लागले.

**श्रीमहास्वामीजींचा धर्मप्रचार दौरा**

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या कार्यकाळात सर्वत्र संचार करून अनेक महत्त्वपूर्ण कार्ये केली. हुब्बळी हन्न्यारड्डू मठाचे श्री ष.ब्र. मडिवाळ शिवाचार्य स्वामीजींनी गोकर्णक्षेत्री एक वीरशैव मठ स्थापिला होता. त्याच्या उद्घाटनाच्या निमित्ताने काशीमहास्वामीजींना निमंत्रिले होते. त्यांच्या आमंत्रणावरून दि. १.३.१९५७ रोजी गोकर्ण क्षेत्री श्रीकाशीजगद्गुरूंचा आडवी पालखी महोत्सव आणि त्यांच्या नूतन मठात श्रीमहास्वामीजींची इष्टलिंग महापूजा संपन्न झाली. श्रीमहास्वामीजींच्या पूजासमारंभात तसेच तेथे झालेल्या धार्मिक महासभेत हजारो भक्त सहभागी होऊन धन्य झाले. श्रीमहास्वामीजींचे श्रीचरण मस्तकी धारण करून समुद्रस्नान करून पुनीत झाले.

**महाराष्ट्र राज्य वीरशैव परिषद**

महाराष्ट्राच्या अमरावती नगरात महाराष्ट्र राज्य वीरशैव परिषदेचे प्रथम अधिवेशन दि. २८.१२.१९६३ पासून ३०.१२.१९६३ पर्यंत तीन दिवस संपन्न झाले. या कार्यक्रमासाठी अमरावतीच्या वीरशैव समाजबांधवांनी प्रार्थना केली होती. समाजभूषण श्री. गंगाधरअप्पा चौधरी समारंभाचे अध्यक्ष होते. स्वागताध्यक्ष म्हणून ॲड्. महादेवअप्पा पसारकर हे निवडले गेले होते. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्यांच्या दिव्य सान्निध्यात राष्ट्रसंत श्री तुकडोजी महाराजांनी परिषदेच्या पहिल्या दिवसाच्या कार्यक्रमाचे उद्घाटन केले. वैरागचे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य त्या दिवशीचे सभाध्यक्ष होते. श्रीमहास्वामीजींची शोभायात्रा झाली. नंतर धार्मिक सभेत वैरागचे ष.ब्र. सांब पंचाक्षर शिवाचार्य, साखरखेर्ड्याचे ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य यांनी धर्मसंदेश दिला. गदगचे वेदान्तकेसरी मल्लिकार्जुन स्वामीजींनी उद्बोधक प्रवचन केले. या सभेत बार्शीचे परंडकर मठाचे श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य उपस्थित होते.

दि. २९.१२.१९६३ रोजी झालेल्या दुसऱ्या दिवशीच्या कार्यक्रमात मैसूर राज्याचे अर्थमंत्री श्री बी. डी. जत्ती उपस्थित होते. सभेला त्यांनी

मार्गदर्शन केले. महास्वामीजींच्या अमृतहस्ते त्यांचा सत्कार करण्यात आला. दि. ३०.१२.१९६३ रोजी तिसऱ्या दिवशीच्या कार्यक्रमात महिला चर्चासत्र ठेवण्यात आले होते. या कार्यक्रमात सोलापूरच्या श्रीमती पंचव्वाबाई सरदार, परळीच्या श्रीमती रत्नाबाई चौधरी आणि पुण्याच्या संत शिवगंगामाई इ. सहभागी झाल्या होत्या. त्यांनी आपले विचार मांडले होते. महिला चर्चासत्राचे उद्घाटन दे.भ. रत्नप्पाण्णा कुंभार यांनी केले होते.

या तीन दिवसांच्या सभेला श्रीकाशीमहास्वामीजींचे सान्निध्य लाभले होते. त्यांनी त्या दिवशीच्या परिसंवादास अनुरूप असे मार्गदर्शनपर उद्बोधक आशीर्वचन केले. महाराष्ट्रात अल्पसंख्याक असणाऱ्या वीरशैव समाजाच्या आर्थिक, शैक्षणिक आणि सामाजिक अभ्युदयाकरिता काही निर्णय घेण्यात आले. ही परिषद सफल होण्याकरिता श्री ष.ब्र. महारुद्र निर्वाण रुद्रपशुपती शिवाचार्य कोळेकर हे बहुसंख्येने आपल्या शिष्यवर्गास घेऊन आले होते.

**केदारपीठाचा पट्टाभिषेक**

केदारपीठाचे श्रीजगद्गुरू रावल विश्वनाथलिंग लिंगैक्य झाल्यानंतर रिक्त झालेल्या त्या स्थानावर केदारपीठाचे लिं. जगद्गुरू श्री नीलकंठलिंग शिवाचार्य यांचा चेला मुतनाळ मठाचे श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्यांना पट्टाभिषेक व्हावा असा दि. १४.५.१९६६ रोजी श्रीशैलक्षेत्री पंचाचार्यांच्या खासगी बैठकीत निर्णय झाला. तेथे उपस्थित असणारे रंभापुरी पीठाचे श्रीगंगाधर जगद्गुरू, उज्जयिनी पीठाचे श्रीसिद्धेश्वर जगद्गुरू, श्रीशैलपीठाचे वागीश पंडिताराध्य या जगद्गुरूंनी एकमताने केदारपीठाच्या पट्टाधिकाराची जबाबदारी श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींवर सोपविली.

श्रीकाशीजगद्गुरूंनी ही जबाबदारी समर्थपणे तडीस नेली. दि. १०.६.१९६६ रोजी श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्यांना पट्टाभिषेक केला. तेव्हा त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू रावल शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले आणि श्रीकाशीजगद्गुरूंच्या अमृतहस्ते किरीट धारण करविला गेला. सालूरचे वैदिक शिरोमणी श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजींनी पट्टाभिषेकाचे वैदिक विधिविधान केले. या प्रसंगी

रंभापुरी जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींचे सान्निध्य लाभले होते.

**समग्र महाराष्ट्र धर्मप्रचार दौरा**

महाराष्ट्रातील अल्पसंख्यांक वीरशैव संघटित व्हावेत आणि त्यांच्यात परस्पर प्रेमबांधव्यभाव वाढीस लागावा या उद्देशाने श्री वे. विश्वंभर स्वामी शिंगणापूरकर यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती स्थापण्यात आली. या समितीमध्ये वे. उद्धव मास्तर जंगम यांनी प्रामुख्याने भाग घेतला होता. या दोघांनी मिळून श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा सर्व जिल्ह्यांतून एक बृहत् धर्मप्रचारदौऱ्याचा आराखडा तयार केला. हा दौरा दि. १५.१२.१९६८ पासून ६.२.१९६९ पर्यंत एकूण ५५ दिवस चालला. बार्शीचे परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी श्रीमहास्वामीजींच्या सोबत सर्व कार्यक्रमांत सहभागी झाले होते.

या धर्मप्रचार दौऱ्यात सकाळी १० वाजल्यापासून महास्वामीजींचे नगरात आगमन, ११ पासून २ वाजेपर्यंत स्नानपूजा आणि विश्रांती, दु. २ पासून ३ वाजेपर्यंत निवासस्थानापासून सभास्थानापर्यंत उत्सव, सायं. ३ पासून ४ पर्यंत दर्शनाशीर्वाद व भजनादी कार्यक्रम, संध्याकाळी ४ वाजल्यापासून आठ वाजेपर्यंत धर्मसभा, शिवाचार्यांकडून धर्मसंदेश आणि महास्वामीजींचे आशीर्वचन, रात्री ८ पासून ९.३० पर्यंत श्री महास्वामीजी आणि शिवाचार्यांची स्नान-पूजा, प्रसाद. रात्री ९.३० पासून १०.३० पर्यंत स्थानिक समस्यांविषयी स्थानिक कार्यकर्त्यांसोबत चर्चा आणि त्यावर तोडगा, प्रात:काळी ६ वाजता पुढील गावाकडे प्रस्थान. या रीतीने दैनंदिन कार्यक्रमाचे वेळापत्रक तयार केले होते.

हा दौरा कार्यक्रम दि. १५.१२.१९६८ पासून पुण्याहून सुरू झाला. पुढे सातारा, कोल्हापूर, सांगली, सोलापूर, लातूर, बीड, परभणी, नांदेड, वाशीम, अकोला, अमरावती, यवतमाळ, चंद्रपूर, वर्धा, नागपूर, औरंगाबाद, जळगाव, नाशिक, मुंबई, रत्नागिरी आणि अहमदनगर या २२ जिल्ह्यांत संचार करून पूर्ण झाला.

या २२ जिल्ह्यांतील प्रमुख ग्रामांत व नगरांत श्रीमहास्वामीजी सामूहिक इष्टलिंगपूजा, दर्शनाशीर्वाद, सभेत आशीर्वचन व अनेक भक्तांच्या वैयक्तिक तसेच कौटुंबिक समस्यांना सोडविण्यासाठी मार्गदर्शनही करीत असत. यामुळे सर्वांना अत्यंत तृप्ती आणि समाधान मिळत होते. वीरशैवधर्मात गुरूला अग्रस्थान आहे. वीरशैवधर्मसंस्थापक पंचाचार्यांची पंचपीठे ही वीरशैवांची तीर्थक्षेत्रे असून भारतातील सर्व तीर्थक्षेत्रांत काशी अत्यंत श्रेष्ठ क्षेत्र होय. अशा काशीक्षेत्राचे जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाच्या पीठाचार्यांनी स्वत: भक्तांच्या गावी तसेच घरोघरी जाऊन संचार केल्याने समस्त महाराष्ट्रीय वीरशैव भक्तांमध्ये श्रीकाशीजगद्गुरूंविषयी अतिशय भक्तिभाव निर्माण झाला होता. या दौऱ्यामुळे महाराष्ट्रातील भक्त काशीपीठाच्या जगद्गुरूंच्या दर्शनाशीर्वादाने तृप्त झाले, तसेच काशीपीठाविषयी त्यांच्या मनात आत्मीयता निर्माण झाली. महाराष्ट्रातील वीरशैवांच्या इतिहासात काशीजगद्गुरूंचा हा दौरा कार्यक्रम सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा झाला.

### गुरु–विरक्त सामंजस्याकरिता प्रयत्न

बेंगळुरू महानगरात दि. ७.१.१९७२ रोजी जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांचा एक बृहत् आडवी पालखी महोत्सव आयोजिला होता. या उत्सवात गुरु–विरक्तांना एक करावे म्हणून समाजातील काही प्रमुखांच्या मनात आले. तेव्हा पंचपीठांसोबत चित्रदुर्गच्या बृहन्मठाचे श्री मल्लिकार्जुन महास्वामीजींना समान स्थान–मान देण्याविषयी विचार झाला. पंचपीठाचार्यांचा समन्वयसंदेश घेऊन पंचपीठांसाठी स्वत: काशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजींना घेऊन चित्रदुर्गास गेले.

तेथे चित्रदुर्ग स्वामीजींसोबत चर्चा झाली. त्यांनी बेंगळूरुच्या उत्सवास येण्याची संमती दिली. हे समजल्यानंतर बेंगळूरुच्या भक्तांना आनंद झाला. उत्सवाकरिता सहा पालख्या सज्ज केल्या. चित्रदुर्गचे श्री मल्लिकार्जुन महास्वामीजींनी आपण संमती दिल्यानुसार यायला हवे होते. परंतु

अस्वास्थ्याचे कारण पुढे करून ते उत्सवास आले नाहीत. त्यामुळे त्यांच्याविषयी भक्त असंतुष्ट झाले. नियोजित जगद्गुरूंची आडवी पालखी महोत्सव, धर्मसभा हे कार्यक्रम अभूतपूर्व रितीने पार पडले. भक्तांच्या मनात पंचपीठाचार्यांविषयी भक्ती द्विगुणित झाली.

**विद्यार्थी निलयाची स्थापना**

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी १९४८ मध्ये पीठाधिकार मिळाल्यानंतर प्रथम महाराष्ट्रातच धर्मप्रचारासाठी संचार केला. त्यावेळी त्यांच्यासोबत बार्शीचे परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी पट्टाधिकारी म्हणून प्रत्येक कार्यक्रमात सहभागी झाले होते. १९५८ मध्ये पुण्यात शिवगंगामाई यांनी निर्माण केलेल्या मंदिरात लिंग स्थापण्यासाठी श्रीकाशीजगद्गुरू आले होते. तेव्हा पुण्यात एका विद्यार्थी निलयाची स्थापना करावी असा विचार महास्वामीजींच्या मनात आला. 'शुभस्य शीघ्रम्' या विचारानुसार टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या गुलटेकडी वसाहतीत १० खोल्यांची एक इमारत भाड्याने घेऊन त्यात 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विद्यार्थी निलया'ची सुरुवात केली.

पुढे सदाशिव पेठेत श्री वाडेकर यांची एक इमारत जिल्हा न्यायालयात लिलावाकरिता आली होती. तेव्हा श्रीमहास्वामीजींनी श्री परंडकर स्वामीजींना पुढे करून ४१,०००/– रुपयास ती लिलावात खरेदी केली. त्या इमारतीत राहणाऱ्या भाडेकरूंना ५–६ वर्षांत जागा रिकामी करून द्यायला सांगितले. ती इमारत पुन्हा रंगरंगोटी करून दि. २२.५.१९६५ मध्ये श्रीशैलजगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्यांना आमंत्रित करून तेथे 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विद्यार्थी निलय' विधिवत् प्रारंभ केले. १९८१ पर्यंत श्री परंडकर स्वामीजी त्या निलयाचा योगक्षेम पाहत होते. त्यानंतर श्री. गंगाधर चिरमे आणि सौ. नलिनी चिरमे यांनी त्या निलयाची व्यवस्था पाहिली. त्यांचे चिरंजीव सचिन चिरमे यांनी काही काळ निलयाचे व्यवस्थापक म्हणून कार्य पाहिले. सध्या श्री. भरत उंबरकर व श्री. सुधाकर हलगणे हे दोघे सुनियोजित रितीने निलय सांभाळीत आहेत.

## बार्शीतील दहिवडकर मठाचा उद्धार

सोलापूर जिल्ह्यातील बार्शीमध्ये दहिवडकर यांचा काशीपीठाचा शाखामठ आहे. हा शिष्यवर्ग परंपरेतील मठ आहे. या मठास श्री ष.ब्र. वरसिद्ध शिवाचार्य नावाचे पट्टाध्यक्ष होते. १९७६ मध्ये फेब्रुवारी महिन्यात ते आकस्मिक लिंगैक्य झाले. त्यांनी आपला उत्तराधिकारी नेमला नव्हता. त्या मठास कोठलीही व्यवस्थापक कमिटी नव्हती. यामुळे त्या मठाचे मूळपीठ असलेल्या श्रीकाशीपीठाच्या जगद्गुरूंनाच विचार करण्याची वेळ आली होती. त्याच्या व्यवस्थेसाठी श्रीकाशीमहास्वामीजींनी परंडकर मठाच्या ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्यांना नेमले. परंडकर स्वामीजींच्या प्रयत्नाचे फलित म्हणजे कायदेशीररित्या तो मठ श्रीमहास्वामीजींनी आपल्या अधिकारात करून घेतला. पुढे काशीपीठात अध्ययन करीत असलेल्या विजयपूर जिल्ह्यातील याळवार गावचे इंदुधर गुरुमठ बटूस दि. ११.२.१९७६ रोजी दहिवडकर मठावर पट्टाभिषेक करून त्यांचे श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य असे नामकरण केले. तसेच आपल्या आधीन असणाऱ्या त्या मठाची चर-स्थिर मालमत्ता नूतन स्वामीजींच्या स्वाधीन केली. अशा रीतीने अनाथ होऊन विनाश पावणाऱ्या मठास आपल्या हाती घेऊन उद्धार केल्याचे श्रेय श्रीकाशीमहास्वामीजींना जाते. ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्यांनी प्रकृतीच्या अस्वाथ्यामुळे आपल्या वंशातील विश्वेश्वर या बटूस श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या सान्निध्यात पट्टाभिषेक केला. ते सुद्धा अल्प आजाराने लिंगैक्य झाल्यामुळे श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी त्या स्थानी विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थी मठम् मणिकंठ यांना पट्टाभिषेक करून त्यांचे 'श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण केले.

## शक्तिविशिष्टाद्वैत पीठाची स्थापना

काशीक्षेत्र विद्यानगरी आहे. येथे तीन विश्वविद्यालये आहेत. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात वेदान्त विभागात वेदान्ताचा अभ्यास होत असला तरी वीरशैवधर्माच्या शक्तिविशिष्टाद्वैत सिद्धान्ताचा अभ्यास

होत नव्हता. म्हणून वीरशैव विद्वत्संघाच्या पदाधिकाऱ्यांनी व सदस्यांनी विश्वविद्यालयात आपल्या सिद्धान्ताचा अभ्यास व्हावा असा विचार केला. १९७२ मध्ये गुळेदगुड्डच्या अमरेश्वर मठाचे श्रीचंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी काशीच्या वीरशैव विद्वत्संघाचे कार्यवाह असताना बेंगळुरू येथे चाललेल्या पंचाचार्य संमेलनात एक निवेदन संघाच्या वतीने पाठविण्यात आले. पीठस्थापनेला आवश्यक असणारा एक लक्ष रुपयाचा निधी संग्रहित करून द्यावा म्हणून जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांना निवेदन दिले. विद्वत्संघाचे हे निवेदन संघाचे प्रतिनिधी हिरेजेवरगीचे श्री ष.ब्र. श्रीपती पंडिताराध्य शिवाचार्य यांनी बेंगळूरुच्या महासभेत सादर केले. तेव्हा काशीजगद्गुरूंनी आपल्या आशीर्वचनात हा विषय उचलून धरला आणि त्याला अल्प प्रमाणात का होईना निधी गोळा करून दिला. पुढे श्रीकाशीजगद्गुरूंनी नेतृत्व स्वीकारून संपूर्णानंद विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त अध्ययनपीठ स्थापन करण्यासंबंधी आशीर्वाद दिले. त्यांच्या आशीर्वादाने १९८३ मध्ये पीठ कार्यरत झाले. तेव्हापासून आजपर्यंत या पीठात अनेक विद्यार्थी शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा अभ्यास करून शास्त्री तसेच आचार्य उपाधी प्राप्त करून घेत आहेत. ही एक श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींची विशेष देणगी आहे.

### मार्केट निर्माण

१९५६ मध्ये श्रीकाशीपीठाची हजारो एकर जमीन Tenancy Act प्रमाणे कुळाच्या नावे झाल्याने श्रीपीठाचे शाश्वत उत्पन्न बुडाले. इतक्या मोठ्या पीठाचा खर्च केवळ गुरुदानदक्षिणेतून अपुरा पडणार हे लक्षात घेऊन श्री महास्वामीजींनी जंगमवाडी मठाच्या आजुबाजूच्या भूमीवर १९६८ मध्ये एक मार्केट बांधायला सुरुवात केली. सतत ४–५ वर्षेपर्यंत निर्माणकार्य चालले. सध्या आज एक सुसज्जित पीठोपकरण मार्केट (Furniture Market) म्हणून प्रसिद्ध झाले आहे. प्रतिमाह ३० ते ४० हजार रुपये भाड्याच्या रूपाने येऊ लागले. त्यामुळे या पीठास एक शाश्वत उत्पन्नाचे साधन झाले.

### विदर्भ धर्मप्रचार दौरा

नागपूरच्या वीरशैव सेवा समाज नावाच्या संस्थेने १९७३ मध्ये श्रीकाशी-जगद्गुरूंचा विदर्भ धर्मप्रचार दौरा आयोजित केला. नागपूरचे श्री य. वि. नहातकर आणि श्री. विश्वेश्वरअप्पा डोंगरे हे दोघे या दौऱ्याचे प्रमुख होते. दि. २७.१२.१९७३ पासून २८.१.१९७४ पर्यंत एक महिन्यापर्यंत हा कार्यक्रम चालला. या दौऱ्यात नागपूर, खापा, केळवद, चोथी, फोडा, पारडसिंग, सौंसर, नारायणवार, पांढुर्णा, वरुड, टेंबूर, खेडा, लोणी, अमरावती, नांदगाव, शिवणगाव, मोझरी, आष्टी, सारवाडी, कारंजा, ठाणेगाव, कोंडाळी, कमलेश्वर, मोहाडी, भंडारा, वडोदा, मौंदू, गिरड, उमरेड, भिवापूर, बिमूर, खडसंगी, वरोडा, वानेगाव, पांढरकवडा, यवतमाळ, दारव्हा, लोही, कारंजा लाड, वाशीम, लोणार, चिखली, वडूळ, साखरखेर्डा, बाळापूर, अकोला, नेरपिंगळाई, नेरपरसोपंत, आंजी, खंदागना आणि आर्वी गावांतून संचार करून सर्वत्र धर्मसभा आणि दीक्षा कार्यक्रम घेतले. शेवटी हा दौरा कार्यक्रम दि. २५.१.१९७४ ला नागपूरला येऊन पोहोचला.

तेथे तीन दिवस विशेष कार्यक्रम घेण्यात आले. तेव्हा मोठ्या प्रमाणात शिवदीक्षा कार्यक्रम घेण्यात आला. या दौरा कार्यक्रमात बार्शीच्या परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी पूर्णत: सहभागी झाले होते. समारोपाच्या कार्यक्रमात बाळापूर जंगममठाचे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य आणि वैरागचे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य यांनी भाग घेऊन भक्तांना शिवदीक्षा संस्कार दिले.

या दौरा कार्यक्रमामुळे विदर्भातील वीरशैव संघटित झाले. या संदर्भात विदर्भातील वीरशैव जनगणना देखील करण्यात आली. या दौऱ्याच्या स्मरणार्थ नागपूरच्या लक्कडगंज गल्लीतल्या समाजाच्या जागेत एक मंगल कार्यालय आणि एक विद्यार्थ्यांसाठी वसतिगृह उभे करण्याचा निर्णय घेण्यात आला. तेव्हा श्रीकाशीजगद्गुरूंनी त्या दौऱ्यात जमा झालेली पादपूजेच्या दानदक्षिणेचे लक्षावधी रुपये वसतिगृहाच्या निर्माणकार्यास देऊ केले. आज

तेथे श्रीजगद्गुरू पंचाचार्य मंगलकार्यालय उभे करण्यात आले आहे. विद्यार्थी वसतिगृह निर्माणाधीन आहे.

### श्रीजगद्गुरूंचे विविध कार्यक्रम

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी ४१ वर्षे पीठाचार्य राहून अनेक धार्मिक-सामाजिक आणि शैक्षणिक कार्यक्रमांत सहभागी होऊन आपल्या अमूल्य आशीर्वचनांच्या माध्यमाने मार्गदर्शन केले. प्रतिवर्षी श्रावण महिन्यात विविध गावांतून, नगरांतून, क्षेत्रांतून अनुष्ठान करून धर्मजागृतीचे कार्य केले. श्री महास्वामीजींनी आपले जीवन अत्यंत शिस्तबद्ध पद्धतीने व्यतीत केले. कार्यक्रमाच्या रेट्यातून डायरी लिहिणे ते कधी विसरले नाहीत. त्यांच्या ४१ वर्षांच्या डायऱ्या श्रीपीठात सुरक्षित आहेत. या डायरीच्या आधारे त्यांच्या धर्मप्रचाराचा दौरा, विविध ठिकाणी झालेल्या प्रमुख धार्मिक समारंभांचे एक संक्षिप्त विवरण याआधी प्रकाशित करण्यात आले आहे.

श्रीमहास्वामीजींनी श्रावणमासानिमित्त बारामती, मंगळवेढा, बार्शी, बोराळे, पुणे, अकलूज, हूली आणि वाराणसी येथे श्रावणमासात अनुष्ठान केले. हूली सांबय्यनवर मठात अनेक श्रावणमासांत अनुष्ठाने केली. दुसरीकडे अनुष्ठान नसल्यास ते काशीक्षेत्री आपले अनुष्ठान करीत असत. ग्रंथविस्ताराच्या भयामुळे येथे सर्व कार्यक्रमांचे संक्षिप्त विवरण दिले आहे. श्रीमहास्वामीजींच्या जीवनकार्यासाठी एक स्वतंत्र ग्रंथ प्रकाशित करण्यात येणार आहे. त्यात सविस्तर सर्व प्रतिपादन केले जाईल.

### मंगळवेढा वसतिगृह

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी १९४८ साली काशी जगद्गुरू पदावर आरूढ झाले. त्यानंतर त्यांनी महाराष्ट्रातील परंडकर, वाईकर, बेळंकीकर व वैरागकर या शिवाचार्यांसोबत संपूर्ण महाराष्ट्राचा दौरा केला. वीरशैव समाजाच्या स्थितीगतीची पाहणी केली. त्यानंतर त्यांनी महाराष्ट्र हेच आपले कार्यक्षेत्र निश्चित केले. गरीब व होतकरू विद्यार्थ्यांसाठी नागपूर, औरंगाबाद, पुणे, मंगळवेढा येथे वसतिगृह स्थापन

करण्याचा संकल्प केला. त्या दरम्यान ५.११.१९५९ मध्ये मंगळवेढा येथे एका सभेत जगद्गुरू विश्वाराध्य विद्यार्थी निलयाची स्थापना करण्याचा संकल्प केला. पहिल्यांदा त्यानंतर ३.१२.१९६६ मध्ये मंगळवेढा येथील केदारलिंगस्वामी मठात वसतिगृह प्रारंभ केले. नंतर याला स्वत:च्या जागेमध्ये शाश्वत स्वरूप देण्यासाठी पंढरपूर मंगळवेढा रोडवर एक जमीन घेण्यासाठी महास्वामीजींनी मंगळवेढा येथील लोकांना सांगितले. तेथे साडेतीन एकर जमीन उपलब्ध झाली. त्यावेळी महास्वामीजींजवळ खरेदीसाठी पैसे नसल्यामुळे मंगळवेढ्याच्यो भक्तांना सांगितले की, तुमच्यापैकी कोणीतरी ही जमीन तुमच्या नावाने खरेदी करा. नंतर पैसे देऊन आमच्या नावाने करून घेऊ. त्यावेळी मंगळवेढ्याचे महास्वामीजींचे परमभक्त पारप्पा बुरकुल यांनी महास्वामीजींच्या आवाहनाला प्रतिसाद देऊन वसतिगृहासाठी साडेतीन एकर जमीन दोन हजार आठशे रुपयांमध्ये २८.९.१९६७ मध्ये स्वत:च्या नावाने खरेदी केली. त्यानंतर महास्वामीजींनी १०.७.१९६८ रोजी पुणे मुक्कामी श्री. रेवप्पा बसप्पा तटपटे यांच्याकडे बुरुकुल यांनी खरेदी केलेली जमीन आपल्या नावाने करण्यासाठी ३ हजार रुपये रोख सुपूर्द केले. या शिवाय त्या जागी विहीर खोदण्यासाठी ६०० रुपये वेगळे दिले. दि. २६.७.१९६८ रोजी जमीन खरेदीसाठी महास्वामीजी स्वत: उपस्थित न झाल्यामुळे पारप्पा बुरकुल यांनी महास्वामीजींच्या नावाने दानपत्र करून दिले. ही सर्व माहिती महास्वामीजींनी आपल्या डायरीमध्ये लिहून ठेवली आहे.

महास्वामीजींच्या घेतलेल्या त्या जागेतील वसतिगृहात खेड्यापाड्यांतील विद्यार्थी येऊन रोज अभ्यास करू लागले. महास्वामीजींनी खेड्यापाड्यांतून ज्वारी गोळा करून मुलांच्या जेवणाची पण व्यवस्था केली. पुढील काळामध्ये प्रत्येक खेडेगावात हायस्कूल झाल्यामुळे मंगळवेढा वसतिगृहात विद्यार्थ्यांचे येणे बंद पडले. पुढे १९८९ साली वर्तमान जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी त्या जागेत सर्वांना सामाजिक कार्यासाठी उपयोग व्हावा म्हणून लिं. जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या नावाने एक

सांस्कृतिक भवन निर्माण केले. त्या कार्यासाठी श्री. मलकप्पा हावनाळे आणि संगू बुरकुल या दोघांनी पुढाकार घेतला. त्या क्षेत्राचे तत्कालीन आमदार श्री. लक्ष्मण ढोबळे सर यांनी आपल्या आमदार निधीतून ११ लाख रुपयांचे अनुदान दिले. त्याच्यामध्ये ११ लाख रुपये पीठातर्फे घालून त्यामध्ये १०० बाय ३० चे एक सांस्कृतिक भवन निर्माण करण्यात आले. तेवढ्या भवनामध्ये लोकांचे मोठे मोठे मंगलकार्य होत नाही म्हणून वर्तमान काशीमहास्वामीजींनी काशीपीठातून जवळ जवळ २ करोड रुपये खर्च करून एक मोठे काशी विश्वेश्वर स्मृतिभवन निर्माण केले. त्या निर्माणकार्यामध्ये निलयाचे व्यवस्थापक श्री. सुधाकर हलगणे आणि श्री. भरत उंबरकर यांनी दोन वर्षे कष्ट करून सुंदर भवन निर्माण केलेले आहे. सध्या त्या भवनामध्ये सर्वधर्मीय विविध कार्यक्रम होतात. कुठलही पक्षपात न करता सर्वांना त्यांच्या कार्यक्रमासाठी भवन उपलब्ध करून देण्यात येते. भवनाच्या उत्पन्नातून दरवर्षी मंगळवेढा तालुक्यातील वीरशैव लिंगायत धर्माच्या सर्व पोटजातींतील दहावी आणि बारावीच्या विद्यार्थ्यांना २०१८ पासून शैक्षणिक सहाय्यता शिष्यवृत्ती देण्यात येत आहे.

**औरंगाबाद वसतिगृह**

लिं. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी नागपूर आणि औरंगाबादमध्ये वसतिगृह स्थापन करण्याच्या उद्देशाने त्या त्या भागात वर्गणी गोळा करून समाजाच्या हाती दिली. नागपूर समाजबांधवांनी महास्वामीजींनी दिलेल्या धनराशीमध्ये आणखी देणगी गोळा करून जगद्गुरू पंचाचार्य मंगलकार्यालयाचे बांधकाम केलेले आहे. त्या कार्यालयाचा समाजासाठी उपयोग होत आहे. परंतु वसतिगृह मात्र होऊ शकले नाही. तसेच औरंगाबाद येथे सुद्धा महास्वामीजींनी तेथील समाजाच्या हाती दौऱ्यामध्ये आलेली सर्व गुरुदक्षिणा वसतिगृह स्थापनेसाठी दिली. समाजाने जमीन घेऊन तिथे वसतिगृहाचे फाऊंडेशन सुद्धा केले होते. परंतु तेथे एक जवळ  मुस्लिम सांस्कृतिक भवन असल्यामुळे तेथे वसतिगृह बांधण्यास परवानगी मिळाली नाही. म्हणून ती जागा समाजाच्या लोकांनी विकलेली आहे. परंतु आतापर्यंत समाज तेथे

वसतिगृह बांधू शकला नाही. हे सर्व पाहून महास्वामीजींनी पुण्यामध्ये स्वत: जमीन खरेदी करून सदाशिवपेठेत एका विश्वाराध्य विद्यार्थी निलयाची स्थापना केली.

**श्रीमहास्वामीजींचे अंतिम दिवस**

श्रीमहास्वामीजींनी ४१ वर्षांत निरंतर धर्मकार्ये पार पाडली. वयाच्या ७२ व्या वर्षी १९८९ श्रावणमासापासून श्री महास्वामीजींची प्रकृती क्षीण होऊ लागली. तेव्हा उपचारासाठी पुण्याच्या जहांगीर हॉस्पिटलमध्ये त्यांना भरती करण्यात आले. तज्ज्ञ वैद्याचा उपचार एक महिन्यापर्यंत चालला तरी अपेक्षित परिणाम दिसून आला नाही. त्यावेळी श्री. गंगाधर चिरमे, सौ. नलिनी चिरमे या दंपतीने केलेली शुश्रूषासेवा उल्लेखनीय होती. शेवटी दि. २.१०.१९८९ मध्ये आश्विन शुद्ध तृतीयेला सोमवारी रात्री ९.४० वाजता पुण्याला जगद्गुरू विश्वाराध्य विद्यार्थी निलयात ते लिंगैक्य झाले.

जनतेच्या दर्शनार्थ त्यांचे पार्थिव शरीर पुणेनगरीच्या विश्वाराध्य विद्यार्थी निलयात ठेवले होते. दुसऱ्या दिवशी श्री. नीळकंठराव कल्याणी यांच्या विशेष प्रयत्नामुळे किर्लोस्करांच्या विमानाने श्री महास्वामीजींचे पार्थिव शरीर श्रीकाशीक्षेत्री आणण्यात आले. या विमानात बार्शी परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी आणि पुण्याचे श्री. गंगाधर चिरमे हे दोघे व्यवस्थेसाठी काशीस आले. श्रीमहास्वामीजी लिंगैक्य झाल्याची वार्ता ऐकल्यानंतर श्रीरंभापुरी जगद्गुरू रुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी बेंगळूरु जवळच्या नेलमंगल येथे चाललेला आपला दसरा दरबार कार्यक्रम स्थगित करून विमानाने दि. ४.१०.१९८९ रोजी काशीक्षेत्री आले.

ही दु:खद वार्ता ऐकून अनेक भक्त आणि शिवाचार्य मिळेल त्या वाहनातून काशीक्षेत्री येऊन पोहोचले. पुढे दि. ५.१०.१९८९ रोजी गुरुवारी सायंकाळी ६ वाजता श्रीरंभापुरीजगद्गुरू आणि केदारपीठाचे श्री सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य यांच्या दिव्य सान्निध्यात आणि अनेक शिवाचार्यांच्या, भक्तांच्या समोर कैलासमंटपाच्या आवारात लिंगैक्य जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींची क्रियासमाधी विधिवत् करण्यात आली.

श्रीमहास्वामीजींनी आपल्या उत्तराधिकाऱ्यासंबंधी इच्छापत्र न लिहिल्याने मठाची पुढील व्यवस्था होईपर्यंत मठाच्या होणाऱ्या कार्यक्रमासाठीची जबाबदारी विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थी डॉ. महेश्वर देव यांच्यावर श्री रंभापुरी महास्वामीजींनी सोपविली.

## ८६ वे श्रीजगद्गुरू
## डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी



श्रीमत् काशीविश्वाराध्य ज्ञानसिंहासन महापीठाचे ८६ वे पीठाधिपती डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य हे पूर्वाश्रमीचे तोगुणसी (ता. गुळेद्गुड्ड, जि. बागलकोट) येथील पुराणमठाचे होत. हा मठ रंभापुरी मठाचा शाखामठ आहे. या मठाचे वे.पं. विरूपाक्ष शास्त्रीजी हे साहित्यशास्त्राचे प्रख्यात पंडित होते. ते सोलापूरच्या वारद संस्कृत पाठशाळेत अध्ययन करून नंतर तेथेच प्राध्यापक होऊन कार्यरत झाले. एवढेच नव्हे तर ते बबलेश्वर, कोटेकल्लू, इलकल इ. ठिकाणच्या पाठशाळांत प्राध्यापक म्हणूनही ते कार्यरत होते. अशी पांडित्यपरंपरा असलेल्या पुराणमठाच्या विरूपाक्ष शास्त्रीजींचे विद्यमान जगद्गुरू हे नातू होत. वे. सिद्धय्या व सौ. सावंत्रम्मा या माहेश्वर दंपतीच्या गर्भी शा.श. १८६९ सर्वजित नाम संवत्सर निज श्रावण मास, शुक्ल पक्ष, द्वादशी तिथी, दि. २८.८.१९४७ रोजी गुरुवारी प्रात:काळी ५.४० वा. पुत्ररूपाने ते जन्मास आले. तेव्हा त्यांचे 'शेखरय्या' असे नामकरण करण्यात आले. त्यांचा जन्म आईच्या माहेरी रड्डेर नागनूर हिरेमठात झाला. नागनूर बृहन्मठाचे पं. काशीनाथ शास्त्रीजी हे यांच्या आईचे चुलत सहोदर (थोरले बंधू) होत. याप्रमाणे चिरंजीव शेखरय्याचे मातृकुल आणि पितृकुल दोन्ही पांडित्यपरंपरा असणारी कुळे होती. या उभय संस्कारांच्या बळानेच हे पुढे संस्कृत पंडित झाले, असे म्हटल्यास वावगे ठरणार नाही.

भारत देश स्वातंत्र्य प्राप्त करून आनंद अनुभवीत असताना तेराव्या दिवशीच त्यांचा जन्म झाला. तोगुणसी गावात चौथीपर्यंत शिक्षण घेऊन पुढील शिक्षणासाठी मामाकडे म्हणजे वे. सिद्धलिंगय्या हिरेमठ यांच्याकडे १९५७ मध्ये ते ब्याडगीस गेले. तेथे त्यांनी लोअर आठवीपर्यंतचा अभ्यास

पूर्ण केला. पुढे गुळेदगुड्ड अमरेश्वर मठाचे श्री ष.ब्र. अमरेश्वर शिवाचार्य स्वामीजीच्या मठात राहून एक वर्ष गुळेद्गुड्डच्या म्युनिसिपल हायस्कूलमध्ये हायर नववीपर्यंत अभ्यास पूर्ण केला. तेव्हा अमरेश्वर स्वामीजींनी शेखरय्याचा हात पाहून १९६३ मध्ये आपल्या मठाचा उत्तराधिकारी म्हणून स्वीकारून तसे इच्छापत्र लिहून ठेवले. त्यांचे चंद्रशेखरय्या असे नामकरण केले.

श्री ष.ब्र. अमरेश्वर शिवाचार्य स्वामीजी आपले उत्तराधिकारी श्री चंद्रशेखरय्यांना संस्कृत अध्ययनाकरिता सोलापुरास घेऊन आले. १९६३ मध्ये होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव संस्कृत पाठशाळेत त्यांनी प्रवेश घेतला. गुरुकुलाचे प्रधानाध्यापक असणारे अनुगोंड बृहन्मठाचे वे.पं. गंगाधर शास्त्रीजी यांनी त्यांना चंद्रशेखर शर्मा या नावाने गुरुकुलात प्रवेश दिला. श्री चंद्रशेखर शर्मा हे होटगी मठाच्या गुरुकुलात तीन वर्षे आणि श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत तीन वर्षे असे सहा वर्षे अध्ययन करून कलकत्त्याच्या वंशीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या काव्यआद्य (१९६५), काव्यमध्यमा (१९६७) व काव्यतीर्थ (१९६९) या परीक्षांत उच्च श्रेणीत उत्तीर्ण झाले.

श्री चंद्रशेखर शर्मा हे सोलापुरात शिक्षण घेत असताना गुळेद्गुड्डचे श्री ष.ब्र. अमरेश्वर शिवाचार्य स्वामीजी शा.श. १८९१ मध्ये सौम्यनाम संवत्सरात वैशाख मास कृष्ण पक्ष त्रयोदशी दि. १४.५.१९६९ बुधवारी अस्वास्थ्यामुळे नागरहळ्ळीचे पोलीस सर्कल इन्पेक्टर श्री. एम. एफ. पाटील यांच्या हुब्बळी येथील घरात लिंगैक्य झाले. पुढे गुळेद्गुड्ड येथे अमरेश्वर स्वामीजींची क्रियासमाधी बन्नूर चिकमठच्या श्री ष.ब्र. चन्नमल्ल यांच्या नेतृत्वाखाली विधिवत् पूर्ण झाली. एम. एफ. पाटील यांच्या पुढाकाराने भक्तांनी एकत्र येऊन धन गोळा केले. शा.श. १८९२ साधारणनाम संवत्सर, वैशाख मास, कृष्ण पक्ष द्वादशी, दि. १.६.१९७० सोमवारी सकाळी ९.२१ मि. कर्क लग्न शुभमुहूर्तावर परमतपस्वी हुब्बळीच्या हन्यारडू मठाचे श्री ष.ब्र. मडिवाळ शिवाचार्य स्वामीजींकडून चंद्रशेखर शर्मांना पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले.

श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी भक्तांच्या सहकार्याने उच्च संस्कृत शिक्षणासाठी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १६.७.१९७० रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर वाराणशीतील संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात तीन वर्षेपर्यंत निरंतर अध्ययन करून १९७३ मध्ये ते 'वेदान्ताचार्य' परीक्षेत सर्वप्रथम आले. तेव्हा त्यांना संपूर्णानंद सुवर्णपदक, स्वामी विवेकानंद सुवर्णपदक तसेच अन्नदाप्रसाद मुखर्जी सुवर्णपदक अशी तीन सुवर्णपदके प्राप्त झाली.

१९७३ मध्ये केरळच्या गुरुवायूर येथे चाललेल्या अखिल भारत आशु (शीघ्र) संस्कृत भाषणस्पर्धेत श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी उत्तरप्रदेश राज्याचे प्रतिनिधी म्हणून सहभागी झाले. त्या स्पर्धेत त्यांना पहिला पुरस्कार मिळाला. १९७४ मध्ये कलकत्त्याच्या सर्वदर्शनतीर्थ परीक्षेत ते प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. पश्चिम बंगाल सरकारचे कुमार शरदेंदु नारायण सुवर्णपदक देखील त्यांना मिळाले. पुढे ते श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रेरणेने संशोधन-व्यासंगात गुंतले. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात पं. देवस्वरूप मिश्र यांच्या मार्गदर्शनाखाली 'श्रीसिद्धान्तशिखामणेर्दशनान्तरीय सिद्धान्तैः समीक्षा' (श्रीसिद्धान्तशिखामणी व षड्दर्शने : एक तौलनिक अभ्यास) या विषयावर त्यांनी १९७४ मध्ये शोधकार्य सुरू केले. निरंतर सहा वर्षेपर्यंत अध्ययन करून, प्रबंध सादर करून १९८१ मध्ये त्यांनी 'विद्यावारिधि' (पीएच्.डी.) उपाधी मिळविली. त्यानंतर गावी परतण्यासाठी ते तयारी करीत असताना श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना 'यापुढील शिक्षण घ्या' अशी आज्ञा केली. त्याप्रमाणे ते काशीलाच राहिले.

आपला व्यासंग न थांबवता त्यांनी पुन्हा त्याच विश्वविद्यालयात पं. देवस्वरूप मिश्रांच्या मार्गदर्शनाखाली 'विद्यावाचस्पति' (डी.लिट्.) उपाधीकरिता १९८२ पासून शोधकार्य सुरू केले. 'शक्तिविशिष्टा-द्वैततत्त्वत्रयविमर्शः' या विषयावर पुन्हा सहा वर्षे अभ्यास करून

विश्वविद्यालयाला प्रबंध सादर केला. त्यानंतर १९८९ मध्ये विद्यावाचस्पती (डी.लिट्.) ही पदवी त्यांना मिळाली. श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींनी १९७० पासून १९८९ पर्यंत १९ वर्षे काशीपीठात राहून उच्च अभ्यास करून डॉक्टरेट पदवी मिळविली. त्यासाठी त्यांना अनेक सुवर्णपदके प्राप्त झाली. केवळ अमरेश्वर मठासच नव्हे तर काशीपीठाच्या गुरुकुलास देखील त्यांनी गौरव प्राप्त करून दिला.

ते गुरुकुलात अध्ययन करीत असताना १९७१-७२ मध्ये काशी वीरशैव विद्वत् संघाचे कार्यदर्शी म्हणूनही त्यांनी कार्य पाहिले आहे. त्यांनी काशी हिंदू विश्वविद्यालयात वीरशैव अध्ययनपीठ स्थापण्याच्या उद्देशाने संघाच्या सदस्यांसोबत विचारविनिमय करून ११.१.१९७२ रोजी बेंगळूरुच्या जगद्गुरू पंचाचार्य संमेलनास प्रतिनिधी पाठवून त्यासाठी धनसंग्रहाची योजना केली. त्या संमेलनात काशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या विशेष प्रयत्नाचे फळ म्हणजे बऱ्याच दानी मंडळींकडून धनसंग्रह करण्यात आला. तरी अध्ययनपीठ स्थापनेकरिता एक लक्ष रुपये काही संग्रहित झाले नाहीत.

यामुळे स्वामीजींनी निराश न होता आपले प्रयत्न पुढे चालू ठेवले. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात वेदान्तविभागाध्यक्ष पं. देवस्वरूप मिश्रांसोबत त्यांनी चर्चा केली. कुठल्याही प्रकारचा निधी विश्वविद्यालयास न देता संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्तविभागात इ.स. १९८४ मध्ये 'शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तपीठ' स्थापण्यात ते यशस्वी झाले. हे कार्य करीत असताना त्यांना श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा संपूर्ण आशीर्वाद होता. शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त विषय शिकवणारे प्राध्यापक उपलब्ध नव्हते. म्हणून स्वत: ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींनीच अध्यापन केले. त्यांनी १९८४ पासून १९८९ पर्यंत पाच वर्षेपर्यंत वेदान्तविभागात शक्तिविशिष्टाद्वैताचे अध्यापन केले. संबंधित सर्व पाठ्यपुस्तके कन्नड लिनीतून देवनागरी लिपीत लिप्यंतरित करून काशीपीठाच्या शिवधर्म ग्रंथमालेकडून प्रकाशित करण्याचे फार मोठे काम स्थानिक विद्वानांच्या मदतीने केले. अशा रीतीने संस्कृत विश्वविद्यालयात

वीरशैवधर्मदर्शनाच्या अध्ययनाची व्यवस्था करून वीरशैव विद्वत्संघाचे खूप दिवसांपासूनचे स्वप्न सत्यात उतरविण्यात ते सफल झाले.

याप्रमाणे विश्वविद्यालयात वीरशैव अध्ययनास प्रारंभ झाल्यानंतर विद्यार्थ्यांना अध्ययनासाठी प्रोत्साहन देण्याकरिता श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींनी समाजातील गणमान्य व्यक्तींशी तसेच पीठाधिपतींशी संपर्क करून त्यांच्याकडून विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती मिळण्याची व्यवस्था केली. विद्यार्थ्यांचा उत्साह द्विगुणित करण्यास ते कारणीभूत झाले. याप्रमाणे त्यांनी काशीपीठात राहून शास्त्रांचा अभ्यास आणि अध्यापन यांतून वेळ काढीत मधल्या काळात कर्नाटक–महाराष्ट्र या प्रांतांत संचार करून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर प्रवचने केली. लोकांना वीरशैव तत्त्वसिद्धान्त समजावून सांगत वीरशैव धर्मग्रंथ 'श्रीसिद्धान्तशिखामणी' अत्यंत लोकप्रिय केला. या ग्रंथावरील प्रवचने गुळेद्गुड्ड अमरेश्वर प्रकाशनाच्या वतीने मुद्रित करून 'श्रीसिद्धान्तशिखामणी प्रवचनप्रभे' या नावाने कन्नड भाषेत लोकविख्यात केले. श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींना श्रीसिद्धान्तशिखामणी म्हणजे पंचप्राण असल्यासारखा होता. त्यांचा कुठेही कार्यक्रम असला तरी श्रीसिद्धान्तशिखामणी हाच प्रवचनाचा मुख्य विषय असे. आपल्या सोबत त्यांनी अनेक शिवाचार्यही या विषयात तयार केले. नंतरच्या काळात 'श्रीसिद्धान्त–शिखामणी'वरील त्यांच्या आशीर्वचनांचा ग्रंथ 'जन्म हा अखेरचा' या नावाने प्रकाशित झाला.

नवरात्रीनिमित्त श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींचा प्रवचन कार्यक्रम इ.स. १९८९ मध्ये सोलापूरच्या कृषी उत्पन्न बाजार समितीच्या देवी मंदिराच्या प्रांगणात सुरू होता. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी अस्वस्थ झाल्याने पुण्यात उपचार घेत होते. तेव्हा त्यांनी श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींना एक पत्र लिहून आपल्यासोबत काही गोष्टींविषयी चर्चा करावयाची आहे म्हणून काशीला जाताना पुण्यास येऊन महास्वामीजींचे दर्शन घेण्याविषयी आदेश दिला. महास्वामीजींच्या पत्रानुसार नवरात्रीचा कार्यक्रम पूर्ण करून पुण्याला जायचे, असे डॉ.

चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींनी ठरवले. परंतु विधिविलास विचित्र होता. आश्विन शु. २, दि. २.१०.१९८९ रोजी श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी दीर्घकालीन अस्वास्थ्यामुळे पुणे येथील सदाशिव पेठेतील जंगमवाडी मठात लिंगैक्य झाले.

ही दुःखद वार्ता दूरवाणीवरून श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींना कळाली. महास्वामीजींच्या पत्रानुसार दर्शन मिळाले नाही म्हणून ते दुःखी झाले. नवरात्री कार्यक्रम खंडित करून श्रीमहास्वामीजींच्या अंतिम दर्शनाकरिता सोलापूरहून पुण्यास गेले. तोपर्यंत महास्वामीजींचे पार्थिव शरीर नीळकंठराव कल्याणी यांच्या प्रयत्नाने किर्लोस्करांच्या खासगी विमानाने काशीला पाठविण्यात आले होते. काशीक्षेत्री चाललेल्या श्रीमहास्वामीजींच्या क्रियासमाधीला तरी उपस्थित राहावे असा विचार करून विशेष वाहन करून भक्तांसोबत ते बार्शी दहिवडकर मठाचे श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्यांसोबत काशीक्षेत्रास निघाले.

इकडे श्रीकाशीमहास्वामीजी लिंगैक्य झाल्याची वार्ता ऐकून रंभापुरी पीठाचे श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी नेलमंगल येथे चाललेला आपला दसरा दरबार कार्यक्रम अर्धवट सोडून महास्वामीजींच्या क्रियासमाधीसाठी विमानाने काशीक्षेत्रास दि. ४.१०.१९८९ रोजी सायंकाळी येऊन पोहोचले. दि. ५.१०.१९८९ रोजी सायंकाळी ६ वाजता केदारपीठाचे श्री १००८ जगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्यांच्या उपस्थितीत अनेक शिवाचार्य तसेच भक्तांच्या उपस्थितीत श्री रंभापुरी जगद्गुरूंनी क्रियासमाधी पार पाडली. श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी या क्रियासमाधीला उपस्थित राहू शकले नाहीत. क्रियासमाधी झाल्यानंतर ते काशीक्षेत्रास येऊन पोहोचले.

श्रीकाशीमहास्वामीजींच्या क्रियासमाधीच्या वेळी रंभापुरी जगद्गुरूंनी बदामीच्या श्री महेश्वर देवांना या पीठाची पुढील शाश्वत व्यवस्था होईपर्यंत व्यवस्था पाहण्यास सांगितले. काशीपीठात लिंगैक्य जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी आयकर (Income Tax) विभागास लिहून

दिलेल्या मठाच्या व्यवस्थेतल्या नियमावलीत उत्तराधिकाऱ्यासंबंधी मुख्य तीन मुद्दे लिहून ठेवले होते.

१. पीठाचार्यांनी आपल्या जीवितकाळात योग्य उत्तराधिकाऱ्यास निवडून आपल्या हातांनी त्यांना पट्टाभिषेक करावा. अथवा

२. वर्तमान पीठाचार्यांनी आपल्या इच्छित बटूच्या नावे इच्छापत्र (Will) लिहून ठेवावे. हे दोन्ही न करता पीठाचार्य लिंगैक्य झाल्यास–

३. वीरशैवधर्माच्या बाकी समान पीठाचे रंभापुरी, उज्जयिनी, केदार, श्रीशैल या जगद्गुरूंनी एकत्र येऊन एकमताने निर्णय घेऊन त्या निवडलेल्या बटूस पट्टाधिकार करावा.

या रीतीने पीठाचे उत्तराधिकार नियम समजून घेतल्यानंतर १४.११.१९८९ रोजी वरील सर्व पीठाचार्य काशीपीठाच्या उत्तराधिकार निवडीसाठी काशीपीठास आले. येथे दोन दिवसपर्यंत सुदीर्घ परस्परविचार विनिमय करून दि. १६.११.१९८९ रोजी सर्व पीठाचार्यांनी एकमताने गुळेद्गुड्ड अमरेश्वर मठाचे श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींना काशीपीठाचे उत्तराधिकारी आणि बदामीच्या महेश्वरदेव हे पीठाचे व्यवस्थापक, असा निर्णय घेऊन त्याची घोषणा केली. या निर्णयाचे सर्वांनी स्वागत केले.

**काशीपीठाचे ८६ वे जगद्गुरू**

उपस्थित पीठाचार्यांच्या निर्णयानुसार शा.श. १९११ शुक्लनाम संवत्सर, कार्तिक कृष्ण पंचमी दि. १७.११.१९८९ शुक्रवारी प्रात:कालापासून सर्व विधिविधान होऊन दुपारी २ वाजून ४५ मि. मीन लग्नाच्या शुभयोगावर पट्टाभिषेक संपन्न होऊन सिंहासनारोहण कार्यक्रम वैभवपूर्णरित्या संपन्न झाला. यावेळी श्री १००८ जगद्गुरू वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी, रंभापुरी पीठ, श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, उज्जयिनी पीठ, श्री १००८ जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैल पीठ, श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी, केदार पीठ यांच्या दिव्य सान्निध्यात तसेच त्यांच्या अमृतहस्ते अभिषेकादी विधिविधान संपन्न होऊन पट्टबंधन, किरीटधारण,

दंडकमंडलू आणि मुद्राप्रदान शास्त्रोक्त पद्धतीने पार पडले. तेव्हा त्यांचे 'श्रीमत् काशीज्ञानसिंहासनाधीश्वर १००८ जगद्गुरू विश्वाराध्य मल्लिकार्जुन शिवाचार्य ऊर्फ श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी' असे नूतन नामकरण करण्यात आले.

या पीठारोहण कार्यक्रमात तपोरत्नं श्री ष.ब्र. योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजी, होटगी मठ, सोलापूर; श्री ष.ब्र. प्रभु पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी, माजलगाव; श्री ष.ब्र. डॉ. श्रीपती पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी, हिरेजेवरगी; श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य स्वामीजी, शिराढोण; श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी, कलादगी; श्री ष.ब्र. विमल रेणुकवीर मुक्तिमुनी शिवाचार्य स्वामीजी, मुक्तिमंदिर; श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी, परंडकर मठ, बार्शी; श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य स्वामीजी दहिवडकर, बार्शी; श्री ष.ब्र. डॉ. जयसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी, गौडगाव; श्री ष.ब्र. जयशांतेश्वर शिवाचार्य स्वामीजी, जालहळ्ळी; श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजी, चिटगुप्पा; श्री ष.ब्र. पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी, वडांगळी; श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य हिरेमठ, वैराग; श्री श्रो.ब्र. अभिनव शिवपुत्र स्वामीजी, विजयपूर; श्री श्रो.ब्र. शिवकुमार स्वामीजी, बीदर; श्री म.नि.प्र. शिवानंद स्वामीजी, करजगी; श्री महेश्वर देवरू, बदामी; श्री. टी. जी. मल्लाराध्य शास्त्रीजी, श्री. शिवयोगी शर्मा हिरेमठ, श्री चंद्रहास रेड्डी करूर, डॉ. जी. सी. केंडदमठ, डॉ. शे. दे. पसारकर, सोलापूर; डॉ. चंद्रशेखर कपाळे, कलबुर्गी; बाबुराव मैंदर्गीकर, सोलापूर; पं. मल्लिकार्जुन शास्त्री, बळ्ळारी; श्री. वे. बसवराज शास्त्री, सोलापूर; श्री. वीरण्णा चरंतीमठ, चेअरमन, वीरशैव बसवेश्वर विद्यावर्धक संघ, बागलकोट; श्री. सदाशिवय्या वस्त्रद, गुळेद्गुड्ड; श्री. सिद्धप्पा तांडुर, गुळेद्गुड्ड; श्री. यमनुरप्पा अरमनी, कोटेकल्ल; श्री. बसवराज दानप्पा गौडर, धारवाड; श्री. वे. एम. बी. गुरुसिद्ध स्वामी, हरिहर; ॲड्. नारायणराव दंदणे, नाशिक; श्री. पंचाक्षरी लिगाडे, श्री. गंगाधर चिरमे, सौ. नलिनी चिरमे तसेच पुणे, सोलापूर, नांदेड, नागपूर, नाशिक आणि

मुंबई इ. महाराष्ट्राच्या विभिन्न नगरांतून अनेक भक्त व कर्नाटकातील बागलकोट, गुळेद्‌गुड्ड, विजयपूर, धारवाड, इलकल इ. गावांहून आलेल्या भक्तांनी भाग घेतला होता. याप्रमाणे पट्टाभिषेक कार्यक्रम अत्यंत वैभवपूर्णरित्या पार पडला.

**काशीत विद्वत् सभा**

श्री १००८ जगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या पीठारोहणाच्या निमित्ताने दि. २०.११.१९८९ रोजी दु. ३ वा. ज्ञानमंदिर ग्रंथालयात एक विद्वत्‌सभा महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात आयोजित केली होती. पीठाचे व्यवस्थापक महेश्वर देवरू, बदामी यांनी या कार्यक्रमाचे आयोजन केले होते. या सभेत संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाचे वेदान्तविभागाध्यक्ष पं. देवस्वरूप मिश्र, प्रा. पं. श्यामनारायण दीक्षित, मध्ववेदान्त विभाग, डॉ. भगीरथप्रसाद त्रिपाठी, निदेशक, अनुसंधान संस्था; डॉ. युगलकिशोर मिश्रा, वेदविभागाध्यक्ष; पं. वज्रवल्लभ त्रिवेदी, पूर्व आचार्य योगतंत्र विभाग; डॉ. पारसनाथ द्विवेदी, उपाचार्य, वेदान्तविभाग; डॉ. नरेंद्रनाथ पाण्डेय, प्राध्यापक, रामानंद वेदान्त विभाग; डॉ. जयप्रकाश त्रिपाठी, प्रा. रामानुज वेदान्त, डॉ. राजनाथ त्रिपाठी, प्राध्यापक, आगम विभाग; पं. सुधाकर मिश्र, वेदान्त विभाग; स्वामी शिवानंद, वेदान्त प्राध्यापक, विश्वनाथ गुरुकुल; डॉ. नीलकंठ शर्मा हिरेमठ, प्रधानाचार्य, ब्रह्ममहाविद्यालय; पं. संगमनाथ शर्मा हिरेमठ, साहित्य अध्यापक, ब्रह्म महाविद्यालय; जनार्दन शास्त्री पाण्डेय, शोधसहाय्यक, तिब्बती संस्था; पं. रामप्रसाद त्रिपाठी, पूर्वाचार्य, व्याकरण विभाग; पं. करुणापती त्रिपाठी, पूर्व कुलपती, संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालय; पं. बटुकनाथ शास्त्री खिस्ते, अध्यक्ष, काशी पंडित सभा; डॉ. विनोदराव पाठक, महामंत्री, काशी पंडित सभा; पंडित ब्रह्मानंद चतुर्वेदी, प्राध्यापक, मीमांसा विभाग; श्रीराम पाण्डेय, पूर्वाचार्य, न्यायविभाग; डॉ. शांतशर्मा हिरेमठ, प्राध्यापक, महात्मा गांधी काशी विद्यापीठ इत्यादी श्रेष्ठ विद्वान उपस्थित होते.

विद्वत्‌सभेत सहभागी झालेल्या सर्व विद्वानांचे मठाचे व्यवस्थापक

महेश्वरदेव व पंचाक्षरी लिगाडे यांनी तिलक लावून, हार घालून स्वागत केले. सभेत विद्वानांचा शास्त्रार्थ झाला. शेवटी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी अनुग्रह–आशीर्वचन केले. सर्व विद्वानांना शाल पांघरून, दक्षिणा देऊन गुरुरक्षा आशीर्वाद दिला. या सभेत काशीच्या पंडितांकडून महास्वामीजींना संस्कृत भाषेत अभिनंदन पत्र समर्पित करण्यात आले.

**मंडल अनुष्ठान : श्री सिद्धान्तशिखामणीचा मराठी अनुवाद**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी काशीपीठात अधिकार स्वीकारल्यानंतर ४८ दिवसांपर्यंत एक मंडल अनुष्ठान केले. त्यावेळी कलबुर्गीचे डॉ. चंद्रशेखर कपाळे यांना आपल्या सोबत श्रीपीठात घेऊन 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाचा मराठी अनुवाद करवून घेतला. त्या ग्रंथास एक अभ्यासपूर्ण प्रस्तावना लिहिली. इ.स. १९०५ मध्ये वारद मल्लप्पा यांनी श्रीसिद्धान्तशिखामणी ग्रंथाचा सर्वप्रथम मराठी अनुवाद मणूरपट्टाध्यक्ष वे. मल्लिकार्जुन शास्त्रीजींकडून लिहवून घेऊन प्रकाशित केला होता. त्यानंतर काशीजगद्गुरूंनी मूलग्रंथ तसेच मरितोंटदार्य यांचे संस्कृत व्याख्यान या दोन्हींचा भावानुवाद करून डॉ. चंद्रशेखर कपाळे यांच्या सहकार्याने नवीन संस्करण तयार केले. या ग्रंथाच्या मराठी अनुवादकार्यात सोलापूरचे श्री वे. शरणय्या शास्त्री, अचलेर व डॉ. शे. दे. पसारकर यांचे सहकार्यदेखील उल्लेखनीय होते.

इ.स. १९९० मध्ये आषाढ महिन्यात सोलापूर येथे चाललेल्या श्रीकाशीजगद्गुरूंच्या श्रीरंभापुरी १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजींच्या आडवी पालखी महोत्सवात 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाचा गजमहोत्सव (हत्तीवरून मिरवणूक) होऊन प्रकाशन करण्यात आले. याप्रमाणे श्रीकाशीजगद्गुरूंच्या पीठारोहणानंतर त्यांच्या ४८ दिवसांच्या अनुष्ठानाचे फळ म्हणून 'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा मराठी संस्मरणीय ग्रंथ महाराष्ट्रातील वीरशैवांच्या घरोघरी विराजमान झाला आहे.

**श्रीकाशीजगद्गुरू : धर्मदंडयात्रा**

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी पीठारोहण केल्यानंतर ४८ दिवसांचे मंडल अनुष्ठान पूर्ण केले. त्यावेळी गुळेदगुड्डचे वे. सदाशिवय्या वस्त्रद, श्री. वे. वीरण्णा चरंतीमठ, श्री घनश्यामदास राठी आणि श्रीमंत पी. एस. देसाई, कोटेकल्ल, इ.नी चर्चा करून श्रीमहास्वामीजींचा पहिला अड्डपालखी (आडवी पालखी) महोत्सव गुळेदगुड्ड येथे आयोजित करण्याचा निर्णय घेतला. श्रीकाशीजगद्गुरूंना आणि बाकीच्या समान पीठाचार्यांना आमंत्रण देऊन सर्वांना गावी बोलावणे धाडले. त्यानंतर २७.७.१९९० रोजी श्रीमद् रंभापुरी वीरसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी, श्रीमद् उज्जयिनी सद्धर्मसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, श्री हिमवत्केदार वैराग्यसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू रावल सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैल सूर्य-सिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी या सर्वांनी श्रीमत् काशीज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींना आडवी पालखीत सन्मानपूर्वक बसविले. त्यानंतर अनेक वाद्य-वैभव, लोककला पथक, कलश, आरती आणि पूर्णकुंभ घेऊन सुहासिनींच्या मिरवणुकीने पंचपीठाधीश्वरांची आडवी पालखी मिरवणूक वैभवाने गावातील प्रमुख रस्त्याने येऊन सरकारी पदवीपूर्व महाविद्यालयाच्या परिसरात येऊन पोहोचली. त्यानंतर बृहत् धर्मजागृती संमेलन झाले.

याप्रमाणे श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींची पीठपरंपरेनुसार आडवी पालखी महोत्सवाने धर्मदंडयात्रा त्यांच्या पूर्वाश्रमीच्या मूलस्थान गुळेदगुड्डपासून प्रारंभ झाली. ही गावच्या लोकांसाठी एक अभिमानास्पद गोष्ट झाली. दुसऱ्या दिवशी महास्वामीजींचा उत्सव सर्व पीठाचार्यांसह महास्वामीजींचे जन्मगाव तोगुणसी येथे वैभवाने पार पाडला. तिसऱ्या दिवशी श्री. वीरण्णा चरंतीमठ यांच्या नेतृत्वाखाली बागलकोट महानगरात देखील पंचपीठाधीशांचा आडवी पालखी महोत्सव तसेच धर्मजागृती

समारोह संपन्न होऊन त्या भागातील भक्तांना परम संतोष झाला.

## जनकल्याणाच्या विविध योजना

श्रीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी श्री पीठारोहणापासून आजपर्यंत म्हणजे १९८९ पासून २०१९ पर्यंतच्या ३० वर्षांच्या कालावधीत कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्रप्रदेश, मध्यप्रदेश, हरियाणा, पंजाब, राजस्थान आणि उत्तर भारतात संचार करून धर्मजागृती करण्यासोबत जनहिताच्या अनेक कल्याणकारी योजना देखील पार पाडून समाजाभिमुख कार्य करून ते जनप्रिय झाले.

### श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान

श्रीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी दि. २८.८.१९९३ या दिवशी 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान' नावाची विश्वस्त संस्था प्रतिष्ठापिली. याचे प्रमुख कार्यालय काशी जंगमवाडी मठात आहे. याची व्याप्ती संपूर्ण भारतभर असून ही संस्था विभिन्न प्रांतांत कार्य करीत आहे. त्यांचा परिचय पुढे देण्यात येत आहे.

### शैवभारती शोधप्रतिष्ठान

'शैवभारती शोधप्रतिष्ठान' ही श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानची एक संशोधनसंस्था (A Research Centre) असून नवी दिल्लीच्या राष्ट्रीय संस्कृत संस्थानाची त्याला मान्यता मिळाली आहे. प्राचीन शैवागमांवर संशोधन करू इच्छिणाऱ्या विद्यार्थि–विद्यार्थिनींना येथे सर्व प्रकारची मदत मिळते. संशोधकांना शिष्यवृत्ती देण्याची व्यवस्थादेखील आहे.

या शोधसंस्थानाकडून शिवागम प्रकाशित करण्याचे कार्य सतत चालू आहे. आजपर्यंत शंभरावर कृती प्रकाशित झाल्या असून त्यांना विद्वत् समाजात मान्यताही मिळाली आहे.

### श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान, बेंगळूरु शाखा

काशी येथील श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानच्या शाखांची स्थापना भारतातील सर्व प्रांतांमध्ये करण्याच्या योजनेअंतर्गत कर्नाटकची राजधानी बेंगळूरु येथे १९९८ जानेवारी मध्ये शाखेची स्थापना करण्यात

आली. श्रीशैल सूर्यसिंहासन पीठाचे जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांनी दीपप्रज्वलन करून उद्घाटन केले. त्यानंतर १९९९ साली त्या प्रतिष्ठानची शाखा म्हणून वीरशैव अनुसंधान संस्थानची स्थापना झाली. त्या अनुसंधान संस्थानद्वारे प्रत्येकी धनुर्मासामध्ये जानेवारी १ पासून १० पर्यंत धनुर्मासाच्या निमित्ताने श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचा प्रात:काली सामूहिक इष्टलिंगपूजा आणि संध्याकाळी श्रीसिद्धान्तशिखामणीचा आशीर्वचन कार्यक्रम प्रारंभ झाला. अशा रीतीने २१ वर्षे अखंडपणे हा कार्यक्रम चालू आहे. या अनुसंधान संस्थानचे मुख्य उद्देश प्राचीन आगमांचे संशोधन, संपादन, विचारगोष्टी आणि त्यांचा कन्नड अनुवाद करून ग्रंथप्रकाशन असे असून आतापर्यंत मकुटागम, कारणागम, पारमेश्वरागम, सूक्ष्मागम, चंद्रज्ञानागम, अनुभवसूत्रम्, शिवपंचविंशंतिलीलाशतकम् आदी ग्रंथांचे विविध विद्वानांकडून कन्नड भाषांत अनुवाद करून मुद्रण करण्यात आले. त्याशिवाय श्रीसिद्धान्तशिखामणी विचारदीप्ती, शैवागमांमध्ये वीरशैव, चंद्रज्ञानागम विचाररश्मी, सूक्ष्मागमविचारप्रभे, वेदागम आणि शिवशरण, वीरशैव धर्म : एक पुनरावलोकन, आधुनिक जगाला श्रीसिद्धान्तशिखामणीची देणगी आदी चर्चासत्रांतील निबंधांचे ग्रंथसुद्धा प्रकाशित झाले. याशिवाय 'शिवतत्त्वचिंतामणी : एक अध्ययन' हा डॉ. सि. यू. उमादेवी यांचा शोधप्रबंध सुद्धा प्रकाशित झालेला आहे. तसेच काशी महास्वामीजींचा डी.लिट्. प्रबंध शक्तिविशिष्टाद्वैत तत्त्वत्रयविमर्श:, तत्त्वप्रकाशिका आणि आशीर्वाद नावाचा महास्वामीजीच्या २५ वर्षांच्या कार्याचा आढावा असणारे एक पुस्तक सुद्धा प्रकाशित झाले आहे.

**श्री जगद्गुरू पंचाचार्य वेद–आगम–संस्कृत–योग–संगीत पाठशाळा, गदग**

काशीपीठात प्राचीन काळापासून गुरुकुल चालू आहे. येथे येणारे विद्यार्थी वेदाध्ययन करणारे असावेत यासाठी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामींनी २००१ मध्ये गदग येथे श्री जगद्गुरू पंचाचार्य वेद–आगम–संस्कृत–योग–संगीत पाठशाळेचा आरंभ केला. वेद, संस्कृत, संगीत व

ग्रामीण भागातील माहेश्वर मुलांना सर्व धार्मिक कार्यक्रमाचे प्रशिक्षण मिळावे, १६ संस्कार विधिवत् करता यावेत यासाठी या गुरुकुलाची स्थापना केली. गदग येथील अब्बिगेरी परिवाराने २००० चौरस फूट जमीन दान दिली. तेथे भक्तांच्या देणगीतून तीन मजली इमारत बांधण्यात आली. पाठीमागे बगीचा केला. १९ वर्षांत ८०० पेक्षा अधिक विद्यार्थी शिकून गेले. काही काशीला आले, काही आपापल्या गावी धार्मिक विधिविधान, पूजापाठ करीत राहिले. फकीर स्वामी हे येथील पहिले प्राध्यापक असून त्यांच्यानंतर येथे श्री ष.ब्र. चरंतेश्वर शिवाचार्य, वे.मू. सिद्धय्या स्वामी, एम. वीरय्या शास्त्री, वे.मू. पंचय्या हिरेमठ व संगय्या हिरेमठ यांनी अध्यापन केले आहे.

या पाठशाळेत शिकून गेलेले काही विद्यार्थी असे– श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य (अमरेश्वर मठ, गुळेद्गुड्ड); श्री म.नि.प्र. गुंडय्या स्वामी (हिडकल, बेळगाव); पं. कुमार बागेवाडीमठ, गदग (राष्ट्रीय संस्कृत विश्वविद्यालय, तिरुपती); पं. परमेश्वर मठद (सहायक प्राध्यापक, रा.सं.वि.वि.,तिरुपती); श्री ष.ब्र. विश्वेश्वर देव (अडनूर हिरेमठाचे नियोजित उत्तराधिकारी); पं. गुरुसिद्धय्या हिरेमठ (अध्यापक, गदग पाठशाळा) व संगय्या हिरेमठ (अध्यापक, शादनगर पाठशाळा); पं. के. व्ही. बाळिकायिमठ (अध्यापक, गदग); वे.मू. प्रभय्या हिरेमठ (अध्यापक, गदग).

या पाठशाळेच्या उभारणीसाठी बेटदय्या हिरेमठ, मंजुनाथ बेलेरी, सिद्धलिंगप्पा तळगेरी, पी. के. गुरुमठ, बसवराज शाबादीमठ, सुरेश अब्बिगेरी, एस. एस. मेटी, सी. जी. हिरेगौड, एल. पी. कंबी, शरणप्पा बळिगार, संगम्मा हिरेमठ, वीरेश कुगुमठ, सुनील अब्बिगेरी यांनी तनमनधनाने सहकार्य केले.

**शादनगर गुरुकुल**

श्रीकाशीमहास्वामीजींनी श्रावणमासानिमित्त आंध्र तेलंगणा या भागात गावोगावी हिंडून धर्मजागृती केली. तेलंगणामधील मेहबूबनगर जिल्ह्यातील शादनगर येथे श्रावणमास अनुष्ठान झाले. त्यावेळी शादनगरच्या सज्जन काशीनाथ या माहेश्वर गृहस्थाने अर्धा एकर जमीन गुरुकुलासाठी दान

दिली. तेथेच श्रावणमास अनुष्ठान झाले. २००८ मध्ये तेथे गुरुकुलाची स्थापना करण्यात आली. टीनशेड मध्ये गुरुकुल चालले. पुण्याचे श्री. धर्मराज खेणी काशीतील एका कार्यक्रमात शादनगर येथील विद्यार्थ्यांचे वेदपठण ऐकले. ते अत्यंत प्रसन्न झाले. त्यांनी पुढाकार घेऊन एक एकर जमीन खरेदी केली. एक कोटी रुपये खर्चून गुरुकुलाचे बांधकाम करून दिले. हैदराबाद येथील उद्योजक नेति ज्ञानेश्वर, नेति महेश्वर हे बंधू मिळून एक मंदिर निर्माण करीत आहेत. ६०-७० विद्यार्थी प्रत्येक वर्षी येथे शिकतात. ११ वर्षांपासून हे गुरुकुल चालू आहे. चार वर्षांचा अभ्यासक्रम आहे. काही उच्च शिक्षणासाठी काशीला गेले. काही गावोगावी पूजापाठ करतात. ४०० विद्यार्थी शिकून गेले. संगय्या व नागराज हे अध्यापक होते. सध्या संगय्या स्वामी अध्यापक आहेत.

**वेद, संस्कृत व योग पाठशाळा, बिसनळ्ळी**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी बंकापूर येथे अनेक वर्षांपासून दरवर्षी पाच दिवस पूजा-आशीर्वचने केली आहेत. त्यावेळी भक्तांनी या परिसरात एक गुरुकुल स्थापन करावे अशी अपेक्षा व्यक्त केली. त्याप्रमाणे बिसनळ्ळी (ता. शिग्गाव, जि. हावेरी) या बंगलोर-पुणे हायवेला लागून असलेल्या गावातील श्री. मुरगेश सुभाष आजूर यांनी लिं. सुभाषचंद्र बसप्पा आजूर यांच्या स्मरणार्थ ८ गुंठे जमीन पाठशाळेसाठी दान केली. त्यांचीच २ एकर जमीन श्रीकाशीमहास्वामीजींनी खरेदी केली आणि त्या जागेवर भक्तांच्या देणगीतून २०१५ मध्ये गुरुकुलाची स्थापना करून इमारत निर्माण केली. या पाठशाळेच्या विकासात सर्वश्री. गदगेप्पा हिरेमठ, गुरुशांतप्पा नेरेगल, गदगेआप्पा शेट्टी, गदगेप्पा मामलेशट्टर, शंभण्णा मामलेशट्टर, गंगाधर बट्टी, कल्लप्पा आजूर, उमेश अंगडी, वीरेश आजूर, प्रकाश मरडूरमठ, निरंजन मरडूरमठ, सिदलिंगप्पा शंकरीकोप्प, शिवयोगी हिरेमठ, व्ही. जी. हर्लापूर, शिवराज वळसंकद, पी.डी. शिरूर, संगप्पा मरबद, शिवशंकर कुरुबेटहिरेमठ आणि निंगप्पा हिरेबेंडिगेरी यांचे व ग्रामीण भागातील अनेक लोकांचे सहकार्य लाभले.

या गुरुकुलात प्रतिवर्षी शंभरपेक्षा अधिक विद्यार्थी वेद, संस्कृत व योग यांचे शिक्षण घेतात. त्याचप्रमाणे येथे राहून शालेय शिक्षण घेण्याची देखील सोय आहे. पाचवीपासून बारावीपर्यंत विद्यार्थी शालेय शिक्षण घेऊ शकतात. श्री. विश्वेश्वर विरक्तमठ हे पूर्वी या ठिकाणी अध्यापक होते. सध्या जगदीश्वर हे येथे अध्यापक आहेत. गेल्या पाच वर्षांत ५०० पेक्षा अधिक विद्यार्थी या गुरुकुलात शिकून बेंगळूरु वगैरे ठिकाणी अर्चक व पूजापाठ करीत आहेत.

**श्रीकाशीजगद्गुरू पंचाचार्य वैदिक पाठशाळा, लातूर**

मराठवाड्यातील लातूर या शहरात श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचे २०१३ साली श्रावणमास अनुष्ठान संपन्न झाले. त्यावेळी तत्कालीन लातूर जिल्ह्याचे पालकमंत्री ना. दिलीपराव देशमुख यांनी काशीपीठाच्या वसतिगृह, गुरुकुल व मंदिरासाठी एक एकर जागा लेआऊट करून महापालिकेकडून मंजूर करून काशीपीठाला दिली. त्या ठिकाणी भव्य काशी विश्वेश्वर मंदिर निर्माण करण्यात आले. या मंदिरनिर्मितीत नांदेडचे उद्योगपती लिं. गणपतीअप्पा मोरगे यांचे खूप सहकार्य लाभले. जवळपास ५० लाख रुपये खर्चून त्यांनी भव्य मंदिराची निर्मिती केली. या मंदिराचे सर्व व्यवस्थापन कै. काशीनाथअप्पा पंचाक्षरी यांनी केले. आपल्या देखरेखीखाली सर्व कामे पूर्ण केली. मंदिरावर कळसारोहण करण्यात आले. २०१७ पासून तेथे वेद-संस्कृत पाठशाळेचा प्रारंभ करण्यात आला. वे.मू. संगय्या हे तेथील पहिले अध्यापक होते. सध्या रामेश्वर हे त्या ठिकाणी अध्यापन करीत आहेत. गुरुकुल प्रारंभिक अवस्थेत असल्यामुळे सध्या ८-१० विद्यार्थी येथे राहतात. काशीनाथअप्पांचे सुपुत्र श्री. मन्मथअप्पा पंचाक्षरी हे सर्व कार्य सांभाळतात. औसा हिरेमठाचे श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य स्वामीजी यांचे त्यांना मौलिक मार्गदर्शन मिळते. ॲड्. एस. एस. पाटील व ॲड्. हामणे व इतर भक्त यांचेही सहकार्य मिळते.

**श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान, शाखा धारवाड**

धारवाड नगर तसेच आजुबाजूच्या ग्रामीण प्रदेशातील जनतेला व मुलांना

संस्कार देण्याच्या उद्देशाने नरेंद्र आणि मंगळगट्टीच्या सीमेवर १४ एक जमीन भक्तांनी दान केली आहे. त्या शाखेचे कार्याध्यक्ष डॉ. एस. आर. रामनगौडर यांच्या नेतृत्वाखाली पुढील विकासकार्य पूर्ण करण्याची योजना आखण्यात आली. १४ एकराला लागून आणखी साडेसात एकर जमीन खरेदी करण्यात आली. या जमिनीत सेंद्रीय आमराईची लागवड करण्यात आली असून रत्नागिरी हापूस आंब्याची १५०० झाडे लावण्यात आली आहेत.

मुनवळ्ळी (जि. हावेरी) येथील श्री. गदगय्या हिरेमठ यांच्यावर आमराईची देखभाल सोपविली आहे. तेथे एक बोअरवेल असून ठिबकसिंचनाची व्यवस्था केलेली आहे. सेंद्रीय पद्धतीने आमराईचे संगोपन केले जाते. जनतेला विषयुक्त आहारापासून वाचविण्याचा पूज्य महास्वामीजींचा हा एक प्रयत्न होय. येथे तीन एकर जमीन खुली असून भावी काळात तेथे वेदागम गुरुकुल काढण्याची योजना आहे. डॉ. एस. आर. रामनगौडर यांना धारवाडचे श्री. बसण्णा कोनलगी हे या जागेच्या विकासासाठी सहकार्य करीत आहेत.

**वधू–वर कल्याण केंद्र, सोलापूर**

श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानचे एक वधू–वर कल्याण केंद्र सोलापूर येथे गेल्या अनेक वर्षांपासून कार्यरत आहे. श्री. सिद्धरामप्पा बिराजदार हे त्याचे मुख्य कार्यवाहक असून सेवाभावाने ते कार्य करीत आहेत. वीरशैवातील सर्व शाखांतील वधूवरांचे वैवाहिक संबंध जुळविण्यास ही संस्था विश्वासार्ह सेवा देत आहे.

**श्री विश्वाराध्य विद्यालय, बलुआ** (उ.प्र.)

श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानच्या अंतर्गत उत्तर प्रदेशाच्या (चंदौली जिल्हा) बलुवा गावात हे विद्यालय १९९८ मध्ये स्थापिले गेले. गंगानदीच्या पश्चिम किनाऱ्यावर अती प्राचीन वाल्मीकी कुंड आहे. त्या कुंडाच्या बाजूला काशीपीठाची चार एकर जमीन होती. त्यावर हे विद्यालय उभे आहे. आज हिंदी माध्यमाच्या या विद्यालयात ९ वी पर्यंतचे वर्ग

चालतात. गावातील गरीब मुलांना हे विद्यालय एक वरदान झाले आहे.

**श्री जगद्गुरू विश्वाराध्य एज्युकेशन ॲण्ड चॅरिटेबल ट्रस्ट, पुणे**

महाराष्ट्रात विद्यार्थ्यांना संस्कारासोबत उत्तम शिक्षण मिळावे यासाठी श्रीकाशी–जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी १६.३.२००६ रोजी या ट्रस्टची स्थापना केली. काशीपीठाचे जगद्गुरू या ट्रस्टचे कायम अध्यक्ष राहतील. देश–विदेशात कोठेही या ट्रस्टची काढता येते. व्यवस्थापक मंडळाची नेमणूक व बदलाचा संपूर्ण अधिकार महास्वामीजींना आहे. पुणे येथे या ट्रस्टच्या स्थापनेपूर्वी सांगली येथे वे.मू. सिद्धय्या चरंतय्या हिरेमठ यांच्या घरात २००० मध्ये इंग्रजी बालवाडी सुरू करण्यात आली. त्या शाळेसाठी २००२ मध्ये १० गुंठे जमीन काशीपीठाने खरेदी केली. सिद्धलिंगय्या चरंतय्या हिरेमठ यांच्या घरातील शाळा तेथे बांधकाम करून आणण्यात आली. बाबासाहेब कल्याणी यांना आक्कुताई कल्याणी ट्रस्टतर्फे शाळेची इमारत बांधून द्यावी, असे महास्वामीजींनी सांगितल्यावर बाबासाहेबांनी तीन मजली इमारत बांधून दिली. बांधकाम व फर्निचरसह सव्वा कोटी रुपये खर्च झाले. २००८ मध्ये ती इमारत ट्रस्टला समर्पित केली. त्यावेळी भारताचे तत्कालीन गृहमंत्री मा. शिवराज पाटील उपस्थित होते. २००८ पासून तेथे नर्सरीपासून दहावीपर्यंत वर्ग असून जवळपास एक हजार विद्यार्थी तेथे शिकतात. ३६ अध्यापक, पाच कर्मचारी व २ ऑफीस कर्मचारी आहेत. महास्वामीजींनी पाच सल्लागार नेमले. सौ. सुनीता बाबासाहेब कल्याणी, श्री विश्वनाथ हिरेमठ, श्री. श्रीनिवास कानडे, श्री. मल्लिकार्जुन कामशेट्टी व श्री. अप्पासाहेब टेंगळे. सौ. कल्याणी ह्या चेअरपर्सन व विश्वनाथ हिरेमठ कार्यवाह आहेत. या ट्रस्टतर्फे गदग पाठशाळा, बिसनळ्ळी पाठशाळा व शादनगर गुरुकुल चालविले जातात.

**विशेष शिष्यवृत्ती योजना**

समाजात अनेक बुद्धिवान मुले आर्थिक संकटामुळे उच्च शिक्षणापासून वंचित राहतात हे लक्षात घेऊन श्रीकाशीमहास्वामीजींनी गेल्या २१ वर्षांपासून एक शिष्यवृत्ती वेतन योजना प्रारंभिली आहे. या योजनेच्या अंतर्गत मेडिकल

आणि इंजिनिअरिंगचे शिक्षण घेणाऱ्या विद्यार्थ्यांना प्रतिमाह एक हजार रुपये त्यांचे अध्ययन पूर्ण होईपर्यंत देण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. प्रारंभी विद्यार्थ्यांची संख्या कमी होती. नंतर ती वाढत जाऊन आता ४०० विद्यार्थ्यांना या योजनेचा लाभ मिळत आहे. या योजनेसाठी पुण्याच्या आक्कुताई कल्याणी चॅरिटेबल ट्रस्टच्या वतीने श्रीमान बाबासाहेब कल्याणी व सौ. सुनीता कल्याणी यांनी वेळोवेळी ५० लाखांपेक्षा अधिक रुपयांची देणगी दिली आहे.

श्रीकाशीजगद्गुरूंनी आपल्या वाढदिवसाच्या निमित्ताने येणारी सर्व गुरुदक्षिणा या योजनेसाठीच समर्पिली आहे. २००२ पासून महास्वामीजींच्या श्रावणमासातील जन्मदिनादिवशी येणारी सर्व दक्षिणा, भक्तांनी अर्पिलेले सुवर्ण आणि षठ्यब्दीच्या वेळी तुलाभारातून मिळालेली दक्षिणा या निधीसाठी महास्वामीजींनी अर्पण केली आहे. याशिवाय उत्पन्नातील काही भाग शिष्यवृत्तीसाठी देऊन ४०० विद्यार्थ्यांना दरमहा रु. १०००/- शिष्यवृत्ती देण्यात येते.

**श्री जगद्गुरू विश्वेश्वर नित्य अन्नदान छत्र**

काशी ही विद्यानगरी तसेच पवित्र तीर्थक्षेत्र असल्याने येथे अध्ययनाकरिता विद्यार्थी, यात्रेसाठी भक्त आदी निरंतर येत असतात. येणाऱ्या विद्यार्थ्यांना आणि यात्रेकरूंना निरंतर अन्नदान चालू राहिले पाहिजे या उद्देशाने काशी जंगमवाडी मठात पूर्वीपासून अन्नछत्र चालत आले आहे. श्री जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य लिंगैक्य झाल्यानंतर त्यांच्या पवित्र स्मृत्यर्थ अन्नछत्राला त्यांचे नाव देण्यात आले. याशिवाय १९९० पासून हे अन्नछत्र आणखी व्यवस्थित चालविले जात आहे. अलीकडे भक्तांना एकेका दिवसाची अन्नदानसेवा देण्यात येते. व्यक्तीने १५,००० रुपये श्रीपीठास स्थायी रूपाने निधी दिल्यास त्याच्या व्याजातून वर्षातून एक दिवस सांगितलेल्या तिथीला अथवा तारखेला अन्नदान केले जाते. हजारो यात्रेकरूंना दोन्ही वेळेस प्रसाद दिला जातो. दानींना दानमूलक प्रसाद पाठविण्यात येतो. सध्या अनेक भक्त आपली देणगी समर्पित करून या योजनेत सहभागी होत आहेत. श्री

जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल विद्यार्थ्यांना व येणाऱ्या यात्रेकरूंना येथे दररोज दोन्ही वेळा प्रसादाची व्यवस्था असते.

**काशी जंगमवाडी मठातील भक्तनिवास**

काशी येथील श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाचा जंगमवाडी मठ अत्यंत प्राचीन आहे. या मठामध्ये अभ्यासासाठी येणाऱ्या विद्यार्थ्यांसाठी आणि यात्रेसाठी आलेल्या भक्तांसाठी प्राचीन काळापासून भक्तनिवासाची व्यवस्था होती. विद्यमान श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी पीठारोहणानंतर १९९७ मध्ये मठाचा जीर्णोद्धार करून सर्व सुविधायुक्त भक्तनिवास निर्माण करण्यासाठी संकल्प केला. काशीपीठामध्ये झालेल्या विविध कोटी बिल्वार्चन आदी दीर्घकालीन धार्मिक कार्यक्रमांमध्ये सहभागी झालेल्या सर्वप्रांतीय आणि सर्वधर्मीय सद्भक्तांनी नूतन भक्तनिवास निर्माण करण्यासाठी सढळ हाताने देणग्या दिल्या. मठाच्या जागेमध्ये ३-४ मजली भक्तनिवासाचा एक मास्टर प्लॅन तयार करून पंचवीस वर्षांमध्ये पूज्य महास्वामीजींनी पुढील वास्तू निर्माण केल्या,

१. श्री जगद्गुरू पंचाचार्य भवन
२. श्री जगद्गुरू प्रथम मल्लिकार्जुन भक्तनिवास
३. श्री जगद्गुरू हरेश्वर भक्तनिवास
४. श्री जगद्गुरू प्रथम वीरभद्र भक्तनिवास
५. श्री जगद्गुरू राजेश्वर भक्तनिवास
६. श्री जगद्गुरू शिवलिंग भक्तनिवास
७. श्री जगद्गुरू पंचाक्षर भक्तनिवास
८. श्री जगद्गुरू विश्वेश्वर भक्तनिवास
९. श्री जगद्गुरू द्वितीय वीरभद्र शिवाचार्य स्मारक ज्ञानमंदिर ग्रंथालय
१०. जंगमबाबा भक्तनिवास

या वास्तूंच्या निर्मितीमध्ये पुण्याचे लिं. गंगाधर चिरमे आणि श्रीमती नलिनी चिरमे यांचे खूप मोठे योगदान आहे. वास्तुनिर्मितीसाठी श्री. गुप्ता आणि श्री. अशोक पांडे या दोन अभियंत्यांचा नकाशा आणि सल्ला अत्यंत

महत्त्वाचा ठरला. याशिवाय जंगमवाडी मठामध्ये गणेश हॉल, चित्रशाला, विश्वेश्वर हॉल आणि जंगमबाबा हॉल अशा वास्तू निर्माण झालेल्या असून सामान्यातल्या सामान्य भक्तांपासून अत्यंत विशिष्ट व्यक्तीपर्यंत सर्व व्यवस्था भक्तनिवासात आहे. एकाच वेळी दोन हजारांपेक्षा अधिक भक्तगण मठामध्ये निवास करू शकतात. तसेच त्यांची प्रसादाची सुद्धा व्यवस्था आहे. याशिवाय मठाच्या समोरच्या जागेमध्ये पंधरा हजार चौरस फूट मोठी खुली पार्किंग जागा असून त्या ठिकाणी मोठमोठ्या सभा व सप्ताह करण्याची व्यवस्था आहे. त्या ठिकाणी ५००० पेक्षा अधिक भक्तगण बसून सत्संग साधना वगैरे कार्यक्रम करू शकतात. ही नवीन व्यवस्था झाल्यामुळे काशी जंगमवाडी मठामध्ये यात्रेकरूंची संख्या दिवसेंदिवस वाढत असून आलेले सर्व भक्त येथील निवास आणि प्रसादाच्या व्यवस्थेमुळे प्रसन्न होऊन जातात.

## काशीपीठाचे पुरस्कार

### १. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विश्वभारती पुरस्कार

परंपरागत संस्कृत भाषेच्या विद्वानाला आणि वीरशैवदर्शन व धर्माला संस्कृत अथवा अन्य प्रांतीय भाषांत महत्त्वपूर्ण योगदान दिलेल्या विद्वान पंडिताला अथवा विदुषीला हा पुरस्कार देऊन सन्मानित करण्यात येते. पुरस्कृत केल्या जाणाऱ्या विद्वानांना २५ हजार रुपये रोख रक्कम, प्रशस्तिपत्र, शाल ू श्रीफळ देऊन त्यांचा सत्कार करण्यात येतो. पुरस्कारप्राप्त विद्वान–

१. पं. देवस्वरूप मिश्र, वाराणसी (उत्तर प्रदेश) १९९७
२. राष्ट्रीय पंडित व्रजवल्लभ द्विवेदी, वाराणसी (उत्तर प्रदेश) १९९८
३. डॉ. एम. शिवकुमार स्वामी, बेंगळूरु (कर्नाटक) १९९९
४. डॉ. चंद्रशेखर कपाळे, कलबुर्गी (कर्नाटक) २०००
५. डॉ. शे. दे. पसारकर, सोलापूर (महाराष्ट्र) २००१
६. प्रो. व्ही. वेंकटाचलम, तिरुनेलवेल्ली, (तमिळनाडू) २००२
७. डॉ. के. प्रताप, तिरुपती (आंध्र प्रदेश) २००३
८. डॉ. मल्लिकार्जुन परेड्डी, धारवाड (कर्नाटक) २००४

९. डॉ. परमहंस मिश्र, वाराणसी (उत्तर प्रदेश) २००५
१०. डॉ. मठम् लिंगय्या, हैदराबाद (तेलंगणा) २००६
११. प्रो. व्ही. कुटुंबशास्त्री, नवी दिल्ली (दिल्ली) २००७
१२. ह.भ.प. चंद्रशेखर महाराज देगलूरकर, पंढरपूर (महाराष्ट्र) २००८
१३. पं. जगन्नाथशास्त्री तैलंग, वाराणसी (उत्तर प्रदेश) २००९
१४. पं. गंगाधरशास्त्री, मैसूर (कर्नाटक) २०१०
१५. पं. कमलेशदत्त तिवारी, वाराणसी (उत्तर प्रदेश) २०११
१६. सौ. महानंदा खके, चारठाणा, परभणी (महाराष्ट्र) २०१२
१७. कु. यूलिया क्रावचेन्को, युक्रेन २०१३
१८. प्रा. अमरनाथ पांडेय, वाराणसी (उत्तर प्रदेश) २०१४
१९. आचार्य समुद्राल लक्ष्मणय्या, तिरुपती (आंध्र प्रदेश) २०१५
२०. डॉ. टी. गणेशन, पुडुच्चेरी (पाँडेचेरी) २०१६
२१. पं. रेवाप्रसाद द्विवेदी, वाराणसी (उत्तर प्रदेश) २०१७
२२. पं. रामयत्न शुक्ल, वाराणसी (उत्तर प्रदेश) २०१८
२३. पं. शिवाप्पा खके, चारठाणा, परभणी (महाराष्ट्र) २०१९
२४. .डॉ. सी. शिवकुमार स्वामी, बेंगळूरु (कर्नाटक) २०२०

**२. कोडीमठ साहित्य पुरस्कार**

(स्वरूप : रु. ११,०००, स्मृतिचिन्ह, सन्मानपत्र, महावस्त्र, श्रीफल)
हा पुरस्कार पुढील विद्वानांना देऊन त्यांचा सन्मान करण्यात आला.

१. प्रा. हरिप्रसाद अधिकारी २०१५
२. डॉ. विनोदराव पाठक २०१६
३. प्रा. जयप्रकाश नारायण त्रिपाठी २०१७
४. प्रा. शीतलाप्रसाद उपाध्याय २०१८
५. प्रा. सुधाकर मिश्र २०१९
६. डॉ. हेमा कृष्णन २०२०

**३. आचार्य व्रजवल्लभ द्विवेदी शैवभारती पुरस्कार**

(स्वरूप : रु. ११,०००, स्मृतिचिन्ह, सन्मानपत्र, महावस्त्र, श्रीफल)

या पुरस्कारासाठी श्रीशैलजगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी आणि बेळगाव कारंजे मठाचे श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध स्वामीजी यांनी काशीपीठाला देणगी दिली. पुरस्कारप्राप्त मान्यवर-

| | |
|---|---|
| १.पं प्रभुनाथ द्विवेदी | २०१३ |
| २. डॉ. रमा घोष | २०१४ |
| ३. प्रा. कमलेश झा | २०१५ |
| ४. डॉ. करुणा त्रिवेदी | २०१६ |
| ४. डॉ. कमला पांडेय | २०१६ |
| ५. प्रा. गोपबंधू मिश्रा | २०१७ |
| ६. डॉ. शशिनाथ झा | २०१८ |
| ७. डॉ. विद्याशंकर त्रिपाठी | २०१९ |
| ८. प्रा. रामपूजन पांडेय | २०२० |

**४. सौ. सिंधुताई सुभाष म्हमाणे मातृशक्ती पुरस्कार**

(स्वरूप : रु. ११,०००, स्मृतिचिन्ह, सन्मानपत्र, महावस्त्र, श्रीफल)

या पुरस्कारासाठी श्री. सुभाष म्हमाणे, पंढरपूर यांनी काशीपीठाला एक लक्ष रुपये देणगी दिली. पुरस्कारप्राप्त मान्यवर-

| | |
|---|---|
| १. डॉ. प्रमोदिनी पंडा, ओडिसा | २०१६ |
| २. डॉ. शांता चट्टोपाध्याय,<br>संस्कृत विभागप्रमुख, काशीहिंदू विश्वविद्यालय, वाराणसी (उ.प्र.) | २०१७ |
| ३. प्रो. मनुलता शर्मा, संस्कृत विभाग,<br>कला संकाय, काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी (उ.प्र.) | २०१८ |
| ४. कु. सिद्धिदात्री भारद्वाज,<br>कला संकाय, काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी (उ.प्र.) | २०१९ |
| ५. स्वाती साखरकर,<br>वीरशैव मराठी साहित्याभ्यासिका,<br>कारंजा लाड, जि. वाशीम (महाराष्ट्र) | २०२० |

### ५. श्रीकाशीपीठ पुरस्कार, सोलापूर

काशीपीठाच्या वतीने महाराष्ट्रात सोलापूर येथे २००२ पासून विविध पुरस्कार देण्यात येतात. १०,००० रुपये रोख, स्मृतिचिन्ह, प्रशस्तिपत्र, शाल, श्रीफळ असे या पुरस्कारांचे स्वरूप आहे.

#### (१) डॉ. चंद्रशेखर कपाळे साहित्य पुरस्कार

मराठी भाषेचे श्रेष्ठ संशोधक लिं. डॉ. चंद्रशेखर कपाळे यांच्या स्मरणार्थ हा पुरस्कार दिला जातो. मराठी भाषेत वीरशैव साहित्यात विशेष कार्य केलेल्या विद्वानाला हा पुरस्कार देण्यात येतो. डॉ. चंद्रशेखर कपाळे यांचे सुपुत्र श्री. अभय कपाळे यांनी या पुरस्कारासाठी काशीपीठास एक लक्ष रुपयांची देणगी दिली आहे. पुरस्कारप्राप्त मान्यवर–

| | |
|---|---|
| १. डॉ. रा. चिं. ढेरे, पुणे | २००२ |
| २. श्री. शांतितीर्थ स्वामी, चाकूर | २००३ |
| ३. डॉ. यू. म. पठाण, औरंगाबाद | २००४ |
| ४. डॉ. सुधाकर मोगलेवार, नागपूर | २००५ |
| ५. डॉ. निर्मलकुमार फडकुले, सोलापूर | २००६ |
| ६. डॉ. इरेश स्वामी, सोलापूर | २००७ |
| ७. डॉ. शे. दे. पसारकर, सोलापूर | २००८ |
| ८. डॉ. अशोक कामत, पुणे | २००९ |
| ९. डॉ. भी. शि. स्वामी, औसा | २०१० |
| १०. डॉ. राम तोंडारे, उदगीर | २०११ |
| ११. डॉ. चंद्रकांत देऊळगावकर, लातूर | २०१२ |
| १२. डॉ. श्यामा घोणसे, पुणे | २०१३ |
| १३. डॉ. शिवशंकर उपासे, आजरा (कोल्हापूर) | २०१४ |
| १४. डॉ. वैजनाथ फास्के, लातूर | २०१५ |
| १५. नारायण कुलकर्णी, सोलापूर | २०१६ |
| १६. डॉ. शोभा कराळे, पंढरपूर | २०१७ |

१७. डॉ. अनिल सर्जे, सोलापूर २०१८
१८. डॉ. संध्या तोडकर, नाशिक २०१९

**(२) श्री वे. वीरसंगय्या आदर्श शिक्षक पुरस्कार**

सोलापूर जिल्ह्यातील मंगळवेढा तालुक्यातील बोराळे गावचे शिक्षक वे. वीरसंगय्या स्वामी यांच्या स्मरणार्थ हा पुरस्कार देण्यात येतो. लिंगैक्य वीरसंगय्या स्वामी यांचे सुपुत्र मुंबईनिवासी चंद्रशेखर हिरेमठ यांनी आपल्या वडिलांच्या स्मरणार्थ एक लक्ष रुपये मठास अर्पिले आहेत. पुरस्कारप्राप्त मान्यवर–

१. रे. रा. मगाई, सोलापूर २००६
२. डॉ. बा. म. चमके, पुणे २००७
३. पं. शिवाप्पा खके, चारठाणा (परभणी) २००८
४. शिवशरण कंबाळेमठ, सोलापूर २००९
५. मनोहर कवचाळे, बोराळे २०१०
६. सौ. सुरेखा चडचणकर–कपाळे, सोलापूर २०११
७. बी. एस. कुलकर्णी, सोलापूर २०१२
८. श्रीमती शांता मरगूर, सोलापूर २०१३
९. डॉ. स्वर्णलता भिशीकर, सोलापूर २०१४
१०. सुभाष हांडगे, सोलापूर २०१५
११. पं. गुलाम दस्तगीर बिराजदार, मुंबई २०१६
१२. रेवणसिद्ध वाडकर, सोलापूर २०१७
१३. डॉ. विनय अपसिंगकर, लातूर २०१८
१४. डॉ. नागनाथ येवले, सोलापूर २०१९

**(३) वे. सदाशिव स्वामी प्रज्ञा पुरस्कार**

हा पुरस्कार सोलापूर विद्यापीठात गणित ह्या विषयात सर्वप्रथम येणाऱ्या विद्यार्थि–विद्यार्थिनीस दिला जातो. सोलापूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. इरेश स्वामी यांनी रु. २५००० देणगी काशीपीठाला दिली. त्यामध्ये

काशीपीठाने भर घालून एक लक्ष रुपये पूर्ण केले. त्या रकमेच्या व्याजातून दरवर्षी हा पुरस्कार दिला जातो. पुरस्कारप्राप्त मान्यवर–

| | | |
|---|---|---|
| १. आरती गुंजी | सोलापूर विद्यापीठ | २००९ |
| २. कु. नमिता नगरकर | सोलापूर विद्यापीठ | २०१० |
| ३. कु. यास्मिन मुल्ला | सोलापूर विद्यापीठ | २०११ |
| ४. कु. उर्मिला चव्हाण | सोलापूर विद्यापीठ | २०१२ |
| ५. अंबादास फलमारी | सोलापूर विद्यापीठ | २०१३ |
| ६. कु. रुख्सारतबस्सुम पीरजादे | सोलापूर विद्यापीठ | २०१४ |
| ७. संतोष बागल | सोलापूर विद्यापीठ | २०१५ |
| ८. शिल्पा नेवले | सोलापूर विद्यापीठ | २०१६ |
| ९. उजमाअख्तर मुछाले | सोलापूर विद्यापीठ | २०१७ |
| १०. सुनीता हरी नागटिळक | सोलापूर विद्यापीठ | २०१८ |
| ११. स्वाती सुरेश पवार | सोलापूर विद्यापीठ | २०१९ |

**(४) वे. बंडय्या मठपती समाजसेवा पुरस्कार**

या पुरस्कारासाठी श्री. मळय्या बंडय्या मठपती, सोलापूर यांनी काशीपीठाला एक लक्ष रुपयांची देणगी दिली.

| | |
|---|---|
| १. सिद्रामप्पा बिराजदार, सोलापूर | २०१२ |
| २. जयनारायण भुतडा, सोलापूर | २०१३ |
| ३. शकुंतलाबाई टेकाडे, पंढरपूर | २०१४ |
| ४. सिद्रामप्पा आलुरे गुरुजी, अणदूर | २०१५ |
| ५. शांतवीरप्पा बावी, सोलापूर | २०१६ |
| ६. गिरीश प्रभुणे, पुणे | २०१७ |
| ७. डॉ. विठ्ठल लहाने, लातूर | २०१८ |
| ८. परमेश्वर काळे, मुळेगाव (सोलापूर) | २०१९ |

**(५) विठाबाई देवाप्पा पसारकर कृतज्ञता पुरस्कार**

कै.सौ. विठाबाईंच्या स्मृत्यर्थ कृतज्ञता म्हणून धर्म, संस्कृती, कला (शिल्प, संगीत, गायन इ.), क्रीडा, विज्ञान-तंत्रज्ञान, वृत्तविद्या, भाषा-साहित्य संशोधन, प्रकाशन, कोरीव लेख संशोधन इत्यादी विविध क्षेत्रांत कार्य करणाऱ्या व्यक्तींना प्रतिवर्षी हा पुरस्कार देऊन गौरविण्यात येते. या पुरस्कारासाठी पसारकर कुटुंबियांनी एक लक्ष रुपयांची देणगी काशीपीठाला अर्पण केली.

| | | |
|---|---|---|
| १. दा. का. थावरे, सोलापूर | संतचरित्रलेखक | २०१२ |
| २. आनंद कुंभार, सोलापूर | शिलालेख-संशोधक | २०१३ |
| ३. अरुण रामतीर्थकर, सोलापूर | पत्रकार | २०१४ |
| ४. बाबूराव मैंदर्गीकर, सोलापूर | प्रकाशक | २०१५ |
| ५. भगवान रामपुरे, सोलापूर | शिल्पकार | २०१६ |
| ६. स्वाती साखरकर, सोलापूर | लेखिका-कवयित्री | २०१७ |
| ७. डॉ. उषा रामवाणी, ठाणे | प्रबंधलेखिका | २०१८ |
| ८. प्रभाकर झळके, येवला (नाशिक) | व्यंगचित्रकार | २०१९ |

**(६) ष.ब्र. परंडकर महाराज पत्रकारिता पुरस्कार**

लिं. राचलिंग शिवाचार्य परंडकर महाराज आणि लिं. रेवणसिद्ध शिवाचार्य परंडकर महाराज यांनी अनेक वर्षे 'वीरशैव गर्जना' हे साप्ताहिक संपादित व प्रकाशित करून त्यामधून समाजप्रबोधन केले. त्यांच्या स्मृत्यर्थ हा पुरस्कार देण्यात येतो. या पुरस्कारासाठी डॉ. भी. शि. स्वामी यांनी काशीपीठाला एक लक्ष रुपयांची देणगी दिली आहे.

| | |
|---|---|
| १. बालाजी मुळे, औरंगाबाद | २०१७ |
| २. अरुण खोरे, पुणे | २०१८ |
| ३. विवेक घळसासी, नागपूर | २०१९ |

**(७) सिद्रामप्पा (दादा) भोगडे नाट्यकर्मी पुरस्कार**

नाट्यक्षेत्रातील कार्यासाठी हा पुरस्कार देण्यात येतो. या पुरस्कारासाठी

श्री. अरुण भोगडे यांनी काशीपीठाला एक लक्ष रुपयांची देणगी दिली आहे.

१. शोभा बोल्ली, सोलापूर २०१८

२. फय्याज शेख, मुंबई २०१९

**(८) सौ. शांताबाई व निवृत्ती गायकवाड कीर्तनकार पुरस्कार**

या पुरस्कारासाठी निवृत्ती गायकवाड यांनी काशीपीठाला देणगी दिली आहे. पहिल्या पुरस्काराचे मानकरी–

१. न्या. विठ्ठलराव वासकर (कोरे), पंढरपूर २०१९

**६. विद्वत् पुरस्कार**

श्री बी.एस. वागीश प्रसाद यांनी आपले लिं. मातापिता श्री शिवप्पा शेट्टी आणि कमलम्मा यांच्या स्मरणार्थ शिवकमल साहित्यप्रशस्ती देण्याचे मनोगत व्यक्त केले. त्यांच्या इच्छेप्रमाणे श्रीजगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान, बेंगळूरु शाखेद्वारा २००४ पासून ही प्रशस्ती देण्यास आरंभ झाला. रु. ११०००/– रोख आणि प्रशस्तिपत्र असे या प्रशस्तीचे स्वरूप आहे. पुरस्कारप्राप्त मान्यवर–

१. प्रो. महादेवय्या, बेंगळूरु २००४

२. प्रो. एन. बसवाराध्य, बेंगळूरु २००५

३. विद्वान षणमुखय्या अक्कुरमठ, बेंगळूरु २००६

४. डॉ. एस. विद्याशंकर, बेंगळूरु २००७

५. डॉ. एम.जी. नागराज, बेंगळूरु २००८

६. डॉ. पंचाक्षरी हिरेमठ, धारवाड २००९

७. डॉ. संगमेश सौंदत्तीमठ, धारवाड २०१०

८. डॉ. एस.एम. हिरेमठ, कलबुर्गी २०११

९. सा.शि. मरुळय्या, बेंगळूरु २०१२

१०. विद्वान बी. राजशेखरय्या, मैसूरू २०१३

११. हि.ची. शांतवीरय्या, बेंगळूरु २०१४

१२. डॉ. वृषभेंद्र स्वामी, धारवाड २०१५

१३. श्री ष.ब्र. डॉ. शिवकुमार शिवाचार्य स्वामीजी, केरूर २०१६
१४. श्री ष.ब्र.डॉ. महादेव शिवाचार्य स्वामीजी, बबलेश्वर २०१७
१६. श्री ष.ब्र. डॉ. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी,
चानकोटी मठ, कोट्टूरू २०१९

**७. पंचाचार्यश्री प्रशस्ती**

श्रीजगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान, बेंगळूरु शाखेकडून हा पुरस्कार दिला जातो. बेंगळूरु वीरशैव अनुसंधान संस्थानचे पोषक मंडळाचे अध्यक्ष श्री. बी. आर. व्ही. गौड यांनी १९९८ पासून २०१३ पर्यंत अखंडपणे संस्थानाची सेवा केली. २०१३ मध्ये ते शिवैक्य झाल्यामुळे त्यांची धर्मपत्नी श्रीमती शांता व्ही. गौड यांनी 'श्रीमती शांता व्ही. गौड आणि लिं. बी. आर. व्ही. गौड फांउंडेशन' या नावाची संस्था स्थापना करून 'पंचाचार्य श्री प्रशस्ती' देण्यास आरंभ केला. २५ हजार रुपये गौरवधन आणि प्रशस्तिपत्र असे याचे स्वरूप आहे. आतापर्यंत पुढील विद्वान या प्रशस्तीने सन्मानित झाले.

१. डॉ. एम.शिवकुमार स्वामी, बेंगळूरु २०१३
२. विद्वान षणमुखय्या अक्कुरमठ, बेंगळूरु २०१४
३. विद्वान बी. राजशेखरय्या, मैसूर २०१५
४. विद्वान को.रं. बसवराजू, तुमकुरू २०१६
५. श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी, हुक्केरी २०१७
६. श्री ष.ब्र. जयशांतेश्वर शिवाचार्य स्वामीजी,जालहळ्ळी २०१८
७. श्री ष.ब्र. प्रभुसारंगदेव शिवाचार्य स्वामीजी, सिंदगी २०१९

**कोटी बिल्वार्चन**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी १९८९ साली जगद्गुरुपदावर आरूढ झाले. त्यानंतर ७ वर्षांनी १९९७ साली लोककल्याणासाठी १०० दिवसांचे कोटी बिल्वार्चन अनुष्ठान संपन्न झाले. प्रतिदिवशी एक लक्ष बिल्वार्चन याप्रमाणे १०० दिवसांमध्ये हे अनुष्ठान पूर्ण

झाले. या अनुष्ठानसमाप्तीला रंभापुरी जगद्गुरू वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, उज्जयिनी जगद्गुरू मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, केदारजगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैलपीठाचे जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांनी सान्निध्यस्थान भूषवून सर्वांना मंगलाशीर्वाद प्रदान केले. काशीपीठामध्ये एवढे दीर्घकालीन अनुष्ठान प्रथमच झाले. या कार्यक्रमात सर्व प्रांतांतून लाखो लोक सहभागी होऊन पुनीत झाले.

### श्रीकाशीमहास्वामीजींच्या पीठारोहणाचा दशमानोत्सव

काशीपीठामध्ये १९९७ मध्ये झालेल्या कोटी बिल्वार्चनानंतर पूज्य महास्वामीजींनी जगद्गुरू विश्वाराध्य भक्तनिवासाची निर्मिती केली. त्यासाठी भक्तांनी सढळ हाताने देणगी दिली होती. त्यावेळी ५० लाख रुपये खर्च करून भक्तनिवास निर्माण झाले होते. त्याच्या उद्घाटनाच्या निमित्ताने महास्वामीजींच्या पीठारोहणाचा दशमानोत्सव करण्यात आला. या शुभप्रसंगी श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी आणि केदारजगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांनी उपस्थित राहून नूतन भक्तनिवासाचे उद्घाटन केले.

### श्रीकाशीमहास्वामीजींचा द्वादश पीठारोहण महोत्सव

काशीपीठात दि. १९.१०.२००१ ते ५.१२.२००१ पर्यंत ४८ दिवसांचा धार्मिक कार्यक्रम पार पडला. यावेळी जगद्गुरू विश्वाराध्य मूर्तीस अतिरुद्राभिषेक, बिल्वार्चना आदी कार्यक्रम झाले. सांगता समारंभामध्ये रंभापुरीजगद्गुरू वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, उज्जयिनीजगद्गुरू मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी आणि केदारजगद्गुरू सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी, केदारपीठाचे नूतन जगद्गुरू रावल श्री जगद्गुरू भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांनी उपस्थित राहून सर्वांना मंगलाशीर्वाद प्रदान केले.

**श्रीकाशीजगद्गुरूंचा षष्ठ्यब्दी महोत्सव**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा १९४७ मध्ये त्यांचा जन्म झाला. २००७ मध्ये त्यांना ६० वर्षे पूर्ण झाली. त्या निमित्ताने काशीपीठामध्ये त्यांचा षष्ठ्यब्दिपूर्ती समारंभ अत्यंत वैभवाने संपन्न झाला. १४.८.२००७ ते २९.११.२००७ पर्यंत १०१ दिवसांचा हा कार्यक्रम होता. या समारंभामध्ये जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचा अमृतमहोत्सव सुद्धा साजरा करण्यात आला. त्यावेळी प्रतिदिवशी १००० कुंभाभिषेकाप्रमाणे एक लक्ष कुंभाभिषेक काशीपीठातील विश्वनाथ लिंगाला आणि जगद्गुरू लिंगोद्भव मूर्तीला करण्यात आला. कोटी बिल्वार्चना तसेच महास्वामीजींचा प्रतिदिवशी तुलाभार करण्यात आला. गुरुकुलाच्या आजी व माजी विद्यार्थ्यांनी आपल्या मठातर्फे आणि आपल्या भक्तांकडून नाण्यतुलाभार सेवा केली. शंभर दिवसांमध्ये नाण्यतुलाभाराच्या माध्यमातून एक कोटी रुपये संग्रहित झाले. महास्वामीजींनी ती सर्व धनराशी बँकेत ठेवून त्याच्या व्याजातून मासिक हजार रु. प्रमाणे शंभर विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देण्यास प्रारंभ केला. तुलाभारात आलेली चांदी आणि सुवर्ण सुद्धा महास्वामीजींनी शिष्यवृत्ती निधीला अर्पण केले. २००७ साली झालेल्या महास्वामीजींच्या षष्ठ्यब्दी महोत्सवामुळे गरीब आणि होतकरू विद्यार्थ्यांसाठी एक शिष्यवृत्तिनिधीचा संग्रह झाला. त्याशिवाय महास्वामीजी प्रत्येक श्रावणमासामध्ये आलेली आपली सर्व गुरुदक्षिणा त्या शिष्यवृत्ती निधीला समर्पण करीत आल्यामुळे सर्वप्रांतीय आणि सर्वधर्मीय वैद्यकीय आणि अभियांत्रिकी शिक्षण घेणाऱ्या ४०० विद्यार्थ्यांना प्रतिवर्षी शिष्यवृत्तीचा लाभ होत आहे.

भारत सरकारचे महास्वामीजींच्या षष्ठ्यब्दी महोत्सवाच्या सांगता समारंभामध्ये २९.११.२००७ रोजी गृहमंत्री सन्माननीय शिवराज पाटील चाकुरकर आणि पुण्योचे मोठे उद्योजक बाबासाहेब कल्याणी, बेंगळूरुचे मोठे उद्योजक अशोक खेणी हे उपस्थित होते. १०१ दिवस झालेल्या या षष्ठ्यब्दी महोत्सवात सुद्धा कुंभाभिषेक, अन्नदान आणि तुलाभार सेवा करण्यात आली. लक्षावधी लोकांनी येऊन आपली सेवा समर्पित केली.

षष्ठ्यब्दी महोत्सवाच्या निमित्ताने दि. २१.११.२००७ पासून २७.११.२००७ पर्यंत अखिल भारत वीरशैव संमेलन संपन्न झाले.

**वीरशैव साहित्य संमेलन**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या षष्ठ्यब्दी महोत्सवाच्या निमित्ताने २१.११.२००७ पासून २७.११.२००७ पर्यंत अखिल भारतीय सर्व भाषिक वीरशैव साहित्य संमेलन आयोजित करण्यात आले होते. संस्कृत, कन्नड, हिंदी, मराठी, तेलुगू आणि तमिळ या भाषांतील वीरशैव साहित्यावर चर्चासत्रे घेण्यात आली. २१ तारखेला सायंकाळी श्रीकाशीमहास्वामीजींनी साहित्य संमेलनाचे विधिपूर्वक उद्घाटन केले.

संस्कृत साहित्याच्या चर्चासत्रात डॉ. एम.शिवकुमार स्वामी (बेंगळूरु), डॉ. मल्लिकार्जुन परेड्डी (धारवाड), डॉ. के. प्रसाद (तिरुपती), पं. राधेश्याम चतुर्वेदी (वाराणसी), डॉ. सी. शिवकुमार स्वामी (बेंगळूरु), को. रं. बसवराजू (तुमकूर), डॉ. कमलेश झा, डॉ. रमा घोष (वाराणसी) या विद्वानांनी शोधनिबंधांचे वाचन केले. या सत्राच्या अध्यक्षस्थानी शैवभारती शोधप्रतिष्ठानचे निर्देशक पं. व्रजवल्लभ द्विवेदी हे होते.

२३.११.२००७ रोजी सकाळी 'मराठी वीरशैव साहित्य' या विषयावरील चर्चासत्राचा आरंभ झाला. त्यामध्ये डॉ. शे. दे. पसारकर (सोलापूर), शांतितीर्थ स्वामी (औरंगाबाद), पं. शिवाप्पा खके (चारठाणा, परभणी), डॉ. सुधाकर मोगलेवार (नागपूर) यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. दुपारच्या सत्रात डॉ. श्यामा घोणसे (पुणे), डॉ. सुधाकर मोगलेवार (नागपूर), आनंद कुंभार (सोलापूर) यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. या सत्राचे डॉ. शे. दे. पसारकर अध्यक्ष होते.

हिंदी वीरशैव साहित्यावरील चर्चासत्रात डॉ. इरेश स्वामी (सोलापूर), डॉ. गोविंद सप्तर्षी, डॉ. रमा घोष (वाराणसी), पं. षण्मुखय्या अक्कुरमठ (बेंगळूरु), पं. जगन्नाथ शास्त्री तैलंग (वाराणसी) यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. डॉ. राधेश्याम चतुर्वेदी (वाराणसी) या सत्राचे अध्यक्ष होते. दुपारी तमिळ भाषेतील वीरशैव साहित्य या विषयावरील चर्चासत्र पार

पडले. त्यामध्ये टी.बी. सिद्धलिंगय्या (चेन्नई) यांनी निबंधवाचन केले.

तेलुगू वीरशैव साहित्यावरील चर्चासत्राचे तेलुगू विभूतिपूर मठाचे डॉ. महांतलिंग शिवाचार्य स्वामीजी यांनी अध्यक्षस्थान भूषविले. यामध्ये समुद्राल लक्ष्मणय्या (तिरुपती), डॉ. एम. महांतय्या स्वामी (हैदराबाद), पं.एन.एन. रेवणसिद्धान्ती (नंद्याळ), मार्गम बसवराजू (हैदराबाद) यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. या चर्चासत्राचे अध्यक्षस्थान के. प्रताप (तिरुपती) यांनी भूषविले होते.

दुपारच्या चर्चासत्रात पं. सांबशिव शर्मा (विकाराबाद), डी.एस. मोहन (बेंगळूरु), रुद्राक्षमठम् प्रभुलिंग शास्त्री (मेहबुब नगर), के. प्रताप (तिरुपती) यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. पं. एन. एन. रेवणसिद्धान्ती या सत्राचे अध्यक्ष होते.

२६ तारखेला सकाळी कन्नड वीरशैव चर्चासत्रात डॉ. एस. विद्याशंकर (बेंगळूरु), डॉ. पंचाक्षरी हिरेमठ, डॉ. राजशेखर स्वामी (गोरटा) यांनी निबंधवाचन केले. प्रा. नागराज (बेंगळूरु) हे या सत्राचे अध्यक्ष होते. दुपारच्या चर्चासत्रात डॉ. संगमेश्वर सौंदत्तीमठ, को. रं. बसवराजू (तुमकूर), प्रो. एम.जी. नागराज, यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. प्रो. एन. बसवाराध्य (बेंगळूरु) हे या सत्राचे अध्यक्ष होते.

दि. २७ ला सकाळी 'विविध भाषांतील वीरशैव साहित्य' या विषयावरील चर्चासत्राला आरंभ झाला. त्यामध्ये डॉ. एम.शिवकुमार स्वामी, डॉ. राजशेखर स्वामी, पं. शिवप्पा खके, डॉ. के. प्रताप, डॉ. टी.बी. सिद्धलिंगय्या, डॉ. टी. शिवकुमार स्वामी यांनी शोधनिबंधांचे वाचन केले. २७ तारखेला सायंकाळी जगद्गुरू पंचाचार्यांच्या सान्निध्यात वीरशैव साहित्य संमेलनाचा समारोप झाला. यावेळी डॉ. एम.शिवकुमार स्वामी लिखित 'श्रीसिद्धान्तशिखामणी' या इंग्रजी ग्रंथाचे प्रकाशन झाले. त्यासोबतच काशीपीठाचे मराठी मुखपत्र 'विभूतिवैभव' (संपादक– डॉ. शे. दे. पसारकर) या त्रैमासिकाच्या विशेषांकाचेही प्रकाशन झाले. प्रा. आर.सी. हिरेमठ यांनी या कार्यक्रमाचे प्रास्ताविक केले.

संमेलनामध्ये झालेले ठराव सर्वांना वाचून दाखवण्यात आले आणि ते सर्वानुमते मंजूर करण्यात आले.

**पहिले अ.भा. वीरशैव मराठी साहित्य संमेलन**

श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानच्या वतीने अखिल भारतीय स्तरावर मराठी साहित्य संमेलने घेण्याचा निर्णय झाला आणि तसे कलम प्रतिष्ठानच्या घटनेत समाविष्ट करण्यात आले. त्यानुसार पहिले अखिल भारतीय मराठी वीरशैव साहित्य संमेलन म. बसवेश्वर महाविद्यालय, लातूर येथे दि. १८-१९ डिसेंबर २००४ रोजी मोठ्या थाटात पार पडले. वीरशैव साहित्याचे गाढे अभ्यासक डॉ. शे. दे. पसारकर, सोलापूर हे संमेलनाध्यक्ष होते. ॲड्. सांबप्पा गिरवलकर स्वागताध्यक्ष होते. प्राचार्य डॉ. सोमनाथ रोडे व त्यांच्या सर्व सहकाऱ्यांनी अत्यंत कौशल्याने संमेलनाचे नियोजन केले होते. महात्मा बसवेश्वर शिक्षण संस्था, लातूर ही निमंत्रक संस्था होती, तर महाराष्ट्र वीरशैव सभा, पुणे; अ.भा. मराठी वीरशैव साहित्य मंडळ, नागपूर व वीरशैव साहित्य संशोधन मंडळ, सोलापूर ह्या सहभागी संस्था होत्या.

सकाळी महात्मा बसवेश्वर चौकातून संमेलनस्थळापर्यंत ग्रंथदिंडी काढण्यात आली. दिंडीतील पालखीत श्रीसिद्धान्तशिखामणी, परमरहस्य, श्रीलक्ष्मणगाथा, जन्म हा अखेरचा व शून्य संपादने असे पाच ग्रंथ ठेवण्यात आले होते. महात्मा बसवेश्वर महाविद्यालयातील प्रांगणात उभारलेल्या सभामंडपाला 'संतशिरोमणी मन्मथस्वामी नगर' असे नाव देण्यात आले होते. या नगरीला 'डॉ. चंद्रशेखर कपाळे महाद्वार' व चन्नप्पा वारद महाद्वार' अशी दोन महाद्वारे केली होती. व्यासपीठाला धर्मवीर देशिकेंद्र महाराजांचे नाव देण्यात आले होते.

ग्रंथदिंडीत आणि साहित्यसंमेलनात श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी व श्रीकेदारजगद्गुरू रावल भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी या दोन जगद्गुरूंचे सान्निध्य लाभले होते. ६३ व्या अ. भा. साहित्य संमेलनाचे अध्यक्ष व मराठी संतसाहित्याचे थोर अभ्यासक

डॉ. यू.म. पठाण यांनी दीपप्रज्वलन करून संमेलनाचे उद्घाटन केले. यावेळी ष.ब्र. रेणुक शिवाचार्य, मंद्रूप, ष.ब्र. श्रीकंठ शिवाचार्य, नागणसूर, ष.ब्र. नंदिकेश्वर शिवाचार्य, पूर्णा, शांतवीरलिंग शिवाचार्य, औसा व ष.ब्र. माजलगावकर महाराज या शिवाचार्यांसह अनेक शिवाचार्य आणि डॉ. सुधाकर मोगलेवार, नगराध्यक्ष डॉ. जनार्दन वाघमारे, श्री. शांतितीर्थ स्वामी, प्रा. विश्वनाथ हजारे इत्यादी अनेक मान्यवर उपस्थित होते. उद्घाटकांचे व स्वागताध्यक्षांचे भाषण झाल्यानंतर संमेलनाध्यक्ष डॉ. शे. दे. पसारकर यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात वीरशैव मराठी साहित्याचा संपूर्ण आढावा घेऊन त्याची वैशिष्ट्ये सांगितली. त्याचबरोबर या अभ्यासक्षेत्रात कोणकोणती आव्हाने आहेत याचेही मूलगामी विवेचन केले. या संमेलनात झालेली चर्चासत्रे पुढील प्रमाणे-

सकाळचे चर्चासत्र : विषय- वीरशैव मराठी साहित्य : स्वरूप आणि विशेष. अध्यक्ष- डॉ. सुधाकर मोगलेवार. प्रमुख पाहुणे- श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य परांडकर महाराज. निबंध व निबंधवाचक : वीरशैवांचे ओवीग्रंथ -अशोक मेनकुदळे (यवतमाळ); वीरशैवांची स्फुट रचना -शि. बा. स्वामी (उदगीर); वीरशैव मराठी साहित्यातील समन्वयविचार -डॉ. शिवशंकर उपासे (आजरा, कोल्हापूर); सांख्य व वीरशैव : तुलनात्मक अध्ययन -डॉ. बा. म. चमके (लातूर).

सायंकालीन सत्र : विषय- सामाजिक व धार्मिक चर्चा. प्रमुख पाहुणे- श्री ष.ब्र. पंडिताराध्य शिवाचार्य स्वामी, अध्यक्ष - प्रा. विश्वनाथ हजारे. निबंध आणि निबंधवाचक- वीरशैव समाज : उपेक्षा आणि अपेक्षा -डॉ. सूर्यकांत घुगरे (बार्शी); उद्याच्या सम्यक समाजाला वीरशैवाशिवाय पर्याय नाही -डॉ. वासुदेव मुलाटे (औरंगाबाद); वीरशैव पंचपीठे : परंपरा व कार्य -राजशेखर स्वामी (गोरटा). या सत्रामध्ये ह.भ.प. गहिनानाथ महाराज, श्री तुकाराम चिवडे (विभुते महाराज), माजी आमदार श्री. गंगाधर पटणे (बिलोली) श्री. डी.बी. लोहारे गुरुजी (अहमदपूर), डॉ. सुरेश चौधरी (परळी), श्री. काका कोयटे (कोपरगाव) व श्री. अशोक कुरझटकर (नागपूर)

या मान्यवरांचे मार्गदर्शन झाले. रात्री सांस्कृतिक कार्यक्रम झाला.

दि. १९ रोजी सकाळचे पहिले सत्र : विषय– वीरशैव वचनसाहित्य. प्रमुख अतिथी– श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य साखरखेर्डेकर, अध्यक्ष– डॉ. चंद्रकांत देऊळगावकर. निबंध व निबंधवाचक– कन्नड वचनसाहित्य : महत्त्व व उपयोगिता –राजेंद्र जिरोबे (उदगीर); तेलुगू भाषेतील वीरशैव साहित्य –लक्ष्मीनारायण बोल्ली (सोलापूर); म. बसवेश्वरांचे राजकीय चिंतन –डॉ. आर. बी. साबळे (नांदेड); बसवादी शरण–शरणी यांच्या वचनांतील परिकल्पना –बसवराज तंबाके (बसवकल्याण); म. बसवेश्वर आणि वीरशैव तत्त्वज्ञान –प्रा. एस.बी. शेटे (नांदेड).

सकाळचे दुसरे सत्र : विषय– वीरशैव मराठी साहित्य : काल, आज आणि उद्या. प्रमुख अतिथी– श्री ष.ब्र. नीळकंठ शिवाचार्य धारेश्वरकर. अध्यक्ष– डॉ. भी. शि. स्वामी (औसा). निबंध व वाचक– वीरशैव मराठी वाङ्मयाचे संशोधन –डॉ. श्यामा घोणसे (पुणे); अन्य भाषांतील वीरशैव वाङ्मयाचा मराठी अनुवाद –डॉ. वैजनाथ फास्के (लातूर); वीरशैव नियतकालिके : स्थिती व गती –शांतितीर्थ स्वामी (औरंगाबाद); वीरशैव साहित्यातील वैश्विकता –रे. रा. मगाई (सोलापूर); वीरशैव मराठी साहित्य व संस्कृत साहित्य –पं. शिवप्पा खके (चारठाणा, परभणी); लिं. श्रीकाशीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींचे वीरशैव साहित्यात योगदान –श्री ष.ब्र. शिवानंद शिवाचार्य हिरेमठ (तुमकूर); वीरनाथ महाराजांचे वाङ्मयीन कार्य –डॉ. विनय अपसिंगकर (लातूर).

दुपारचे सत्र : विषय– वीरशैव साहित्यातील स्त्रियांचे योगदान. अध्यक्ष– डॉ. श्यामा घोणसे (पुणे), प्रमुख अतिथी– डॉ. विजया तेलंग (कलबुर्गी). या परिसंवादात डॉ. शोभा कराळे (पंढरपूर), सौ. महानंदा खके (चारठाणा) सौ. शालिनी दोडमनी (उगार) यांनी आपले विचार व्यक्त केले. वरील सर्व सत्रांचे सूत्रसंचालन श्री. रमेश चिल्ले (लातूर), प्रा. एस. एस. स्वामी (लातूर), प्रा. कमलाकर कबाडे (लातूर), रेवणसिद्ध वाडकर (सोलापूर) व प्रा. उमादेवी मिरजगावे (लातूर) यांनी नेटकेपणाने केले.

सायंकाळी खुले अधिवेशन झाले. श्रीकाशीजगद्गुरू व श्रीकेदारजगद्गुरू महास्वामीजींचे या अधिवेशनाला सान्निध्य लाभले होते. संमेलनाध्यक्ष डॉ. शे. दे. पसारकर यांच्या अध्यक्षतेखाली सोलापूर विद्यापीठाचे कुलगुरू डॉ. इरेश स्वामी, औरंगाबाद मराठवाडा विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. शिवराज नाकाडे यांनी आपले विचार व्यक्त केले. संमेलनाध्यक्ष डॉ. शे. दे. पसारकर यांचे समारोपाचे अत्यंत हृदयस्पर्शी भाषण झाले. त्याचे श्रोत्यांनी टाळ्यांच्या प्रचंड गजरात स्वागत केले. श्रीकेदारजगद्गुरू आणि श्रीकाशीजगद्गुरू यांची आशीर्वचने झाली. खुल्या अधिवेशनात सर्वानुमते काही ठराव संमत करण्यात आले. ते असे–

१. महाराष्ट्र शासनाने म. बसवेश्वर जयंती साजरी करण्याचा व त्यांचे छायाचित्र शासकीय कार्यालयांत लावण्याचा निर्णय घेतल्याबद्दल शासनाचे अभिनंदन; २. मराठी संतसाहित्य शासनाकडून प्रकाशित व्हावे; ३. शालेय व विद्यापीठीय पाठ्यपुस्तकांत वीरशैव मराठी साहित्याचा समावेश करावा; ४. सोलापूर विद्यापीठास सिद्धरामेश्वर किंवा म. बसवेश्वर यांचे नाव द्यावे; ५. कन्नड वचनसाहित्याचे मराठीत व मराठी वीरशैव साहित्याचे कन्नडमध्ये भाषांतर करावे; ६. वीरशैव स्वतंत्र धर्म असून वीरशैवांना अल्पसंख्य म्हणून जाहीर करून त्या सवलती देण्यात याव्यात.

हे सर्व ठराव टाळ्यांच्या प्रचंड गजरात संमत करण्यात आले व वीरशैव मराठी साहित्याच्या या पहिल्या ऐतिहासिक संमेलनाचे सूप वाजले.

### दुसरे अ.भा. वीरशैव मराठी साहित्य संमेलन

दुसरे अ.भा. वीरशैव मराठी साहित्य संमेलन श्रीपलसिद्ध बृहन्मठ, साखरखेर्डा (जि. बुलढाणा) येथे २५ व २६ मे २००८ रोजी पार पडले. श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य महाराज अहमदपूरकर यांच्या अध्यक्षतेखाली संपन्न झालेल्या या संमेलनात ग्रंथदिंडी, विविध विषयांवरील परिसंवाद व मुलाखतींचे आयोजन करण्यात आले होते. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी, वाराणसी आणि श्रीउज्जयिनी जगद्गुरू मरुळसिद्ध शिवाचार्य महास्वामीजी यांचे पवित्र सान्निध्य या संमेलनास लाभले होते.

संतांच्या आणि ग्रंथांचा जयजयकार करीत ग्रंथदिंडीत हजारो लोक सहभागी झाले होते. वेदान्ताचार्य श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी साखरखेर्डेकर यांच्या मार्गदर्शनाखाली संमेलन व्यवस्थित पार पडले.

सकाळच्या उद्घाटन सत्रात स्वागताध्यक्ष अशोक दादा मोदे यांनी वीरशैव बांधवांचे आणि साहित्य रसिकांचे स्वागत केले. संमेलनाचे उद्घाटन उज्जयिनी महास्वामीजींच्या अमृतहस्ते करण्यात आले. पूर्व संमेलनाध्यक्ष डॉ. शे. दे. पसारकर यांनी नूतन संमेलनाध्यक्ष डॉ. शिवलिंग शिवाचार्य यांच्याकडे अध्यक्षपदाची सूत्रे सोपविली. याप्रसंगी शे. दे. पसारकरलिखित 'जगद्गुरू पलसिद्ध' या तीन अंकी संगीत नाटकाचे प्रकाशन महास्वामीजींच्या अमृतहस्ते करण्यात आले. संमेलनाध्यक्ष डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी यांनी वीरशैव साहित्याची वैशिष्ट्यपूर्ण नोंद घेत या साहित्याच्या अभ्यासकांविषयी गौरवोद्गार काढले. समारंभाचे सूत्रसंचालन अनिल सर्जे यांनी केले.

उद्घाटन समारंभानंतर 'मन्मथस्वामी आणि त्यांची प्रभावळ' या विषयावर परिसंवाद झाला. डॉ. शे. दे. पसारकर अध्यक्षस्थानी होते. निबंध व वाचक- मन्मथस्वामींचे प्रबोधनकार्य -डॉ. शिवशंकर उपासे (आजरा), लिंगेश्वर व बसवलिंग- शि. बा. स्वामी मानखेडकर (उदगीर), संतकवी शिवदास -डॉ. वैजनाथ फास्के (लातूर), महादेव प्रभू -डॉ. अपर्णा जिरवणकर (औरंगाबाद), उत्तरकालीन अभंगकार -डॉ. शोभा कराळे (पंढरपूर).

दुसरा दिवस, सकाळचे सत्र : विषय- श्रीलक्ष्मण गाथा : एक चिंतन. अध्यक्ष- डॉ. सुधाकर मोगलेवार (नागपूर). निबंध व वाचक- लक्ष्मणगाथेतील जगद्गुरू पलसिद्ध दर्शन -पं. शिवाप्पा खके (चारठाणा), लक्ष्मणगाथेतील समन्वयविचार -डॉ. सुहास पुजारी (सोलापूर), लक्ष्मणगाथा आणि वारकरी संतकाव्य -डॉ. सतीश बडवे (औरंगाबाद), लक्ष्मण महाराजकृत शिवभक्त कथा -डॉ. भी. शि. स्वामी (औसा), लक्ष्मणगाथेतील रूपके -डॉ. विनय अपसिंगकर (लातूर).

दुसरे सत्र : विषय– वीरशैव मराठी साहित्यातील विविधता व वीरशैव ग्रंथकार. अध्यक्ष– डॉ. शिवशंकर उपासे (आजरा). निबंध व वाचक– वीरशैव मराठी वाङ्मयातील म. बसवेश्वर –डॉ. शे. दे. पसारकर (सोलापूर), खेचर विसाकृत शडूस्छळी –डॉ. श्यामा घोणसे (पुणे), वीरशैवांचे लोकसाहित्य –डॉ. प्रवीण कारंजकर (वर्धा), सोलापूरकर शिवदास – अनिल सर्जे (सोलापूर), वीरशैव साहित्यातील स्त्रियांचे योगदान –सौ. महानंदा खके (चारठाणा), वीरशैवांची स्फुट रचना –विद्या पुणेकर (पुणे), वीरशैव आणि वेदान्त –डॉ. बा. म. चमके (पुणे).

नंतर मुलाखतीचे सत्र झाले. शिलालेख संशोधक आनंद कुंभार, सोलापूर यांची प्रकट मुलाखत डॉ. सुहास पुजारी, सोलापूर यांनी घेतली. या मुलाखतीला श्रोत्यांचा उत्स्फूर्त प्रतिसाद लाभला. डॉ सुधाकर मोगलेवार यांची मुलाखत डॉ. शे. दे. पसारकर व अनिल सर्जे यांनी घेतली. त्यानंतर श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांची मुलाखत डॉ. शे. दे. पसारकर व डॉ. श्यामा घोणसे यांनी घेतली. या मुलाखतींना श्रोत्यांचा चांगला प्रतिसाद मिळाला. संमेलनाध्यक्ष डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी अहमदपूरकर यांची मुलाखत पं. शिवाप्पा खके गुरुजी यांनी घेतली. यावेळी व्यासपीठावर साखरखेर्ड्याच्या पलसिद्ध मठाचे अधिपती वेदान्ताचार्य सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी आणि ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी धारेश्वरकर हे उपस्थित होते. संमेलनाच्या समारोपात प्रा. विश्वनाथ हजारे व बाबुराव मठपती यांनी मनोगत व्यक्त केले. संमेलनाध्यक्षांनी समारोप केला. हजारो श्रोत्यांच्या उपस्थितीत दुसरे वीरशैव मराठी साहित्य संमेलन मोठ्या उत्साहात पार पडले. सर्वसंमतीने काही ठराव पारित केल्यानंतर या संमेलनाचे सूप वाजले.

**तिसरे अ.भा. वीरशैव मराठी साहित्य संमेलन**

श्री विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठान, वाराणसी यांच्या वतीने तिसरे अ.भा. वीरशैव मराठी साहित्य संमेलन दि. २३ व २४ जानेवारी २०१० रोजी धारेश्वर (ता. पाटण, जि. सातारा) येथे वीरशैव साहित्याचे अभ्यासक

डॉ. भी. शि. स्वामी यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले. ष.ब्र. श्रीगुरू नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी धारेश्वरकर यांचे मार्गदर्शन या संमेलनास लाभले होते. यावेळी प्रमुख अतिथी म्हणून संतसाहित्याचे अभ्यासक डॉ. यू. म. पठाण, डॉ. अशोक कामत, विभागप्रमुख, संत नामदेव अध्यासन पुणे विद्यापीठ, पुणे, सोलापूर विद्यापीठाचे माजी कुलगुरू डॉ. इरेश स्वामी व लातूरचे प्राचार्य डॉ. सोमनाथ रोडे हे उपस्थित होते. पाटण पंचायत समितीचे सभापती सत्यजित पाटणकर हे स्वागताध्यक्ष होते.

ग्रंथदिंडीने कार्यक्रमाचा प्रारंभ झाला. डॉ. यू. म. पठाण यांच्या शुभहस्ते दीपप्रज्वलन होऊन कार्यक्रमाचे उद्घाटन झाले. निमंत्रकांचे मनोगत, प्रमुख अतिथींची भाषणे, स्वागताध्यक्षांचे भाषण व संमेलनाध्यक्ष डॉ. भी. शि. स्वामी यांचे अध्यक्षीय भाषण पार पडले. डॉ. स्वामी यांनी आपल्या अध्यक्षीय भाषणात वीरशैव साहित्याची आजवर खूप उपेक्षा झाली आहे असे स्पष्ट करून यापुढे कशाप्रकारे या साहित्याचे संशोधन झाले पाहिजे याचे मार्गदर्शन केले.

दोन दिवसांच्या या संमेलनात विविध परिसंवाद आयोजित करण्यात आले होते. विषय व अभ्यासकांची नावे पुढीलप्रमाणे–

सिद्धरामेश्वरविषयक मराठी वाङ्मय –डॉ. अनिल सर्जे, सोलापूर; लक्ष्मणमहाराजकृत शिवभक्तकथा –प्रा. शंकर धडके, अक्कलकोट; भावंडीबाईची अभंगवाणी –डॉ. शोभा कराळे, पंढरपूर; वीरशैवांचे प्रबंधप्रकल्प –डॉ. शिवशंकर उपासे, आजरा; परमरहस्याची संपादने –पं. शिवाप्पा खके, चारठाणा; वीरशैवांचे शिवपाठ –सौ. महानंदा खके, चारठाणा; वीरशैवांची पदरचना व गीतरचना –विद्या पुणेकर, पुणे; शिवदासांची अभंगवाणी –डॉ. वैजनाथ फास्के, लातूर; म. बसवेश्वरांचे प्रबोधनकार्य –डॉ. सोमनाथ रोडे, लातूर; मन्मथस्वामींची प्रभावळ –शांतितीर्थ स्वामी, औरंगाबाद; गंगाधर स्वामी वडांगळीकरांचे साहित्य –शिवानंद बुदले, उमरगा; कन्नड–मराठी भावबंध –डॉ. विजया तेलंग, कलबुर्गी; सिद्धरामेश्वरांच्या वचनांतील कल्पनावैभव –डॉ. सुहास पुजारी, सोलापूर;

लक्ष्मण महाराजकृत श्रीसिद्धेश्वरमाहात्म्य –डॉ. विनय अपसिंगकर, लातूर.

यावेळी शिलालेख संशोधक श्री. आनंद कुंभार, सोलापूर, ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य धारेश्वरकर महाराज व शांतितीर्थ स्वामी यांच्या प्रकट मुलाखती घेण्यात आल्या. डॉ. सुहास पुजारी, डॉ. शोभा कराळे यांनी मुलाखती घेतल्या. अनिल सर्जे, विद्या पुणेकर व एस. जी. हिरेमठ यांनी सत्रांचे सूत्रसंचालन केले. समारोपसत्राचे प्रमुख अतिथी डॉ. शे. दे. पसारकर व संमेलनाध्यक्ष डॉ. भी. शि. स्वामी यांच्या भाषणांनी संमेलनाची सांगता झाली. या संमेलनात मोठ्या प्रमाणात श्रोतृवर्ग उपस्थित होता.

**श्रीकाशीजगद्गुरू विश्वाराध्य वीरशैव विद्यापीठाच्या परीक्षा**

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी जिज्ञासूंना आणि विद्यार्थ्यांना धर्मतत्त्वांचे ज्ञान व्हावे यासाठी 'श्रीकाशीजगद्गुरू विश्वाराध्य वीरशैव विद्यापीठा'ची स्थापना केली. स्वतः महास्वामीजी या विद्यापीठाचे कुलपती आहेत. वीरशैव सिद्धान्त प्रबोध, वीरशैव सिद्धान्त प्रवीण आणि वीरशैव सिद्धान्त पंडित अशा तीन परीक्षा या विद्यापीठाद्वारे १९९७ पासून संपूर्ण महाराष्ट्रात घेतल्या जात आहेत. या परीक्षांचे मुख्य कार्यालय सोलापूर येथे असून या परीक्षांसाठी अभ्यासकांकडून पाठ्यपुस्तके लिहून घेण्यात आली आहेत. ही पुढीलप्रमाणे–

**वीरशैव सिद्धान्त प्रबोध परीक्षा**

१. वीरशैवधर्माचा स्थूल इतिहास –डॉ. चंद्रशेखर कपाळे
२. अष्टावरण –डॉ. शे. दे. पसारकर
३. वीरशैव संतवाणी –संपा. : रे. रा. मगाई, ल. सि. हनगंडी, शे. दे. पसारकर

**वीरशैव सिद्धान्त प्रवीण परीक्षा**

१. वीरशैव पंचपीठे –डॉ. चंद्रशेखर कपाळे
२. पंचाचार –पं. शिवाप्पा खके

३. वीरशैवांची स्फुट कविता —शांतितीर्थ स्वामी

**वीरशैव सिद्धान्त पंडित परीक्षा**

या परीक्षेसाठी काशीपीठाकडून प्रकाशित झालेले वीरशैव साहित्यावरील प्रबंध आणि ग्रंथ नेमले जातात. प्रत्येक परीक्षेसाठी तीन प्रबंध नेमले जाऊन त्यात वेळोवेळी बदल केला जातो. ते प्रबंध व ग्रंथ पुढीलप्रमाणे—

१. वीरशैव संतकवी बसवलिंग : चरित्र व वाङ्मय —डॉ. चंद्रशेखर कपाळे

२. लक्ष्मण महाराज : व्यक्ती व वाङ्मय —डॉ. भी. शि. स्वामी

३. श्रीमन्मथशिवलिंगकृत परमरहस्य —डॉ. शे. दे. पसारकर

४. वीरशैवांचे मराठी-हिंदी वाङ्मय —डॉ. श्यामा घोणसे

५. मन्मथस्वामी : व्यक्ती आणि वाङ्मय —डॉ. चंद्रकांत देऊळगावकर

६. वीरशैव मराठी अभंगकविता —डॉ. शोभा कराळे

७. मराठी काव्यातील शिवदैवत-दर्शन —डॉ शिवशंकर उपासे

८. विदर्भातील वीरशैव संप्रदाय : ग्रंथकार व वाङ्मय —डॉ अशोक मेनकुदळे

९. वीरशैव संतकवी शिवदास : एक अभ्यास —डॉ. वैजनाथ फास्के

१०. वीरनाथ महाराजांची अभंगवाणी —डॉ. विनय अपसिंगकर

११. परमरहस्य —श्रीमन्मथस्वामी

१२. अभंगामृत —रेवणसिद्ध परंडकर महाराज

१३. म्हणे मन्मथशिवलिंग —स्वाती साखरकर कराळे

या परीक्षांना उत्स्फूर्त प्रतिसाद मिळाला. विद्यार्थी व जिज्ञासू स्त्री-पुरुष अशा हजारो लोकांनी या परीक्षा दिल्या आहेत. पहिल्या दोन परीक्षांत उत्तीर्ण झाल्यानंतर तिसरी पंडित परीक्षा देता येते. परंतु बी.एस्सी., बी.कॉम., बी.ए. झालेला कोणीही पदवीधारक पहिल्या दोन परीक्षा न देता तिसऱ्या पंडित परीक्षेला बसू शकतो. मुंबई, नागपूर, पुणे, नाशिक, बीड, परळी, चिपळूण, सोलापूर, लातूर इत्यादी महाराष्ट्रातील अनेक ठिकाणी परीक्षाकेंद्रे असून दरवर्षी या परीक्षा घेतल्या जातात. कोणत्याही धर्माची, वंशाची,

जातीची व वयाची व्यक्ती या परीक्षा देऊ शकते. सोलापुरात अनेक मुस्लिम विद्यार्थी–विद्यार्थिनींनी सुद्धा पहिल्या दोन परीक्षा दिल्या आहेत.

या परीक्षांची सर्व जबाबदारी विद्यापीठाचे पहिले सचिव रेवणसिद्ध राचप्पा मगाई यांनी अनेक वर्षे उत्तम प्रकारे सांभाळली. ते लिंगैक्य झाल्यानंतर शिवशरण कंबाळेमठ यांनी ही जबाबदारी निष्ठेने सांभाळली. अलीकडे तेही लिंगैक्य झाले असून श्रीकाशीमहास्वामीजी लवकरच नवीन सचिवाची नियुक्ती करतील आणि या परीक्षा पुन्हा सुरळीतपणे यानंतरही निश्चित पार पडतील.

## काशीपीठातर्फे विविध महाराजांना प्रशस्ती प्रदान

**१. बाबामहाराज सातारकर :** महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध कीर्तनकार बाबा महाराज सातारकर यांना दि. ५.३.२०११ रोजी महाशिवरात्रीच्या पर्वकाळी त्यांनी काशीक्षेत्री महाशिवरात्रीच्या दिवशी ‘शिवमहिमा’ या विषयावर अत्यंत सुंदर कीर्तन करून जमलेल्या हजारो भाविकांना मंत्रमुग्ध केल्यामुळे काशीजगद्गुरू चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी ‘कीर्तनचक्रवर्ती’ ही प्रशस्ती आणि काशी विश्वेश्वर मंदिराचे सुवर्णशिखराची प्रतिमा देऊन गौरवान्वित केले. त्या दिवशी धर्मसभेत काशी हिंदू विश्वविद्यालय संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालय आणि विविध महाविद्यालयांतील अनेक विद्वान उपस्थित होते.

**२. श्री ह.भ.प. गुरुबाबा महाराज :** औसा येथील वीरनाथ मल्लनाथ संस्थानचे अधिपती श्री ह.भ.प. गुरुबाबा महाराज यांना ‘चक्रीभजन चक्रवर्ती’ आणि ‘धर्मभास्कर’ अशा दोन उपाधी वेगवेगळ्या प्रसंगी देण्यात आल्या. तसेच त्या संस्थानचे निष्ठावंत महाराज पंढरपूरचे विठ्ठल रुक्मिणी मंदिराचे सह अध्यक्ष श्री. गहिनीनाथ महाराज यांना ‘गुरुचरणकमलचंचरीकः’ अशी उपाधी प्रदान करण्यात आली.

## उत्तर भारत राज्यामध्ये काशी जगद्गुरूंचा धर्मप्रचार दौरा

उत्तर भारतातील राजस्थान, हरियाणा, पंजाब या भागांमध्ये अनादी कालापासून वीरशैव जंगम समाज निवास करून आहे. गेल्या अनेक वर्षांपासून

वीरशैव धर्माच्या मूलाधारापासून विभक्त झाल्यामुळे त्यांना वीरशैव धर्माबद्दल माहिती नसल्यामुळे ते इकडे तिकडे भटकत होते. दि. १.८.२०११ ते १२.८.२०११ पर्यंत राजस्थान येथील करौली जिल्ह्यामधील हिंडोनमध्ये १२ दिवसांचे महास्वामीजींचे श्रावणमास तपोनुष्ठान संपन्न झाले. त्यावेळी राजस्थानातील विविध जिल्ह्यांतून जंगम समाज त्या अनुष्ठानात सहभागी झाला होता. जंगम बटूंना महास्वामीजींच्या सान्निध्यात बेळंकीचे श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य आणि औसा हिरेमठ संस्थानचे श्री ष.ब्र. शांतवीरलिंग शिवाचार्य यांच्याकडून अय्याचार विधी करण्यात आला. या १२ दिवसांच्या अनुष्ठानामध्ये ५००० पेक्षा अधिक जंगम स्त्रीपुरुषांनी इष्टलिंगदीक्षा घेतली. याप्रसंगी १२.८.२०११ दिवशी महास्वामीजींचा ६४ वा वाढदिवस खूप मोठ्या प्रमाणात साजरा करण्यात आला. त्यावेळी अखिल भारतीय वीरशैव महासंमेलन घेण्यात आले होते. त्यामध्ये कर्नाटक, आंध्र, महाराष्ट्र आणि उत्तर भारतातील हरियाणा, पंजाबमधील वीरशैवसुद्धा उपस्थित होते. महास्वामीजींच्या वाढदिवसाच्या निमित्ताने राजस्थान जंगम समाजाने ५६ भोगांचे प्रदर्शन करून सर्वांना तो प्रसाद वाटण्यात आला.

त्यानंतर महास्वामीजींनी हरियाणा येथील कुरुक्षेत्र जिल्ह्यातील पेहवा क्षेत्री सरस्वती नदीच्या काठी असलेल्या प्राचीन जंगमवाडी मठामध्ये निवास करून त्या प्रदेशातील अनेक गावांमध्ये प्रचारदौरा केला आणि लिंगदीक्षा प्रदान केली. सध्या राजस्थान, हरियाणा, पंजाब या सर्व राज्यांमध्ये महास्वामीजींच्या वारंवार धर्मप्रचारामुळे तेथील लोकांच्या मनामध्ये धर्मजागृती झाली असून सर्व जंगम समाज इष्टलिंगदीक्षा धारण करून वीरशैवधर्माच्या सर्व नियमांचे पालन करतात. उत्तर भारतातील राज्यांमध्ये पहिल्यांदा काशीजगद्गुरू महास्वामीजींनी दौरा करून तेथील जंगम वीरशैवांना मूल वीरशैवधारेमध्ये आणून मोठी धर्मजागृती केली आहे.

**मतदानाविषयी जागरूकता**

भारत देश प्रजासत्ताक देश आहे. प्रजा ही या देशाची प्रभू असून सत्तापरिवर्तन करण्याचा त्यांना अधिकार आहे. म्हणून त्यांच्या हाती

मतदानाचा अधिकार दिलेला आहे. या मतदानाचा अधिकार कोणी चुकवू नये असे महास्वामीजी सर्वत्र आवर्जून सांगतात. उत्तर भारतामध्ये ज्यावेळी लोकसभा आणि विधानसभा यांचे मतदान असते त्यावेळी महास्वामीजी कुठेही असले तरीही मतदानाच्या वेळेवर पोहोचून मतदान करतात, हे एक त्यांचे वैशिष्ट्य होय.

**काशी नरेश आणि काशी जगद्गुरूंची भेट**

काशीचे राजघराणे आणि काशीजंगमवाडी मठ यांचा संबंध इ.स. ५७४ पासून आहे. त्यावेळी तत्कालीन राजा जयनंददेव यांनी काशीजगद्गुरूंना भूदान केले होते. त्यानंतर १९१८ साली येथे जगद्गुरू पंचाचार्य संमेलन झाले असताना तत्कालीन काशीनरेश प्रभुनारायण सिंह यांनी पंचाचार्यांचे दर्शन घेतले. त्यांच्या उत्सवासाठी आपले हत्ती दिले होते आणि मूल कागदावर लिहून दिलेले दानपत्र ताम्रपत्रावर कोरून दिले होते.

यानंतर २०१० मध्ये नवरात्रीच्या पर्वावर गंगानदीच्या पलीकडे असलेल्या रामनगर येथे चालेलेली रामलीला पाहण्यासाठी सध्याचे काशीनरेश श्री. अनंत नारायण सिंह यांनी काशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांना निमंत्रित केले होते. महास्वामीजी राजभवनात आल्याबरोबर काशीनरेश अनंत नारायण सिंह यांनी महास्वामीजींचे विधिवत् स्वागत केले. महास्वामीजींनी सुद्धा त्यांना काशीपीठाचा गौरव समर्पित केला. त्यावेळी त्यांचे चि. अनिरुद्ध नारायण सिंह आणि प्रद्युम्न नारायण सिंह या दोघांनाही महास्वामीजींनी आशीर्वाद दिला. त्यानंतर काशीनरेश अंबारीने सुशोभित असलेल्या एका हत्तीवर बसले आणि महास्वामीजी सुद्धा अंबारीने सजविलेल्या दुसऱ्या हत्तीवर विराजमान झाले. दोघांनी रामलीला पाहिली. हे दृश्य काशी आणि रामनगरवासियांसाठी आणि जमलेल्या लाखो लोकांसाठी एक अत्यंत आनंदाचा क्षण होता.

**काशी हिंदू विश्वविद्यालयात वीरशैव आगम अध्यासनाची स्थापना**

इ.स. १९८४ मध्ये संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त अध्ययनपीठ सुरू झाले. काशी हिंदू विश्व-

विद्यालयामधील संस्कृतविद्या धर्मविज्ञान संकाय या विभागामध्ये वेद, वेदान्त, न्याय, व्याकरण, मीमांसा आदी विषयांचे अध्ययन होत होते. १९९८ साली धर्मागम असा एक विभाग प्रारंभ झाला. त्या विभागाचे तत्कालीन अध्यक्ष डॉ. कमलेशदत्त त्रिपाठी यांच्या अध्यक्षतेखाली १०.८.१९९८ रोजी चाललेल्या अध्ययनबोर्डाच्या मिटिंगमध्ये प्रो. कृष्णकांत चतुर्वेदी, प्रो. सुधांशु शेखरशास्त्री, प्रो. रामनिवास तिवारी, डॉ. कमलेश झा, डॉ. कृष्णकांत शर्मा सर्वांनी विचारविमर्श करून सर्व संमतीने वीरशैव आगमांचा अध्ययनामध्ये समावेश करण्याचा निर्णय घेतला. या धर्मागम विभागामध्ये वीरशैव आगमांचे एक अध्यासन स्थापन करण्यात आले. हा विषय घेऊन शास्त्री आणि आचार्य असा पाच वर्षांचा कोर्स स्वीकृत झाला.

काशीपीठाच्या शैवभारती शोधप्रतिष्ठानकडून प्रसिद्ध झालेले पारमेश्वरागम, चंद्रज्ञानागम, कारणागम, सूक्ष्मागम, मकुटागम, श्रीसिद्धान्तशिखामणी, अनुभूसूत्र, लिंगधारणचंद्रिका, श्रीकरभाष्य, तसेच काशीजगद्गुरूंचे पीएच.डी शोधप्रबंध श्रीसिद्धान्तशिखामणी समीक्षा आणि महास्वामीजींचा डी.लीट्. प्रबंध शक्तिविशिष्टाद्वैत तत्त्वत्रयविमर्शः असे सर्व ग्रंथ पाठ्यग्रंथ म्हणून स्वीकृत करण्यात आले. या वीरशैव आगम अध्यासनामध्ये शास्त्री आणि आचार्य परीक्षा उत्तीर्ण केल्यानंतर त्याच अध्यासनामध्ये पुढील संशोधनाची सुद्धा सोय आहे. १२ वी मध्ये संस्कृत घेऊन उत्तीर्ण झालेले विद्यार्थी या अध्यासनामध्ये शास्त्री वर्गात प्रवेश घेऊन पुढील अध्ययन करू शकतात. या अध्यासनाची स्थापना १९९८ साली झाली असून आतापर्यंत अनेक विद्यार्थ्यांनी शास्त्री आणि आचार्य या पदव्या प्राप्त केल्या. काही विद्यार्थी संशोधनसुद्धा करीत आहेत. विश्वविद्यालयात अध्ययनपीठ स्थापण्याचे काम तितकेसे सोपे नसते. तरी देखील महास्वामीजींनी आपल्या वैयक्तिक प्रभावामुळे वीरशैव अध्ययन पीठ स्थापून काशी हिंदू विश्वविद्यालयात वीरशैव धर्मध्वज फडकाविला.

अशाप्रकारे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी १९८९ पासून, काशीपीठारोहण केल्यापासून आजपर्यंत ३० वर्षे अनेक

लोककल्याणकारी योजना आखून अमलात आणल्या आहेत. कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र, मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश आणि उत्तर भारतातील अनेक गावांत तसेच नगरांत कन्नड, मराठी, हिंदी भाषांत 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर प्रवचने करून धर्मजागृती केली आहे. याशिवाय १९९७ मध्ये काशीक्षेत्रात १०० दिवसांचा धार्मिक कार्यक्रम आखून कोटी बिल्वार्चन करून, लक्षावधी भक्तांना काशीयात्रा करण्याची संधी उपलब्ध करून दिली. त्याप्रमाणे २००१ मध्ये त्यांनी काशीपीठात केलेल्या अतिरुद्राभिषेक आणि कोटी दीपोत्सव या कार्यक्रमांनी पीठाच्या इतिहासात एक पर्व निर्माण केले.

या वर्षी त्यांनी ७२ वर्षे पूर्ण करून ७३ व्या वर्षात पदार्पण केले. श्रीकाशीमहास्वामीजींच्या षष्ठ्यब्दीपूर्तीनिमित्त पीठात मोठ्या प्रमाणावर गुरुवंदना कार्यक्रम आयोजित केला होता. हा कार्यक्रम दि. १४.८.२००७ पासून २९.११.२००७ पर्यंत १०८ दिवस चालला. या संदर्भात श्रीमहास्वामीजींनी भक्तांच्या उदार देणग्यांमधून निर्माण केलेल्या श्री जगद्गुरू पंचाक्षर भक्तनिवास, श्री जगद्गुरू वीरभद्र स्मृतिभवन आणि श्री जगद्गुरू विश्वेश्वर भक्तनिवास यांचे समान पीठाचार्यांच्या अमृतहस्ते उद्घाटन केले आहे.

आज काशीपीठात भक्तांसाठी उत्तम निवासव्यवस्था, महाप्रसादाची व्यवस्था करण्यात आली आहे. म्हणून भक्तगण निरंतर काशीपीठास येतच राहतात. याप्रमाणे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या या ३० वर्षांच्या कालावधीत काशीमहापीठाचा जंगमवाडी मठ नूतन रूपात उभा राहिला आहे. यासाठी पीठाच्या पूर्वाचार्यांचा अनुग्रह-आशीर्वादच कारणीभूत आहे, असे महास्वामीजी म्हणतात.

**लोककल्याणासाठी चातुर्मास कार्यक्रम**

लिं. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा पुण्याराधना रौप्यमहोत्सव व श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा पीठारोहण रौप्यमहोत्सव या निमित्ताने दि. ७.७.२०१४ ते ११.११.२०१४ पर्यंत चातुर्मासात विविध धार्मिक अनुष्ठानाचा कार्यक्रम

संपन्न झाला. या कार्यक्रमामध्ये विश्वशांतीसाठी लक्ष कुंभोत्सव, कुंभाभिषेक, द्वादशकोटी महामंत्र जपयज्ञ, कोटी रुद्राक्षार्चना, कोटी बिल्वार्चना, कोटी दीपोत्सव, श्रीसिद्धान्तशिखामणी (संस्कृत), श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत आणि परमरहस्य आदी धर्मग्रंथांचे पारायण हा कार्यक्रम अत्यंत वैभवाने संपन्न झाला.

दि. ७.७.२०१४ सोमवार रोजी प्रात:काळी ६.४९ ते ७.०३ या कर्कलग्नाच्या शुभ नवांशामधील कार्यक्रमात उज्जयिनीजगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी व काशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांनी सान्निध्यस्थान भूषविले होते. अब्बेतुमकूरू विश्वाराध्य सिद्धसंस्थानमठाचे श्री ष.ब्र. डॉ. गंगाधर शिवाचार्य स्वामीजींनी दीपप्रज्वलन करून उद्घाटन केले. कोकटनूर आणि मांजरी काडसिद्धेश्वरमठाचे श्री ष.ब्र. गुरुशांतलिंग देशिकेंद्र शिवाचार्य स्वामीजी यांनी जपयज्ञाचे नेतृत्व सांभाळले होते. प्रतिदिवशी पहाटे ५ ते ६– गंगानदीतून उत्सवपूर्वक अग्रोदक आणणे, सकाळी ६ ते ८.३०– महामंत्र जपयज्ञ, सकाळी ९ ते ११– मठातील विश्वनाथलिंगाला कुंभाभिषेक व जगद्गुरू महास्वामीजींच्या इष्टलिंगाला कुंभाभिषेकपूर्वक रुद्राभिषेक, दुपारी ११ ते १२– बिल्वार्चना आणि रुद्राक्षार्चना, दुपारी १२– महामंगलारती, दुपारी ३ ते ४– सुवासिनींकडून श्रीयंत्राला कुंकुमार्चना, सायं. ४ ते ७– श्रीसिद्धान्तशिखामणी, श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत, श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा, आणि परमरहस्य ग्रंथांचे पारायण, सायंकाळी ७ ते ९– धर्मसभा., रात्री ९ ते ९.३०– दीपोत्सव व तुलाभार व रात्री १० वाजता महाप्रसाद, असा हा चातुर्मासातला दैनंदिन कार्यक्रम होता.

दि. ८.७.२०१४ रोजी श्रीसिद्धान्तशिखामणी पारायण सप्ताहाचा शुभारंभ झाला. १२.७.२०१४ रोजी गुरुपौर्णिमेच्या निमित्ताने विशेष कार्यक्रम करण्यात आले. दि. ९.८.२०१४ रोजी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा ६८ वा जन्मदिनोत्सव साजरा करण्यात आला. दि. २७.९.२०१४ रोजी लिं. जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा

पुण्याराधनेचा रौप्यमहोत्सव साजरा करण्यात आला. दि. ३.१०.२०१४ रोजी विजयादशमीचा विशेष कार्यक्रम व दि. २३.१०२०१४ रोजी काशीपीठामध्ये प्रतिवर्षाप्रमाणे पारंपरिक महालक्ष्मी, महासरस्वती पूजन करण्यात आले. दि. ६.११.२०१४ रोजी त्रिपुरारी पौर्णिमेनिमित्त विशेष कार्यक्रम झाला. दि. ९ आणि १० नोव्हेंबर २०१४ रोजी आंतरराष्ट्रीय वीरशैव चर्चासत्र घेण्यात आले. दि. १०.११.२०१४ रोजी अखिल भारतीय शिवाचार्य संमेलन, दि. ११.११.२०१४ रोजी जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या पीठारोहणाचा रौप्यमहोत्सव करण्यात आला. उज्जयिनी व श्रीशैल जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात हा कार्यक्रम संपन्न झाला.

दि. ८.७.२०१४ ते १४.७.२०१४ पर्यंत संस्कृत 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाचे पारायण झाले. या पारायणामध्ये हावेरी जिल्ह्यातील बंकापूर येथील विविध महिला मंडळांनी भाग घेतला होता. दि. १५.७.२०१४ ते २१.७.२०१४ पर्यंत सौ. कविता गुरुसिद्धय्या हिरेमठ, धारवाड यांच्या मार्गदर्शनाखाली संस्कृत श्रीसिद्धान्तशिखामणीचे पारायण पार पडले. २२.७.२०१४ ते २८.७.२०१४ पर्यंत बेळंकीचे श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य हिरेमठ आणि औसा हिरेमठ संस्थानचे श्री ष.ब्र. शांतवीरलिंग शिवाचार्य स्वामी यांच्या नेतृत्वाखाली 'श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत' ग्रंथाचे पारायण झाले. दि. ३.९.२०१४ ते ९.९.२०१४ पर्यंत श्री ष.ब्र. प्रभुदेव शिवाचार्य माढेकर, श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य औंधकर, बार्शी यांच्या मार्गदर्शनाखाली 'परमरहस्य' ग्रंथाचे पारायण झाले. १०.९.२०१४ ते १६.९२०१४ पर्यंत श्री ष.ब्र. शिवानंद शिवाचार्य वाळवेकर आणि श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्य वाईकर यांच्या मार्गदर्शनाखाली परमरहस्य पारायण संपन्न झाले. दि. १७.९.२०१४ ते २३.९.२०१४ पर्यंत माढेकर आणि औंधकर महाराजांच्या मार्गदर्शनाखाली पारायण संपन्न झाले. दि. २४.९.२०१४ ते १४.१०.२०१४ पर्यंत उदगीरच्या सौ. जयश्री व्यंकटप्पा खेळगे आणि श्री उद्धवमहाराज हैबतपूरे यांच्या मार्गदर्शनाखाली ३ सप्ताह झाले. दि. १५.१०२०१४ ते

२१.१०.२०१४ पर्यंत श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य धारेश्वर यांच्या मार्गदर्शनाखाली परमरहस्य पारायण संपन्न झाले. दि. २२.१०.२०१४ ते २८.१०.२०१४ पर्यंत श्री ष.ब्र. मुक्तेश्वर शिवाचार्य वेळापूरकर आणि श्री ष.ब्र. शिवशंकर शिवाचार्य नेरपिंगळाईकर यांच्या मार्गदर्शनाखाली परमरहस्य पारायण पूर्ण झाले.

**श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा पारायण**

दि. ५.११.२०१४ ते ७.११.२०१४ पर्यंत श्री. काशीनाथ गुंडप्पा सर्जे सोलापूर यांच्या मार्गदर्शनाखाली 'श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथे'चे पारायण उत्तम रीतीने पूर्ण झाले.

**महास्वामीजींचा ६८ वा जन्मदिवस महोत्सव**

दि. ९.८.२०१४ रोजी श्री जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा हैदराबाद येथील मलकमपेठ वीरशैव सेवासमाज आणि सर्वप्रांतीय भक्तांकडून महास्वामीजींचा ६८ वा जन्मदिवस कुंभांचे मंगलस्नान, महास्वामीजींची इष्टलिंगपूजा, पादपूजा, विश्वाराध्य लिंगोद्भव मूर्तीला लक्ष रुद्राक्षार्चना करून संपन्न झाला. संध्याकाळी धर्मसभा उत्तम रीतीने पार पडली.

नटराज क्रीडा कला प्रतिष्ठान, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा १४ वा वर्धापन महोत्सव दि. १६.९.२०१४ रोजी संपन्न झाला. त्यावेळी त्या प्रतिष्ठानचे अध्यक्ष श्री. महेश स्वामी यांच्या ५० व्या वाढदिवसानिमित्ताने काशीपीठाकडून श्री. महेश स्वामींना राष्ट्रीय गौरव पुरस्कार प्रदान करण्यात आला.

**शिवयोग विज्ञान शिबिर**

दि. ६.११.२०१४ रोजी गुळेद्गुड्डचे योगाचार्य श्री. बसवराज हडगली यांनी शिवयोग विज्ञान शिबिरात मार्गदर्शन केले.

**आंतरराष्ट्रीय चर्चासत्र**

दि. ९ आणि १० नोव्हेंबर २०१४ रोजी काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी आणि शैवभारती शोधप्रतिष्ठान, जंगमवाडी मठ, वाराणसी यांच्या संयुक्त विद्यमाने 'वीरशैव धर्म व दर्शन : उगम आणि विकास' या विषयावर

आंतरराष्ट्रीय वीरशैव चर्चासत्र संपन्न झाले. यामध्ये भारत, नेपाळ, रशिया व इतर राष्ट्रांतील विद्वान आणि भारतातील विविध प्रांतांतील शिवाचार्य सहभागी झाले होते.

**अखिल भारतीय शिवाचार्य संमेलन**

दि. १०.११.२०१४ रोजी काशी श्रीशैल उज्जयिनी जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात 'धर्मप्रचारकार्यात शिवाचार्यांचे योगदान : काल आज आणि पुढील दिशा' या विषयावर अनेक शिवाचार्यांची व्याख्याने झाली. या संमेलनात १०० पेक्षा अधिक शिवाचार्य उपस्थित होते.

**श्रीकाशीजगद्गुरू महास्वामीजींचा पीठारोहण रौप्य महोत्सव**

**विश्व वीरशैव महासंमेलन**

दि. ११.११.२०१४ रोजी जगद्गुरू उज्जयिनी, श्रीशैल आणि श्रीकाशी महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात हा समारंभ वैभवाने संपन्न झाला. यावेळी देशी व विदेशी १६ भाषांमधील श्रीसिद्धान्तशिखामणीच्या अनुवादग्रंथांचे विधिवत् लोकार्पण झाले. या समारंभामध्ये पंजाबचे राज्यपाल शिवराज पाटील, अखिल भारतीय महासभेचे अध्यक्ष डॉ. शामलोरू शिवशंकरअप्पा, पुण्याच्या भारत फोर्ज कंपनीचे अमित कल्याणी वसौ. सुनीता कल्याणी हे उपस्थित होते. या समारंभात कर्नाटक, महाराष्ट्र, तेलंगणा, आंध्र, तमिळनाडू, केरळ, मध्यप्रदेश, उत्तरप्रदेश, हरियाणा, राजस्थान, पंजाब, गुजरात, ओरिसा, पश्चिम बंगाल आणि जम्मू काश्मीर या सर्व राज्यांतील वीरशैव सभेचे अध्यक्ष आणि पदाधिकारी तसेच नेपाळ, रशियातील वीरशैव सुद्धा उपस्थित होते.

**'श्रीसिद्धान्तशिखामणी'चे विविध भाषांत अनुवाद**

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या आज्ञेवरून देश-विदेशांतील विद्वानांनी 'श्रीसिद्धान्तशिखामणी' ग्रंथाचा विविध भाषांत अनुवाद केला असून तो काशीपीठाच्या वतीने प्रकाशित करण्यात आला आहे. हे अनुवाद पुढीलप्रमाणे:-

०१. डॉ. चंद्रशेखर महास्वामीजी, वाराणसी (उ.प्र.) – कन्नड
०२. डॉ. एम. शिवकुमारस्वामी, बेंगळूरु (कर्नाटक) – संस्कृत
०३. डॉ. एम. शिवकुमारस्वामी –''– – इंग्रजी
०४. डॉ. राजशेखरय्या, मैसूर (कर्नाटक) – संस्कृत
०५. डॉ. के. प्रताप, तिरुपती (आंध्र प्रदेश) – तेलुगू
०६. डॉ. गणेशन, पुडुच्चेरी (पाँडेचेरी) – तमिळ
०७. श्रीमती अंबिका अप्पुकुट्टन, तिरुवांकुरम, केरळ – मलयालम
०८. डॉ. चंद्रशेखर कपाळे, कलबुर्गी (कर्नाटक) – मराठी गद्य
०९. डॉ. शे. दे. पसारकर, सोलापूर (महाराष्ट्र) – मराठी ओवी
(श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत)
१०. डॉ. शे. दे. पसारकर –''– – मराठी अभंग
(श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा)
११. डॉ. शे. दे. पसारकर –''– – मराठी अनुष्टुभ्
(रेणुकगीताई)
१२. डॉ. राधेश्याम चतुर्वेदी, वाराणसी (उत्तरप्रदेश) – हिंदी
१३. डॉ. प्रभुनाथ द्विवेदी, वाराणसी (उत्तरप्रदेश) – अवधी
दोहा–चौपाई
१४. डॉ. हरिप्रसाद अधिकारी, वाराणसी (उत्तरप्रदेश) – नेपाळी
१५. डॉ. करुणा त्रिवेदी, अहमदाबाद (गुजरात) – गुजराती
१६. डॉ. प्रमोदिनी पंडा, पुरी (ओडिसा) – उडिया
१७. पं. शशिनाथ झा, दरभंगा (बिहार) – मैथिली
१८. डॉ. प्रवीणकुमार पांडेय, (बिहार) – भोजपुरी
१९. युलिया क्रावचेन्को (युक्रेन) – रशियन

याशिवाय या ग्रंथांवरील मराठी आशीर्वचने 'जन्म हा अखेरचा' (अनुवाद– शे. दे. पसारकर) व कन्नड 'प्रवचनप्रभे' (डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य) हे ग्रंथही प्रकाशित झाले असून याचा तेलुगू अनुवाद प्रा. मठम लिंगय्या यांनी केला आहे.

डॉ. ओमप्रकाश (जर्मन), डॉ. कु. चांदनी (जपानी) व डॉ. रामनिवास जंगम (हरियाणी) हे श्रीसिद्धान्तशिखामणी'चे त्या त्या भाषांत अनुवाद करीत आहेत. उर्दू, पंजाबी, चिनी, पर्शियन या भाषांत या ग्रंथाचा अनुवाद करण्याची योजना असून ब्रेल लिपीत देखील हा ग्रंथ रूपांतरित केला जात आहे.

**श्रीकाशीमहास्वामीजींचा परदेश दौरा**

श्रीकाशीमहास्वामीजींनी धर्मप्रचारासाठी परदेश दौरादेखील केलेला आहे. तो पुढीलप्रमाणे–

**हाँगकाँग :** येथील कन्नड संघ नामक संस्था कर्नाटकातून गेलेल्या कन्नडिगांनी स्थापन केलेली आहे. १ नोव्हेंबरला कर्नाटकात राज्य दिन साजरा केला जातो. तो येथील कन्नड संघातर्फे १ नोव्हेंबरनंतर येणाऱ्या पहिल्या रविवारी साजरा केला जातो. ७.११.२००९ रोजी आयोजित केलेल्या कन्नड राज्य दिनोत्सवात सहभागी होण्यासाठी श्रीकाशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांना आमंत्रित केले गेले. त्यांच्यासोबत गुळेद्‌गुड्ड येथील श्रीकृष्णाश्रमाचे श्री. बसवराज हडगली व त्यांच्या धर्मपत्नी, शाखापूर तपोवन मठाचे श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी, बळ्ळारी जिल्ह्यातील कोट्टूरचे चानकोटी पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी हे होते. कर्नाटक राज्य दिन समारंभाच्या उद्‌घाटनासाठी भारताचे राजदूत श्रीयुत रालटे सपत्नीक उपस्थित होते.

उद्‌घाटनानंतर अनेक सांस्कृतिक कार्यक्रम झाले. त्यानंतर श्रीकाशीमहास्वामीजींनी कन्नडमधून आशीर्वचन केले. हाँगकाँग, बँकॉक इत्यादी स्थळे पाहण्यासाठी महास्वामीजींचा त्या भागात १० दिवस निवास होता. हाँगकाँगमध्ये हास्पिटल्सऐवजी नागरिकांच्या आरोग्याची काळजी घेण्यासाठी योगकेंद्रे आहेत. वृद्धावस्थेत त्या देशात मुले सांभाळात नाहीत. म्हणून वृद्ध लोकदेखील योगकेंद्रात जाऊन आपल्या प्रकृतीची स्वत: काळजी घेतात. दुसऱ्यावर अवलंबून न राहता आपण स्वतःच निरोगी जीवन कसे जगावे याचा वस्तुपाठच या देशातील योगकेंद्रे देतात.

योगायोगाने ११.११.२००९ रोजी महास्वामीजींचा २१ वा पीठारोहण समारंभाचा वर्धापन दिन होता. येथील बॉडी वाईज योगकेंद्रात श्रीकाशीमहास्वामीजींचा २१ वा पीठारोहण वर्धानपन दिन साजरा करण्यात आला. त्या दिवशी कार्यक्रमात सर्व योगशिक्षिका हिरवा, लाल, निळा, पांढरा व पिवळा या रंगांच्या साड्या नेसून सहभागी झाल्या होत्या. तेथे एक प्रश्नोत्तराचा कार्यक्रम करण्यात आला. हा एक स्मरणीय अनुभव होता.

**मॉस्को :** येथील डॅनिश नामक एका योगशिक्षकाने काशी जंगमवाडी मठाने प्रकाशित केलेला 'चंद्रज्ञानागम' हा इंग्रजी ग्रंथ वाचला. त्यामुळे अत्यंत प्रभावित होऊन आपण हठयोगाबरोबच शिवयोगसाधना आणि लिंगपूजा केली पाहिजे असे त्याला वाटले. तो भारतात काशी जंगमवाडी मठात आला. त्यावेळी काशीमहास्वामीजी धनुर्मासाच्या निमित्ताने बेंगळूरु येथे होते. त्याने महास्वामीजींचे दर्शन घेऊन ८.१.२००1 रोजी लिंगदीक्षा घेतली. नंतर त्याने महाशिवरात्रीला काशीला येऊन आपली आई व इतर योगशिक्षकांनाही लिंगदीक्षा देवविली. अशा प्रकारे अनेक योगशिक्षक काशीपीठामध्ये येऊ लागले. त्याचे नाव बदलून त्याला महास्वामीजींनी त्याला 'दिनेश' हे भारतीय नाव दिले. नंतर त्याने आपल्या नियोजित वधूला आणले, तिला लिंगदीक्षा दिली आणि तिच्यासोबत भारतीय पद्धतीने विवाह केला. त्याच्यासोबत युक्रेनच्या यूलिया क्रावचेन्को नामक तरुणीनेही लिंगदीक्षा घेतली.

नंतर त्याने श्रीकाशीमहास्वामीजींच्या दौऱ्याचे आयोजन केले. १.७.२०1० रोजी महास्वामीजी मॉस्कोला गेले. तेथे १० तारखेपर्यंत त्यांचा मुक्काम होता. तेथील अष्टांग योगकेंद्रात २ तारखेपासून ४ तारखेपर्यंत श्रीमहास्वामीजींच्या आशीर्वचनांचे आयोजन केले होते. महास्वामीजींनी हिंदीमधून व्यक्त केलेले विचार यूलिया श्रोत्यांना रशियन भाषेमध्ये अनुवादित करून सांगत होती. त्यांच्याशी प्रश्नोत्तरे झाली. ७ तारखेला महास्वामीजींची इष्टलिंगपूजा झाली. तेथे येणाऱ्या शंभर योगशिक्षकांपैकी ८० योगशिक्षकांनी

महास्वामीजींकडून लिंगदीक्षा घेतली. २० योगशिक्षकांनी मंत्रदीक्षा घेतली. ६ ते ९ तारखेपर्यंत सेंट पीटर्सबर्गमधील योगकेंद्रामध्ये महास्वामीजींची आशीर्वचने झाली. तेथेही ५० जणांनी लिंगदीक्षा घेतली. पहिल्या दौऱ्यात १२० लोकांनी मॉस्को आणि पीटर्सबर्ग येथे लिंगदीक्षा घेतली.

त्यानंतर कु. यूलिया क्रावचेन्को ऊर्फ गौरी हिला 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा रशियन भाषेत अनुवाद करण्याची महास्वामीजींनी आज्ञा केली. तिने दोन वर्षे परिश्रम करून त्या ग्रंथाचा रशियन भाषेत अनुवाद केला. रशियातील महास्वामीजींचे भक्त वीरेश यांनी त्या ग्रंथाचे प्रकाशन केले. त्या ग्रंथाच्या लोकार्पणासाठी २५.५.२०१२ रोजी महास्वामीजी दुसऱ्यांदा मॉस्कोला गेले. तेथे त्या ग्रंथाचे महास्वामीजींच्या अमृतहस्ते लोकार्पण करण्यात आले. महास्वामीजींनी त्या सर्वांना पारायणपद्धती शिकविली.

दरवर्षी रशियामधून अनेक भक्त काशीला येत असतात. दरवर्षी मार्च-एप्रिल मध्ये गोकर्ण येथे रशियन भक्त येतात. त्यावेळी श्रीमहास्वामीजी तेथे जातात. महाबळेश्वर मंदिरात त्यांना दीक्षा देऊन त्यांचे प्रबोधन करण्यात येते. २००२ पासून २०२० पर्यंत या काळात ४०० पेक्षा अधिक रशियन वीरशैव झाले आहेत. तेथील लोकांनी रशियन वीरशैवांची एक स्वतंत्र संघटनादेखील केली आहे. त्याची एक वेबसाईट तयार करून ते नेहमी एकमेकांच्या संपर्कात राहतात.

दिनेशच्या घरी सगळे जमून आठवड्यातून एक दिवस सामूहिक लिंगपूजा करतात. श्रीसिद्धान्त-शिखामणीवर चर्चा करतात. अधूनमधून ते भारतात येत असतात. श्रीकाशीमहास्वामीजींनी रशियामध्ये नव्याने वीरशैवधर्माची स्थापना केली, असे म्हटल्यास अतिशयोक्ती होणार नाही. लिंगदीक्षेबरोबर रशियन लोकांनी श्रीरुद्राचे पठणदेखील चालू केले आहे. ही परंपरा यापुढे वर्धिष्णू होत राहणार आहे. रशियन भाषेत श्रीसिद्धान्तशिखामणीचा अनुवाद केल्याबद्दल यूलिया क्रावचेन्को ऊर्फ गौरी हिला महाशिवरात्रीच्या पर्वकाली 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विश्वभारती पुरस्कार' प्रदान करण्यात आला.

**श्रीसिद्धान्तशिखामणी ग्रंथदिंडी**

'श्रीसिद्धान्तशिखामणी' हा एक जागतिक दर्शनग्रंथ आहे. या ग्रंथातील दार्शनिक तत्त्वे आणि धर्माचरण हे सर्व लोकांना ज्ञात व्हावे या उद्देशाने श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी या ग्रंथाची पारायण प्रत तयार करण्याचा विचार केला. मूळ संस्कृत ग्रंथाचे विविध भाषांत अनुवाद करता यावेत यासाठी बेंगळूरुचे डॉ. एस. आर. सिद्धलिंगप्पा, डॉ. एम. शिवकुमार स्वामी, विद्वान बसवराजू आदी अनेक विद्वानांसोबत चर्चा केली. न्यास, ध्यान, माहात्म्य आदी सामग्रीची सिद्धता केली. त्यानंतर कन्नड भाषेतील पारायण ग्रंथ सिद्ध झाला.

३१.५.२०११ रोजी सिंदगी (जि. विजयपूर) येथील मठाध्यक्ष श्री ष.ब्र. सारंग प्रभुदेव शिवाचार्य महाराजांनी या ग्रंथदिंडीचा कार्यक्रम आयोजित केला. त्यावेळी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीशैलजगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी या दोघांनी 'श्रीसिद्धान्त-शिखामणी' ग्रंथ पालखीमध्ये ठेवून ती पालखी थोडा वेळ खांद्यावर घेतली. नंतर भक्तांनी ती पालखी घेतली आणि दोन्ही महास्वामीजी पालखीपुढे पायी चालले. ही वार्ता समजल्यानंतर प्रत्येक गावातील शिवाचार्यांनी अशा प्रकारच्या ग्रंथदिंडीचे आयोजन केले. गावोगावी श्रीकाशीजगद्गुरूंनी श्रीशैलजगद्गुरूंसह ग्रंथदिंडीत भाग घेतला. लोकांना पारायण पद्धती समजावून सांगितली आणि ग्रंथाचे फार मोठ्या प्रमाणावर वितरण केले. खेड्यापाड्यातील महिलासुद्धा ग्रंथपारायण करू लागल्या. हावेरी जिल्ह्यातील बंकापूर येथील महिला शुद्ध संस्कृतमध्ये ग्रंथपारायण करतात. हजारो महिला त्यात सहभागी होतात. धारवाडच्या सौ. कविता गुरुसिद्धय्या हिरेमठ यांनी स्वतः शिकून ग्रंथपारायणाचा गावोगावी प्रचार केला. या निमित्ताने लक्षावधी कन्नड ग्रंथ कर्नाटकातील घराघरांमध्ये पोहोचले. जानेवारी २०२० मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाच्या शतमानोत्सव समारंभात शंभर महिला संस्कृत ग्रंथपठण करणार आहेत.

कर्नाटकात या ग्रंथाचा प्रसार झाला त्याप्रमाणे महाराष्ट्रातही व्हावा, असा विचार मनात आल्यावर श्रीकाशीमहास्वामीजींनी वीरशैव मराठी साहित्याचे अभ्यासक डॉ. शे. दे. पसारकर यांना श्रीसिद्धान्तशिखामणी हा संस्कृत ग्रंथ ओवीबद्ध करावा अशी आज्ञा केल्यावर ते सपत्नीक काशीला आले आणि त्यांनी १७ सप्टेंबर २०१२ ते १९ नोव्हेंबर २०१२ या अवघ्या दोन महिन्यांच्या काळात या ग्रंथावर ३८११ ओव्यांचा 'श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत' नामक ग्रंथ रचला. त्याचे मुद्रण सांगलीच्या शिव ऑफसेट प्रिंटर्स यांच्याकडे झाले.

२० जानेवारी २०१३ रोजी सोलापूर येथे या ग्रंथाची प्रथम दिंडी काढण्यात येऊन भव्य प्रमाणावर प्रकाशन करण्यात आले. त्यावेळी श्रीकाशीजगद्गुरू, श्रीशैलजगद्गुरू, महाराष्ट्रातील सर्व शिवाचार्य, राजकीय व सामाजिक क्षेत्रांतील अनेक मान्यवर उपस्थित होते. लोकांनी मोठ्या प्रमाणावर या मराठी ग्रंथाची खरेदी केली.

त्यानंतर श्रीकाशीजगद्गुरू व श्रीशैलजगद्गुरू यांनी महाराष्ट्रभर या ग्रंथाची दिंडी काढली. सोलापूर ते नागपूरपर्यंत शहराशहरांत, प्रत्येक तालुक्यांत, गावागावांत ही ग्रंथदिंडी काढण्यात आली. त्यामुळे या ग्रंथाच्या लक्षावधी प्रती महाराष्ट्रातील भाविकांपर्यंत पोहोचल्या. महाराष्ट्रात ठिकठिकाणी आता या ग्रंथाची पारायणे होतात. लातूर येथे श्रावणमास अनुष्ठानात या ग्रंथाची हत्तीवरून मिरवणूक काढण्यात आली. श्रीकाशीमहास्वामीजींच्या पीठारोहणाच्या रौप्यमहोत्सव प्रसंगी श्रीमन्मथस्वामी 'परमरहस्य' या ग्रंथाबरोबर 'श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत' आणि श्री. शे. दे. पसारकर रचित 'श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा' व 'श्रीजगद्गुरू पंचाचार्य विजय' या ग्रंथांचे सामूहिक पारायण काशीपीठात करण्यात आले.

त्यानंतर महास्वामीजींना या ग्रंथावर मराठीत विनोबाजींच्या 'गीताई'प्रमाणे अनुष्टुभ छंदात रचना व्हावी असे वाटले. त्यांनी हे काम डॉ. शे. दे. पसारकर यांच्यावर सोपविले. हे अत्यंत कठीण काम त्यांनी गुरुकृपेच्या

बळावर पार पाडले. ३ मार्च २०१६ ते २ मे २०१६ या काळात काशीपीठात हे लेखन पूर्ण झाले. एकूण १३०१ मराठी श्लोक रचले गेले. या ग्रंथाला 'रेणुकगीताई' असे नाव दिले. त्याचेही प्रकाशन होऊन तो ग्रंथ लोकांपर्यंत पोहोचला. आता महाराष्ट्रातील वीरशैवांना श्रीसिद्धान्तशिखामणीचे मराठीतून पारायण करण्यासाठी ओवीबद्ध श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत, अभंगबद्ध श्रीसिद्धान्तशिखामणी अभंगगाथा आणि अनुष्टुभ छंदातील रेणुकगीताई असे तीन ग्रंथ उपलब्ध झाले आहेत.

डॉ. शे. दे. पसारकरांची ही काव्यसेवा पाहून प्रसन्न झालेल्या श्रीकाशी-महास्वामीजींनी त्यांना १७ जुलै २०१६ रोजी सोलापूर येथे भव्य समारंभात 'शिवकवी' ही सन्माननीय पदवी आणि एक लक्ष रुपयांचा गौरवनिधी काशीपीठातर्फे प्रदान केला. या तिन्ही ग्रंथांचे अनेक ठिकाणी व्यक्तिश: आणि सामूहिक पारायण केले जाते. त्यातील ओव्यांचा आणि अभंगांचा अनेक लोक आपल्या प्रवचनांत उपयोग करीत असतात. या ग्रंथनिर्माणकार्यात डॉ. पसारकरांसोबत त्यांच्या सुविद्य धर्मपत्नी सौ. उषा पसारकर यांचेही मोलाचे योगदान आहे.

नंतर कोट्टायम (केरळ) येथे या ग्रंथाच्या मलयालम् भाषेतील अनुवादग्रंथाची दिंडी काढून लक्षावधी केरळी वीरशैवांना त्याचे वितरण करण्यात आले. याप्रमाणे तेलुगू, नेपाळी इत्यादी भाषांतील ग्रंथाचे प्रकाशन आणि वितरण करण्यात आले. हे सर्व ग्रंथ पीडीएफ स्वरूपात काशीपीठातर्फे एका ॲपमध्ये उपलब्ध करून देण्यात आले आहेत.

# श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचा पूर्वेतिहास

जगात अत्यंत प्राचीन असणारे नगर म्हणजे काशी हे अविमुक्त क्षेत्र. भगीरथाच्या तपश्चर्येने गंगा उत्तरेकडून दक्षिणाभिमुख होऊन प्रवाहित झाली आणि काशीत येऊन पुन्हा उत्तराभिमुख होऊन वाहू लागली हे या क्षेत्राचे वैशिष्ट्य! गंगानदीच्या पश्चिम काठावर काशीनगरी आणि पूर्वेला विशाल असा मोकळा प्रदेश ही वास्तुशास्त्रानुसार अत्यंत महत्त्वाची गोष्ट आहे. पश्चिम दिशेला राजे–महाराजांनी बांधलेले घाट, उंचच उंच इमारती, पूर्व दिशेला विशाल असा मोकळा प्रदेश, या दोन्हीमध्ये उत्तरवाहिनी बनून वाहणारी अत्यंत पवित्र नदी. अशा वास्तू जेथे असतात तेथे त्याग, तपश्चर्या आणि ज्ञान प्राप्त होऊन मनाला शांती प्राप्त होते. असा एक अपूर्व योग काशीक्षेत्रास प्राप्त झाला आहे.

उत्तरवाहिनी गंगेत ब्राह्ममुहूर्तावर स्नान करून तिच्या काठावर बसून लिंगपूजा अथवा संध्यावंदन केल्याने सूर्याची पहिली किरणे त्या व्यक्तीवर अनायासे पडतात. अशा प्रकारे काशीक्षेत्रास एक नैसर्गिक वास्तुशास्त्राची अनुकूलता प्राप्त झाली आहे. कैलासातही नसणारी ही अनुकूलता काशीला असल्याने श्री विश्वेश्वर कैलास सोडून काशीला येऊन राहिला आहे. म्हणून याला 'अविमुक्त क्षेत्र' असे म्हणतात. 'ज्ञानमिच्छेतु शंकरात्' म्हणजे ज्ञान हे शिवाकडून अपेक्षिले पाहिजे या उक्तीनुसार ज्ञानदायक असणारा सर्वज्ञ, जगद्गुरू असणारा शिव येथे नित्य निवास करीत असल्याने हिला ज्ञाननगरी असे म्हणतात. काश्मीरपासून कन्याकुमारीपर्यंतचे भारतीय तसेच विदेशी उच्च विद्याध्ययनासाठी प्राचीन काळापासून काशीक्षेत्रास येऊन राहतात आणि येत असतात. वेदवेदान्ताच्या अध्ययनासोबत संगीत, नृत्यकला देखील येथे शिकविली जाते.

जगात कुठेही भाषेच्या माध्यमातून व्यासंग केला असला तरी तो काशीक्षेत्री येऊनच पूर्ण होतो. म्हणून दक्षिणेत जन्म घेतलेल्या शंकराचार्य आणि रामानुजाचार्य यांसारख्या विद्वान आचार्यांनी काशीक्षेत्री येऊनच उपनिषदांवर

आणि ब्रह्मसूत्रांवर भाष्ये लिहिली आहेत. ब्रिटीश, जर्मन लोकांनी येथे संस्कृतचा अभ्यास करून वेदांचा इंग्रजीत तसेच जर्मन भाषेत अनुवाद केले आहेत. एवढेच नव्हे तर मुसलमानांनी देखील संस्कृत भाषा शिकून उपनिषदांचा अभ्यास केलेली नगरी काशी होय. मॅक्समूलरसारख्या जगप्रसिद्ध विद्वानाने उपनिषदांचा अभ्यास केलेली नगरी म्हणजे काशी, अशी मॅक्समूलरने या विद्यानगरीची केलेली प्रशंसा लक्षात घेण्यासारखी आहे.

**विद्यानगरीत ज्ञानपीठ**

विश्वविख्यात अशा या विद्यानगरीत काशी येथे वीरशैव पंचपीठांतील एक पीठ श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन हे काशीइतकेच प्राचीन आहे. येथे ज्ञानार्जनासाठी येणाऱ्या वीरशैवधर्माच्या विविध मठाधिपतींना, शास्त्री-कलाकारांना अनादी काळापासून अनुकूल सुविधा देत आले आहेत. अनेक प्राचीन दस्तावेज मिळणे दुर्लभ झाले आहे. तरी मिळालेल्या प्राचीन अनेक दस्ताऐवजांनुसार काशीमहापीठात असणाऱ्या अध्ययन-अध्यापनाची व्यवस्था आणि येथे अध्ययन पूर्ण केलेल्या विद्यार्थ्यांच्या व्यक्तित्व आणि कर्तृत्वासंबंधी माहिती संकलित करण्याचा एक छोटासा प्रयत्न केला आहे.

काशी महापीठास आजवर ८५ जगद्गुरू होऊन गेल्याचे दस्तावेज या पीठात आहेत. बहुतेक काशीपीठास जगद्गुरू झालेले सर्वजण काशीच्या जंगमवाडी मठातच अध्ययन करीत होते असे लक्षात आले आहे. त्यामुळे काशी जंगमवाडी मठात अध्ययनाकरिता आलेल्या विद्यार्थ्यांना अन्न व निवास इ.आश्रय देऊन विद्यादान करण्याची काशीपीठाची परंपरा अत्यंत प्राचीन आहे, यात कुठलाही संदेह नाही.

**जंगमवाडी मठातील विद्यार्थ्यांचे दाखले**

काशीपीठाचे ८२ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी इ.स. १८८५ मध्ये काशी जंगमवाडी मठात अध्ययनासाठी येऊन १८९७ पर्यंत म्हणजे १२-१३ वर्षे अध्ययन करून इ.स. १९०७ मध्ये काशीपीठाचे जगद्गुरू झाले. ते परंपरागत संस्कृत विद्वान होते. इतकेच

नव्हे तर ऐतिहासिक प्रज्ञा असणारे होते. म्हणून तेव्हा त्यांना मिळालेले सर्व दस्तावेज संग्रहित करून प्रसिद्ध करण्याचे महत्कार्य त्यांनी केले. आपल्या आधीचे काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन केलेले तसेच आपले सहपाठी विद्यार्थी कुठे कुठे मठाधिपती झाले, शास्त्री झाले, ही माहिती गोळा करून ती प्रसिद्ध करून तेव्हाच त्याचा प्रचार आणि प्रसार त्यांनी केला. त्यांनी प्रसिद्ध केलेली ती माहिती मैसूरच्या 'पंचाचार्य प्रभा' आणि काशीपीठातर्फे प्रकाशित झालेल्या जाहिरातपत्रिकेत आजदेखील पाहायला मिळते. याशिवाय गुरुवर्गदर्पण, शिवयोग मंदिराचा बेळगु विशेषांक, पुण्यश्लोक वारद आणि बबलेश्वर शिवयोगी या सर्व ग्रंथांमधून काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन केलेल्या विद्यार्थ्यांचे दाखले पाहायला मिळतात. या सर्व दाखल्यांच्या आधारे जगद्गुरू, मठाधिपती, शास्त्री, कवी, कलाकार यांची नावे यापुढे नमूद केली आहेत.

इ.स. १८०१ मध्ये परमतपस्वी गर्गचे मडिवाळ शिवयोगी हे काशी जंगमवाडी मठात राहून, अध्ययन करून पुढे कर्नाटकात अत्यंत ख्यातनाम झाले. इ.स. १८५६ मध्ये काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन केलेले बळ्ळारी जिल्ह्यातील हरपनहळ्ळी तालुक्यातील गजापूर गावचे सूलिपल्ल देवर मठाचे वे.मू. शांतवीरय्या आणि सौ. पार्वतम्मा यांचे सुपुत्र गजापूर कोट्रपय्या शास्त्रीजी पुढे रंभापुरी पीठाचे ११६ वे पीठाधिपती होऊन श्री जगद्गुरू वृषभराजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी म्हणून ख्यात झाले.

बळ्ळारी जिल्हा कुडलगी तालुक्यातील तुंबरगुद्दी गावचे पं. विरूपाक्ष शास्त्रीजी इ.स. १८८१ मध्ये जंगमवाडी मठात राहून अध्ययन करून पुढे इ.स. १९०६ मध्ये उज्जयिनी महापीठाचे १०७ वे स्थिर पट्टाधिकार प्राप्त करून श्री १००८ जगद्गुरू चन्नबसव शिवाचार्य या नावाने ख्यातनाम झाले.

अशाच पद्धतीने पं. नीलकंठ शास्त्री, विजयपूर; पं. शंकरशास्त्री, हुब्बळी; पं. काशीनाथ शास्त्री, अब्बिगेरी; पं. पंचाक्षर शास्त्री, कोल्हापूर; पं. नंजुंडस्वामी, बेंगळूरु; पं. नागलिंग शास्त्री, सोलापूर; पं. सिद्धलिंग शास्त्री, सोलापूर; पं. सोमनाथ शास्त्री, तल्लूर; श्री संगनबसव स्वामीजी, हालकेरे;

चरमूर्ती स्वामी, गुळेदगुड्ड; श्री वीरभद्र शास्त्री, जालवाडिगी इ. काशी जंगमवाडी मठात राहून पांडित्य मिळवून प्रख्यात झाले.

याचप्रमाणे काशीत अध्ययन केलेले अनेक शास्त्रीजी सुप्रसिद्ध विरक्त मठाला आणि गुरुस्थल मठालाही अधिकारी झाले आहेत. त्यांच्यामध्ये बिन्नाळचे पं. जयदेवशास्त्री हे चित्रदुर्ग बृहन्मठास, पं. वीरप्पय्या शास्त्री, मंगळुरु हे हुब्बळी मूरुसाविर मठाला, पं. लिंग मरिदेवरू अनंतपूरच्या मुरघा विरक्त मठास, पं. भीमाशंकर शास्त्रीजी हे उमरावती गुरुस्थल मठास, पं. हुच्चप्पा देवरू हे कमतगी–हुच्चेश्वर विरक्त मठास, पं. चंद्रशेखर शास्त्रीजी हे अब्बिगेरीच्या गुरुस्थल मठास, पं. महालिंगशास्त्री, यमनूर हे कडेनंदी हळ्ळी येथील गुरुस्थलमठाला आणि पं. नंजुंड शास्त्रीजी, निडुमामिडि हे करबसव स्वामी मठास मठाध्यक्ष होऊन या सर्वांनी आपल्या कार्यकाळात खूप मोठी धर्मजागृती केली आहे.

याशिवाय वे.पं. गुरुमूर्ती शास्त्रीजी, बेनकनहळ्ळी हे बागलकोटच्या बसवेश्वर संस्कृत पाठशाळेचे, वे.पं. अप्पयशास्त्रीजी हे हावेरी पाठशाळेत, वे.पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी हे गदग पाठशाळेचे, वे.पं. रेवणसिद्ध शास्त्रीजी पडेकनूर हे अब्बिगेरीच्या शिवयोग मंदिराच्या संस्कृत पाठशाळेचे, वे.पं. जगदीश शास्त्रीजी नालवार आणि वे.पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी मणूर हे सोलापूरला श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेचे, वे.पं. वीरभद्र शास्त्रीजी कोंगवाड हे कोप्पळ शाळेचे, वे.पं. सोमनाथ शास्त्रीजी इटगी आणि वे.पं. शंकरशास्त्रीजी उमचिगी हे दोघे श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या पाठशाळेचे, वे.पं. जगन्नाथ शास्त्रीजी, कंपलि सांगत्रय पाठशाळेचे, वे.पं. बसवराज शास्त्रीजी कोडीकप्प हे हालकेरे पाठशाळेचे आणि पं. सदाशिव शास्त्रीजी हुक्केरी निडसोसी पाठशाळेचे हे सर्व प्राध्यापक जगन्मान्य झाले आहेत.

याच पद्धतीने वे.पं. उमापती शास्त्रीजी अज्जमपूर, वे.पं. चिदानंद शास्त्रीजी हरिहर, वे.पं. श्रीकंठ शास्त्रीजी नलवडी, वे.पं. चंद्रशेखर शास्त्री तेलगी, वे.पं. रुद्रप्पा शास्त्री तेलगी, वे.पं. शिवशंकर शास्त्री यलगोडू, वे.पं. चन्नबसव शास्त्री मुनवळ्ळी, वे.पं. नीलकंठ शास्त्री नंदीकोटकुरू, वे.पं. बापूशास्त्री

सेलू (महाराष्ट्र), वे.पं. बसवराज शास्त्री आलदकट्टी, वे.पं. राचोटशास्त्री इटगी, वे.पं. रुद्रप्पा शास्त्री बाडद, वे.पं. गुरुशांत शास्त्री शिकारीपूर, वे.पं. इंदुधर शास्त्री करडी, वे.पं. शंकरशास्त्री मरेगुद्दी, वे.पं. शंकरशास्त्री चिक्क बळ्ळापूर आणि वे.पं. गंगाधर शास्त्री कोंगवाड या सर्वजणांनी काशी जंगमवाडी मठात अध्ययन करून परतल्यानंतर आपापल्या क्षेत्रांत पाठ–प्रवचन–पुराणादी सांगून जीविका मिळवून धर्मजागृती केली आहे.

याप्रकारे वे.पं. गुरुसिद्ध देवरू यक्कुंडी, वे.पं. महादेव मरिदेवरू ममदापूर, वे.पं. चरमूर्ती स्वामीजी हूली, पं. श्रीकंठ शास्त्रीजी सूडी, वे.पं. उमापती शास्त्रीजी सूडी, वे.पं. काशीनाथ शास्त्रीजी नागनूरु, वे.पं. हरीश्वर शास्त्रीजी सुणकल् बिदरे, वे.पं. राजेश्वर शास्त्रीजी मल्लापूर, वे.पं. गौरीशंकर शास्त्रीजी मैसूर, वे.पं. नागभूषण शास्त्रीजी कोतबाळ, वे.पं. शिवलिंगदेवरू सावळगी, वे.पं. विरूपाक्ष शास्त्री कोंडगल, वे.पं. कलिगणनाथ शास्त्री पगडदिन्नी, वे.पं. सोमनाथ शास्त्री नांदेड, वे.पं. विश्वनाथ शास्त्री अप्सरी, वे.मू.पं. बसवराजशास्त्री दुडेरी, सांब मरिदेवरू जिंतूर, वे.पं. विश्वनाथ शास्त्री पुणे, वे.पं. संगमेश्वर शास्त्री मसगुप्पी आणि वे.पं. शिवशंकर शर्मा काप (कोंकण) इ. अनेक विद्वानांनी काशीक्षेत्री येऊन जंगमवाडी मठात राहून विविध शास्त्रांचे अध्ययन केले. नंतर आपापल्या भागात भविष्यात मठाधिपती होऊन, सुप्रसिद्ध शास्त्री होऊन त्यांनी वीरशैव समाजाचे जागरण केले आहे.

### गुरुकुलाचे नामकरण

काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन केलेले वरील पीठाचार्य, मठाधिपती तसेच शास्त्रीजींच्या नावाची यादी पाहिल्यास ज्ञानपीठाने एवढ्या विद्यार्थ्यांना आश्रय देऊन त्यांना ज्ञान देऊन आपले ज्ञानपीठ हे नाव सार्थ केले आहे. वर उल्लेखिलेले स्वामीजी तसेच विद्वानांप्रमाणे खूप लोक १९१८ पूर्वी काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन करून गेले आहेत.

हे लक्षात घेऊन काशीपीठाचे ८२ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी याविषयी सुदीर्घ विचार केला. विद्यार्थी जंगमवाडी मठात राहून अध्ययन करून गेले आहेत असे म्हणण्यापेक्षा

येथील गुरुकुलामध्ये अध्ययन करून गेले आहेत असे म्हणणे अधिक योग्य होईल. याप्रमाणे काशी जंगमवाडी मठात आणि कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र इ. प्रदेशांतील मठांत गुरुकुल, पाठशाळा सुरू कराव्यात अशी फार मोठी योजना तयार करून इ.स. १९१० मध्ये महाशिवरात्रीला धर्मसभेत 'श्रीकाशी वीरशैव विद्या धर्माभिवृद्धी फंड' नावाची संस्था स्थापून त्याला या पीठाकडून १०,००५ रु. आशीर्वादरूप दिले. या फंडासाठी निधी उभा करण्यासाठी तेव्हा श्रीपीठात अभ्यास करीत असलेले श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य पारगाव, श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य मालगाव, श्री म.नि.प्र. हुच्चेश्वर स्वामी कमतगी, श्री वे. गुरुसिद्ध देवरू एकुंडी, पं. सदाशिव शास्त्री अब्बिगेरी, पं. कलिगणनाथ शास्त्री, पगडदिन्नी आणि पं. फालाक्ष शास्त्री या सर्वांना समितीचे व्यवस्थापक सदस्य म्हणून घेऊन कार्य सुरू केले.

पुढे इ.स. १९१८ मध्ये काशी महापीठात आयोजित केलेल्या श्री जगद्गुरू पंचाचार्य संमेलनाचे स्मृतिरूप म्हणून श्री जगद्गुरू पंचाचार्यांच्या अमृतहस्ते दि. २३.३.१९१८ रोजी गुरुकुलाचे 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे विधिवत् नामकरण करण्यात आले. या गुरुकुलाने आधीपासून आणि नामकरणापासून आजपर्यंत अनेक विद्वानांना निर्माण करण्यात आपला महत्त्वाचा वाटा उचलला आहे. हे गुरुकुल स्थापनेच्या घटनेला १०० वर्षे पूर्ण झाली आहेत. त्याचा शतमानोत्सव आयोजित करून यानिमित्त एक स्मृतिग्रंथ प्रकाशित करण्यात आला आहे. या ग्रंथात इ.स. १९१८ पूर्वीच्या विद्यार्थ्यांचे आणि १९१८ मध्ये गुरुकुल स्थापनेनंतर अध्ययन करून गेलेल्या विद्यार्थ्यांचे दाखले विविध मार्गांनी संग्रहित करण्यात आले. येथे काही जणांची माहिती परिपूर्ण रूपात प्राप्त झाली आहे, तर काहींची माहिती अपूर्ण स्वरूपात मिळाली आहे. आणखी कितीतरी जणांची तरी माहिती न मिळाल्याने केवळ त्यांचा नामोल्लेख केला आहे. जेवढी माहिती उपलब्ध झाली तिचा यात समावेश करण्यात आला आहे. सध्या मिळालेल्या गुरुकुलातील विद्यार्थ्यांची माहिती त्यांच्या गुरुकुलात प्रवेश घेतलेल्या इ.स.च्या आधारे क्रमश: देण्यात आली आहे.

# श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल

## विद्यार्थ्यांचा परिचय

गुरुकुलाच्या नामकरणाआधी
इ.स. १९१८ पूर्वीचे विद्यार्थी
(क्र. १ ते ६०)
गुरुकुलाच्या नामकरणानंतर
इ.स. १९१८ ते २०२० पर्यंतचे विद्यार्थी
(क्र. ६१ ते ४२७)

## १. श्री मडिवाळ शिवयोगी

मु.पो. गरग, जि. धारवाड (कर्नाटक)



कित्तूरच्या तळ्याजवळ सापडलेल्या अनाथ शिशूचे कित्तूरचा राजा श्री. मल्लसर्ज आणि त्याची धर्मपत्नी रुद्रम्मा यांनी पालनपोषण केले. त्यावेळी श्री मुदिमडिवाळेश्वर स्वामीजी कित्तूरच्या कल्मठाचे अधिकारी होते. ते लिंगैक्य झाल्यानंतर त्यांच्या स्मरणार्थ या अनाथ शिशूचे कित्तूरच्या महाराजांनी मडिवाळेश्वर असे नामकरण केले. त्यावेळी कित्तूर कल्मठाच्या गादीवर श्री प्रभू स्वामीजी हे अधिपती होते. महाराजांनी स्वामीजींकडे या मुलाला सोपवून त्याचा विद्याभ्यास घेण्याची विनंती केली.

बाळ मडिवाळेश्वराने श्री प्रभू स्वामीजींच्या मार्गदर्शनाखाली प्राथमिक अभ्यास पूर्ण केला. मठातील विद्वान पंडित वेंगी चन्नबसवशास्त्री आणि पंडित रंगाचार्य यांच्याकडे संस्कृत भाषेचा अभ्यास केला. त्यांची तीव्र बुद्धिमत्ता पाहून श्री प्रभू स्वामीजींनी त्यांना पुढील शिक्षणासाठी काशीक्षेत्रास पाठविले. तेथील सुप्रसिद्ध श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासन जंगमवाडी मठात ७८ वे पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू प्रथम शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १८०१ मध्ये श्री मडिवाळेश्वरांनी प्रवेश घेतला.

मडिवाळेश्वरांनी काशी जंगमवाडी मठात राहून काशीतील विविध विद्वानांकडून व्याकरण, न्याय, अद्वैत वेदान्त इत्यादी शास्त्रांचा १० वर्षेपर्यंत अभ्यास केला. १८११-१२ च्या सुमारास ते कित्तूरला परतले. त्याचवेळी कल्मठाच्या श्री प्रभू स्वामीजींनी त्यांची मठाचे उत्तराधिकारी म्हणून नियुक्ती केली. काही काळानंतर श्री प्रभू स्वामी लिंगैक्य झाले. कित्तूरचे राजे श्री. शिवलिंग रुद्रसर्ज यांच्या मनात श्री मडिवाळेश्वराविषयी आकस असल्यामुळे त्यांना कल्मठाचे उत्तराधिकारी करू नये असे राजाला वाटत होते. त्यामुळे

राजाने ‘आपल्याला कल्मठाचे निरंजन पट्टाधिकारी करतो’ असे सांगून त्यांना ‘काशीला जाऊन गंगाजल घेऊन परत या’ असे सांगितले.

त्याप्रमाणे मडिवाळेश्वर काशीला गेले. ते परत येईपर्यंत शिवलिंग रुद्रसर्ज राजाने श्रीगुरुसिद्धदेव नामक बटूला कित्तूर कल्मठाचा पट्टाधिकारी नेमले. श्री मडिवाळेश्वर परत आल्यावर आपण फसविले गेलो हे त्यांच्या लक्षात आले. त्यावेळी त्यांनी ‘कित्तूर संस्थानचा नाश होऊ दे’ असा शाप दिला आणि विरक्त होऊन भारतातील पुण्यक्षेत्रांची यात्रा केली. यात्रेत अनेक विद्वानांशी शास्त्रार्थ करून त्यांचा पराजय करून त्यात ते विजयी झाले. परम तपस्वी अशा मडिवाळेश्वरांनी अनेक चमत्कार करून लोकांची संकटे दूर केली आणि प्रवास करीत ते पुन्हा कर्नाटकात परतले.

होसूर, बेळवडी, तडकोड इत्यादी गावांत त्यांनी मठांची स्थापना करून त्यांना सुक्षेत्र बनविले. भक्तांच्या अपेक्षेनुसार त्यांनी आपले उत्तरायुष्य गरग या गावी व्यतीत केले. शेवटच्या श्वासापर्यंत त्यांनी भक्तांना धर्ममार्गाचा उपदेश केला. दि. २८.२.१८८८ या दिवशी ते गरग येथे लिंगैक्य झाले.

म्हणून ते गरगचे श्री मडिवाळ शिवयोगी म्हणून ते प्रसिद्ध झाले. हल्ली या मठाचे मठाधिपती श्री म.नि.प्र. चन्नबसव स्वामीजी असून ते धार्मिक कार्यक्रमाबरोबर शैक्षणिक संस्थादेखील चालवीत आहेत.

---

परिचय : श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध स्वामीजी, कारंजे मठ, बेळगाव

२. **श्री नंजुंड शिवयोगी**

मु.पो. मतकुरू, ता. नेलमंगल,

जि. बेंगळूरु ग्रामांतर (कर्नाटक)



मतकुरूच्या श्री नंजुंडप्पा आणि सौ. नागम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १८२५ मध्ये श्री नंजुंड शिवयोगींचा जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून बेंगळूरुच्या महांत मठात राहून माध्यमिक अभ्यास करीत संस्कृत भाषा आणि वैदिक अध्ययन पूर्ण केले. १८४४ मध्ये थोरल्या बहिणीची मुलगी गौरम्मा हिच्याबरोबर त्यांचा विवाह झाला. वर्षभरात त्यांना कन्यारत्न प्राप्त झाले. काही वर्षांनंतर मतकुरू गावात श्री खारद स्वामीजी आले. ते शिवपूजेनंतर हिरव्या किंवा वाळलेल्या मिरच्यांबरोबर बिल्वपत्र व मीठ मिसळून ते वाटून तो प्रसाद ग्रहण करीत. त्यामुळे लोक त्यांना 'खारद स्वामीजी' (तिखट स्वामी) असे म्हणत. ते परम तपस्वी आणि सदाचरणी होते. त्यांनी मतकुरच्या गृहस्थाश्रमी नंजुंड शिवयोगींच्या सहवासात राहून वीरशैव तत्त्वाचे ज्ञान करून घेतले होते. पुढे शिवयोगींच्या मनात वैराग्यभावना अंकुरित झाली. प्रपंचाचा त्याग करून शिवयोगात आयुष्य व्यतीत करावे अशी प्रबळ इच्छा त्यांच्या मनात उत्पन्न झाली. लहान भाऊ श्री. चिक्कनन्नप्पा याच्यावर आपली एकुलती एक कन्या व पत्नी यांच्या उपजीविकेची जबाबदारी सोपवून योगसाधनेकरिता व उच्च अध्ययनाकरिता काशी-केदारला जातो असे सांगून त्यांनी काशीला प्रयाण केले. तत्कालीन काशीपीठाधीश श्री १००८ जगद्गुरू हरेश्वर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने इ.स. १८५५ मध्ये त्यांनी काशी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात वेद, आगम, वेदान्त व संस्कृत साहित्य यांचा अभ्यास करून त्यांनी पांडित्य प्राप्त केले. श्री जगद्गुरू हरेश्वर महास्वामीजींच्या कृपाछत्राखाली १५ वर्षे अध्ययन करून आपल्या भावाच्या विनंतीनुसार ते मतकुरला परतले.

काशीचे पंडित श्री नंजुंड शिवयोगीसोबत श्री आडवी स्वामीजींचा परिचय होऊन त्यांनी शिवयोगींना तुमकुरूला येण्याचे निमंत्रण दिले. त्यानुसार श्री नंजुंड शिवयोगींनी तुमकुरला येऊन श्री सिद्धगंगा मठात १८७० मध्ये संस्कृत पाठशाळा सुरू केली. ते स्वतःच त्या शाळेत अध्यापक झाले. पुढे त्यांनी संन्यास घेतला. नंजुंड शिवयोगींनी १. सुराभांडेश्वरु उपाख्यान, २. हालाहल : भक्षणीय कथा, ३. श्रीमद् अटवीश्वर गुरुभक्तिसार, ४. अटवीश्वर चरित्र, ५. अटवीश्वर गीतामंजरी अशा साहित्यकृतींची रचना केली आहे. १८८६ पासून १८९४ पर्यंतच्या कालावधीत हे ग्रंथ प्रकाशित झाले. इ.स. २००० मध्ये कर्नाटक शासनाच्या सहाय्याने या सर्व रचनांचे संपादन 'नंजुंड मतकुरु : कृति' या नावाने प्रसिद्ध करण्यात आले असून श्री कंबाळू सिद्धगंगय्या आणि लिंगराज हे या ग्रंथाचे संपादक आहेत. श्री नंजुंड शिवयोगी एक श्रेष्ठ कवी होते. आपल्या एका कवितेत काशीपीठाच्या श्री हरेश्वर जगद्गुरूंची त्यांनी अत्यंत भक्तिभावाने स्तुती केली आहे. त्याचा नमुना–

*जड तनुविनमानवनु बिडदे, गुरुलिंगज़ंगम...*
*...रक्षिसय्या हरिश गुरुवरने ।।३।।*

अशा प्रकारे मतकुरचे श्री नंजुंड शिवयोगी यांनी गृहस्थाश्रम स्वीकारल्या-नंतर काशीक्षेत्रात जाऊन प्रकांड पांडित्य संपादिले. चिंतनशील लेखक व कवी होऊन अनेक साहित्यकृतींची रचना करून ते प्रसिद्ध झाले. शेवटी संन्यास स्वीकारून शिवयोगी झाले. काशीपीठाचा एक विद्यार्थी आपल्या बहुमुखी प्रतिभेचा विकास करून तुमकूरच्या सिद्धगंगा मठाच्या संस्कृत पाठशाळेचा पहिला प्राध्यापक म्हणून प्रसिद्धीस आला. शेवटच्या श्वासापर्यंत शिवध्यान आणि सरस्वतीची सेवा करून १९२५ मध्ये ते लिंगैक्य झाले. त्यांची समाधी दोड्डबळ्ळापूरजवळ हुस्कुरू या गावी आहे.

---

परिचय : डॉ. बी. नंजुंडस्वामी, तुमकुरू

### ३. श्री १००८ जगद्गुरू वृषभराजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी

रंभापुरी पीठ (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे गजापूर (ता. हरपनहळ्ळी, जि. बळ्ळारी) या गावचे सूलिपल्ल देवरमठ. वे.मू. शांतवीरय्या व सौ. पार्वतम्मा यांच्या पुण्यगर्भी यांचा जन्म झाला. जन्मनाव कोट्रप्पय्या. जन्मगावी व हरपनहळ्ळी येथे त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले.

नंतर उच्च संस्कृत व्यासंगासाठी इ.स. १८७१ मध्ये ते काशीक्षेत्री गेले. तत्कालीन काशीपीठाधीश श्री जगद्गुरू हरेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीच्या विद्वानांकडून त्यांनी व्याकरण, न्याय, वेदान्त इत्यादी शास्त्रांचा पंधरा वर्षेपर्यंत परिश्रमपूर्वक अभ्यास केला. त्यांच्या पांडित्यामुळे त्यांना शास्त्री ही उपाधी प्राप्त झाली. लोक त्यांना 'वेदपंडित कोट्टुरेश्वर शास्त्रीजी गजापूर' असे संबोधू लागले.

काशीतील अध्ययन पूर्ण केल्यावर ते गजापूरला परत येऊन आपल्या भागात अनेक धार्मिक कार्यक्रम करू लागले. इ.स. १८९१ मध्ये शा. शके १८१३, खरनाम संवत्सरात श्रीमद् रंभापुरी वीरसिंहासनावर ११५ वे पीठाचार्य म्हणून त्यांची नियुक्ती झाली. त्यावेळी त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू वृषभराजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. श्री जगद्गुरू वृषभराजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी यांनी उत्तम रीतीने धर्मप्रबोधन केले. पुढे बिरुरू परिसरात धर्मजागृतीकरिता संचार करीत असताना प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते बिरुरू येथेच लिंगैक्य झाले. त्यांची समाधिक्रिया बिरुरू येथे करण्यात आली.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ६

## ४. श्री वेदपंडित फालाक्ष शास्त्रीजी हिरेमठ

मु.पो. बारडगी, जि. शिवमोग्गा (कर्नाटक)

हे बारडगी गावचे हिरेमठाचे होत. बालपणी संस्कृत अध्ययनासाठी १८८० मध्ये काशीक्षेत्री येऊन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. व्याकरण, अलंकार, धर्मशास्त्र अशा अनेक शास्त्रांमध्ये पांडित्य संपादन करून ते जंगमवाडी मठातच राहिले. यांची विद्वत्ता पाहून जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी काशीपीठाचे राजपंडित म्हणून त्यांचा सन्मान केला. सहृदयी, सरळ स्वभावी व प्रकांड पंडित असलेले शास्त्रीजी संस्कृत अध्ययनासाठी काशीपीठात येणाऱ्या विद्यार्थ्यांना पाठ-प्रवचन व मार्गदर्शन करीत असत.

पंडित फालाक्ष शास्त्रीजी यांनी पीठातील ताम्रपत्र, शिलालेख, दानपत्रे, भोजपत्रे आणि ताडपत्रे यांवर लिहिलेल्या मजकुराच्या आधारे काशीपीठात होऊन गेलेल्या आचार्यांची यादी व त्यांचा कार्यक्रम 'पट्टवल्लरी' या ग्रंथात प्रकाशित करून ती सर्वांना उपलब्ध करून दिली. जंगमवाडी मठात विद्यार्थ्यांसाठी एक ग्रंथालय सुरू करावे असा संकल्प विद्यार्थ्यांनी केल्यावर त्यांनी आपल्याकडील अमूल्य ग्रंथांचे मठात दान केले. अशा रीतीने पीठाच्या सेवेसाठी स्वतःचे जीवन समर्पित केलेले शास्त्रीजी काशीक्षेत्री लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. १०२

## ५. श्री वे.पं. मल्लिकार्जुन शास्त्री

गुरुस्वामी हिरेमठ,

मु. जैनापूर, जि. विजयपूर (कर्नाटक)



जैनापूरचा गुरुस्वामी हिरेमठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ आहे. पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी हे जैनापूर गुरुस्वामी हिरेमठाचे वे. उमापती व सौ. शिवपुजम्मा या माहेश्वरांच्या पुण्यगर्भी १८६३ मध्ये जन्मले. वयाच्या आठव्या वर्षी गुरुस्वामी हिरेमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींकडून त्यांनी माहेश्वर दीक्षा घेतली. गावातील श्रीमान गदगप्पा सरदेसाई यांनी स्थापन केलेल्या कन्नड शाळेत त्यांनी प्राथमिक अध्ययन केले. नंतर बळ्ळारीच्या सक्करी करडप्पांच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. गावातील शिष्यांच्या सहकार्याने उच्च शिक्षणासाठी त्यांनी काशीपीठात जाऊन श्रीकाशीपीठाधीश प्रथम वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १८८३ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथे व्याकरण, साहित्य आणि न्यायशास्त्र यांचा विभिन्न विद्वानांचे मार्गदर्शन घेऊन अभ्यास केला व त्यात पांडित्य प्राप्त केले. दहा–बारा वर्षे जंगमवाडी मठात राहून त्यांनी अध्ययन केले. श्री जगद्गुरू विश्वाराध्यांच्या कृपाशीर्वादास पात्र होऊन आपल्या गावी जैनापूरला परतले.

सोलापूरच्या रा.ब. मल्लप्पा ऊर्फ अप्पासाहेब वारद यांनी वीरशैव माहेश्वरांच्या अध्ययनासाठी १८७८ मध्ये सोलापुरात 'श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळे'ची स्थापना केली होती. पंडित मल्लिकार्जुन शास्त्रींची अप्पासाहेब वारदांनी आपल्या पाठशाळेत अध्यापक म्हणून नियुक्ती केली. पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजींनी विद्यार्थ्यांना संस्कृत शिकवण्याबरोबरच अप्रकाशित प्राचीन वीरशैव साहित्य प्रसिद्ध करण्याचा विचार अप्पासाहेब वारदांसमोर व्यक्त केला. तो ऐकून आनंदित झालेल्या अप्पासाहेब वारदांनी शास्त्रीजींच्या सल्ल्यानुसार 'वीरशैव लिंगी ब्राह्मण धर्मग्रंथमाला' या प्रकाशन

संस्थेचा आरंभ केला. दानशूर व वीरशैव साहित्यप्रेमी श्री. मल्लप्पा वारदांच्या उदार आश्रयाखाली सूक्ष्मागम, वीरमाहेश्वर प्रकरण, पंचाचार्य पंचमोत्पत्ति प्रकरण, पारमेश्वरागम, पादोदक विचार, संक्षिप्त पूजाविधी, संस्कृत प्रभुलिंगलीले, हरिहरतारतम्य इत्यादी जवळजवळ १०० ग्रंथांचा मराठीत अनुवाद होऊन तो प्रसिद्ध झाला. पं. मल्लिकार्जुन शास्त्री जैनापूर आणि मणूरमठाध्यक्ष पं. श्री मल्लिकार्जुन शास्त्रीजी यांनी त्या ग्रंथांच्या संपादनाचे कार्य केले.

पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी जैनापूर ही या ग्रंथमालेची प्रेरक शक्ती होती. त्यांचे बहुमुखी व्यक्तिमत्त्व लक्षात घेऊन १९१८ मध्ये काशीक्षेत्री झालेल्या श्री जगद्गुरू पंचाचार्यांच्या प्रथम संमेलनात त्यांना 'वीरशैव धर्मसुधाकर' ही प्रशस्ती सन्मानपूर्वक देण्यात आली. पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी मेधावी कवी होते. सोलापूरच्या परम तपस्वी श्री म.नि.प्र. किरीट चन्नबसव स्वामीजींचे पुराण रचून त्यांनी आपले चातुर्य दाखवून दिले. वार्धक षट्पदीत रचलेले हे पुराण खूप प्रसिद्ध झाले. किरीट स्वामीजींच्या लीलांसोबत प्राचीन व समकालीन वीरशैव धर्माचे ऐतिहासिक संदर्भ त्या पुराणात दिलेले आहेत. संस्कृत साहित्याची अशी अपार सेवा करून ख्यातनाम झालेले पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी दि. २०.१.१९३८ मध्ये जैनापूर येथे लिंगैक्य झाले. जैनापूरच्या उत्तरवाहिनी असलेल्या कृष्णानदीच्या काठावरील लिंगकट्टी येथे यांची समाधी बांधलेली आहे.

## ६. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी

**हिरेमठ, मु. अडहळ्ळी,**
**ता. अथणी, जि. बेळगाव (कर्नाटक)**

अडहळ्ळीचा हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेतील मठ आहे. श्री ष.ब्र. नूरंदेश्वर शिवाचार्य हे या मठाचे मूळ कर्तृपुरुष होत. या परंपरेतील श्री ष.ब्र. सिद्धलिंग स्वामीजी यांचा अडहळ्ळी हिरेमठाचे श्री. सिद्धलिंगय्या आणि सौ. काशीबाई या माहेश्वराच्या पुण्यगर्भी १८६८ मध्ये श्रावणमास शुद्ध पंचमीला गुरुवारी जन्म झाला. त्यांचे सिद्धय्या असे नामकरण करण्यात आले. यांनी प्राथमिक शिक्षण अडहळ्ळी आणि अथणी येथे घेतले. अडहळ्ळी मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांचे नाव निश्चित करण्यात आले.

गुरुवर्य श्री ष.ब्र. चन्नमल्ल शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने उच्च संस्कृत अध्ययनासाठी ते काशीला आले. श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ प्रथम वीरभद्र महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १८८४ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात त्यांनी ९ वर्षे व्याकरण, साहित्य आणि वेदान्त या शास्त्रांचा पूर्ण अभ्यास केला. त्यानंतर ते अडहळ्ळी येथे परत आले.

श्री ष.ब्र. चन्नमल्ल स्वामीजींनी १८९४ मध्ये त्यांना अडहळ्ळी हिरेमठावर स्थिर–चरपट्टाभिषेक केला. 'श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी' असे त्यांचे नामकरण करण्यात आले. ते पुढे त्रिकाल पूजा व भक्तोद्धाराचे कार्य करू लागले. संस्कृत विद्वान असल्याने आपल्याकडे आलेल्या विद्यार्थ्यांना शिकवण्याचे काम त्यांनी निरंतर केले. बबलेश्वर बृहन्मठाचे श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य स्वामीजी हे यांचे विद्यार्थी होत. पुढे बबलेश्वर पट्टाध्यक्षांनी आपल्या गावातील पुराणिक मठाची कन्या अडहळ्ळी हिरेमठाच्या घरी देऊन बबलेश्वर व अडहळ्ळी यांच्यातील संबंध अधिक दृढ केला. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींनी भक्तोद्धाराचे कार्य

करून ते १९३६ मध्ये वयाच्या ६८ वर्षी लिंगैक्य झाले. मठाच्या बागाईत शेतात त्यांची समाधी बांधण्यात आली. महालिंगपूर, मुगळखोर, बबलेश्वर, सारवाड, ताळीकोट, सवनूर, सिंधूर, नासिक, गोकाक इत्यादी कर्नाटक व महाराष्ट्रातील अनेक गावात या मठाचे भक्त आहेत.

यांच्यानंतर श्री वे.मू. चन्नमल्लय्या यांना या मठाचे उत्तराधिकारी नेमण्यात आले. त्यांनी सोलापुरातील होटगी मठात राहून संस्कृतचा अभ्यास केला. परंतु अन्य कारणाने गृहस्थाश्रम स्वीकारला. सध्या या मठावर श्री वे.मू. पंचाक्षरी हिरेमठ हे उत्तराधिकारी असून या मठाची परंपरा ते सांभाळत आहेत.

७. **श्री ष.ब्र. गुरू गंगाधर शिवाचार्य स्वामीजी**

**औंधकर स्वामी संस्थानमठ,**

**मु.पो. बार्शी, जि. सोलापूर (महाराष्ट्र)**



बार्शीचा औंधकर स्वामी संस्थानमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून या मठाला दोनशे वर्षांपेक्षा अधिक प्राचीन परंपरा आहे. छत्रपती शिवाजी महाराजांनी या मठाच्या स्वामीजींच्या स्वागताकरिता विशाल तोफांची सलामी देण्याचा आदेश दिला होता. ब्रिटीश कालामध्येही ही प्रथा चालू होती. या परंपरेत श्री ष.ब्र. मुनिमहाराज हे पहिले शिवाचार्य होऊन गेले. त्यांना औंध गावच्या यमाई देवीचा साक्षात्कार झाला होता. औंधच्या पूर्व दिशेला असणाऱ्या मायणी गावच्या अभयारण्यात त्यांनी तपश्चर्या केली होती.

या अभयारण्याचे अलीकडे 'इंदिरा गांधी अभयारण्य' असे नामकरण करण्यात आले आहे. मायणी (ता. खटाव, जि. सातारा) या गावी या मठाचे पूर्वपुरुष श्री ष.ब्र. मुनिमहाराजांची संजीवन समाधी आहे. हे समाधिमंदिर शिवाजी महाराजांच्या काळात बांधलेले असून ते हेमाडपंथी आहे. मायणी गावातच या मठाच्या पूर्वाचार्यांच्या दहा समाध्या उपलब्ध झाल्या असून त्यांचे एकत्रिकरण करून १९९७ मध्ये एक समाधिमंदिर उभारण्यात आले. सांगली जिल्ह्यातील विटा गावच्या शेजारी असलेल्या रेणावी येथील श्री रेवणसिद्धेश्वर मंदिराच्या बाजूच्या टेकडीवर औंधकर मठाचा एक शाखामठ होता. तेथे त्या मठाच्या बाळलिंग स्वामी (प्रभुलिंग स्वामी) यांची जिवंत समाधी आहे. औंध (ता. खटाव, जि. सातारा) या गावी या मठाच्या जागेत श्री गंगाधर स्वामीजींची समाधी असून सध्या त्या ठिकाणी महाराष्ट्र समाजकल्याण विभागाने मागास मुलींसाठी वसतिगृह सुरू केले आहे.

बार्शी (जि. सोलापूर) येथे औंधकर संस्थान मठ असून तेथे श्री ष.ब्र.

गंगाधर स्वामीजींची १३० वर्षांपूर्वीची एक प्राचीन समाधी आहे. प्रतिवर्षी भाद्रपद कृष्ण नवमीला श्री गंगाधर स्वामीजींची पुण्यतिथी साजरी केली जाते. महाराष्ट्रातील सातारा, सांगली, सोलापूर व कर्नाटकातील बागलकोट या जिल्ह्यांत औंधकर संस्थान मठाच्या शाखामठांना मिळालेल्या इनामी जमिनी आहेत. या मठाचे मूळपुरुष श्री ष.ब्र. मुनिस्वामीजी नंतर झालेल्या मठाधिपतींना श्री शंभुलिंग स्वामी व श्री गंगाधर स्वामी अशी दोन नावे दिली जातात. अशी भव्य परंपरा असणाऱ्या मठावर इ.स. १९१८ मध्ये श्री ष.ब्र. गुरुगंगाधर शिवाचार्य स्वामीजी हे अधिपती होते. श्री. शिवराज शास्त्री निंबर्गीकर व सौ. त्रिवेणीबाई हे त्यांचे आईवडील काशीपीठात सेवा करीत असत. तत्कालीन काशीपीठाधीश श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी या जंगम दंपतीला पीठात सेवा करण्याची संधी दिली होती. त्यांच्या पवित्र गर्भी शा. शके. १८११ मार्गशीर्ष शुद्ध षष्ठी म्हणजेच दि. २८.११.१८८९ रोजी श्री गंगाधर स्वामीजींचा जन्म काशी जंगमवाडी मठात झाला. त्यावेळी त्यांचे महेश्वर असे नामकरण करण्यात आले.

श्री महेश्वर यांचे प्राथमिक शिक्षण काशी येथे हिंदी भाषेतून झाले. नंतर त्यांनी संस्कृत भाषेच्या माध्यमातून व्याकरण, साहित्य, सांख्य, न्याय व वेदान्त या शास्त्रांचे अध्ययन केले. त्यामुळे त्यांना सांख्यवाचस्पती, वेदान्तरत्न अशा पदव्या प्राप्त झाल्या. त्यानंतर ते काशीतील दयानंद महाविद्यालयात संस्कृतचे प्राध्यापक म्हणून सेवा करू लागले. काही काळानंतर काशी सोडून ते मुंबईला येऊन तेथील प्रसिद्ध एल्फिस्टन कॉलेजात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. त्यांनी पुढे १९१७ पुणे येथे भवानी पेठेत स्वतः काशी विश्वेश्वर संस्कृत पाठशाळा सुरू केली. विद्यार्थ्यांना शिकविण्याची त्यांची हातोटी आणि पाठशाळेचे नियम पाहून लोकमान्य टिळक, मनोहर विष्णू काथवटे, वि. का. राजवाडे, ग. ज. आगासे, ल. ग. देशमुख, शि. म. परांजपे आणि कृ. ना. आठल्ये इत्यादी मान्यवरांनी त्यांची प्रशंसा करून त्यांना आर्थिक सहाय्य केले.

काशीवरून आलेले पं. श्री. महेश्वर शास्त्रीजी महाराष्ट्रात प्रसिद्ध झाले त्यावेळी औंधकर मठाची गादी रिक्त होती. भक्तगण योग्य मठाधिपतीच्या शोधात होते. तेव्हा बार्शीच्या परंडकर मठाचे श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य स्वामीजींनी औंध मठासाठी नैष्ठिक ब्रह्मचारी असलेल्या महेश्वर शास्त्रीजींचे नाव सुचविले. बार्शीच्या भक्तांनी पुण्यास जाऊन पं. महेश्वर शास्त्रीजींना विनंती केली आणि नंतर १९१८ मध्ये महेश्वर शास्त्रीजींचा बार्शीच्या औंधकर मठावर पट्टाभिषेक करण्यात आला. 'श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामीजी' असे त्यांचे नामकरण करण्यात आले.

१९१८ ते १९६९ पर्यंत ५१ वर्षे मठाधिपती राहून त्यांनी वीरशैवधर्माचा प्रचार व प्रसार केला. त्यांनी आपल्या कार्यकालात औंधकर समाज संगीत भजनी मंडळाची स्थापना केली. हे मंडळ आजही कार्यरत असून विविध धार्मिक कार्यक्रमात भजन करून भक्तिभाव जागृत करीत असते.

१९६१ मध्ये गंगाधर शिवाचार्य स्वामीजींनी आपला लहान भाऊ श्री वे. विश्वनाथ स्वामी निंबर्गीकर यांच्या चिरंजीवाला, शिवानंदला आपला उत्तराधिकारी नेमून त्यांना संस्कृत अध्ययनाकरिता काशीपीठात पाठवून दिले. १९६५ मध्ये श्री शिवानंद स्वामीजींना औंधकर मठावर पट्टाभिषेक केला. शा.श. १८९१ ज्येष्ठ मासात म्हणजे १९६९ या दिवशी विटा येथील भाऊसाहेब लकडे यांच्या घरी श्री गंगाधर शिवाचार्य लिंगैक्य झाले. त्यांची समाधी मायणी येथील औंधकर मठात करण्यात आली आहे.

## ८. स्थिरपट्टाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू चन्नबसव शिवाचार्य महास्वामीजी

उज्जयिनी पीठ (कर्नाटक)



पूर्वाश्रमी तुंबरगुद्दी (ता. कुडलगी, जि. बळ्ळारी) या गावच्या वीरशैव माहेश्वर वंशात १८७६ मध्ये यांचा जन्म झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव विरूपाक्षय्या असे होते. त्यांनी जन्मगावी कन्नड व तेलुगू भाषांतून प्राथमिक शिक्षण घेतले. पुढे उच्च संस्कृत अध्ययनासाठी १८९१ मध्ये ते काशीक्षेत्री गेले. श्रीकाशीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्यांच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. त्यानंतर काशीतील अनेक विद्वानांकडून साहित्य-व्याकरणादींचा अभ्यास करून १९०१ मध्ये ते आपल्या गावी परतले. तुंबरगुद्दीचे विरूपाक्ष शास्त्री या नावाने प्रसिद्धीस आले. नैष्ठिक ब्रह्मचर्याचे पालन करीत ते धार्मिक कार्यक्रमात सहभागी होत असत.

त्यांची प्रतिभा आणि धर्मनिष्ठा पाहून उज्जयिनीपीठाचे १०६ वे चरपट्टाधिकारी श्री जगद्गुरू मरुळसिद्ध शिवाचार्य महास्वामीजींनी विरूपाक्ष शास्त्रीजींना शा.श. १८२८, पराभवनाम संवत्सरात वैशाख कृष्ण पंचमीच्या शुभमुहूर्तावर उज्जयिनी पीठाचा स्थिर पट्टाधिकार दिला. 'श्री जगद्गुरू चन्नबसव शिवाचार्य महास्वामीजी' असे त्यांचे नामकरण करण्यात आले.

त्याच मुहूर्तावर बंगारनायकन हळ्ळी (ता. जगळूर, जि. चित्रदुर्ग) या गावच्या हिरेमठाचे वे.मू. चन्नबसवार्य व सौ. गुरुसिद्धम्मा या दंपतीच्या पुण्यगर्भी जन्मास आलेल्या श्री सिद्धलिंग नावाच्या बटूस उज्जयिनीपीठाचे १०८ वे चरपट्टाध्यक्ष म्हणून जगद्गुरू मरुळसिद्ध महास्वामीजींनी पट्टाभिषेक केला. त्यांचे 'श्री जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले.

उज्जयिनीपीठाचे १०७ वे स्थिरपट्टाध्यक्ष चन्नबसव शिवाचार्य महास्वामीजी यांनी धर्मपीठाचा कारभार पाहिला. पुढे हरपनहळ्ळी तालुक्यात धर्मसंचार

करीत असताना बळ्ळारी येथील पाचव्या अखिल भारतीय वीरशैव महासभेत उपस्थित राहून पीठाकडे परत येत असताना कडेकोळ्ळ या गावी ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, लेखक- विरूपाक्षशास्त्री पुराणिकमठ, हिरेहडलगी, श्री पंचाचार्य इलेक्ट्रिक प्रेस, मैसूर, १९५३, पृ. १९-२०.

## ९. श्री म.नि.प्र.ज. जयदेव मुरघाराजेंद्र महास्वामीजी

बृहन्मठ, चित्रदुर्ग (कर्नाटक)



खिन्नाळ (ता.जि. कोप्पळ) या गावचे हिरेमठ वे.मू. चन्नबसय्या आणि सौ. भ्रमरांबिका यांच्या पुण्यगर्भी दि. २७.८.१८७४ श्रावण शुद्ध पौर्णिमा, गुरुवार या शुभमुहूर्तावर यांचा जन्म झाला. चन्नवीरय्या असे त्यांचे नाव ठेवण्यात आले. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून गदगच्या श्रीमती मानवी रुद्रम्मांच्या आर्थिक सहाय्याने संस्कृतच्या अध्ययनासाठी १८९० मध्ये ते सोलापूरला आले. येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत ३ वर्षे संस्कृत साहित्याचा अभ्यास केला. पुढे श्री. मल्लप्पा वारद आणि श्रीमती रुद्रम्मा मानवी यांच्याकडून आर्थिक मदत प्राप्त करून ते उच्च संस्कृत अध्ययनासाठी १८९४ मध्ये काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपाशीर्वादास पात्र होऊन त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश मिळविला. येथे क्विन्स कॉलेजमध्ये पं. ताराचंद भट्टाचार्यांकडे न्यायशास्त्राचा अभ्यास केला. त्याशिवाय वीरशैवधर्माच्या आधारग्रंथाचा- शिवागमांचाही अभ्यास केला.

त्यांचे पांडित्य पाहून काशीच्या विद्वानांनी त्यांना शास्त्री ही पदवी दिली. तेव्हापासून ते पं. चन्नवीर शास्त्री या नावाने ओळखले जाऊ लागले. श्रीकाशीजगद्गुरूंच्या कृपेसही ते पात्र झाले. काशीक्षेत्री ८-९ वर्षे अनेक शास्त्रांचा अभ्यास करून त्यांनी पांडित्य मिळविले. त्याचवेळी चित्रदुर्ग बृहन्मठाचे मुप्पिनेंद्र महास्वामीजी ब्याडगी येथे लिंगैक्य झाले. त्या रिक्त पीठावर श्री चन्नवीर शास्त्रीजी योग्य आहेत असा श्री. मल्लप्पा वारद यांनी निर्णय घेऊन त्यांना काशीहून बोलावून घेतले. समाजाची मान्यता घेऊन ३ नोव्हेंबर १९०३ रोजी म्हणजे शा.शके १८२५ शोभननाम संवत्सर कार्तिक शु. त्रयोदशी या शुभमुहूर्तावर त्यांना निरंजन पट्टाधिकार

देण्यात आला. त्यांचे 'श्री म.नि.प्र.ज. जयदेव मुरघाराजेंद्र महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. सुमारे ५३ वर्षे मठाधिपती म्हणून त्यांनी अनेक कार्ये केली. चित्रदुर्ग बृहन्मठाच्या इतिहासात ते ध्रुव नक्षत्राप्रमाणे तळपले. वयाच्या ८२ व्या वर्षी इ.स. १९५६ मध्ये ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : १. पुण्यश्लोक वारद, चित्रशाळा प्रेस, पुणे, १९४९, पृ. २३२-२३३,२९४.
२. मुरुघराजेंद्र विजय, जी. एच. होसूर.
३. युगप्रवर्तक जयदेव, बी. शिवमूर्ती शास्त्री, बेंगळूरु.

## १०. वैयाकरणी



**श्री म.नि.प्र. ज. गंगाधर महास्वामीजी**

मूरुसाविर मठ,

मु.पो.ता. हुब्बळी, जि. धारवाड (कर्नाटक)

पूर्वाश्रमात कब्बिकेरे (जि. चिक्कमगळुरू) या गावच्या अंबळे हिरेमठाचे वे.मू. बसय्या यांचे द्वितीय पुत्र म्हणून १८७५ मध्ये यांचा जन्म झाला. श्री. वीरेश्वरदेव असे यांचे नाव ठेवले. त्यांनी कब्बिकेरे येथे प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर संस्कृत अध्ययनाकरिता आपल्या मामांच्या सहकार्याने बेंगळूरुला गेले. तेथील समाजाचे अध्वर्यू रा.ब. श्री. के. पी. पुट्टण्णशेट्टी यांना भेटून पुढील संस्कृत अध्ययनासाठी मदत मागितली. श्री. पुट्टण्णशेट्टी विद्यार्थिवत्सल असल्याने त्यांनी त्यांना आपल्याकडे आश्रय देऊन सहाय्य केले. बेंगळूरुच्या विद्वानाकडे संस्कृतचा अभ्यास करून ते प्राथमिक परीक्षेत उत्तीर्ण झाले.

त्यांची अध्ययनशीलता पाहून पुट्टण्णशेट्टींनी त्यांना मैसूरच्या धर्मवीर वीरसंगप्पा यांनी धर्मार्थ चालविलेल्या वीरशैव संस्कृत वैदिक पाठशाळेत प्रवेश देवविला. तेथे त्यांनी संस्कृतचे प्राथमिक अध्ययन केले. त्यानंतर भाषोज्जीवनी पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथील विद्यार्थिप्रिय प्राध्यापक पं. पी. आर. करबसव शास्त्रीजींकडे अध्ययन केले. करबसव शास्त्रीजींकडे अध्ययन करणाऱ्या विद्यार्थ्यांविषयी समाजात गौरवाची भावना होती.

के. पी. पुट्टण्णशेट्टी यांनी श्री वीरेश्वर देव यांना सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पुढील शिक्षणासाठी पाठविले. तेथे ते गुरूकडे अध्ययन करून लहान मुलांना शिकवीत असत. सोलापुरात अध्ययन पूर्ण केल्यानंतर श्री. पुट्टण्णशेट्टींनी त्यांना उच्च व्यासंगासाठी काशीक्षेत्री पाठविले. श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १८९५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. व्याकरणशास्त्रात त्यांना विशेष रस होता. म्हणून त्यांनी म.म. पं.

गुरुदेव मिश्र या वैयाकरणीकडे पाच वर्षे व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला.

याप्रमाणे व्याकरणशास्त्रात पांडित्य संपादन करून ते आपल्या गावी परतले. हुब्बळीचा मूरुसाविर मठ १८९७ पासून रिक्त होता. तेथे त्यांना मठाधिपती करावे असा पुट्टण्णशेट्टींनी विचार केला त्यावेळी पुट्टण्णशेट्टींनी मठाच्या पंचांसोबत विचारविनिमय करून निर्णय घेतला आणि बिदरी कुमारस्वामीजींच्या अमृतहस्ते वैयाकरणी श्री वीरेश्वर स्वामीजींना मूरुसाविर मठाचा निरंजन पट्टाधिकार १०.२.१९०१ रोजी मोठ्या थाटाने देण्यात आला. त्यावेळी 'श्री म.नि.प्र. ज. गंगाधर महास्वामीजी' असे त्यांचे नूतन नामकरण करण्यात आले. अधिकार स्वीकारल्यानंतर त्यांनी आर्थिकदृष्ट्या मठ समृद्ध केला. धार्मिक, शैक्षणिक व सामाजिक कार्य केले. मठात संस्कृत पाठशाळा सुरू केली. याबरोबरच मठात एक मुद्रणालय काढले. तंत्रसंग्रह, विशेषार्थ प्रकाशिका आणि शिवमंत्र जपविधी इत्यादी पुस्तके प्रकाशित केली. जिनिंग अँड प्रेसिंग फॅक्टरी स्थापन करून त्यातून येणाऱ्या उत्पन्नातून गरीब विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती देण्याची व्यवस्था केली. अशाप्रकारे धार्मिक, सांस्कृतिक, साहित्यिक व शैक्षणिक कार्य करून ते ख्यातनाम झाले. दि. ३१.८.१९२० रोजी ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : १. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. २८२-२८८.
२. विद्यानिधी लिंगैक्य जगद्गुरू गंगाधर महास्वामीजी, मूरुसाविर मठ, हुब्बळी, १९८२

## ११. श्री ष.ब्र. रामलिंग शिवाचार्य स्वामीजी

करमाळकर मठ संस्थान,
मु.पो.ता. करमाळा, जि. सोलापूर (महाराष्ट्र)



करमाळकर मठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेचा मठ आहे. या मठावर बरेच शिवाचार्य होऊन गेले आहेत. इंदापूर, माढा, कराड आणि टाकळी येथे या मठाच्या शाखा आहेत. या मठपरंपरेतील श्री ष.ब्र. रामलिंग शिवाचार्य हे विद्वान होते. पूर्वाश्रमी करमाळा मठसंस्थानच्या श्री वे.मू. गंगाधरस्वामी व सौ. भागीरथीबाई यांच्या पवित्र गर्भी १८७५ मध्ये त्यांचा जन्म झाला. करमाळा येथे त्यांनी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. मठाच्या शिष्यांच्या अपेक्षेनुसार करमाळा मठसंस्थानचा वारसदार म्हणून त्यांची नियुक्ती झाली. उच्च शिक्षणासाठी भक्तांनी त्यांना काशीक्षेत्री पाठविले. श्रीकाशीजगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १८९५ मध्ये त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. १९०७ पर्यंत अर्थात् बारा वर्षेपर्यंत व्याकरण, साहित्य, तर्क आणि वेदान्त या शास्त्रांचे अध्ययन करून त्यांनी आचार्य पदवी प्राप्त केली.

काशीला अध्ययन पूर्ण करून ते करमाळ्यास परतले. त्या मठावर त्यांचा विधिपूर्वक पट्टाभिषेक करण्यात आला. विद्वत्तेच्या प्रभावाने त्यांनी महाराष्ट्रात धर्मजागृती केली. त्यामुळे त्यांना खूप प्रसिद्धी मिळाली. त्यांच्यामुळे करमाळा संस्थानमठाची कीर्ती सर्वदूर पोहोचली. विविध धार्मिक आणि सामाजिक कार्य करून १९३५ मध्ये ते लिंगैक्य झाले. त्यांची समाधी करमाळा मठात केली आहे. हा मठ पुत्रवर्गाचा असल्याने त्यांच्यानंतर वंशातील कोणीही आजपर्यंत पट्टाधिकार न स्वीकारल्याने हे संस्थान रिक्त राहिले आहे. विद्यमान श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी या मठाचे वंशज आणि गावातील प्रतिष्ठित लोक यांच्याशी विचारविनिमय करून लवकरच हा प्रश्न सोडविणार आहेत.

## १२. श्री वे.पं. इंदुधर शास्त्री होसमठ

मु.पो. करडी, ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)
द्वारा- इरय्या इंदुधर शास्त्री होसमठ, निवृत्त शिक्षक, करडी

वे.पं. इंदुधर शास्त्रीजी हुनगुंद तालुक्यातील करडी गावातील होसमठाच्या वे.मू. बसय्या व सौ. बसम्मा यांच्या उदरी १८७९ मध्ये जन्मास आले. त्यांचे बसलिंगय्या असे नामकरण करण्यात आले. करडी येथे प्राथमिक शिक्षण घेतल्यावर त्यांच्या वडिलांनी त्यांना धार्मिक शिक्षण घेण्यासाठी इलकलच्या विजय महांतेश्वर मठात पाठविले. तेथे त्यांनी संस्कृतबरोबर वैदिक शिक्षणही घेतले. तसेच हुक्केरीच्या संस्कृत पाठशाळेत वे.पं. सदाशिव शास्त्रींकडे संस्कृतचे त्यांनी अध्ययन केले. त्यांची प्रतिभा लक्षात घेऊन इलकलचे विजय महांतेश्वर स्वामीजींनी या बालकाला उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीला पाठविले. त्यासाठी इलकलचे श्री. शंकरप्पा सक्री यांनी आर्थिक मदत केली. काशीला गेल्यावर श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १८९७ मध्ये काशी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथे १२ वर्षेपर्यंत व्याकरण, साहित्य, न्याय व वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास केला. यांचे विविध विद्येतील पांडित्य पाहून नूतन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी १९०९ मध्ये एका धार्मिक कार्यक्रमात त्यांचे 'इंदुधर' असे नामकरण केले. तेव्हापासून ते पं. इंदुधर या नावाने प्रसिद्धीस आले.

काशीला पांडित्य प्राप्त करून पं. इंदुधर शास्त्रीजी आपल्या गावी परतले, तेव्हा त्यांचे वय ३० होते. त्यांच्या कुटुंबियांनी सुगम्मा नामक माहेश्वर कन्येशी १९०९ मध्ये त्यांचा विवाह लावून दिला. परळीच्या प्रकरणात त्यांनी पं. काशीनाथ शास्त्रीजींचा उजवा हात होऊन त्यांना बौद्धिक सहाय्य केले. नंतर बागलकोटच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक

म्हणून सेवा केली. तेथे अनेक विद्यार्थ्यांना ज्ञानदान केले.

त्यांना विरूपाक्षय्या, ईश्वरय्या, बसय्या व शरणय्या अशी चार मुले झाली. इंदुधर शास्त्रींनी बबलेश्वर बृहन्मठाच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून सेवा केली. तसेच श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य स्वामीजींची कृपा संपादन केली. श्री म.नि.प्र. कुमारस्वामीजी हानगल यांच्या इच्छेनुसार शिवयोग मंदिरात देखील त्यांनी संस्कृतचे अध्यापन केले. त्यांनी संपादन केलेली वेदवाणी अनेक शिष्यगणांना शिकविली. जानेवारी १९५१ मध्ये वयाच्या ७२ व्या वर्षी ते लिंगैक्य झाले.

---

परिचय : वे. शिवलिंगय्या हिरेमठ, जंगमवाडी मठ.

## १३. श्री म.नि.प्र. शिवबसव महास्वामीजी



हुक्केरी मठ,
मु.पो.ता.जि. हावेरी (कर्नाटक)

यांचा पूर्वाश्रमी श्री शिवबसव महास्वामीजींचा सप्तसागर (ता. अथणी, जि. बेळगाव) या गावातील हिरेमठाचे श्री. वे.मू. गिरिमल्लय्या व सौ. शिवगंगम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १८५७ म्हणजे शा.श. १७७९ आनंदनाम संवत्सरात माघ मास कृष्ण चतुर्दशीला शुक्रवारी महाशिवरात्रीच्या पर्वकाली ब्राह्मी मुहूर्तावर पहाटे ४ वाजता जन्म झाला. अथणी येथे कन्नड शिक्षणासोबत मिरज येथे त्यांनी संगीताचे शिक्षण घेतले. नंतर बळ्ळारी येथील सक्करे करडेप्पा यांच्या संस्कृत पाठशाळेत काही वर्षे अभ्यास करून संस्कृतमध्ये प्राविण्य मिळविले. १८९८ मध्ये उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपेस पात्र होऊन त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

काशीच्या विद्वानांकडून वेद, आगम, उपनिषदे, साहित्य, व्याकरण आदी शास्त्रांचा अभ्यास करून प्रकांड पांडित्य मिळविले. काशीतील अध्ययनकाळात अनंतपूरचे लिंगस्वामीजी, चित्रदुर्गाचे जयदेव मुरुघराजेंद्र स्वामीजी, सोलापूरचे वेदपंडित जगदीशशास्त्री आणि जैनापूरचे शास्त्रीजी हे त्यांचे सहाध्यायी होते. सहा वर्षे काशीत अध्ययन पूर्ण करून बिदरीचे कुमार शिवयोगी महास्वामीजी यांच्या कृपेला पात्र होऊन त्यांनी आपले जीवन सार्थ करून घेतले. पुढे हानगल कुमारशिवयोगी, बिदरीचे कुमार शिवयोगी महास्वामीजी यांच्या सान्निध्यात १९०५ मध्ये शिवबसवस्वामीजींना हावेरी हुक्केरी मठाचा निरंजन पट्टाधिकार एक्कुंडीच्या श्री मुरघेंद्र महास्वामीजींनी दिला. त्यानंतर चित्तरगीच्या इलकल्लच्या महांत स्वामीजींनी दाखविलेल्या ठिकाणी हानगल कुमारस्वामीजींसोबत त्यांनी १९०९ मध्ये

श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिर या संस्थेची स्थापना केली. तसेच निडगुंदी कोप्प, शिराळ कोप्प, कपनळ्ळी, हिरेहाळ इत्यादी गावी त्या संस्थेच्या शाखा स्थापून साधकांची सोय केली.

याशिवाय हावेरीच्या हुक्केरी मठात एक संस्कृत पाठशाळा स्थापन केली. मठात एक मुद्रणालय उघडून 'सद्धर्मदीपिके' नामक मासिक सुरू करून धर्मकार्य केले. त्यांनी कावेरीचा हुक्केरी मठ पाषाणामध्ये बांधून काढला. हानगल कुमारस्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर श्रीशिवबसव महास्वामीजींनी शिवयोग मंदिराचे अध्यक्षपद स्वीकारून त्याची शेवटपर्यंत व्यवस्था पाहिली. याप्रमाणे आपल्या जीवनात धर्मप्रसार व प्रचार करून १९४६ मध्ये शा.श. १८६९ पौष मास शुक्ल ११ या दिवशी ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : १. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. २८९-२९०.
२. शिवबसवस्मारक संचिके, हुक्केरी मठ, हावेरी, १९७१, पृ. ९-२१.
३. शिवबसवमहास्वामीजी : आदर्श व्यक्तित्व, १९६७.

## १४. श्री वे.पं. रेवणसिद्ध शास्त्री

मु.पो. पडेकनूरु, जि. विजयपूर (कर्नाटक)



पडेकनूरु हिरेमठाचे वे.मू. परप्पय्या व सौ. गौरम्मा या दंपतीचे चतुर्थ पुत्र म्हणून १८७० मध्ये श्री रेवणसिद्धय्या यांचा जन्म झाला. यांचे पूर्वज मूळचे विजयपूर जिल्ह्यातील सिंदगी तालुक्यातील देवरहिप्परगीचे परदेशीमठ होते. रेवणसिद्ध यांचे प्राथमिक शिक्षण पडेकनूरु येथे झाले. त्यावेळी श्रीशैलचे वीरभिक्षावृती मठाचे स्वामीजी धर्मप्रचारार्थ आले होते. या सुलक्षणी बालकास पाहून त्याला संस्कृत अभ्यासास प्रेरित करून ते आपल्यासोबत घेऊन गेले. रेवणसिद्धांनी प्रथम धारवाडच्या मूरुसाविर मठातील संस्कृत पाठशाळेत धार्मिक व संस्कृत अध्ययन केले. नंतर बळ्ळारीच्या सक्करी करडप्पा यांच्या चौकीच्या संस्कृत पाठशाळेत अध्ययन केले. त्यानंतर सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव संस्कृत पाठशाळेत आणि तोंटदार्य मठाच्या संस्कृत पाठशाळेत त्यांनी क्रमशः संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. या सर्व पाठशाळांतील अध्यापकांचे ते प्रिय विद्यार्थी होते.

पाणिनीय अष्टाध्याय, अमरकोश, पंचकाव्य व अनेक संस्कृत नाटकांचा त्यांनी अभ्यास केला. पुढे संस्कृतच्या उच्च शिक्षणासाठी १८९८ मध्ये ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपेला पात्र होऊन त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथील सुप्रसिद्ध व्याकरण पंडित श्री. देवनारायण तिवारी यांचे शिष्यत्व पत्करून त्यांनी व्याकरणाचार्य परीक्षेसाठी सर्व ग्रंथांचा अभ्यास केला आणि ते श्रेष्ठ वैयाकरणी झाले. हरियाणाचे पंडित चंद्रशेखर शास्त्रीजी यांच्याकडे त्यांनी तर्कशास्त्राचा अभ्यास केला. म.म. पंडित शिवकुमार मिश्र यांच्याकडे अध्ययन करून सर्व शास्त्रांत प्राविण्य मिळविले. १२ वर्षे काशीला अध्ययन करून ते सर्व विद्यासंपन्न झाले. १९१० मध्ये मातृभूमीस परतले. त्यावेळी गदगचे तोंटदार्य

मठाच्या श्री सिद्धलिंग महास्वामीजींनी लकुंडी येथील वे.मू. सिद्धलिंगय्या यांची कन्या चन्नबसम्मा हिच्यासोबत पं. रेवणसिद्ध यांचा विवाह करून दिला. नंतर शास्त्रीजींनी मुद्देबिहाळ तालुक्यातील निडगुंदी गावच्या विरक्त मठाच्या संस्कृत पाठशाळेत काही काळ अभ्यास करून अब्बीगेरी येथील संस्कृत पाठशाळेत सहा वर्षेपर्यंत १९१६ पर्यंत अध्यापन केले.

१९१६ ते १९२० या काळात त्यांनी बागलकोटच्या बसवेश्वर विद्यावर्धक संघाच्या संस्कृत पाठशाळेत अध्यापन केले. १९२० ते १९२३ या काळात निडसोसी दुडदुंडीश्वर मठाच्या पाठशाळेत त्यांनी अध्यापन केले. त्यांच्या विद्वत्तेची कीर्ती सर्वदूर पोहोचली. श्री हानगल कुमार शिवयोगीजींनी त्यांना शिवयोग मंदिरात बोलावून घेतले. तेथे १९२३ ते १९३० असे बारा वर्षे त्यांनी शेकडो स्वामीजींना व शास्त्रींना विद्यादान केले. ते गृहस्थाश्रमी असून त्यांना ४ मुले व ३ मुली होत्या. त्यांनी सर्वांना उत्तम शिक्षण दिले. २५-३० वर्षे त्यांनी प्राध्यापक म्हणून सेवा केली. संसारातील अडचणी स्थितप्रज्ञ वृत्तीने सहन करून वयाच्या ८६ व्या वर्षी दि. ४.६.१९५६ रोजी मंगळवारी पहाटे ४.३० वाजता ते लिंगैक्य झाले. विजयपूर येथील वीरशैव रुद्रभूमीत त्यांची समाधी आहे.

---

संदर्भ : १. रेवणसिद्ध शास्त्री, १९९०, पृ. ११-६३.
२. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३६०.
३. गुरुवर्ग दर्पण, पृ. ४२-४४.

## १५. श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी



अरळेले हिरेमठ, मु.पो. बंकापूर,
ता. शिग्गाव, जि. हावेरी (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८३७८-२५४३२४,
चरभाष : ९४४८०२७४५८

हावेरी जिल्ह्यातील बंकापूर हे गाव ऐतिहासिक आहे. पांडवाच्या काळात एकचक्र नगरी नावाने प्रसिद्ध असणारे हे नगर म्हणजे आजचे बंकापूर होय. बंकापूरजवळ असणाऱ्या बाड या गावच्या डोंगरात बकासूर हा राक्षस राहत होता असे म्हणतात. त्या गावाजवळील तळ्याला आजदेखील बकासूराचे तळे म्हणून ओळखतात. पूर्वीपासून अनेक राजेमहाराजांनी या गावाला आपल्या राज्याची राजधानी केली होती, हे तेथील अवशेषांवरून लक्षात येते. बंक राजाने येथे राज्य केल्यामुळे याला बंकापूर असे नाव मिळाले आहे. अशा इतिहासप्रसिद्ध गावात पंचपीठांशी संबंधित सोळा मठ असून त्या मठांची परंपरा खंडित झालेली आहे. आज केवळ अरळेले हिरेमठ हाच अस्तित्वात असून या मठाच्या २२ गावांत शाखा आहेत, हे या मठातील कागदपत्रांवरून समजते. त्यामुळे या मठाला बावीस महल, कट्टीमनी अरळेले हिरेमठ असे म्हणतात. रंभापुरी मठाचा दंड हाच या मठाचा दंड असल्यामुळे आणि तो दंड मठाच्या अस्तित्वासाठी या मठाचे शिवाचार्य धारण करीत आल्यामुळे 'अरळेले मठ' हे नाव या मठास मिळाले आहे.

या मठपरंपरेत अनेक शिवाचार्य होऊन गेले असून त्यांपैकी प्रस्तुत श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी यांनी परम तपस्वी आणि महिमाशाली होऊन या शतकात विशेष प्रसिद्ध मिळविली आहे. हे पूर्वाश्रमी कुसनूर (ता. हानगल, जि. हावेरी) या गावच्या श्री. वे. चन्नवीरय्या मुडलगशी मठ आणि सौ. सावित्रीअम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १८८५ मध्ये जन्मास आले. गदगय्या असे त्यांचे नामकरण केले. त्यांनी कुसनूर येथे पाचवीपर्यंत शिक्षण घेतले. पुढील शिक्षणासाठी वडिलांनी त्यांना

हरपनहळ्ळीला पाठविले. तेथे ६ वी व ७ वीचे शिक्षण घेत असताना त्यांनी संस्कृतचा अभ्यास केला. संस्कृत विद्वानांकडून पंचकाव्यांचे अध्ययन केले. नंतर मुलकी परीक्षेत उत्तम श्रेणीत उत्तीर्ण होऊन अध्ययनकाळात त्यांनी ज्योतिषशास्त्राचाही अभ्यास केला. गदगय्यांना संस्कृतचा उच्च अभ्यास करण्याची इच्छा असल्यामुळे ते १८९८ मध्ये काशीक्षेत्री गेले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथे २ वर्षे संस्कृतचे अध्ययन करून व श्रीकाशीमहास्वामीजींचे कृपाशीर्वाद मिळवून ते १९०० मध्ये कुसनूर येथे परतले.

अरळेले हिरेमठाचे गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी वयोवृद्ध झाल्यामुळे उत्तराधिकारी शोधीत ते कुसनूर येथे आले. तेथे गदगय्यांच्या ठायी असणारा विद्याभ्यास व त्यांचा विनयी स्वभाव पाहून त्यांना उत्तराधिकारी होशील का, म्हणून विचारले. एवढेच नव्हे तर पुढे बंकापूरच्या अरळेले मठावर कुसनूरच्या मुडलगशी मठाचे वंशजच परंपरेने मठाधिपती व्हावेत, असा सर्व भक्तांशी विचारविनिमय करून त्यांनी निर्णय घेतला. त्याप्रमाणे शा.श. १८३४ परिधावी नाम संवत्सरात कार्तिक मास शुक्ल पंचमी, गुरुवारी इ.स. १९१२ मध्ये रंभापुरी जगद्गुरू श्री शिवानंद राजेंद्र शिवाचार्यांच्या सान्निध्यात शिग्गाव हिरेमठाच्या श्री ष.ब्र. महांतेश शिवाचार्य स्वामीजींकडून श्री वे. गदगय्या यांना बंकापूरच्या अरळेले हिरेमठाचा पट्टाधिकार देण्यात आला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी असे नामकरण करण्यात आले. ते ६५ वर्षेपर्यंत पट्टाध्यक्षपदी राहून अत्यंत प्रभावी गुरू म्हणून प्रसिद्ध झाले. श्रीरंभापुरी जगद्गुरू श्री गंगाधर महास्वामीजींना बालपणी दीक्षासंस्कार करणारे तसेच विजयपूरचे श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य यांना पट्टाभिषेक करवून देणारे अशी ख्याती त्यांना प्राप्त झाली. १८.१.१९७४ रोजी ते लिंगैक्य झाले. सध्या या मठाची परंपरा श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी समर्थपणे पुढे चालवीत आहेत.

---

संदर्भ : श्री लिंगैक्य रुद्रमुनी शिवाचार्य चरितामृत, वे. रुद्रय्या चिकमठ, १९९८.

१६. **श्री वे.पं. जगदीशशास्त्री**

सुगुर मठ, मु.पो. नालवारू,
ता. चितापूर, जि. कलबुर्गी (कर्नाटक)



यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. संस्कृतच्या अध्ययनाकरिता ते बळ्ळारीस गेले. तेथील संस्कृत पाठशाळेत साहित्यशास्त्राचा अभ्यास करून साहित्यालंकार ही पदवी प्राप्त केली. नंतर न्यायशास्त्राच्या अभ्यासाकरिता १८९८ मध्ये सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत त्यांनी प्रवेश मिळविला. त्यांच्याठायी असणारी प्रतिभा पाहून पुण्यश्लोक अप्पासाहेब वारदांनी त्यांचा सर्व खर्च करून त्यांना पुढील अध्ययनासाठी काशीला पाठविले. पं. जगदीश शास्त्रीजींनी १८९९ मध्ये श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. नंतर ५ वर्षेपर्यंत काशीतील विद्वानांकडून न्यायशास्त्राचा यथासांग अभ्यास केला. पुढे सोलापूरला परतून १९०५ पासून १९४५ पर्यंत अखंड ४० वर्षे श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेचे मुख्याध्यापक म्हणून सेवा करीत शेकडो विद्यार्थ्यांना ज्ञानदान केले. यांचे बरेच शिष्य जगद्गुरू, पट्टाधिकारी, विरक्त मठाधीश, शास्त्री व अध्यापक झाले.

१९४२ मध्ये बालतपस्वी श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजींनी सोलापूरला होटगी मठात श्रीमद् वीरशैव गुरुकुलाची स्थापना केली. १९४६ पासून होटगी स्वामीजींच्या अपेक्षेप्रमाणे पं. जगदीशशास्त्री त्यांच्या गुरुकुलात प्रधान अध्यापक म्हणून काम करू लागले. आयुष्यातील ५० वर्षे अध्यापनकार्य केल्यामुळे श्रीरंभापुरी जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांचा 'कुलपती' अशी उच्च पदवी देऊन गौरव केला.

---

संदर्भ : पुण्यश्लोक वारद, ना. रा. बामणगावकर, १९४९, पृ. २९२-२९३.

## १७. श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य स्वामीजी

पट्टदकंथे हिरेमठ,

मु.पो.ता. कुष्टगी, जि. रायचुरू (कर्नाटक)

रायचुरू जिल्ह्यातील कुष्टगी येथील पट्टद कंथे हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून हा मठ शिष्यवर्ग परंपरेचा आहे. या मठाला इनामी जमीन देखील आहे. निडशेषी गज्जीभावी, मादापूर, होसूरु, वनीगेरी आणि गुडदुरू या गावी या मठाच्या शाखा असून या मठावर २५ पेक्षा अधिक पट्टाधिपती होऊन गेले आहेत. या परंपरेतील श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य स्वामीजींनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेऊन ते पुढे संस्कृत अध्ययनासाठी १९०० मध्ये ते काशीपीठात गेले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी काशी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. ८-१० वर्षेपर्यंत काशीमध्ये व्याकरण व न्यायशास्त्रांचा अभ्यास केला. पुढे आपल्या गावी परतून त्यांनी पट्टद कंथे हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. २५ वर्षेपर्यंत ते अधिकारावर होते. त्या काळात त्यांनी धर्मजागृतीचे कार्य केले. पुढे १९३५ मध्ये ते लिंगैक्य झाले. यांच्या मठाची परंपरा पुढे चालू आहे.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ७७.

## १८. श्री म.नि.प्र. जगद्गुरू लिंग महास्वामीजी

मुरुघामठ, मु.पो. आनंदपूर,
ता. सागर, जि. शिवमोग्गा (कर्नाटक)



श्री म.नि.प्र.जगद्गुरू लिंग महास्वामीजी कर्नाटकात प्राथमिक संस्कृत अध्ययन करून उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १९०० मध्ये काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपाशीर्वादास पात्र होऊन त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

काशीच्या विद्वानांकडून तर्क व व्याकरण या शास्त्रांचा त्यांनी उत्तम अभ्यास केला. आणि अद्वितीय पांडित्य प्राप्त करून घेतले. ते सरळ स्वभावाचे, उदार अंत:करणाचे होते. भक्तांकडून मिळालेल्या दक्षिणेतून ते विद्यार्थ्यांना मदत करीत. काशीक्षेत्रीचे अध्ययन पूर्ण करून ते आनंदपुरास परतले. मुरघामठाच्या श्री म.नि.प्र. ज. गुरुबसव महास्वामीजींची सेवा करून ते त्यांच्या अनुग्रहास पात्र झाले. महास्वामीजींनी त्यांना मुरघामठाचा अधिकार प्रदान केला. लिंगस्वामीजींच्या काळात या मठाला वैभवाचे दिवस आले. लिं. म.नि.प्र. हानगल कुमारस्वामीजींना हे अत्यंत प्रिय होते. शिवयोग मंदिराच्या स्थापनेनंतर १९१० मध्ये श्री लिंगस्वामीजींच्या नेतृत्वाखाली पहिला शिवरात्री महोत्सव संपन्न झाला.

---

संदर्भ : शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. २८८-२८९.

## १९. श्री वे.पं. शिवप्पय्या शास्त्रीजी हिरेमठ



मु. अनवाल,
ता. बदामी, जि. बागलकोट (कर्नाटक)
द्वारा – महांतेश आर. हिरेमठ,
मार्गोवा, गोवा ४०३९०२

श्री वे.पं. शिवप्पय्या शास्त्रीजी हे अनवाल (ता. बदामी, जि. बागलकोट) या गावच्या हिरेमठाचे श्री. वे. गुरुशांतय्या यांचे पुत्र असून १८८२ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण व जवळच्या पाठशाळेत संस्कृत तसेच वैदिक अध्ययन पूर्ण केले. वडिलांच्या व भक्तांच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०२ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. वे. शिवपय्यांनी काशी शासकीय संस्कृत महाविद्यालयात व्याकरण, साहित्य तसेच वेदान्तादी शास्त्रांचा ५ वर्षे अभ्यास केला. १९०७ मध्ये ते आपल्या गावी परतले.

वे.पं. शिवप्पय्या शास्त्रीजींचा गळा अत्यंत सुरेल होता. काशीत केलेल्या शास्त्राभ्यासाच्या बळावर त्यांनी येथील अनेक संत–शरणांच्या चरित्रांवर प्रवचने केली. बसवपुराण, तोंटद सिद्धलिंगेश्वर पुराण, श्री अवराधी कलाहरेश्वर पुराण आणि अथणी मुरघेंद्रपुराण ते अत्यंत रसाळ वाणीत सांगत असत. धारवाडचा मुरघामठ, हुब्बळीचा रुद्राक्षमठ, ओलीमठ, मूरुसाविरमठ, यरडेत्तीन मठ, कल्याणमठ, बंकापूरचा अरळेले मठ, मूरघोड महांतस्वामी मठ अशा अनेक ठिकाणी त्यांचे पुराणप्रवचन प्रसिद्ध झाले.

वे.पं. शिवप्पय्या शास्त्रींचा विवाह गुळेद्गुड्डच्या सालीमठाची कन्या हुच्चव्वा हिच्याशी झाला. त्यांना १४ मुले झाली. दुर्दैवाने त्यांपैकी १३ मुले जगली नाही. शेवटचा १४ वा मुलगा चि. रेवणसिद्धय्या हाच जगला. त्यांनी हुब्बळीच्या कल्याणमठाचे श्री म.नि.प्र. बसवलिंग स्वामीजींच्या अपेक्षेनुसार कल्याणमठात कायम वास्तव्य केले. पं. शिवप्पय्या शास्त्रींनी

शेवटच्च्या श्वासापर्यंत पुराणप्रवचनाच्या माध्यमातून समाजात धर्मजागृतीचे कार्य केले. वयाच्या ८४ व्या वर्षी दि. ११.३.१९६६ रोजी हुब्बळीच्या कल्याणमठात ते लिंगैक्य झाले.

---

परिचय : महांतेश आर. हिरेमठ, गोवा.

## २०. श्री वे. पं. बसवलिंगशास्त्रीजी

तोपकट्टी हिरेमठ, मु.पो. गंवार,

ता. जेवरगी, जि. कलबुर्गी (कर्नाटक)



गंवार गावातील तोपकट्टी हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरा असणारा मठ आहे. मठातील कागदपत्रानुसार या मठावर २० शिवाचार्य होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी हे या मठाचे मूळपुरुष होत. अशी भव्य परंपरा असणाऱ्या तोपकट्टी हिरेमठाचे श्री. वे. बनदय्या शास्त्रीजी व सौ. नीलम्मा यांच्या पवित्र गर्भी द्वितीय पुत्र म्हणून १८९० मध्ये पं. बसवलिंगशास्त्री जन्मास आले. गंवार गावी त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. आपल्या मठाचे पट्टाध्यक्ष श्री. ष.ब्र. राचोटी शिवाचार्य स्वामीजी यांच्या छत्रछायेत वाढून त्यांनी धार्मिक संस्कार ग्रहण केले. त्यानंतर आपले मोठे बंधू विश्वाराध्य यांच्यासोबत उच्च शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य

महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०२ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीतील विद्वानांकडून ९ वर्षेपर्यंत त्यांनी व्याकरण व साहित्यशास्त्राचा अभ्यास करून काव्यतीर्थ व व्याकरणतीर्थ या पदव्या मिळविल्या. आपले ज्येष्ठ बंधू विश्वाराध्यांप्रमाणे हेदेखील पंडित झाले.

काशीतील अध्ययन पूर्ण करून ते आपल्या गावी परतले. १९११ मध्ये त्यांनी गंगांबे नामक कन्येशी विवाह केला. श्री उज्जयिनी जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या सहवासात राहून ते धर्मसभेत प्रबोधन करीत असत. त्यांची विद्वत्ता आणि वाक्चातुर्य पाहून श्री उज्जयिनी जगद्गुरूंनी त्यांच्यावर अनुग्रह केला. त्रिकाल लिंगपूजानिष्ठ होऊन ते गंवार गावी परतले. तेथे एक संस्कृत पाठशाळा काढून मुलांना शिकवू लागले. पुराणप्रवचन करून त्यांनी खूप प्रसिद्ध मिळविली. त्यांना चंद्रशेखर नावाचा एक मुलगा झाला.

पं. बसवलिंग शास्त्रीजींनी जीवनभर ज्ञानाचा प्रसार केला. १९६५ मध्ये भाद्रपद कृष्ण सप्तमीच्या दिवशी ते लिंगैक्य झाले. हल्ली त्यांचे सुपुत्र श्री. वे. चंद्रशेखर हे गंवार हिरेमठाचे सर्व धार्मिक परंपरा चालवीत आहेत. अब्बेतुमकुरू च्या विश्वाराध्य सिद्धसंस्थानमठाचे पट्टाधिकारी शिवाचार्यरत्न श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामीजी हे श्री. चंद्रशेखर यांचे सुपुत्र होत. ते अब्बेतुमकुरूच्या सर्वांगीण विकासासाठी अहर्निश प्रयत्न करीत असतात.

---

परिचय : पं. राजगुरू गुरुस्वामी कलकेरी, गदग.

## २१. घनपंडित श्री विश्वाराध्य स्वामीजी



श्री विश्वाराध्य सिद्धसंस्थान मठ,
मु.पो. अब्बेतुमकूर, ता. यादगिरी,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)

'काशीघनपंडित' म्हणून हे प्रसिद्ध झाले. श्री विश्वाराध्य स्वामी हे मूलतः हिरेमठाचे होते. गंवार (ता. जेवरगी, जि. कलबुर्गी) या गावचा तोपकट्टी हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेचा आहे. श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी हे या मठाचे मूलकर्ते होत. या मठाला मोठा शिष्यवर्ग आहे. या मठाचे वे. बनदय्या आणि सौ. नीलम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १८८० मध्ये श्री विश्वाराध्यांचा जन्म झाला. तत्कालीन पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. राचोटी शिवाचार्य स्वामीजींच्या कृपाछत्राखाली विश्वाराध्यांनी कन्नड व संस्कृत भाषांचा अभ्यास केला. गुरुचरणी विद्याभ्यास करून ते गुरूंच्या प्रेरणेने उच्च अध्ययनासाठी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०२ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

काशीक्षेत्री विविध विद्वानांकडून व्याकरण, साहित्य, वेदान्त या शास्त्रांचा ९ वर्षेपर्यंत अभ्यास करून त्यांनी पांडित्य संपादन केले. १९११ मध्ये ते आपल्या गावी गंवारला परत आले. त्यांचे प्रखर पांडित्य पाहून कर्नाटकातील भक्त त्यांना 'काशीघनपंडित' असे संबोधू लागले. जोगुरू गावच्या बसवांबा हिच्याशी १९११ मध्ये यांनी विवाह करून गृहस्थाश्रमात प्रवेश केला. श्रीउज्जयिनी जगद्गुरू श्री १००८ सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना व त्यांचे कनिष्ठ बंधू पं. बसवलिंग शास्त्रीजी यांना त्यांच्या विद्वत्तेची वार्ता ऐकून आपल्या पीठात बोलावून घेतले. त्यांना धर्मप्रचार मंडळात घेऊन त्यांच्याकडून धर्मप्रबोधन करवून घेतले. काही वर्षे तेथे सेवा करून उज्जयिनी महास्वामीजींचा कृपाशीर्वाद प्राप्त करून ते स्वग्रामी परतले.

गंवार आणि नायिकल्ल या गावी संस्कृत पाठशाळा काढून दोन्ही बंधूंनी

तेथे स्वत: अध्यापन सुरू केले. विद्यार्थ्यांचा योगक्षेम ते स्वत: पाहात असत. त्यामुळे समाजात त्यांना गौरव प्राप्त झाला. पुराणप्रवचन सांगण्यात त्यांचा संपूर्ण प्रांतात नावलौकिक झाला. पं. विश्वाराध्यांना अपत्य झाले नाही. त्यामुळे विरक्त होऊन त्यांनी जेवरगीजवळ शाखापूर येथे घोर तपस्या केली. सिद्धी प्राप्त करून घेतली. तेव्हा भक्त इष्टार्थप्राप्तीसाठी त्यांची पूजा करू लागले. त्यांच्या तपश्चर्येची ख्याती सर्वदूर पोहोचली. शेवटी अब्बेतुमकूरच्या सक्रेप्पा पाटलांच्या विनंतीनुसार ते अब्बेतुमकूरला जाऊन राहिले. त्यांच्या दर्शनासाठी हजारो भक्त तेथे येऊ लागले. आपल्या जीवनात अनेक लीला करून ते दि. २६.२.१९५५ रोजी (फाल्गुन शुद्ध चतुर्थी) अब्बेतुमकूर येथे लिंगैक्य झाले. तेथेच त्यांची योगसमाधी बांधण्यात आली.

सध्याचे अब्बेतुमकूर विश्वाराध्य मठाचे मठाधिपती श्री शिवाचार्यरत्न ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामीजी प्रतिवर्षी फाल्गुन शुद्ध पंचमीस लिंगैक्य विश्वाराध्यांचा पुण्यस्मरणोत्सव साजरा करीत असतात. त्यावेळी पदयात्रा करीत लक्षावधी भक्त त्या ठिकाणी येतात. या निमित्ताने पंचपीठांचे जगद्गुरू, निरंजनमूर्ती, शिवाचार्य, कवी, कलाकार व मंत्री इत्यादी मान्यवरांना श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य निमंत्रित करीत असतात. श्री विश्वाराध्यांच्या योगसमाधीवर त्यांची अमृतशिलामूर्ती पंचपीठांच्या जगद्गुरूंच्या अमृतहस्ते प्रतिष्ठापित करण्यात आली. त्यावेळी तेथे फार मोठा धार्मिक समारंभ पार पडला. श्री विश्वाराध्यांनी तपश्चर्या केलेल्या आणि निवास केलेल्या ठिकाणी प्रत्येक गावात मंदिर उभे केले गेले आहे. श्री विश्वाराध्य योगसमाधीत राहून आजदेखील भक्तांचे मनोरथ पूर्ण करणारे कल्पवृक्ष झाले आहेत.

---

परिचय : पं. राजगुरू गुरुस्वामी कलिकेरी, गदग.

## २२. तर्कतीर्थ श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी

पंचवण्णिगी हिरेमठ,
मु.पो. हूली, ता. सौंदत्ती, जि. बेळगाव (कर्नाटक)



हा बृहन्मठ काशीपीठाचा शाखामठ असून त्याचे मूळ कर्तृपुरुष श्री दक्षिणामूर्ती शिवाचार्य होत. या मठाची परंपरा अत्यंत प्राचीन असून येथे स्थिरपट्टाधिकारी ५१ शिवाचार्य आणि चरपट्टाधिकारी ४६ शिवाचार्य होऊन गेले आहेत. हे सर्व शिवाचार्य विद्वान व तपस्वी होते. या मठाचे चरपट्टाधिकारी श्री सिद्धनंजेश्वर शिवाचार्य यांनी पंचवर्ण या महासूत्रावर वीरशैव भाष्य केले आहे. त्यांचे शिष्य श्री चिक्कंजेश्वर शिवाचार्यांनी श्री जगद्गुरू विश्वकर्ण शिवाचार्यांचे चरित्र २७ श्लोकांत रचलेले आहे. ते 'श्री जगद्गुरू विश्वकर्ण विजय नक्षत्रमालिका' या नावाने प्रसिद्ध झाले आहे.

तर्कतीर्थ श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी हे हूली बृहन्मठाचे ४४ वे चरपट्टाधिकारी होत. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेऊन ते उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १९०३-१९०४ मध्ये काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीच्या विद्वानांकडून साहित्य, व्याकरण, तर्कशास्त्र यांचा अभ्यास करून त्यांनी कलकत्त्याची तर्कतीर्थ ही उपाधी संपादन केली. त्यांनी सांख्य, वेदान्त, शिवाद्वैत या सिद्धान्तांचा पूर्ण अभ्यास केला. त्यांना तर्कतीर्थ, वेदान्तविशारद, सांख्यालंकार, न्यायवाचस्पती, शिवाद्वैत सिद्धान्त सुधाकर, संस्कृत साहित्य विलास इत्यादी प्रशस्ती प्राप्त झाल्या. काशी येथील अध्ययन पूर्ण करून ते स्वग्रामी परतले.

विविध सभांत भाग घेऊन आपल्या विद्वत्तेने ते प्रसिद्धीस आले. त्यांची प्रतिभा पाहून १९२० मध्ये नवलगुंद येथील द्वितीय चरपट्टाधिकारी

संमेलनाचे अध्यक्ष म्हणून त्यांची निवड करण्यात आली. १९४० मध्ये बेळगाव येथे झालेल्या प्रथम संस्कृत साहित्य संमेलनात संस्कृतमध्ये भाषण करून त्यांनी पंडितांकडून वाहवा मिळवली. त्यांच्या सर्व विचारांना २९.१२.१९४१ च्या 'पंचाचार्य प्रभा' या पत्रिकेत प्रसिद्धी मिळाली. ते उत्तम लेखक होते. त्यांनी शिवाद्वैतपरिभाषा, शिवानुभव दीपिका, वीरशैव सिद्धान्त चूडामणी, सूरभारती विलास, विजयध्वज विलास इत्यादी ग्रंथांची रचना केली. आपल्या जीवनकालात अनेक धार्मिक कार्यक्रम करून त्यांनी कीर्ती मिळविली. त्यांची क्रियासमाधी मुक्तिमंदिर या धर्मक्षेत्रात आहे. हल्ली त्यांचे उत्तराधिकारी म्हणून श्री ष.ब्र. शिवमहांतेश्वर शिवाचार्य स्वामीजी धर्मकार्य करीत आहेत.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ८२-८६.

## २३. श्री महांत शिवाचार्य स्वामीजी

पंचवण्णिगी हिरेमठ, मु.पो. हूली, ता. सौंदत्ती, जि. बेळगाव (कर्नाटक)

हूली येथील पंचवण्णिगी हिरेमठ हा काशीपीठाची शाखा असून या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. दक्षिणामूर्ती स्वामीजी होत. या मठाची परंपरा अत्यंत प्राचीन असून याला स्थिर-चरपट्ट आहे. या मठावर स्थिरपट्टाचे एकूण ५१ शिवाचार्य आणि चरपट्टाचे ४६ शिवाचार्य होऊन गेले आहेत.

श्री ष.ब्र. महांत शिवाचार्य स्वामीजी हे या मठाचे स्थिरपट्टाधिकारी होते. स्वग्रामी प्राथमिक अध्ययन करून उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते १९०३-१९०४ मध्ये काशीस आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील व्याकरणाचार्यांकडून सिद्धान्तकौमुदी इत्यादी ग्रंथांचा अभ्यास केला. नंतर आपल्या गावी परत येऊन पट्टाधिकार स्वीकारून धर्मकार्य केले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ४४.

## २४. श्री. वे.पं. मल्लिकार्जुन सखाराम जंगम

मु. रहिमतपूर, ता. कोरेगाव, जि. सातारा (महाराष्ट्र)



रहिमतपूर या गावी एक जंगम कुटुंब व्यापार-उद्योगाच्या क्षेत्रात संपन्न असून त्या घराण्यात श्री.वे. सखाराम जंगम हे गृहस्थ व्यापारउदीम करीत आपली उपजीविका चालवीत होते. १८९३ मध्ये त्यांना मुलगा झाला. त्याचे मल्लिकार्जुन असे नाव ठेवले. मल्लिकार्जुनाने जन्मगावीच मराठी भाषेतून प्राथमिक शिक्षण घेतले. बार्शीहून प्रकाशित होणारे 'वीरशैव गर्जना' हे साप्ताहिक त्यांच्याकडे येत असे. लहानपणापासूनच त्याचे वाचन करून मल्लिकार्जुनाला वीरशैवधर्माचे ज्ञान झाले. विशेष धर्मज्ञान संपादन करण्यासाठी काशीला जाऊन संस्कृत भाषा शिकून वेदविद्या आत्मसात करावी अशी उत्कट इच्छा त्यांच्या मनात दृढ झाली. सोलापुराहून अनेक लोक पायी काशीला जातात हे समजल्यावर ते घरात कोणास न कळवता सोलापुरास गेले. होटगीमठातून जाणाऱ्या पदयात्रेत सामील झाले. त्यांच्यासोबत गेलेला नरहरी नावाचा मित्र हा अर्ध्या वाटेवरून परत आल्यावर त्याच्याकडून मल्लिकार्जुन काशीला गेल्याचे कुटुंबियांना समजले. तेव्हा कुटुंबियांना समाधान वाटले.

खूप दूरचा प्रवास पायी करत १९०४ मध्ये ते काशीला पोहोचल्यावर त्यांना खूप आनंद झाला. श्री जगद्गुरू १००८ राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजी या छोट्या मुलाची जिज्ञासा पाहून संतुष्ट झाले. त्यांनी त्याला अध्ययनासाठी जंगमवाडी मठात ठेवून घेतले. त्यावेळी महाराष्ट्र-कर्नाटकातील अनेक विद्यार्थी मठात राहात होते. त्यांच्यामधील बार्शीचे श्री महेश्वर औंधकर महाराज विद्यार्थ्यांसोबत मराठी भाषेत बोलत. त्यांच्यासोबत मल्लिकार्जुनाने संस्कृतचा अभ्यास सुरू केला. १० वर्षे काशीच्या मठात राहून त्यांनी वेदाध्ययन पूर्ण केले. नंतर स्वग्रामी परतून

वैदिक विद्येच्या बळावर आपली उपजीविका सुरू केली. सातारा परिसरात पंडित म्हणून त्यांना ख्याती मिळाली. पुढे गृहस्थाश्रमी होऊन त्यांनी आपल्या पुत्रास वैदिक विद्येसोबत आधुनिक शिक्षणदेखील दिले. वयाच्या ७५ व्या वर्षी १९६८ मध्ये ते लिंगैक्य झाले. महाराष्ट्रातील एका खेड्यातील मुलाने वीरशैव साप्ताहिक वाचून त्याच्या ज्ञानाची उत्कट इच्छा मनात बाळगावी, त्यासाठी काशीला जाऊन अध्ययन करावे आणि विद्यादान करण्यात आपले समग्र आयुष्य वेचावे हे त्यांचे जीवन सर्वांसाठी अतिशय प्रेरणादायी आहे.

## २५. शास्त्रमार्तंड श्री वे.पं. श्रीशैलनाथ शास्त्रीजी

उदास्ती हिरेमठ, द्वारा विजयशास्त्री, उदास्ती हिरेमठ, कडेबझार, बेळगाव (कर्नाटक)



पंडित श्रीशैलनाथ शास्त्री हे मूळचे देशनूर (ता. बैलहोंगल, जि. बेळगाव) या गावच्या उदास्ती हिरेमठाचे होते. या मठाचे वे. गुरुबसय्या व सौ. संगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी ८.८.१८८२ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांनी देशनूर येथे प्राथमिक शिक्षण घेऊन नंतर वडिलांच्या मार्गदर्शनाखाली हालकेरे येथील संस्कृत पाठशाळेत संस्कृतचे प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. हुक्केरी येथील सदाशिव शास्त्रीचे शिष्यत्व पत्करून तेथील पाठशाळेत पुढील शिक्षण घेतले. उच्च संस्कृत शिक्षणाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०४ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथे विविध विषयांत पारंगत पंडितांकडून त्यांनी व्याकरण, साहित्य, न्याय, वेदान्त इत्यादी शास्त्रांचा पूर्ण अभ्यास केला. विविध विषयांत प्राविण्य मिळवल्यामुळे

त्यांना शास्त्रमार्तंड, शास्त्ररत्नाकर, शास्त्रालंकार, शास्त्रशिखामणी, शास्त्रभूषण अशा विविध उपाधी प्राप्त झाल्या. त्यांनी १९२२ पर्यंत म्हणजे १८ वर्षे काशीत निरंतर अभ्यास करून सर्व शास्त्रांत प्राविण्य संपादन केले. त्यांचे पांडित्य पाहून मैसूरचे राजे श्रीकृष्णराज वडियर यांनी त्यांना तीन वर्षे राजगुरू म्हणून आपल्या दरबारात ठेवले. श्रीशैलनाथ शास्त्रींनी नागनूर बृहन्मठाध्यक्ष काशीनाथ शास्त्रीजींच्या सोबत राहून काही वर्षे 'पंचाचार्य प्रभा' या नियतकालिकाचे संचालक म्हणून काम केले.

त्यांनी आपले उत्तर आयुष्य बेळगावात व्यतीत केले. बेळगावातील भक्तांना त्यांच्याविषयी अपार भक्ती होती. वैदिक व ज्योतिष या विषयांत लोकांच्या शंकांचे ते समाधान करीत. शास्त्रपंडित, ज्योतिष विद्वान अशी त्यांना प्रसिद्धी मिळाली. शतायुषी होऊन १९८२ मध्ये ते लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर त्यांचे चिरंजीव पं. विजय शास्त्री वडिलांकडून मिळविलेल्या विद्येने बेळगाव शहरात धार्मिक कार्य करीत असतात.

## २६. श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ होन्निदिब्ब आणि उगुरकोड,
ता. बैलहोंगल, जि. बेळगाव (कर्नाटक)



होन्निदिब्ब आणि उगुरकोड या गावचा हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून या मठाला प्राचीन इतिहास आहे. या मठपरंपरेत अनेक शिवाचार्य होऊन गेले असून सध्या श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी हे येथील शिवाचार्य आहेत. होन्निदिब्ब गावचे श्री वे. महांतय्या स्वामी व सौ. पार्वतम्मा यांच्या पवित्र गर्भी १८८७ मध्ये त्यांचा जन्म झाला. जन्मगावीच त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. संपगाव व बैलहोंगल येथे त्यांनी माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे होन्निदिब्ब आणि उगुरकोड हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली.

त्यानंतर भक्तांच्या इच्छेनुसार उच्च शिक्षणासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. नंतर काशीतील विद्वानांकडून भाषा, व्याकरण, वैदिक विद्या व ज्योतिष इत्यादी शास्त्रांचा अभ्यास केला. १९०९ पर्यंत ४ वर्षे काशीत राहून अभ्यास करून ते स्वग्रामी परतले. आपल्या गावात मठाची स्थापना केली. १९६५ मध्ये उगुरकोड या गावात ते लिंगैक्य झाले. सध्या या मठावर कोणीही उत्तराधिकारी नसून स्वामीजींचे वंशज मठाच्या पुढील व्यवस्थेविषयी विचार करीत आहेत.

## २७. श्री ष.ब्र. पं. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, जोरापूर पेठ, बनगार गल्ली,
मु.पो.ता.जि. विजयपूर (कर्नाटक)



विजयपूरचा हा हिरेमठ रंभापुरी पीठाची शाखा असून हा शिष्यवर्ग परंपरेचा आहे. या प्राचीन मठात अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. पंडित शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजींचा कटगेहळ्ळी (ता. जगळूरू, जि. चित्रदुर्ग) या गावच्या वे.मू. सिद्धेश्वरय्या व सौ. चन्नम्मा यांच्या पवित्र गर्भी १८८८ मध्ये म्हणजे शा.श. १८०९ विश्वजितनाम संवत्सरात माघ मास शुक्लपक्ष द्वादशी या तिथीला बुधवारी जन्म झाला. त्यांचे सदाशिव असे नाव ठेवण्यात आले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. बाल्यावस्थेपासूनच संस्कृतचा अभ्यास करण्याची त्यांची इच्छा होती. परंतु आईवडिलांनी अनुमती न दिल्यामुळे ते वयाच्या १४ व्या वर्षी घर सोडून १९०२ मध्ये मैसूरच्या जपदकट्टी मठात गेले. त्यांच्या ठिकाणी असलेले संस्कृतप्रेम पाहून मठाच्या स्वामीजींनी त्यांना आपल्याकडे ठेवून घेतले. तेथे पं. सुब्रमण्यम शास्त्रींकडे संस्कृतच्या अभ्यासाला प्रारंभ करून नंतर सदाशिव देवरूकडून त्यांनी काव्य, नाटक, अलंकार, व्याकरण इत्यादींचा अभ्यास केला.

त्याच काळात शेषण्णा व पुट्टस्वामी गवई यांचे शिष्य होऊन ते दाक्षिणात्य संगीतात पारंगत झाले. १९०५ मध्ये उच्च संस्कृत शिक्षणासाठी काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीतील सुप्रसिद्ध म.म. पं. शिवकुमार मिश्रांचे शिष्य होऊन त्यांनी तर्क, मीमांसा, वेदान्त, सांख्य इत्यादी शास्त्रांचा अभ्यास करून पांडित्य संपादन केले. त्यावेळी त्यांना विद्यालंकार, विद्यावाचस्पती, वेदान्तभूषण इत्यादी उपाधी मिळाल्या. त्या काळात काशीपीठात पं. फालाक्ष शास्त्री हे विद्वान राहात होते. ते शिवमोग्गा

जिल्ह्यातील बारडगी गावचे मठाध्यक्ष होते. त्याशिवाय श्री सदाशिव देवरू हे आजीचे भाऊही तेथे होते. सदाशिवला त्यांचे नेहमी सहकार्य मिळाले. श्री सदाशिव देवरूने काशीतील शिक्षण पूर्ण करून काशी सोडताना आजन्म ब्रह्मचारी राहून शिवयोगी होण्याचा संकल्प केला. देशात संचार करून अनेक विद्वानांशी शास्त्रार्थ करून त्यांनी विजय मिळविला. ते एकांतशील व तपोनिष्ठ होते. विजयपूरजवळच्या हुल्ल्याळ येथे १४ महिने निराहार राहून त्यांनी तपश्चर्या केली. नंतर विजयपूरच्या शंकरलिंग देवस्थानात अनुष्ठान आणि प्रवचन करून लोकांना प्रभावित केले. त्यांचे पांडित्य आणि तपोनिष्ठा पाहून जोरापूर हिरेमठाच्या भक्तांनी त्यांच्या रिक्त मठावर पट्टाध्यक्ष होण्याची त्यांना विनंती केली. लोकांच्या आग्रहाखातर त्यांनी होकार दिला. त्यानंतर एका शुभमुहूर्तावर अरळेले हिरेमठाध्यक्ष श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्यांनी शास्त्रोक्त पद्धतीने जोरापूर मठावर त्यांचा १९२० मध्ये पट्टाभिषेक केला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले.

विद्वान व साहित्यिक असलेल्या या स्वामीजींनी भक्तांच्या इच्छेनुसार विविध ठिकाणी पुराणप्रवचन केले. बळ्ळारीच्या मरिस्वामी मठात नवरात्रीत यांच्या अमोघ अमृतवाणीचा लाभ घेतलेल्या भक्तांनी २०.१२.१९२५ मध्ये बळ्ळारीपूर पालन संघाच्या वतीने सन्मानपत्र देऊन त्यांचा गौरव केला. उत्तम लेखक असलेल्या स्वामीजींनी अष्टावरण विवेक, आगम-परिज्ञान, प्रभातिलक, शिवशक्तिविलास, आणि वेदपरिचय (पूर्वभाग) इत्यादी कृतींची रचना केली आहे. त्यांनी योगसाधनेसाठी हुल्ल्याळच्या डोंगरात एक योगाश्रम स्थापन केला आणि आपल्या जीवनाचा उत्तरार्ध तेथेच घालविला. एकांतवास आणि शिवयोग साधना करीत त्यांनी जिवंत समाधी घेतली.

---

संदर्भ : १. गुरुवर्ग दर्पण, पृ. ८२.
२. विद्यावाचस्पती श्री शंभुलिंगेश्वर विजयचंपू संस्कृत, गलगली पंढरीनाथाचार्य, १९८२, पृ. १-१४१.

२८. **श्री वे.पं. ओंकारशास्त्रीजी**

मु.पो. हळ्ळूर, ता. हिरेकेरूर,
जि. हावेरी (कर्नाटक)



पं. ओंकारशास्त्रीजींचा हळ्ळूरच्या हिरेमठ घराण्यात १८९० मध्ये जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. आपले बंधू गुरुसिद्ध शास्त्री यांच्यासोबत ते काशीला गेले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०६ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीत १० वर्षे राहून त्यांनी साहित्य, ज्योतिष या शास्त्रांचा अभ्यास केला. ज्योतिषशास्त्राचा विशेष अभ्यास करून ते आपल्या गावी परत आले.

काशीहून परतल्यानंतर त्यांनी स्वत: १९१६ मध्ये पंचांग तयार करून ते प्रकाशित केले. त्यामुळे पंचांगकर्ते अशी त्यांना प्रसिद्धी मिळाली. जातक लिहिण्यामध्ये ते सिद्धहस्त होते. यांना गुळितशिखामणी, ब्रह्मश्री, सिद्धान्ती इत्यादी प्रशस्तींनी गौरविण्यात आले. अनेक पाठशाळांतून त्यांनी विद्यार्थ्यांना ज्योतिषशास्त्र शिकवून ते कीर्तिमान झाले.

## २९. श्री ष.ब्र. पं. वीरभद्र शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. अब्बिगेरी,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



अब्बिगेरी हे इतिहासप्रसिद्ध गाव असून अनेक शिलालेखांत या गावचा उल्लेख आढळतो. या गावातील हिरेमठ रंभापुरी पीठाचा शाखामठ असून त्याला प्राचीन परंपरा आहे. वलदाळू आणि नंदूर या गावांत या मठाच्या शाखा आहेत. अब्बिगेरी हिरेमठावर १० शिवाचार्य होऊन गेल्याचे दाखले उपलब्ध आहेत. श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी हे या मठाचे मूळ कर्तृपुरुष होते. ते अत्यंत महिमाशाली होते. त्यामुळे त्यांच्यानंतर आलेल्या मठाधिपतींना त्यांचेच नाव ठेवण्यात आले. या परंपरेतील ६ वे मठाधिपती श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी हेदेखील शिवपूजानिष्ठ असून महिमाशाली होते. त्यांच्यानंतर श्री सिद्धाराम शिवाचार्य, श्री रेणुक शिवाचार्य, श्री वीरय्या शिवाचार्य हे पट्टाध्यक्ष होऊन गेले. दहावे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. पंडित वीरभद्र शिवाचार्य झाले. पूर्वाश्रमी अब्बिगेरी हिरेमठाचे श्री. वे. वीरसंगय्या आणि सौ. पार्वतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १८९० मध्ये आईच्या माहेरी सवडी (ता. रोण) या गावी त्यांचा जन्म झाला. वीरभद्रय्या असे त्यांचे नाव ठेवण्यात आले.

अब्बिगेरी येथे त्यांनी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. अब्बिगेरी हिरेमठाचे श्री ष.ब्र. वीरय्या शिवाचार्य स्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर चि. वीरभद्रय्यांचे प्राथमिक शिक्षण सुरू असतानाच १८९७ मध्ये वडिलधाऱ्या माणसांच्या इच्छेनुसार अब्बिगेरी मठावर त्यांचा पट्टाभिषेक करण्यात आला. गावातील भक्तांच्या सहकार्याने उच्च संस्कृत व्यासंगाकरिता १९०७ मध्ये ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीत १४ वर्षे राहून विविध विषयांच्या विद्वानांकडून त्यांनी व्याकरण, साहित्य,

दर्शन, ज्योतिष या शास्त्रांत पांडित्य संपादन केले. शिवाय अनेक भाषांवर प्रभुत्व मिळविले. नंतर अब्बिगेरीस परत आले.

आपल्या हिरेमठात १९०२ मध्ये स्थापन केलेल्या मल्लणार्य यांच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक होऊन ते शिकवू लागले. या पाठशाळेत अध्ययन करणारे विद्यार्थी पुढीलप्रमाणे आहेत. श्री रंभापुरी जगद्गुरू शिवानंद राजेंद्र महास्वामीजी, नागनूर बृहन्मठाध्यक्ष पं. काशीनाथ शास्त्रीजी, चिक्कमण्णूरचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य, गदगचे वे. बसय्या शास्त्री, सिंदगी हिरेमठाचे श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य, नरेगल गच्चिन मठाचे शास्त्रीजी, अब्बिगेरी गावातील सवनूर मठाचे जगदीश शास्त्री व अब्बिगेरी नंदिकेश्वर मठाचे पं. काशीनाथ शास्त्री.

श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य स्वामीजी यांनी अविरत विद्यादान केले. दि. २१.७.१९७० या दिवशी ८० व्या वर्षी ते लिंगैक्य झाले. त्यांचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. सोमशेखर शिवाचार्य स्वामीजी या मठाची परंपरा पुढे चालवीत आहेत.

---

परिचय : श्री. षण्मुख सिद्धेकोप्प, पत्रकार, अब्बिगेरी.

## ३०. श्री वे.पं. सोमनाथ शास्त्री

मु.पो. इटगी, ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



रोण तालुक्यातील इटगी हे गाव ऐतिहासिक असून शांतगेरी संस्थानातील गाव होय. म्हणून याला शांतगेरी इटगी असे म्हणतात. या गावात भीमांबिका नामक अवधूत शिवशरणी होऊन गेली आहे. गदग तालुक्यातील कुरडगी गावच्या हिरेमठाचे वे.मू. तोंटदार्य आणि त्यांची धर्मपत्नी सौ. लिंगांबिका हे इटगी गावी येऊन राहिले. यंत्रतंत्राचा व आयुर्वेदाचा त्यांचा अभ्यास होता. गावातील मुलांना आपल्या मठात ठेवून ते शिक्षण देत होते. या दंपतीला पाच मुले होती. १९८७ मध्ये त्यांच्या पाचव्या मुलाचा जन्म झाला. त्याचे नाव गुरुपादय्या होते. हेच पुढे सोमनाथ शास्त्री या नावाने प्रसिद्धीस आले.

वे.मू. गुरुपादय्या यांनी अब्बिगेरी येथे संस्कृत पाठशाळेत प्राथमिक अभ्यास पूर्ण केला. अब्बिगेरी सालीमठच्या श्री शिवयोगी यांनी त्यांना मुलासारखे सांभाळले. गुरुपादय्या मुलकी परीक्षेत जिल्ह्यात पहिला आला. संस्कृतच्या पुढील अध्ययनासाठी सालीमठ शिवयोगींनी भक्तांकडून वर्गणी गोळा करून १९०५ साली त्यांना सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद पाठशाळेत पाठविले. तेथे दोन वर्षे अभ्यास करून वार्षिक परीक्षेत ते पहिले आले. तेव्हा संतुष्ट होऊन मल्लप्पा वारद यांनी त्यांना प्रोत्साहन देऊन पुढील शिक्षणासाठी काशीला पाठवले. श्री १००८ जगद्गुरू राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०७ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशी येथे विभिन्न शास्त्रांच्या पंडितांकडून त्यांनी साहित्य, व्याकरण आणि न्याय या शास्त्रांचा अभ्यास करून विशेषतः न्यायशास्त्रात प्राविण्य मिळविले. दहा वर्षे काशीत अध्ययन करून १९१७ मध्ये ते परत निघाले. त्यावेळी जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी

त्यांना 'पंडित सोमनाथशास्त्री' असे नवे नाव दिले. तेव्हापासून वे. गुरुपादय्या हे पंडित सोमनाथ शास्त्रीजी या नावाने प्रख्यात झाले.

ते गुळेद्गुड्डच्या कोटेकल्ल मठात श्री हुच्चेश्वर संस्कृत पाठशाळेत मुख्याध्यापक म्हणून रुजू झाले. काही काळानंतर बागलकोटच्या हुंडेकार मठाच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून रुजू झाले. पुढे त्यांनी हानगल कुमार शिवयोगींनी स्थापन केलेल्या श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात पाच-सहा वर्षेपर्यंत न्यायशास्त्राचे प्राध्यापक म्हणून सेवा केली. ते ६४ शीलाचारसंपन्न व शिवयोगसिद्ध होते. त्यांनी निराभारी चरपट्टाधिकारी, नेट्टदपूर चिक्कवीर देशिकेंद्र लीलामृत ही ग्रंथरचना केली आहे. शेवटच्या काळात शिवमोग्गा जिल्ह्याच्या गोग्गीहळ्ळी हिरेमठ आणि केळदी संस्थान हिरेमठ यांची व्यवस्था ते पाहत होते. १९४५ मध्ये ज्येष्ठ वद्य एकादशीला ते लिंगैक्य झाले. गोग्गीहळ्ळी हिरेमठात त्यांची क्रियासमाधी आहे.

---

संदर्भ : १. पुण्यश्लोक वारद, १९४९, पृ. २९३.
२. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३५८.
३. सोमनाथशास्त्रीगळ चरित्रे, मूरुसाविर मठ प्रकाशन, १९८८, पृ. १-१०४.

## ३१. श्री वे.पं. काशीनाथ शास्त्रीजी

हिरेमठ, मु.पो. अब्बिगेरी, ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)

अब्बिगेरी हिरेमठाचे काशीनाथ शास्त्री यांनी स्वग्रामी शिक्षण पूर्ण केले. १९०० मध्ये त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद पाठशाळेत प्रवेश घेऊन व्याकरण आणि साहित्यशास्त्राचा अभ्यास केला.

नंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी १९०८ मध्ये काशीला येऊन जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. शासकीय संस्कृत महाविद्यालयात न्याय व वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास करून ते न्यायाचार्य परीक्षेत उत्तीर्ण झाले.

नंतर परत येऊन अब्बिगेरी संस्कृत महाविद्यालयात ७-८ वर्षेपर्यंत प्राध्यापक म्हणून सेवा केली. वार्धक्यावस्थेत १९४४ मध्ये ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : पुण्यश्लोक वारद, पृ. २९२.

३२. **श्री म.नि.प्र. दहावे हुच्चेंद्र महास्वामीजी**

हुच्चेश्वर मठ, कमतगी–कोटेकल्ल
मु.पो. कमतगी, ता. हुनगुंद,
जि. बागलकोट (कर्नाटक)



बाराव्या शतकात होऊन गेलेल्या महाप्रसादी मरुळशंकरदेव यांच्यापासून कोटेकल्ल हुच्चेश्वर मठाची परंपरा प्रारंभ झाली. या मठावर आजपर्यंत १२ स्वामीजी होऊन गेले. सध्याचे श्री म.नि.प्र. हुच्चेश्वर स्वामीजी हे १३ वे पट्टाधिकारी होत. या मठाच्या परंपरेतील दहावे हुच्चेंद्र स्वामीजी हे प्रकांड पंडित होते. काशीच्या श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अभ्यास करून ते पंडित झाले होते. म्हणून लोक त्यांना 'काशीस्वामीजी' असे म्हणत असत.

तत्कालीन विजयपूर जिल्ह्यातील हुनगुंद तालुक्याच्या कमतगी गावी श्री वे.मू. मुप्पय्या स्वामी आणि सौ. वीराम्बा यांच्या पवित्र गर्भी १८८१ मध्ये त्यांचा जन्म झाला. बालपणी १८ वर्षांपर्यंत त्यांनी विद्याभ्यास न केल्यामुळे लोक त्यांची थट्टा करीत. त्यामुळे विद्यावंत होईपर्यंत मी मठात परतणार नाही, अशी त्यांनी प्रतिज्ञा केली. मध्यरात्री मठ सोडून गुळेद्‌गुड्डच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेण्यासाठी ते गेले. परंतु त्यांना प्रवेश मिळाला नाही. नंतर शलवडी संस्कृत पाठशाळेत त्यांनी संस्कृत व कन्नडचे थोडे ज्ञान मिळविले. नंतर गदगच्या श्री तोंटदार्य संस्कृत पाठशाळेत प्रवेश मिळवून संस्कृतवर प्रभुत्व मिळविले. हुब्बळीच्या मूरुसाविर मठाच्या संस्कृत कॉलेजात अभ्यास करून ते संस्कृतात पारंगत झाले. पुढील शिक्षणाकरिता काशीला जाण्याची उत्कट इच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली. बागलकोटच्या श्रीमंत वैजापूर घराण्याने त्यांच्या शिक्षणाची जबाबदारी स्वीकारून त्यांना काशीला पाठविले.

तत्कालीन काशीजगद्‌गुरू श्री १००८ शिवलिंग शिवाचार्य

महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९०९ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. ३-४ वर्षेपर्यंत येथील विविध विद्वानांकडून व्याकरण, तर्क, वेदान्त, या शास्त्रांचा अभ्यास करून ते प्रकांड पंडित झाले. त्यावेळी त्यांना 'पंडितवरेण्य' ही प्रशस्ती मिळाली. काशीचा अभ्यास पूर्ण करून १९१२ मध्ये ते स्वग्रामी परतले. कमतगी हळे हुच्चेश्वर मठाचे दहावे निरंजन पट्टाधिकारी झाले. पुढे कमतगीस आपल्या मठात १९१३ मध्ये एक संस्कृत पाठशाळा स्थापून स्वत: अध्यापन करू लागले. अनेक धार्मिक कार्यक्रमात सहभागी होऊन त्यांनी कीर्ती संपादन केली. शेवटी १९१८ मध्ये ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : पंडितवरेण्य दहावे हुच्चेंद्र, कोट्टुरू देवरू, कल्मठ, गंगावती, हुब्बळी मूरुसाविर मठ प्रकाशन, १९९२

३३. **श्री वे.पं. श्रीकंठ शास्त्रीजी**

हिरेमठ, मु.पो. नलवडी,
ता. नवलगुंद, जि. धारवाड (कर्नाटक)



नलवडी गावचा हिरेमठ हा केदारपीठाची शाखा आहे. या मठाचे वे.मू. अमरय्या व सौ. गुरुलिंगम्मा यांचे सुपुत्र श्रीकंठ शास्त्री यांचा १४ नोव्हेंबर १८८९ रोजी जन्म झाला. ते सुप्रसिद्ध नाटककार म्हणून गौरविले गेले. पं. नेहरू आणि त्यांचा जन्म एकाच दिवशी झाला. यांचे जन्मनाव राचय्या होते. तरीही ते पुढे नलवडी श्रीकंठ शास्त्री या नावाने प्रसिद्ध झाले.

त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन केले. १९१० मध्ये संस्कृत अध्ययनाकरिता काशीला येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील अनेक विद्वानांकडून साहित्य तसेच व्याकरणादी शास्त्रांचा अभ्यास करून पांडित्य संपादन केले. ते उत्तम वक्ते होते. काशीहून स्वग्रामी परतल्यानंतर शिवकीर्तने, पुराणप्रवचन आदी करीत त्यांनी धर्मप्रचार केला. त्यांनी अनेक कविता आणि नाटके लिहिली. त्यामुळे त्यांना उज्जयिनी जगद्गुरू श्री सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी 'कर्नाटककविचंद्र' ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला.

त्यांनी ४० पेक्षा अधिक नाटके आणि सुमारे ५० हून अधिक इतर साहित्य निर्माण केले. ते सर्व प्रकाशित झाले आहे. 'श्री जगद्ज्योती बसवेश्वर' व 'हेमरड्डी मल्लम्मा' ही यांची दोन नाटके प्रसिद्ध आहेत. त्या नाटकांचे अनेक प्रयोग होऊन इतिहास निर्माण झाला आणि ते लोकप्रिय ठरले. गदग व यादगिरीच्या संस्कृत महाविद्यालयात त्यांनी अध्यापक म्हणून अल्पकाळ सेवा केली. आपले संपूर्ण आयुष्य नाटक व साहित्यकृतींना वाहिले. देशभ्रमण करीत कीर्तन प्रवचन करीत त्यांनी लोकप्रबोधन केले. ते करीत असताना ते १४.१२.१९६७ रोजी ते लिंगैक्य झाले.

## ३४. श्री १००८ जगद्गुरू नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजी

केदारपीठ (उत्तरांचल)



पूर्वाश्रमी धारवाड जिल्ह्यातील कल्लेदेवरू गावच्या वीरमाहेश्वर वंशात १८८९ मध्ये यांचा जन्म झाला. पूर्वाश्रमी यांचे नाव गंगाधरय्या असे होते. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून उच्च शिक्षणाकरिता १९११ मध्ये त्यांनी जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीतील विद्वानांकडून संस्कृत व हिंदी भाषांचा अभ्यास केला. याशिवाय ते आयुर्वेदविशारद झाले. पुढे ते केदारपीठाचे ३१९ वे रावल जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींचे वारस म्हणून त्यांची केदारपीठावर नियुक्ती करण्यात आली.

श्री जगद्गुरू विश्वलिंग शिवाचार्य महास्वामीजी त्यावेळी केदारपीठावर असलेले ८० हजार रुपयांचे कर्ज फेडण्यासाठी उज्जयिनीजगद्गुरू सिद्धलिंग महास्वामीजी आणि पं. काशीनाथ शास्त्रीजी यांच्या सल्ल्यानुसार धनसंग्रह करण्यासाठी कर्नाटकातील अनेक धार्मिक कार्यक्रमात सहभागी झाले. पुढे १९१९ मध्ये डिसेंबर महिन्यात बेरूर येथे भरलेल्या ९ व्या अखिल भारत वीरशैव महासभेला त्यांचे सान्निध्य लाभले. त्यानंतर जगद्गुरू विश्वलिंग शिवाचार्य लिंगैक्य झाले. त्यांची समाधी उज्जयिनी पीठात आहे. विश्वलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी आपले प्रिय शिष्य नीलकंठ यांच्या नावाने इच्छापत्र लिहून ठेवले होते. त्याआधारे काशी जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी १.१०.१९२१ रोजी काशीपीठात त्यांना केदारपीठाच्या जगद्गुरुत्वाचा अधिकार प्रदान केला.

श्री जगद्गुरू नीलकंठलिंग शिवाचार्यांनी कर्नाटक-महाराष्ट्रात संचार करून भक्तांकडून दक्षिणा मिळवून केदारपीठाला कर्जमुक्त केले. एवढेच नव्हे तर पीठाची कीर्ती सर्वदूर पसरविली. त्यांनी उत्तरांचलचा उखीमठ

आणि गुप्तकाशी यांच्या दरम्यान असणारी केदारपीठाची ८० एकर जमीन उत्तराखंड विद्यापीठाच्या स्थापनेसाठी दान दिली. ३०.४.१९४५ रोजी विद्यापीठ इमारतीचे भूमिपूजन करण्यात आले. उत्तराखंड विद्यापीठ स्थापून त्या भागातील विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय करून दिली. त्यांनी धारवाड जिल्ह्यातील तिम्मापूर गावचे श्री. वे. पं. शिवमूर्ती शास्त्री हिरेमठ यांना वैराग्य सिंहासनाचा चरपट्टाधिकार देऊन त्यांचे चिद्घनलिंग शिवाचार्य असे नामकरण केले. परंतु ते थोड्या दिवसांतच लिंगैक्य झाले. म्हणून त्या पीठाचा योगक्षेम जगद्गुरू नीलकंठलिंग यांनीच पाहिला. २३.४.१९४५ रोजी उखीमठात ते लिंगैक्य झाले. त्यांची समाधी उत्तरांचल विद्यापीठात आहे. त्यांचे शिष्य विश्वनाथलिंग यांनी केदारपीठाचे रावल म्हणून सूत्रे हाती घेतली.

## ३५. श्री वे.पं. वीरभद्र शास्त्रीजी

हिरेमठ, मु. कोंगवाड,
ता. नवलगुंद, जि. धारवाड (कर्नाटक)

कोंगवाडचा हिरेमठ ही काशीपीठाची शाखा आहे. या मठाचे वे.मू. राचोटय्या आणि सौ. बसम्मा यांच्या गर्भी पं. वीरभद्र शास्त्रीजींचा १८८९ मध्ये जन्म झाला. त्यांनी रोण तालुक्यातील यावगल गावी कन्नड प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर वडिलांच्या आग्रहाखातर शलवडीच्या संस्कृत पाठशाळेत ३ वर्षे संस्कृतचे अध्ययन केले. सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत संस्कृतचे पुढील शिक्षण घेतले. नंतर श्री. मल्लप्पा वारद यांनी आपल्या उदार आश्रयाखाली त्यांना उच्च संस्कृत शिक्षणाकरिता १९११ मध्ये काशीला पाठविले. काशीपीठाधिपती १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

काशीमध्ये व्याकरण, तर्कशास्त्र, साहित्य यांचा त्यांनी अभ्यास केला. अध्ययन पूर्ण करून आपल्या गावी परतल्यानंतर अब्बिगेरी, कोप्पळ, होसपेटे येथील संस्कृत पाठशाळांत प्राध्यापक म्हणून त्यांनी अध्यापन कार्य केले. त्यानंतर श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरातही काही काळ अध्यापन केले. आपल्या जीवनातील अंतिम काळात उज्जयिनी पीठाचे जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपेस ते पात्र झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. १०७.

## ३६. श्री वे. सिद्धान्ती कोट्रप्पय्या शास्त्रीजी

शब्दमणी मठ, मु.पो. हिरेहडलगी,
ता. हुविन हडलगी, जि. बळ्ळारी (कर्नाटक)



हिरेहडलगीचा शब्दमणी मठ हा काशीपीठाचा शाखामठ असून या मठाचे वंशज हुविन हडलगी, हरपनहळ्ळी, कोट्टूरू आणि कूडलगी येथे राहतात. हे कोट्टूरचे कोट्टुरेश्वर स्वामींचे परमभक्त होत. श्री वे. कोट्रप्पय्य शास्त्रीजींचा जन्म हिरेहडलगी येथे १०.१२.१८९२ मध्ये झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण जन्मगावीच झाले. पुढे उच्च शिक्षणासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१२ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील विद्वानांकडून गणित व ज्योतिषाचा पूर्ण अभ्यास करून 'सिद्धान्ती' ही उपाधी प्राप्त केली. १० वर्षे काशीला अभ्यास करून १९२२ मध्ये ते आपल्या गावी परतले.

नंतर गृहस्थाश्रम स्वीकारून त्यांनी हिरेहडलगी येथेच वास्तव्य केले. ज्योतिषशास्त्राचे शिक्षण त्यांनी इच्छुक विद्यार्थ्यांना दिले. त्यांना पाच मुले आणि एक मुलगी होती. त्यांचा तिसरा मुलगा एच.एस.एम. चन्नबसय्य हा कृषिक्षेत्रातील उच्च शिक्षणासाठी अमेरिकेस जाऊन आला. ज्योतिषशास्त्राचे प्रकांड पंडित कोट्रप्पय्या शास्त्रीजी वयाच्या ६० व्या वर्षी १६.२.१९५२ मध्ये लिंगैक्य झाले.

## ३७. श्री पं. बसवराजेंद्र स्वामीजी

शिवानंद मठ, मु.पो.ता. रोण,
जि. गदग (कर्नाटक)



हे मूळचे रोण तालुक्यातील सर्जापूर गावचे होत. या गावातील श्रीमान सोमनगौडा आणि सौ. चिन्नम्मा यांच्या पवित्र गर्भी १८९२ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांचे बसवराज असे नामकरण करण्यात आले. जन्मगावी त्यांनी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून गदगच्या श्री शिवानंद स्वामीजींच्या छत्रछायेत राहून संस्कृतचे अध्ययन केले. त्यानंतर श्री शिवानंद स्वामीजींच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१२ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन व्याकरण, साहित्य आणि तर्कशास्त्र यांचा अभ्यास केला.

काशी येथील शिक्षण पूर्ण करून ते गदगला परतले. श्री शिवानंद स्वामीजींच्या आदेशानुसार त्यांनी श्री शिवानंद संस्कृत पाठशाला सुरू केली आणि स्वत: प्राध्यापक म्हणून विद्यार्थ्यांना ज्ञानदान केले. अनेक पंडित निर्माण केले. पुढे श्री शिवानंद स्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर ते गदग सोडून रोणला आले. तेथे आपले गुरू श्री शिवानंद स्वामीजींच्या नावे एक संस्कृत शाळा प्रारंभ करून विद्यार्थ्यांना विद्यादान व अन्नदान करीत राहिले.

तपस्वी व विद्वान असलेल्या या स्वामीजींनी आपल्या जीवनात अनेकांची संकटे दूर करून त्यांच्या जीवनात सुखसमाधान निर्माण केले. विद्यादान आणि भक्तोद्धाराचे कार्य करीत १९५२ मध्ये पौष अमावास्येच्या दिवशी ते लिंगैक्य झाले. तेव्हापासून प्रतिवर्षी त्यांच्या पुण्याराधनेच्या निमित्ताने रोण येथे रथोत्सवाचे आयोजन केले जाते. विद्यमान मठाधिपती श्री श्रवणकुमार स्वामीजी या मठाची परंपरा पुढे चालवीत आहेत.

## ३८. श्री वे.पं. राजशेखर शास्त्री

पुराणमठ, मु. पो. मल्लापूर,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



मल्लापूरच्या पुराणमठाचे वीरगोत्रीय श्री वे. प्रभुस्वामी आणि सौ. राचम्मा यांच्या पवित्र गर्भी १.३.१८९२ रोजी यांचा जन्म झाला. मल्लापूर येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण करून नंतर श्री मल्लण्णार्यांनी स्थापिलेल्या अब्बिगेरीच्या संस्कृत पाठशाळेत वे.मू.पं. रेवणसिद्ध शास्त्रीजींकडून व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. पुढे उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१३ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीचे सुप्रसिद्ध विद्वान पं. ताराचंद भट्टाचार्य या बंगाली पंडिताकडे साहित्य व व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून काव्यतीर्थ व व्याकरणतीर्थ या उपाधी प्राप्त केल्या. काशीक्षेत्री १५ वर्षे राहून अध्ययन पूर्ण झाल्यानंतर ते स्वग्रामी परतले. अथणीच्या संस्कृत पाठशाळेत व धारवाडच्या श्री मृगेंद्र शिवयोगी स्मारक संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून चार वर्षे अध्यापन केले. नंतर अब्बिगेरी येथील संस्कृत पाठशाळेत १६ वर्षे अध्यापन केले. त्यानंतर अनेक गावांत पुराणप्रवचन, वैद्यकीय मार्गदर्शन व सामाजिक कार्य केले. गरीब विद्यार्थ्यांना शक्य तेवढी आर्थिक मदत केली. त्यांच्या पांडित्यामुळे प्रभावित होऊन श्री म.नि.प्र. मृत्युंजय स्वामीजींनी त्यांना आपल्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून घेतले. एवढेच नव्हे तर १९६५ मध्ये त्यांना 'साहित्यकोविद' या उपाधीसह सुवर्णपदक देऊन त्यांचा गौरव केला. पं. राजशेखर शास्त्रीजी आयुष्यभर ज्ञानप्रसार करून १९.९.१९२७ ला लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी मल्लापूर येथे करण्यात आली. त्यांना तीन मुले व पाच मुली आहेत.

---

परिचय : श्री. शिवलिंगय्या पुराणमठ, श्रीगुरू मल्लय्या पुराणमठ, मल्लापूर.

## ३९. श्री म.नि.प्र. मरिशांतवीर महास्वामीजी

गविमठ,

मु.पो.ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)



कोप्पळचा गविमठ हा काशीमठ म्हणून प्रसिद्ध आहे. अकराव्या शतकात काशीचे चरपट्टाधिकारी श्री रुद्रमुनी शिवाचार्यांनी कोप्पळ येथील पर्वताच्या गुहेत राहून तपश्चर्या केली. पुढे ती गुहाच मठाचे कारण ठरली. म्हणून या मठाला 'गविमठ' असे नाव पडले. या मठावर आजपर्यंत १७ मठाधिपती होऊन गेले आहेत. १६ वे मठाधिपती श्री म.नि.प्र. मरिशांतवीर शिवयोगी हे होत. पूर्वाश्रमीचे हे सूडी गावचे जुक्ती हिरेमठाचे वंशस्थ असून हा मठ काशीपीठाचा शाखामठ आहे. सूडी जुक्ती हिरेमठाचे वे. बसवलिंगय्या आणि सौ. शांतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी ३.१२.१८८८ मध्ये यांचा जन्म झाला. गुरू नंज्जय्या असे नामकरण करण्यात आले. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतल्यानंतर त्यांनी संस्कृतच्या अध्ययनासाठी कोट्टूरच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला.

त्यानंतर अब्बिगेरीच्या संस्कृत पाठशाळेत वे.पं. रेवणसिद्धेश्वर शास्त्रीजींकडे पुढील संस्कृत शिक्षण घेतले. नंतर हुनगुंद येथील पाठशाळेत अभ्यास करून पुढे सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे मणूरच्या पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजींकडून साहित्य, व्याकरण, तर्कशास्त्र यांचा पाच वर्षेपर्यंत अभ्यास केला. त्यांची प्रतिभा पाहून श्रीमान मल्लप्पा वारद आणि पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी यांनी त्यांना उच्च शिक्षणासाठी काशीक्षेत्री पाठविण्याचा निर्णय घेतला. त्यावेळी १९०९ मध्ये बळ्ळारी नगरात अखिल भारत वीरशैव महासभेचे अधिवेशन सुरू होते. त्याचे अध्यक्ष श्रीमान मल्लप्पा वारद हे होते. मल्लप्पांनी आपल्या सोबत पाठशाळेतील विद्वान श्रीगुरू नंज्जय्या यांना नेले होते. नंज्जय्यांनी महासभेत अस्खलित भाषण केले. ते ऐकून कोप्पळच्या गविमठाचे म.नि.प्र.

शांतवीर महास्वामीजी आनंदित झाले. एवढेच नव्हे तर त्यांना आपला उत्तराधिकारी नेमण्याचा त्यांनी आपल्या मनात निश्चय केला.

पुढे मल्लप्पा वारदांच्या प्रेरणेने श्रीगुरू नंजय्या हे संस्कृतच्या उच्च शिक्षणासाठी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१३ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. त्यावेळी श्रीगुरू नंजय्या यांचे जगद्गुरूंनी 'श्रीकंठशास्त्री' असे नामकरण केले. येथील विविध विद्वानांकडे त्यांनी तर्क, व्याकरण, साहित्य, प्राचीन न्याय, नव्यन्याय, योग, व आयुर्वेद या शास्त्रांचा १९२२ पर्यंत एकूण ९ वर्षे अभ्यास केला. ते अनेक शास्त्रांत पारंगत झाले. काशीत अध्ययन करीत असताना 'सूडि श्रीकंठशास्त्री' अशी त्यांना प्रसिद्धी मिळाली.

१९२२ मध्ये ते सूडी येथे परत आले. सूडी जुक्ती हिरेमठाचा पट्टाधिकार ते स्वीकारणार होते, परंतु त्यांच्या नावे कोप्पळ गविमठाचे पट्टाधिकारी, असे इच्छापत्र शांतवीर महास्वामीजींनी लिहून ठेवले होते. ते लिंगैक्य झाल्यावर गविमठाचे १६ वे निरंजन पट्टाधिकारी म्हणून श्रीकंठ शास्त्रीजींनी अधिकार ग्रहण केला. त्यावेळी त्यांचे 'श्री म.नि.प्र. मरिशांतवीर शिवयोगी' असे नामकरण करण्यात आले. ते आयुर्वेदशास्त्रात अत्यंत पारंगत होते. रुग्णांना असाध्य रोगांपासून मुक्त करणारे समर्थ वैद्य होते. शिवपूजानिष्ठ, शिवयोगसिद्ध, आयुर्वेदतज्ज्ञ होते. नाडीविज्ञानात अत्यंत प्रवीण होते. नाडी पाहूनच ते रोगनिदान करीत. स्त्रियांना स्पर्श न करता त्यांच्या मनगटांना दोरा बांधून त्याच्या कंपनावरून ते नाडीपरीक्षा करीत. स्वामीजी कोप्पळच्या गविमठाची परंपरा अव्याहत चालवीत धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक कार्य करीत १.७.१९६७ रोजी लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : गविदीप्ति, गविमठ, कोप्पळ, १९७६.

## ४०. धर्मभूषण श्री वे. पं. हरीश्वर शास्त्रीजी



आराध्यमठ,
मु.पो. सुणकल्ल बिदरी,
ता. राणेबेन्नूरु, जि. हावेरी (कर्नाटक)

सुणकल्ल बिदरी गावचा आराध्यमठ हा गृहस्थपरंपरेचा मठ असून श्रीशैलपीठाचा शाखामठ होय. या मठाचे वे.पं. वीरबसवशास्त्री व सौ. गंगम्मा यांच्या पवित्र गर्भी १८९१ मध्ये यांचा जन्म झाला. त्यांच्या मातोश्री गंगम्मा या सिडेनूर केंडदमठाच्या वे. वीरपय्या यांच्या भगिनी होत्या. शास्त्रीजींचे पहिले नाव मुरुगय्या असे होते. मुरुगय्या यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर हावेरी येथील हुक्केरी मठाच्या संस्कृत पाठशाळेत काही वर्षे प्रथमा आणि अमरकोशादी संस्कृताध्ययन पूर्ण केले. नंतर धारवाडच्या हूलीमठाच्या संस्कृत पाठशाळेत पुढील संस्कृत शिक्षण घेतले.

संस्कृत साहित्याच्या अध्ययनासाठी सोलापुरातील त्यांनी श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत शाळेत प्रवेश घेतला. वे.पं. जगदीशशास्त्रीजी नालवार यांचे शिष्यत्व पत्करून साहित्य, शास्त्र यांसोबत वैदिक व ज्योतिष या शास्त्रांचाही अभ्यास केला. पुढील शिक्षणासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१३ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथे साहित्यशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला १०-१२ वर्षे अध्ययन केल्यानंतर त्यांना 'संस्कृतसाहित्यरत्न' अशी उपाधी मिळाली. काशीतील अध्ययनकाळात अब्बिगेरीचे श्री वे.पं. जगदीशास्त्रीजी मल्लापूर पुराणिकमठ, वे.पं. राजशेखर शास्त्रीजी, कोप्पळ गविमठाचे श्री म.नि.प्र. मरिशांतवीर स्वामीजी आणि रंभापुरी पीठाचे श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य अर्थात् पूर्वाश्रमीचे पं. सदाशिव शास्त्रीजी हे त्यांचे सहाध्यायी होते.

१९२५ मध्ये काशी येथील अध्ययन पूर्ण करून ते स्वग्रामी परतले.

तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी यांनी त्यांचे मुरुगय्य हे नाव बदलून त्यांना 'वे.पं. हरीश्वरशास्त्री' असे नवे नाव दिले. तेव्हापासून ते याच नावाने प्रसिद्ध झाले. कर्नाटकात परत आल्यावर हरीश्वर शास्त्रीजींनी धारवाडच्या हिरेबेंडिगेरी आणि कुंदगोळ येथील संस्कृत पाठशाळांत प्राध्यापक म्हणून काही वर्षे अध्यापन केले. पुढे ते बळ्ळारी जिल्ह्यातील होसपेटच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून रुजू झाले. या पाठशाळेत त्यांनी अनेक विद्यार्थी घडविले. त्यामध्ये यलबुर्गीच्या धरमुरूडी हिरेमठाचे श्री ष.ब्र. बसवलिंग शिवाचार्य, जमखंडीचे श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य, पालीकोप्प हिरेमठाचे श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य हे प्रमुख होत.

पं. हरीश्वर शास्त्रींची विद्वत्ता आणि कार्यकुशलता पाहून रंभापुरी पीठाचे श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांची आपल्या संस्थानचे 'सर्किट एजंट' म्हणून नियुक्ती केली. त्यांनी रंभापुरी पीठात २५ वर्षे सेवा केली. हे एजंट असतानाच १९४२-४३ मध्ये सोलापूर नगरात श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजींचा अड्डपालखी महोत्सव आणि धर्मजागृती समारंभ अभुतपूर्वरित्या सफल झाला. पं. हरीश्वर शास्त्रीजींनी धारवाडचे प्रसिद्ध वकील रा.ब. बी.एल. पाटील व ॲड्. श्री. एस. बसवनाळ यांच्या सहकार्याने कलेक्टरची परवानगी मिळवून धारवाडमध्ये रंभापुरी जगद्गुरूंचा अड्डपालखी महोत्सव आणि धर्मसमारंभ पार पाडला. त्याची प्रमाणपत्रे दिली.

हरीश्वर शास्त्रीजींचे परिश्रम पाहून श्री रंभापुरी महास्वामीजींनी त्यांना 'धर्मभूषण' ही पदवी देऊन गौरविले. जगद्गुरू शिवानंद शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य होईपर्यंत त्यांनी तेथे सर्किट एजंट म्हणून सेवा केली. त्यानंतर हावेरी जिल्ह्यातील बंकापूर येथे त्यांनी संस्कृत, वैदिक तसेच ज्योतिष पाठशाळा काढली. श्री जगद्गुरू पंचाचार्य भजनी मंडळ स्थापून सर्व लोकांना स्वत: रचलेली पंचाचार्यांची भजने शिकवून लोकांमध्ये पंचपीठांविषयीचा भक्तिभाव वाढीस लावला. त्यांचे वैशिष्ट्य म्हणजे

रोज आचार्यांविषयी ते एक पदरचना करीत. ती स्वत: गात आणि इतरांना शिकवीत असत. काही वर्षांनतर हावेरीचे हंचिनाळ सिद्रामप्पा यांच्या मदतीने त्यांनी हावेरीत एक पाठशाळा काढली. तेथे काही वर्षे अध्यापन केले. सांबय्यनवर मठाचे श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य स्वामीजींनी वे.पं. हरीश्वर शास्त्रीजींना धारवाडला बोलावून घेतले. तेथे हूलीमठात एक संस्कृत वैदिक आणि ज्योतिष पाठशाळेची स्थापना केली.

पं. हरीश्वर शास्त्रीजींनी पाठशाळेतील विद्यार्थ्यांना शिकवत, पुराणप्रवचन करीत त्यांच्यात धर्मजागृती केली. श्रीशैल जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींकडून त्यांनी प्रसादिदीक्षा घेतली होती. गृहस्थाश्रमातही ते त्रिकालपूजानिष्ठ होते. शेवटच्या श्वासापर्यंत त्यांनी धारवाडच्या हूलीमठातील संस्कृत पाठशाळेत अध्यापनकार्य केले. १४.९.१९८४ या दिवशी ते लिंगैक्य झाले. पं. हरीश्वर शास्त्रीजी शीघ्रकवी होते. पंचपीठाविषयी त्यांनी रचलेली भक्तिगीते व मंगल पदे ह्या अत्यंत प्रसिद्ध काव्यरचना आहेत. शास्त्रीजींचे भौतिक शरीर जसे तेजस्वी होते तसेच त्यांची साहित्यिक रचनाही अजरामर आहे.

---

परिचय : आर. एस. सावळगीमठ, हुब्बळी.

## ४१. श्री वे.पं. काशीनाथ शास्त्रीजी

बृहन्मठ, मु.पो. नागनूरु,
ता. नवलगुंद, जि. धारवाड (कर्नाटक)



नवलगुंद तालुक्यातील नागनूरु गावात रेड्डी समाजाचे लोक अधिक संख्येने असल्याने या गावाला 'रड्डेर नागनूरु' या नावाने ओळखतात. या गावातील बृहन्मठ पंचग्रह हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी असून या मठाला बारा एकर इनामी जमीन आहे. कर्तृपुरुष श्री सिद्धेश्वर स्वामीजी हे सर्पांच्या सहवासात राहात असे म्हणतात. भक्तगण श्रावणमासात यांच्या कर्तृगादीस अभिषेक करून आजही आपले नवस फेडीत असतात. श्रावणमासात कर्तृगादीची अलंकारपूजा होत असते.

नागनूरु बृहन्मठ हा पुत्रवर्ग परंपरेचा मठ आहे. मूळपुरुषानंतर श्री ष.ब्र. नागभूषण शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य, श्री ष.ब्र. विश्वनाथ शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य, श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य आणि श्री ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य हे पट्टाधिकारी येथे होऊन गेले आहेत. नववे पट्टाध्यक्ष श्री सिद्धेश्वर शिवाचार्यांनंतर ही पट्टाधिकारी परंपरा संपली आहे.

अशी प्राचीन परंपरा असणाऱ्या नागनूरु मठाचे श्री. वे. सिद्धेश्वरय्या आणि सौ. नागव्वा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी २८.५.१८९५ या दिवशी काशीनाथशास्त्रींचा जन्म झाला. लहानपणी आईच्या माहेरी नारायणपूरमध्ये प्राथमिक शिक्षण पूर्ण करून त्यांनी नागनूर येथे माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर संस्कृत अध्ययनाकरिता १९११ मध्ये अब्बिगेरीच्या वीरशैव संस्कृत पाठशाळेत जाऊन तेथे दोन वर्षेपर्यंत काव्याचा अभ्यास केला. नंतर १९१३ मध्ये सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पंडित जगदीश शास्त्रीजी नालवार यांचे शिष्य होऊन अलंकारशास्त्र आणि

न्यायशास्त्राचा अभ्यास केला. पुढे उच्च शिक्षणाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात १९१४ मध्ये प्रवेश घेतला.

येथील प्रसिद्ध विद्वान म.म. पं. देवीप्रसाद शुक्ल यांचे शिष्य होऊन साहित्याचे अध्ययन करून १९१६ मध्ये ते काव्यतीर्थ परीक्षेत उत्तीर्ण झाले. साहित्यशास्त्रासोबत सांख्य, योग, पूर्वमीमांसा या दर्शनांचा त्यांनी अभ्यास केला. संस्कृतभाषेतील गद्यासोबत अत्यंत सुंदर संस्कृत काव्यसाहित्याची निर्मिती केली. त्यांचे काव्यचातुर्य पाहून काशीच्या विद्वानांनी त्यांना 'कविरत्न' म्हणून गौरविले. ते अध्ययन करीत असताना पं. कालिकेश्वर दत्त यांनी आपल्या ग्रंथात 'वीरशैव हे अवैदिक आहेत' असे विधान केलेले पाहून पं. काशीनाथ शास्त्रीजी संतप्त झाले. त्यांनी त्यांचे विधान खोडून काढण्यासाठी त्यांच्यासोबत पत्रव्यवहार केला. सहा महिने ही पत्रचर्चा सुरू होती. शेवटी पं. कालिकेश्वर दत्तांनी आपला पराजय स्वीकारून 'वीरशैव हे वैदिक आहेत' हे मान्य केले. त्यांचा हा पत्रव्यवहार 'दुर्वाददूरीकरणम्' या नावाने ग्रंथरूपाने प्रसिद्ध झाला आहे.

पुढे काशीजगद्गुरू श्री शिवलिंग शिवाचार्यांना प्रेरणा देऊन १९१८ मध्ये काशीमहाक्षेत्रात श्री जगद्गुरू पंचाचार्यांचे प्रथम संमेलन घडवून आणण्यात त्यांनी अव्याहत कष्ट केले. त्या संमेलनाचे काशीनाथ शास्त्रीजी हे प्रधान कार्यदर्शी होते. या संमेलनामुळे श्री जगद्गुरू पंचाचार्यांच्या आणि शिवाचार्यांच्या धार्मिक जीवनात नवचैतन्य निर्माण झाले. या संमेलनात अनेक धार्मिक निर्णय घेण्यात आले. काशी जंगमवाडी मठात प्राचीन कालापासून चालत आलेल्या संस्कृत अध्ययनकार्याला गुरुकुलाचे स्वरूप देऊन त्याचे 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे नामकरण करण्यात आले.

पं. काशीनाथ शास्त्रीजींनी आपले अध्ययन पूर्ण करून आपले संपूर्ण जीवन धर्मासाठी समर्पित केले. त्यासाठी त्यांनी आजीवन नैष्ठिक ब्रह्मचर्याचे पालन केले. पंचपीठे व त्यांच्या शाखामठांच्या समस्या दूर करण्यासाठी

अहर्निश श्रम घेतले. १९१९ मध्ये अखिल भारतीय गुरुवर्गोत्तेजक संघाची स्थापना करून कुंदगोळ, नवलगुंद, मनगोळी, सत्तीगेरी आणि उज्जैन येथील महापीठांत संमेलने भरविली. १६.५.१९२७ पासून मैसूर येथे जगद्गुरू पंचाचार्य इलेक्ट्रिक प्रिंटिग प्रेस स्थापन करून त्याद्वारा अनेक ग्रंथ मुद्रित केले. 'पंचाचार्य प्रभा' या नावाचे धार्मिक साप्ताहिक सुरू केले. ते गेल्या ९३ वर्षांपासून अव्याहत चालू आहे. पं. काशीनाथ शास्त्रीजींचे जीवन व कार्य आणि त्यांचे विचार ग्रथित केलेला 'वीरशैवरत्न' हा ग्रंथ काशीपीठाकडून मराठी भाषेत प्रकाशित झाला आहे. तसेच पंचाचार्य प्रेसकडून तो कन्नडमध्येही प्रकाशित करण्यात आला. अधिक माहितीसाठी जिज्ञासू तो पाहू शकतात.

काशीपीठाचे शाखानुवर्ती आणि विद्यार्थी असणारे पं. काशीनाथ शास्त्रीजी ही एक व्यक्ती नसून ती वीरशैव समाजाची फार मोठी शक्ती होती. आयुष्यभर धर्मासाठी झटून शा.श. १८७१ विरोधी नाम संवत्सर इ.स. १९४९ मध्ये फाल्गुन शुद्ध दशमीस ते लिंगैक्य झाले. सध्या धर्मग्रंथाचे मुद्रण तसेच 'पंचाचार्य प्रभा' या पत्रिकेची जबाबदारी त्यांचे वंशज श्री. बी. एम्. सिद्धेश्वरअय्या आणि त्यांचे चिरंजीव काशीनाथ हे पाहात आहेत.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, १९५३, पृ. ८०.

## ४२. श्री वे.पं. शंकरशास्त्रीजी मळेमठ

मु.पो. उमचिगी, जि. गदग (कर्नाटक)



उमचिगी मळेमठाच्या वे.मू. अप्पय्या आणि सौ. चन्नम्मा या दंपतीच्या पुण्यगर्भी १८८५ मध्ये यांचा जन्म झाला. जन्मगावी त्यांनी कन्नड भाषेचा अभ्यास केला. गदग आणि हावेरी येथील पाठशाळांत संस्कृत विद्याभ्यास केला. पुढे उच्च संस्कृत व्यासंगाकरिता १९१४ मध्ये ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री १०-१२ वर्षे राहून तर्क, मीमांसा, सांख्य इ. शास्त्रांचा अभ्यास करून प्रकांड पांडित्य प्राप्त केले. पुढे श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात काही काळ प्राध्यापक म्हणून काम पाहिले. त्यांचे अमोघ पांडित्य पाहून उज्जयिनी जगद्गुरू श्री सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना आपल्या मठाचे राजपंडित म्हणून निवडले. उज्जयिनीपीठात राहून त्यांनी ईश, केन, मुंडक, सिद्धान्तशिखामणी इत्यादी उपनिषदांवर व ग्रंथांवर वीरशैव भाष्ये रचून वीरशैव साहित्य श्रीमंत केले. त्यांनी ब्रह्मसूत्रावर शांकरी वृत्तीची रचना केली आहे.

त्यांचे सर्व ग्रंथ संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री या परीक्षेसाठी पाठ्यपुस्तके म्हणून लावण्यात आली. त्यांची विद्वत्ता पाहून मैसूरमहाराज कृष्णराज वडियार यांनी त्यांना आपल्या संस्थानचे विद्वान निवडून त्यांचा गौरव केला. ५.९.१९२५ पासून हैदराबादमध्ये चाललेल्या परळी वैद्यनाथच्या खटल्यामध्ये उज्जयिनीपीठाच्या वतीने युक्तिवाद करून ते परळी प्रकरणाच्या विजयास कारणीभूत झाले. त्यांनी आपल्या लेखनाने आणि विद्वत्तापूर्ण भाषणाने समाजात धर्मजागृती केली. अशा महान विद्वानामुळे काशीपीठ गौरवान्वित झाले आहे. शा.श. १८६८, इ.स. १९४६ व्ययनाम संवत्सरात श्रावण शु. ६ या दिवशी ते लिंगैक्य झाले.

## ४३. श्री म.नि.प्र. महादेव महास्वामीजी

सर्पभूषणमठ, बेंगळूरु (कर्नाटक)



कर्नाटकातील प्रसिद्ध मठांत सर्पभूषण हा एक प्रसिद्ध मठ होय. 'कैवल्य कल्पवल्लरी' नामक ग्रंथ कन्नड भाषकांना देऊन सुप्रसिद्ध शिवयोगी, मेधावी कवी श्री सर्पभूषण शिवयोगींनी बेंगळूरु महानगरात या मठाची स्थापना केली. म्हणून या मठाला 'सर्पभूषण मठ' असे म्हटले जाते.

या मठाचे अधिपती श्री म.नि.प्र. महादेव स्वामीजी यांचा पूर्वाश्रमी श्री.वे. शिवमूर्तीअय्या व सौ. चंद्रव्वा या दंपतीच्या पवित्र उदरी १८९२ मध्ये रामदुर्ग येथे जन्म झाला. जुळ्या मुलातील एक मुलगा म्हणजे महादेव स्वामीजी होत. रामदुर्ग येथे त्यांनी प्राथमिक अभ्यास पूर्ण करून बागलकोटच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे काही वर्षे अभ्यास करून पुढील संस्कृत अभ्यासाकरिता ते सोलापुरास आले. तेथील सुप्रसिद्ध श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीश शास्त्रीजींचे शिष्य होऊन अलंकार-व्याकरणादी शास्त्रांचा अभ्यास केला.

उन्नत संस्कृत अध्ययनाकरिता १९१४ मध्ये काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. सुप्रसिद्ध काशी हिंदू विश्वविद्यालयात वेदान्ताचे अध्ययन करून 'वेदान्ताचार्य' पदवी प्राप्त केली. १२ वर्षे काशीत राहून वेदान्तादी विषयांचा अभ्यास करून ते विद्वान झाले. १९२६ मध्ये कर्नाटकात परत आले. यांचे संस्कृत पांडित्य पाहून धारवाडच्या मुरघा मठाचे मृत्युंजय स्वामीजींनी आपल्या मठातील संस्कृत पाठशाळेची व शिवानुभव परीक्षेची जबाबदारी त्यांच्यावर सोपविली. काही वर्षांनंतर त्यांनी सौदंत्ती तालुक्यातील मुनवळ्ळी या गावी स्वतंत्र आश्रम स्थापून प्रवचनादी कार्यातून धर्मजागृती केली. ते उत्तम वक्ते व चतुर संघटक होते. हरिहर राघवांकादी कवींचे

काव्य आणि शिवशरणांच्या अनुभाव वचनांचा अभ्यास करून ते प्रासादिक प्रवचन करीत. त्यामुळे त्यांना 'अभिनव अल्लम' ही उपाधी मिळाली. त्यांचे पांडित्य आणि प्रतिभा पाहून चित्रदुर्ग मुरुघामठाच्या श्री जयदेव महास्वामीजींनी १९३२ मध्ये त्यांना बेंगळुरच्या सर्पभूषण मठाचा निरंजन पट्टाधिकार प्रदान केला.

साहित्यात अत्यंत अभिरुची असणाऱ्या महादेव स्वामीजींनी सर्पभूषण मठात श्री सर्पभूषण शिवयोगींच्या नावे एका ग्रंथमालेचा आरंभ केला. त्याद्वारा अनेक ग्रंथ प्रकाशित केले. आपल्या संकल्पानुसार त्यांनी लिं. शि. शि. बसवनाळजी यांच्याकडून 'कैवल्यकल्पवल्लरी' ग्रंथ संपादित करून तो प्रकाशित केला. अण्णनबळग, अक्कनबळग स्थापून वीरशैव धर्मतत्त्वांचा प्रचार केला. वेदोपनिषदांत पांडित्य मिळवलेल्या स्वामीजींनी वेदोनिषदांतील रहस्य आपल्या प्रवचनांतून कन्नड लोकांपर्यंत पोहोचविले. महादेवी अक्कांचे जीवनकार्य, हिंदू धर्मास बसवण्णांची देणगी, प्रभुसंदेश इत्यादी ग्रंथांची त्यांनी रचना केली. प्रा. च. सुंदरेश यांनी श्री महादेव स्वामीजींचे लेख 'अभिनव अल्लम' ग्रंथात संग्रहित केले आहेत. श्री महादेव स्वामीजींनी सर्पभूषण मठाचा ट्रस्ट करून साहित्यिक, सामाजिक व धार्मिक कार्ये केली. १९६१ मध्ये ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : १. बबलेश्वर शिवयोगीजी, संपा. डॉ. ज.च.नि., बबलेश्वर बृहन्मठ प्रकाशन,१९७६, पृ. ९५.
२. पुण्यश्लोक वारद, पृ. क्र. २९५.

## ४४. तर्कतीर्थ श्री वे.पं. कलिगणनाथ शास्त्रीजी

मु.पो. पगडदिन्नी,

ता. सिंदनूर, जि. रायचूरु (कर्नाटक)

हे पगडदिन्नी हिरेमठाच्या पं. पंचाक्षरी शास्त्रीजींचे सुपुत्र होत. १८८९ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांचा वंश पांडित्य परंपरेचा असून त्यांचे धाकटे काका पं. चंद्रशेखर शास्त्रीजी हे आयुर्वेद निष्णात होते. पं. कलिगणनाथ शास्त्रीजींनी जन्मगावी शिक्षण घेतले. संस्कृत अध्ययनासाठी ते गदगच्या तोंटदार्य मठाच्या संस्कृत पाठशाळेत गेले. तेथे प्रारंभिक शिक्षण पूर्ण केले आणि उच्च संस्कृत शिक्षणाकरिता १९१४ मध्ये काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीतील तर्कशास्त्राचे प्रसिद्ध विद्वान श्री. शिवशंकर भट्टाचार्यांचे शिष्यत्व पत्करून नव्यन्यायशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला. कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेची तर्कतीर्थ परीक्षा उत्तम श्रेणीत उत्तीर्ण झाले.

काशीक्षेत्री तर्कशास्त्राचे पांडित्य संपादून व श्रीकाशीमहास्वामीजींचा आशीर्वाद मिळवून ते कर्नाटकात परत आले. बागलकोटच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक झाले. ते श्रेष्ठ संशोधक व लेखक होते. त्यांनी श्री बसवादी प्रमथांचा निजतत्त्वदर्पण आणि शिखासूत्र विमर्श इत्यादी ग्रंथ लिहिले आहेत. परळीच्या वेदाधिकार विजयामध्ये त्यांनी सक्रिय सहभाग घेतला होता. ते शिवयोग मंदिराच्या प्रतिवर्षी होणाऱ्या परीक्षेचे आयोजन करीत असत. संस्कृत ग्रंथ आणि वाक्चातुर्य त्यांनी आत्मसात केले. श्रावणमासादी पर्वांत ते लोकांना प्रवचनातून बोधामृत देत असत. त्यांनी अखेरचे दिवस गदगच्या तोंटदार्य संस्कृत पाठशाळेत पाठप्रवचन करीत व्यतीत केले.

---

संदर्भ : १. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३५२.

२. गुरुवर्ग दर्पण, पृ. ४२–४४.

३. पंचाचार्य प्रभा, ९.१२.१९२९.

## ४५. श्री वे.पं. अन्नदान शास्त्रीजी



हूलीकंथी हिरेमठ ऊर्फ शास्त्रीमठ
मु.पो. येरे हंचिनाळ,
ता. यलबुर्गा, जि. कोप्पळ (कर्नाटक)

पं. अन्नदान शास्त्रीजी येरे हंचिनाळचे वे. रुद्रय्या यांचे सुपुत्र होत. १८९४ मध्ये त्यांचा जन्म झाला. येरे हंचिनाळमध्ये प्राथमिक शिक्षण घेऊन त्यांनी अब्बिगेरीच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे २-३ वर्षे प्रारंभिक संस्कृत भाषाध्ययन करून पुढे उच्च शिक्षणासाठी काशीला गेले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१४ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथील संस्कृत महाविद्यालयात साहित्य व व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याची व्याकरणतीर्थ परीक्षा उत्तीर्ण झाले. कोप्पळ गविमठाचे मरिशांतवीर स्वामीजी, रंभापुरी जगद्गुरू शिवानंद राजेंद्र महास्वामीजी आणि केदारजगद्गुरू नीलकंठलिंग शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमी पंडित अन्नदानशास्त्रीजींचे सहाध्यायी होते.

काशीतील अध्ययन पूर्ण करून ते स्वग्रामी परत आले. त्यांनी साडेतीन वर्षेपर्यंत केदार जगद्गुरू नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या पीठात पंडित म्हणून सेवा केली. पुढे विजयपूर जिल्ह्यातील सिंदगी गावच्या पट्टाध्यक्षांच्या पाठशाळेत दोन वर्ष अध्यापनकार्य केले. नंतर आपल्या गावी राहून पुराणप्रवचन करीत जनजागृती करू लागले. वृद्धापकाळाने २७.६.१९६८ या दिवशी येरे हचिनाळ येथे लिंगैक्य झाले.

---

परिचय : श्री शिवानंद स्वामी, शास्त्रीमठ, हुलकोटी.

## ४६. श्री ष.ब्र. करबसवेंद्र शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. इंचगेरी,
ता. इंडी, जि. विजयपूर (कर्नाटक)



इंचगेरी हिरेमठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेचा मठ आहे. दहाव्या शतकात या मठाची स्थापना झाल्याचे दाखले मठात उपलब्ध आहेत. या मठाचे संस्थापक श्री ष.ब्र. चंद्रगुंड करबसव देशिकेंद्र शिवाचार्य स्वामीजी श्रीशैलवरून संचार करीत, पूजा-अनुष्ठान करीत, जनतेला धर्मबोध करीत कर्नाटकातील एका रम्य अरण्यात एक कुटीर बांधून तपश्चर्या करू लागले. एकदा काही व्यापारी बैलांवर मसाले लादून पंढरपुरास निघाले होते. त्यावेळी स्वामीजींच्या कुटिरासमोरून जाताना स्वामीजींनी त्यांना प्रश्न केला, 'तुमच्या बैलांच्या पाठीवर काय आहे?' त्यांनी खोटे उत्तर दिले, 'मेंढीच्या लेंड्या व गोवऱ्या आहेत.' पुढे पंढरपुरास गेल्यावर गोण्या सोडून पाहिल्यावर त्यात वेलदोडे आदींच्या मेंढीच्या लेंड्या व गोवऱ्या झाल्या होत्या. त्या पाहिल्यावर मालकाने काय झाले, असे विचारले. तेव्हा नोकरांनी सर्व हकीकत सांगितली. मालकाने अरण्यात जाऊन चंद्रगुंड करिबसव स्वामीजींचे दर्शन घेऊन क्षमायाचना केली. तेव्हा दयाळू स्वामींनी 'खोटे बोलू नका, जा. तुमचे मसाले पूर्वीसारखे होतील' असा आशीर्वाद दिला.

त्याप्रमाणे लेंड्या-गोवऱ्यांचे वेलदोडे इत्यादी मसाले सामान झाले. त्याशिवाय त्यांना बाजारात चौपट फायदा झाला. त्या मालकाने अरण्यात स्वामीजींना एक मठ बांधून दिला. तो मठ म्हणजेच इंचगेरी हिरेमठ होय. याप्रमाणे चंद्रगुंड करबसवेंद्र शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या तप:शक्तीने अनेक चमत्कार करीत अनेक शाखामठांची स्थापना केली. राचोटी वीरभद्र देवालय त्यांनीच निर्माण केले. अमावस्येला आकाशात चंद्र दाखवणारे तपस्वी म्हणून त्यांचा लौकिक झाला.

श्री ष.ब्र. चंद्रगुंड करबसवेंद्र शिवाचार्यांनी स्थापन केलेल्या इंचगेरी मठावर आजपर्यंत ४७ शिवाचार्य होऊन गेले आहेत. ४७ वे श्री ष.ब्र. करबसवेंद्र शिवाचार्य स्वामीजी होत. इंचगेरी हिरेमठाचे वे. संगय्या व सौ. चन्नम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी १८९९ मध्ये त्यांचा जन्म झाला. रुद्रमुनी असे त्यांचे नामकरण करण्यात आले. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण इंचगेरी, बरडोल आणि चडचण येथे झाले. नंतर यादगिरीच्या शंकर संस्कृत महाविद्यालयात त्यांनी संस्कृतचे अध्ययन केले. पुढे मैंदर्गीच्या श्री. मल्लेशप्पा कल्याणशेट्टी यांच्या आर्थिक सहाय्याने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीतील विद्वानांकडून साहित्य, वेदान्त इत्यादी शास्त्रांचा आठ वर्षे अभ्यास करून काव्यतीर्थ व वेदान्ताचार्य या पदव्या मिळविल्या. विद्वन्मणी होऊन ते इंचगेरीस परतले.

१९२३ मध्ये त्यांचा इंचगेरी मठावर पट्टाभिषेक झाला. श्री ष.ब्र. करबसवेंद्र शिवाचार्य स्वामीजी असे त्यांचे नामकरण करण्यात आले. त्यांनी तपस्या करून धर्मजागृती व भक्तोद्धाराचे कार्य केले. त्यांच्या तपःशक्तीमुळे प्रभावित होऊन अनेक भक्तांनी मठाला जमीन व वास्तू दान दिल्या. रंभापुरी जगद्गुरू श्री १००८ शिवानंद राजेंद्र शिवाचार्य भगवत्पादांनी १९५२ मध्ये त्यांना 'तपोरत्न' ही उपाधी प्रदान केली. १९६८ मध्ये आपल्या वंशातील बटूस विद्याध्ययन करवून त्याला पट्टाधिकार देऊन त्याचे श्री ष.ब्र. रेणुक शिवाचार्य असे नामकरण केले. हेच या मठाचे विद्यमान ४८ वे पट्टाधिकारी होत. विद्याविनयसंपन्न व वाक्पटू असणारे हे स्वामीजी मठाच्या धार्मिक परंपरेचे पालन करीत आहेत.

---

परिचय : श्री ष.ब्र. रेणुक शिवाचार्य स्वामीजी, हिरेमठ, इंचगेरी.

## ४७. श्री वे. महालिंगस्वामी काशीकर

मु.पो.ता. कंधार, जि. नांदेड (महाराष्ट्र)



वे. महालिंग स्वामींचा जन्म मुखेडचे वे. मल्लिकार्जुनय्या आणि सौ. बसवलिंगबाई या माहेश्वरांच्या पवित्र उदरी ८.८.१८९६ रोजी झाला. जन्मगावी मराठी माध्यमातून त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. वडिलांकडून वैदिक विद्येचा अभ्यास केला आणि गावातच धार्मिक विधिविधान करू लागले. पुढे वडिलांच्या प्रेरणेने संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. कुशाग्र बुद्धीच्या महालिंग स्वामींनी दोन वर्षेपर्यंत संस्कृत साहित्याचे अध्ययन केले. त्यांनी मठाच्या व्यवस्थेमध्ये लक्ष घातले. यात्रेकरूंना क्षेत्रदर्शन घडविणे व त्यांचे पूजापाठ करणे यांवर त्यांचे अधिक लक्ष होते.

त्यांचा हा स्वभाव पाहून श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांच्यावर एका व्यवस्थापनाची जबाबदारी सोपविण्याचे ठरविले. १९१८ मध्ये प्रयाग (अलाहाबाद) येथील जंगमवाडी मठाचे व्यवस्थापक म्हणून त्यांची नियुक्ती केली. श्री महास्वामीजींच्या आज्ञेनुसार महालिंग स्वामींनी चार वर्षेपर्यंत म्हणजे १९२१ पर्यंत प्रयागमठाचे व्यवस्थापक म्हणून कार्य पाहिले. त्यानंतर काशीपीठाचे प्रतिनिधी म्हणून मुंबई, पनवेल, सलगर, जोडजवळा, उमरगा, बार्शी आणि सोलापूर इत्यादी गावांत संचार करून काशीपीठाच्या कार्याची भक्तांना ओळख करून देण्याचे कार्य केले. भक्तांकडून मिळालेली दानदक्षिणा मठाकडे सुपूर्द केली. असे १९२३ पर्यंत दोन वर्षे त्यांनी कार्य केले. नंतर प्रयागक्षेत्रीच्या जंगमवाडीमठाचे व्यवस्थापक म्हणून काम केले. परळी वैद्यनाथ रुद्राभिषेकाच्या वादात वे. महालिंग स्वामींनी पं. काशीनाथ शास्त्रीजींचे सहकारी म्हणून काम केले.

१९२९ ते १९३२ या काळात रंभापुरी, उज्जयिनी व श्रीशैल पीठांत जाऊन तेथेदेखील सेवा केली. १९३२ मध्ये काशीपीठात श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या पट्टाभिषेक संदर्भात त्यांनी बरेच सहकार्य केले.

विश्वाराध्य बँकविषयक हायकोर्टाच्या कामात महालिंग स्वामींनी श्री जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींचे प्रतिनिधी म्हणून काम पाहिले. १९४४ मध्ये श्री १००८ जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या पट्टाभिषेकाच्या वेळी सर्वात पुढे राहून त्यांनी सेवा केली. १९४८ मध्ये श्री जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या पट्टाभिषेकाच्या वेळी देखील सेवा केली. श्रीपीठात राहून संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आलेल्या वे. महालिंगस्वामींनी श्रीपीठाची अपार सेवा केली. काशीपीठाचे निष्ठावंत सेवक म्हणून काम करीत १९.९.१९८२ रोजी ब्राह्मी मुहूर्तावर पहाटे चार वाजता काशी जंगमवाडी मठातच ते लिंगैक्य झाले.

## ४८. वे.पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजी

मु.पो. मणूर, जि. बीड (महाराष्ट्र)



यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. संस्कृत अध्ययनासाठी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथील अध्ययन पूर्ण केल्यानंतर पुण्यश्लोक अप्पासाहेब वारद यांनी स्वखर्चाने त्यांना पुढील शिक्षणासाठी काशीला पाठविले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील क्विन्स संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन त्यांनी न्यायशास्त्राचा अभ्यास केला. पुन्हा सोलापुरास येऊन अप्पासाहेब वारदांनी स्थापिलेल्या वीरशैवलिंगी ब्राह्मण धर्मग्रंथमालेच्या संपादकीय विभागात प्रमुख संपादक होऊन अनेक ग्रंथांचे मराठी भाषेत अनुवाद करून ते प्रकाशित केले.

या ग्रंथमालेकडून 'श्रीसिद्धान्तशिखामणी'सारखे अनेक ग्रंथ मराठी अनुवादासह प्रकाशित झाले. लिं. मल्लप्पा वारदांची ही अपूर्व साहित्यसेवा होती. त्या काळात मल्लिकार्जुन शास्त्रीजींनी समर्पणभावनेने सेवा केली. त्यामुळे श्री रंभापुरी जगद्गुरू प्रसन्नरेणुक शिवाचार्य महास्वामीजींनी 'धर्मरत्न' ही उपाधी देऊन त्यांचा गौरव केला.

---

संदर्भ : पुण्यश्लोक वारद, ना. रा. बामणगावकर, १९४९, पृ. २९२-२९३.

## ४९. श्री म.नि.प्र. गौरीशंकर स्वामीजी

गविमठ, मैसूर (कर्नाटक)



पूर्वाश्रमात उक्कलगेरी (ता. नरसीपूर, जि. मैसूर) या गावातील बेट्टदमठाचे श्री. लिंगप्पय्या व सौ. लिंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भात १८९४ मध्ये यांचा जन्म झाला. कावेरी आणि कपिला या नद्यांचा जेथे संगम झाला त्याला तिरुमकुडल असे म्हणतात. हे क्षेत्र नरसीपुराच्या अत्यंत जवळ असल्याने या गावाला टी. नरसीपूर असे म्हणतात. तिरुमकुडल क्षेत्री अगस्ती महर्षींनी स्थापिलेले अगस्तेश्वर लिंग आहे. या तिरुमकुडल क्षेत्राच्या अत्यंत जवळ असणारे छोटे गाव म्हणजे उक्कलगेरी ग्राम होय. उक्कलगेरीत श्री गौरीशंकर स्वामीजींच्या रूपाने पुण्य उतू आले, अशी त्या भागातील लोकांची भावना आहे. बेट्टद मठाचे श्री. लिंगप्पय्या शेती करीत होते. अत्यंत गरिबी अवस्थेत दिवस कंठीत होते. अशा गरीब कुटुंबात शंकर यांचा जन्म झाला. मुलाच्या मुखावरील तेज पाहून सारेजण हा पुढे स्वामी होणार असे म्हणत असत.

मैसूरच्या गविमठाचे बंधू या मुलास विद्याभ्यासासाठी मैसूरला घेऊन गेले. तेथील वीरशैव मान्यवरांच्या सहकार्याने त्यांनी संस्कृत पाठशाळेत प्रवेश मिळविला. संस्कृत व वेदाध्ययन करीत ते गुरूंच्या विशेष कृपेला पात्र झाले. त्यांची ख्याती वाढत गेली. मैसूरच्या गविमठ महाराजांची विशेष भक्ती केल्यामुळे मैसूरच्या वीरशैव भक्तांनी शंकराला गविमठावर मठाधिपती म्हणून घ्यावे असा निर्णय घेतला आणि एका शुभमुहूर्तावर त्यांचा निरंजन पट्टाधिकार करविला. त्यावेळी त्यांचे श्री म.नि.प्र. गौरीशंकर असे नामकरण केले. विद्याभ्यासाच्या उत्कट इच्छेपोटी मठाधिपती झाल्यानंतर महाराजांच्या सहाय्याने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने

त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील विद्वानाकडे व्याकरण व साहित्यशास्त्रासोबत तर्कशास्त्राचा अभ्यास केला. काशी हिंदू विश्वविद्यालयातून दर्शनशास्त्र या विषयात ते एम्.ए. झाले. त्यांनी संस्कृतबरोबरच पाली, प्राकृत, बंगाली व हिंदी या भाषांवर प्रभुत्व मिळविले. १०-१२ वर्षे मठात राहून विद्या संपादून ते काशीतील विद्वानांमध्ये ख्यातनाम झाले.

नंतर काशी हिंदू विश्वविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. अध्ययन पूर्ण केल्यानंतर काशीक्षेत्रातच मैसूर महाराजांनी निर्मिलेल्या तेव्हाच्या राणीछत्राच्या बाजूला निवास करून १९४६ पर्यंत ते काशीक्षेत्री राहिले. अध्ययनाकरिता आलेल्या विद्यार्थ्यांना पाठ-प्रवचन देणे, स्वाध्याय करणे व जपतप करणे असा त्यांचा दैनंदिन कार्यक्रम होता. काशीहून मैसूरला परतल्यानंतर गविमठात राहून त्यांनी अनेक साहित्यकृतींची रचना केली. अध्ययन-अध्यापनात आपले आयुष्य वेचलेले गौरीशंकर स्वामीजी १२.८.१९५२ रोजी लिंगैक्य झाले.

## ५०. वे.पं. जगदीश शास्त्री

सवणूर मठ, मु.पो. अब्बिगेरी,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



अब्बिगेरी गावचा सवणूर मठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ होय. या मठाचे श्री. वे.मू. चन्नवीर शास्त्री व सौ. संगम्मा यांचे सुपुत्र श्री वे. पं. जगदीशास्त्री होत. स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण करून उच्च अध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथे साहित्यशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याच्या काव्यतीर्थ, काशीच्या साहित्याचार्य आणि आयुर्वेदाचार्य या परीक्षांत उत्तीर्ण झाले. तसेच हिंदी राष्ट्रभाषा परीक्षेतही उत्तीर्ण झाले. नंतर मथुरा विश्वविद्यालयात त्यांनी काही वर्षे अध्ययन केले.

असे पांडित्य संपादन करून अब्बिगेरीस परतल्यानंतर कोप्पळ, कंपली, हालकेरी, मुंडरगी येथील संस्कृत पाठशाळांत प्राध्यापक म्हणून काम केले. नंतर बळ्ळारीच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून काम केले. अनेक विद्यार्थ्यांना विद्यादान केले. १९५५ मध्ये श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात संस्कृतचे प्राध्यापक म्हणून सेवा केली. शेवटच्या काळात गजेंद्रगड येथील माध्यमिक शाळेत संस्कृतचे अध्यापक म्हणून ते सेवारत होते. १६ मे १९६० रोजी लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : १. गुरुवर्ग दर्पण, पृ. १०९.
२. शिवयोग मंदिर बेळगु प्रकाशन, १९६०, पृ. ३६२.

## ५१. श्री ष.ब्र. उमापती शिवाचार्य स्वामीजी

जुक्ती हिरेमठ, मु.पो. सूडी,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



सूडी गावातील जुक्ती हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेचा मठ होय. या मठाला परंपरागत शिष्यवर्ग आणि इनामी जमीन आहे. या मठाचे पूर्वज हे विजयपूर जिल्ह्यातील मसुती गावचे होते. विजयपूरच्या आदिलशहास या मठाच्या अधिपतींनी बऱ्याच कठीण प्रसंगांत मार्गदर्शन केल्याचे दाखले मठात उपलब्ध आहेत. आदिलशहाने त्या महाराजांना गौरविल्याचे ऐतिहासिक दस्तावेज देखील मठात आहेत. राजाला युक्तिप्रयुक्ती सांगितल्यामुळे या मठाला जुक्ती हिरेमठ असे नाव पडले.

या मठपरंपरेत अनेक शिवाचार्य होऊन गेले. त्यांपैकी श्री ष.ब्र. उमापती शिवाचार्य हे एक होत. पूर्वाश्रमी यांचा जन्म सूडी गावातील जुक्ती हिरेमठाचे वे. अडिवेय्या स्वामी आणि सौ. शांतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १८९५ मध्ये झाला. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेऊन संस्कृत अध्ययनासाठी ते अब्बिगेरीस गेले. तेथील संस्कृत पाठशाळेत अध्ययन करून पुढील संस्कृत अध्ययनाकरिता त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. काही वर्षे तेथे अध्ययन केल्यानंतर संस्कृतच्या उच्च शिक्षणाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री शासकीय संस्कृत कॉलेजमध्ये साहित्य, तर्कशास्त्र आणि व्याकरण या शास्त्रांचा अभ्यास करून आचार्य पदवी मिळविली. काशीतील अध्ययन पूर्ण करून सूडीला परतल्यानंतर ताळिकोटीच्या श्री खासगतेश्वर विद्यावर्धक समितीच्या आश्रयाने चाललेल्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून कार्य करीत अनेक विद्यार्थ्यांना विद्यादान केले.

त्यानंतर सूडी येथे येऊन संस्कृत पाठशाळा काढली. तेथे विद्यार्थ्यांना जेवणाची आणि वसतिगृहात राहण्याची सोय करून दिली. स्वत: अध्यापनकार्य केले. काही वर्षे या पाठशाळेत हरीश्वर शास्त्रीजींना अध्यापक म्हणून नेमले. स्वामीजींचे शिक्षणप्रेम आणि विद्यार्थ्यांविषयीची आत्मीयता पाहून गदगजवळच्या बेटगिरी गावचे काश्यप्पा बेलेरी यांनी १९३६ मध्ये गदग येथे २४ गुंठे जमीन त्यांना दान दिली. आज त्या ठिकाणी श्री ज. विश्वाराध्य मंदिर निर्माण केले असून भक्तांकडून पूजा होते.

शांतमूर्ती, शिवपूजानिष्ठ, विद्यार्थिवत्सल अशा स्वामीजींनी आयुष्यभर धार्मिक कार्यक्रम करीत मठाची परंपरा चालू ठेवली. २०.१०.१९४७ या दिवशी ते लिंगैक्य झाले. आज त्या ठिकाणी श्री ष.ब्र. डॉ. कोट्टूरबसवेश्वर शिवाचार्य स्वामीजी पट्टाधिकारी असून मठाचे कार्यक्रम विधिवत् करीत आहेत.

---

परिचय : १. श्री ष.ब्र. डॉ. कोट्टूरबसवेश्वर शिवाचार्य स्वामीजी.
२. गुरुवर्गदर्पण, पृ. ७०.

## ५२. श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी

पंचग्रह हिरेमठ, मु.पो. सुळ्ळ,
ता. हुब्बळी, जि. धारवाड (कर्नाटक)

सुळ्ळ गावातील पंचग्रह हिरेमठ हा रंभापुरी पीठाची शाखा आहे. या मठाचे मूळपुरुष श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी हे तपस्वी व महिमाशाली होऊन गेले. या मठाला परंपरानुगत शिष्यवर्ग आणि इनामी जमीन आहे. परंपरेतील सर्व स्वामीजींना श्री सिद्धराम शिवाचार्य हेच नाव देण्यात येते.

श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी हे स्वग्रामी कन्नडमधून प्राथमिक शिक्षण घेऊन उच्च संस्कृत अध्ययनासाठी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१५ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. शासकीय संस्कृत महाविद्यालयात त्यांनी साहित्य, व्याकरण व वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास केला. पुढे स्वग्रामी परतून त्यांनी आयुष्यभर धार्मिक कार्यक्रमांत सहभाग घेतला. या मठावर त्यांच्यानंतर श्री मडिवाळ शिवाचार्य स्वामीजी आणि श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी हे पट्टाधिकारी होऊन गेले. नंतर हरनाळ (ता. सिंदगी, जि. विजयपूर) येथील चिदानंद शिवाचार्य १९७३ मध्ये या मठाचे पट्टाधिकारी झाले. त्यांनी त्यांच्या वंशज बटूंना उत्तराधिकार दिला आहे. सध्या श्री ष.ब्र. अभिनव सिद्धराम शिवाचार्य या मठाची परंपरा पुढे चालवीत आहेत. विशेष म्हणजे हे दोघे काशी विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थी होते. अभिनव शिवाचार्य स्वामीजी लिंगैक्य झाले असून त्या गादीवर हूली मठाचे श्री ष.ब्र. शिवमहांत शिवाचार्य स्वामीजी यांचा पट्टाभिषेक झाला आहे. पट्टाभिषेकानंतर त्यांचे 'श्री ष.ब्र. शिवसिद्धराम शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. तेच सध्या हूली मठाचे आणि सुळ्ळ हिरेमठाचे धार्मिक कार्य करीत आहेत.

## ५३. षड्दर्शनशिरोमणी, न्यायादिपंचाचार्य श्री सदाशिवानंद स्वामीजी

शिवानंद मठ, गदग (कर्नाटक)



पूर्वाश्रमी चोडळ्ळी गावच्या श्री. चन्नबसप्पा मूम्मीगट्टी व सौ. लिंगव्वा या शिवभक्त दंपतीच्या उदरी १२.१२.१८९६ मध्ये यांचा जन्म झाला. करिअप्पा असे त्यांचे जन्मनाव होते. जन्मानंतर पाचव्या दिवशी गुरूंनी त्यांना लिंगधारणा केली. करिअप्पा चोडळ्ळी येथे प्राथमिक शिक्षण घेऊन पुढे मुलकी परीक्षा उत्तीर्ण झाले. अण्णिगेरी येथे प्राथमिक शाळेत शिक्षक म्हणून कार्य करू लागले. भैरीदेवर कोप्प येथे त्यांनी शिक्षकाची नोकरी केली. त्यांचे आईवडील त्यांच्या लग्नाचा विचार करीत असताना करिअप्पांनी संकदाळचे श्री. चन्नबसय्यास लग्न करण्याची माझी इच्छा नाही असे सांगितले. तेव्हा चन्नबसय्याने, तुला लग्न करायचे नसेल तर नागनूर गावी गदगचे श्री शिवानंद स्वामीजी सध्या राहतात तेथे जाऊन त्यांचे दर्शन घे, असे सांगितले. करिअप्पा मास्तर अण्णिगेरीस येऊन श्री. मल्लेशअप्पा होळेयन्नवर यांच्यासोबत नागनूरला गेले. श्री शिवानंद स्वामीजींचे दर्शन घेऊन त्यांनी आपल्या मनातील इच्छा सांगितली. शिवानंद स्वामीजींनी करिअप्पाच्या ठिकाणी असणारे वैराग्य ओळखून हे पुढे लोककल्याणकारी व्यक्तिमत्त्व होईल हे जाणले. त्याला नैष्ठिक ब्रह्मचर्याची दीक्षा देऊन 'महेश्वर' असे त्याचे नूतन नामकरण केले.

त्यानंतर महेश्वरला उच्च संस्कृत शिक्षणासाठी काशी जंगमवाडी मठात पाठविले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१६ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. काशीतील विद्वानांकडून न्याय, वैशेषिक, सांख्य, योग, पूर्वमीमांसा आणि वेदान्त या शास्त्रांचा त्यांनी पूर्ण अभ्यास करून प्रत्येक विषयातील आचार्य पदवी काशी हिंदू विश्वविद्यालयाकडून संपादन केली. त्यामुळे त्यांना

'षड्दर्शनशिरोमणी, न्यायादिपंचाचार्य' अशी प्रसिद्धी मिळाली. १९२८ पर्यंत एकूण १२ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून, अभ्यास करून त्यांनी सर्व शास्त्रांत प्राविण्य मिळविले.

त्यानंतर ते जम्मू येथील श्री रघुनाथ संस्कृत महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून रुजू झाले. तेथे १९२८ पर्यंत ११ वर्षे विद्यादान केले. त्यावेळी ते 'पंडित महेश्वरशास्त्री' या नावाने प्रसिद्ध झाले. इकडे गदगचे शिवानंद स्वामीजी १९३९ मध्ये लिंगैक्य झाले. त्यांच्या स्थानी पंडित महेश्वर शास्त्रीजींना पट्टाधिकार देण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री सदाशिवानंद स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. श्री सदाशिवानंद स्वामीजी वेदान्तशास्त्राच्या चिंतनाबरोबर इष्टलिंगपूजाही करीत राहिले. १४.२.१९७० रोजी ते लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर श्री नंदीश्वर स्वामीजी या मठाचे पट्टाधिकारी झाले.

## ५४. श्री वे.पं. गुरुमूर्ती शास्त्रीजी

हिरेमठ, मु.पो. कज्जरी,
ता. ब्याडगी, जि. हावेरी (कर्नाटक)



कज्जरी गावच्या हिरेमठ वंशात १८९० मध्ये यांचा जन्म झाला. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेऊन संस्कृत अध्ययनाकरिता त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत १९१० मध्ये प्रवेश घेतला. तेथे पाच वर्षे व्याकरण व साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१६ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथे अनेक विद्वानांकडून व्याकरण, साहित्य व ज्योतिष या शास्त्रांचा अभ्यास केला.

त्यानंतर कर्नाटकास परतून त्यांनी हावेरी–हुक्केरी मठाच्या संस्कृत पाठशाळांत प्राध्यापक म्हणून कार्य केले. श्री म.नि.प्र. शिवबसव महास्वामीजींच्या प्रेमास ते पात्र झाले. पुढे हुक्केरी मठाच्या मुद्रणालयातून त्यांनी 'शिवप्रताप' नावाचे कन्नड साप्ताहिक काही वर्षे प्रकाशित केले. त्यानंतर हानगलजवळच्या अक्की आलूरच्या चन्नवीरेश संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून सेवा केली.

---

संदर्भ : १. पुण्यश्लोक वारद, १९४९, पृ. २९३.
२. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३५८.
३. सोमनाथशास्त्री चरित्रे, मूरुसाविर मठ प्रकाशन, १९८८, पृ. १–१०४.

परिचय : प्रा. अ. सि.हिरेमठ, राणेबेन्नूर.

## ५५. श्री वे.पं. सोमशेखर शास्त्रीजी

मु.पो. बेणकल्ल, ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)

वे.पं. सोमशेखर शास्त्री यांचा बेणकल्ल (ता.जि. कोप्पळ) येथे जन्म झाला. त्यांनी स्वग्रामी कन्नडमधून प्राथमिक शिक्षण पूर्ण करून गदगच्या तोंटदार्य संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृत शिक्षण घेतले. पुढे उच्च शास्त्राध्ययनाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१६ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील विद्वानांकडे नव्यन्यायशास्त्री, अवच्छेदकत्व-निरुक्ति तसेच व्यधिकरण इत्यादी ग्रंथांचा अभ्यास करून कलकत्त्याच्या न्याय मध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. काशीमधील अभ्यास पूर्ण करून कर्नाटकात परतले. केळदी संस्थान हिरेमठ आणि श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात अध्यापक म्हणून सेवा केली.

१९२६ मध्ये हुब्बळी मूरुसाविर मठाच्या गंगाधर संस्कृत महाविद्यालयात न्यायशास्त्राचे प्राध्यापक म्हणून रुजू झाले. ते मूरुसाविर मठात अध्यापनाबरोबर मठाचे व्यवस्थापक म्हणून कार्य पाहत होते. त्यांच्या संपादकत्वाखाली मूरुसाविर मठाचे अनेक ग्रंथ प्रकाशित झाले. त्यामध्ये १९३६ मध्ये प्रकाशित झालेले 'निरंजन मरितोंटदार्य विरचित वीरशैवानंदचंद्रिके' हा प्रमुख ग्रंथ होय. पं. सोमशेखर शास्त्रीजींनी शेवटपर्यंत मूरुसाविर मठाच्या संस्कृत महाविद्यालयात न्यायशास्त्राचे प्राध्यापक म्हणून कार्य केले.

---

संदर्भ : १. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३५९-३६०.
२. पंचाचार्य प्रभा, ९.१२.१९२९.
३. गुरुवर्ग दर्पण, पृ. ४२-४४.

५६. **श्री वे.पं. चंद्रशेखर शास्त्रीजी**

हिरेमठ, मु.पो. होळलू,

ता. हुविन हडगली, जि. बळ्ळारी (कर्नाटक)

होळलू गावातील हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठाला इनामी जमिनी आणि परंपरानुगत शिष्यवर्ग आहे. या मठाचे चंद्रशेखर शास्त्रीजी यांचा जन्म मागळ (जि. बळ्ळारी) येथे १८९६ मध्ये झाला. त्यांनी स्वग्रामी कन्नडमधून प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर गदग व हावेरी येथील संस्कृत पाठशाळांतून संस्कृतचे प्रारंभिक अध्ययन पूर्ण केले. उच्च संस्कृत व्यासंगाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१७ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात दोन वर्षे व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून १९२४ मध्ये कलकत्त्याच्या व्याकरणतीर्थ या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

काशीतील अभ्यास पूर्ण करून त्यांनी काही काळ हुब्बळीच्या मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून काम केले. १९४० मध्ये धारवाड येथे भरलेल्या कन्नड साहित्य संमेलनाचे आणि १.८.१९४६ रोजी मानवी (जि. रायचूरु) येथे झालेल्या हैदराबाद प्रांतीय दुसऱ्या साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले होते. त्यानंतर यादगिरीच्या शंकर संस्कृत कॉलेजचे प्राचार्य म्हणून त्यांनी कार्य केले.

---

संदर्भ : १. गुरुवर्ग दर्पण, पृष्ठ १०३.

२. शिवयोग मंदिर बेळगु, पृ. ३५४-३५५.

३. पंचाचार्य प्रभा, ९.१२.१९२९.

५७.	**श्री वे.पं. विश्वनाथ शास्त्रीजी**

मु.पो. आस्परी, ता. आलूर, जि. कर्नूल (कर्नाटक)

आस्परी येथील मठाचे श्री वे.पं. विश्वनाथ शास्त्रीजी संस्कृत अध्ययनाकरिता काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१७ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथे व्याकरण व साहित्यशास्त्राचा अभ्यास करून व्याकरणतीर्थ व काव्यतीर्थ या परीक्षांत उत्तीर्ण झाले. नंतर स्वग्रामी परतले.

## ५८. श्री म.नि.प्र. विरूपाक्षानंद महास्वामीजी



पेद्द मठम्, मु.पो.ता. सदाशिव पेठ,
जि. संगारेड्डी (तेलंगणा)
मु.पो.ता. कोडंगल, जि. मेहबूबनगर (तेलंगणा)

श्री म.नि.प्र. विरूपाक्षानंद स्वामीजी मूलतः बळ्ळारी जिल्ह्यातील होसपेठचे होत. त्यांचा जन्म होसपेठ येथे १८८२ मध्ये झाला. त्यावेळी विरूपाक्षय्या असे त्यांचे नामकरण करण्यात आले. त्यांनी होसपेट येथे प्राथमिक, माध्यमिक आणि पदवीपर्यंतचे शिक्षण घेतले. त्यानंतर त्यांची तीव्र जिज्ञासा आणि वैराग्यवृत्ती पाहून गावातील वीरशैव भक्तमंडळींनी उच्च संस्कृत अध्ययनासाठी त्यांना काशीला पाठविले. काशीक्षेत्री श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने त्यांनी १९१७ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. तेथे प्रारंभिक संस्कृत शिक्षण प्रारंभ करून व्याकरण, साहित्य, न्याय आदी विषयांचा गाढा अभ्यास चौदा वर्षेपर्यंत केला. काशीत राहून विविध शास्त्रांतील पांडित्य प्राप्त केले. त्यांच्या पांडित्याची प्रसिद्धी सर्वत्र झाल्यानंतर तेलंगणामधील कोडंगल निरंजन मठावर त्यांच्या पट्टाभिषेक करण्याचे निश्चित करण्यात आले.

ठरल्याप्रमाणे १९३१ मध्ये ते कोडंगलला आले आणि १९३२ मध्ये श्री म.नि.प्र. बसवलिंग महास्वामीजी यांच्या नेतृत्वाखाली निरंजन मठावर त्यांचा विधिपूर्वक पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री म.नि.प्र. विरूपाक्षानंद महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. कोडंगल निरंजन मठ त्या काळात कर्नाटक आणि तेलंगणा राज्यांत अत्यंत प्रसिद्ध होता. मठाच्या प्राचीन इतिहासाप्रमाणे मठाचे ७७० शाखामठ होते. त्यापैकी सध्या सदाशिव पेठ, शमशाबाद, राणीगंज, जोगीपेठ, जहीराबाद, संगारेड्डी, आलमपल्ली या तेलंगणा प्रांतातील गावांमध्ये तसेच हुमनाबाद, भातांब्रा, कुलकुंटी, कुलमोडू या कर्नाटकातील गावांमध्ये अजूनही या मठाचे शाखामठ

आहेत.

श्री म.नि.प्र. विरूपाक्षानंद महास्वामीजींचा कोडंगल निरंजन मठावर पट्टाभिषेक झाल्यानंतर त्यांनी सर्व शाखामठांमध्ये जाऊन त्या मठांचा जीर्णोद्धार केला. त्या भागात धर्मप्रचार करून अनेक ठिकाणी गोशाला आणि अन्नछत्रे उघडली. शेवटी ते सदाशिवपेठ येथील निरंजन मठावर स्थायिक झाले आणि वयाच्या नव्वदाव्या वर्षी १९७२ मध्ये कार्तिक वद्य एकादशीला पहाटे ५.३० वाजता तेथेच लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी सदाशिवपेठ येथील निरंजन मठामध्ये असून प्रतिवर्षी त्यांची पुण्यतिथी साजरी केली जाते. सध्या त्या गादीवर श्री म.नि.प्र. नीलकंठ महास्वामीजी यांचा पट्टाभिषेक झाला असून ते मठाचे सर्व धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक कार्य पाहत आहेत.

## ५९. श्री १००८ जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजी

रंभापुरी पीठ (कर्नाटक)



श्री महास्वामीजींचा जन्म पूर्वाश्रमी हिरेहाळ (ता. रायदुर्ग, जि. बळ्ळारी) या गावातील हिरेमठ वे.मू. सिद्धेश्वर शास्त्री व सौ. सिद्धवीरम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी शा.श. १८१२ (इ.स. १८९०) विकृतिनाम संवत्सरात श्रावण शुद्ध द्वितीयेला झाला. सदाशिवार्य असे त्यांचे नामकरण केले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे अब्बिगेरीच्या संस्कृत पाठशाळेत संस्कृत अध्ययन करून नंतर सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पंडित जगदीशशास्त्रीजींकडे साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. नंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१७ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. येथे ८-१० वर्षेपर्यंत वास्तव्य करून व्याकरणतीर्थ व काव्यतीर्थ या परीक्षा उत्तीर्ण केल्या. त्यांची विद्वत्ता आणि व्यावहारिक कौशल्य पाहून श्रीकाशीजगद्गुरूंनी त्यांची आपल्या संस्थानचे व्यवस्थापक म्हणून नियुक्ती केली.

रिक्त असलेल्या रंभापुरी पीठावर योग्य उत्तराधिकारी नेमताना पं. काशीनाथ शास्त्रीजींनी अनेक बटूंमध्ये काशीचे पंडित सदाशिवशास्त्री अधिक योग्य आहेत असा निर्णय दिल्यावर त्यांची निवड करण्यात आली. मैसूरचे महाराज कृष्णराज वडियर यांचा हुकूम (संमती) देखील मिळाला. उज्जयिनी जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अमृतहस्ते शा.श. १८४६ क्रोधननाम संवत्सरात मार्गशीर्ष शुद्ध सप्तमी (दि. २२.११.१९२५) या शुभ मुहूर्तावर त्यांना रंभापुरी पीठाचा पट्टाधिकार देण्यात आला. त्यांच्या काळात रंभापुरी पीठाला वैभवाचे दिवस आले. श्री महास्वामीजींनी २१ वर्षे पीठाचार्य म्हणून कर्नाटक-महाराष्ट्र या प्रांतांत संचार करून धर्मजागृतीचे

कार्य केले. १९४६ मध्ये ते लिंगैक्य झाले.

त्यानंतर श्री १००८ जगद्गुरू वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजी पीठावर आले. त्यांच्यानंतर श्री १००८ जगद्गुरू वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी पीठावर आले. ते लिंगैक्य झाल्यानंतर सध्या श्री १००८ जगद्गुरू वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी पीठाचार्य होऊन पीठाचे धार्मिक कार्य करीत आहेत.

६०. **श्री वे.पं. विरूपाक्ष शास्त्री**

भिक्षावर्ती मठ,

मु.पो. गारवाड, ता.जि. गदग (कर्नाटक)

पं. विरूपाक्ष शास्त्रीजी हे मूळचे कर्नूल जिल्ह्यातील आत्मकूर गावच्या भिक्षावर्ती मठाचे होते. हा श्रीशैलपीठाचा शाखानुवर्ती मठ होय. भिक्षावर्ती मठास पट्ट व चर परंपरा आहे. काही काळानंतर यांचे वंशज गारवाड (ता.जि. गदग) या गावी येऊन राहिले.

गारवाड भिक्षावर्ती मठाचे श्री. वे. शिवपूजे शिवाचार्य आणि सौ. करबसम्मा यांच्या पवित्र गर्भी १८९० मध्ये पं. विरूपाक्ष शास्त्रींचा जन्म झाला. करबसय्या असे त्यांचे नामकरण झाले. गारवाडच्या गावठी शाळेत त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. त्यानंतर वडिलांच्या प्रेरणेने जवळ असलेल्या बळगानूरच्या संस्कृत पाठशाळेत संस्कृत अध्ययन केले. काही काळानंतर रोण तालुक्यातील अब्बिगेरीच्या संस्कृत पाठशाळेत प्रसिद्ध काशीपंडित रेवणसिद्ध शास्त्रीजींचे शिष्यत्व पत्करून पुढील शिक्षण घेतले. नंतर रेवणसिद्ध शास्त्रीजींच्या प्रेरणेने संस्कृतच्या उच्च शिक्षणाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१७ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

काशीक्षेत्री १० वर्षे राहून विविध विषयांच्या विद्वानांकडे काव्य, व्याकरण

आणि ज्योतिष या शास्त्रांचा पूर्ण अभ्यास केला. कलकत्त्याच्या वंगीय शिक्षा परिषदेच्या काव्यतीर्थ आणि व्याकरण-मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. काशीतील अभ्यास पूर्ण करून १९२७ मध्ये स्वग्रामी परतताना काशीजगद्गुरू श्री १००८ पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांचे करबसय्या नाव बदलून 'पं. विरूपाक्ष शास्त्री' असे नूतन नामकरण करून त्यांना आशीर्वाद दिला.

काशीहून कर्नाटकात आल्यानंतर विजयपूर जिल्ह्यातील ताळीकोटी खास्गतेश्वर मठाच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून त्यांनी कार्य केले. विजयपूर सोप्पी मठाचे वे. राचय्या यांची सुपुत्री गुरुबसम्माशी त्यांचा विवाह झाला. पुढे बळ्ळारी जिल्ह्यातील होसपेटच्या संस्कृत पाठशाळेत त्यांनी काही वर्षे अध्यापन केले. नंतर हावेरी हुक्केरी मठाच्या संस्कृत पाठशाळेत देखील प्राध्यापक म्हणून २ वर्षे कार्य केले. १९३८ मध्ये बागलकोटच्या श्री बसवेश्वर संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. तेथे अखेरच्या श्वासापर्यंत म्हणजे १९७८ पर्यंत ४० वर्षे त्यांनी अध्यापनकार्य केले. बागलकोटचे तत्कालीन मंत्री एम्.पी. नाडगौडा आणि समस्त नागरिक यांचा पं. विरूपाक्ष शास्त्रीजींवर खूप विश्वास होता. ज्योतिषशास्त्रात ते प्रवीण असल्याने बागलकोटच्या लोकांनी त्यांचा अधिकाधिक फायदा घेतला. गदगचे पंडित पुट्टराज कवि गवई यांनी होसपेटच्या संस्कृत पाठशाळेत पं. विरूपाक्ष शास्त्रीजींकडे पंचकाव्याचा अभ्यास केला होता. तसेच संतेकेलूरचे अमरनाथ शास्त्रीजी देखील त्यांचे शिष्य होते. आयुष्यभर विद्यादान करीत पंडित विरूपाक्ष शास्त्रीजी गारवाड येथे ७.१.१९७८ रोजी वयाच्या ८८ व्या वर्षी लिंगैक्य झाले. त्यांना विश्वनाथ नावाचा मुलगा होता. ते एका हायस्कूलवर मुख्याध्यापक होते. ते आता निवृत्त झाले आहेत.

---

परिचय : श्री. विश्वनाथ भिक्षावर्ती मठ, गारवाड.

६१.   **श्री ष.ब्र. नंदिकेश्वर शिवाचार्य स्वामीजी**

हिरेमठ, मु.पो. सौंदत्ती, जि. बेळगाव (कर्नाटक)

या मठास परंपरानुगत शिष्यवर्ग आहे. जमीन वगैरे आहे. आजपर्यंत अनेक शिवाचार्य या मठास अधिपती म्हणून होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. नंदिकेश्वर शिवाचार्य स्वामीजी यांनी धारवाडच्या संस्कृत पाठेशाळेतून प्राथमिक संस्कृत अध्ययन पूर्ण केले. उच्च संस्कृत अध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी ३०.७.१९१८ रोजी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला.

काशीत संस्कृत विद्वानांकडे अध्ययन करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या काव्यआद्य आणि काव्यमध्यमा परीक्षांत ते उत्तीर्ण झाले.

काशीत व्याकरण तसेच न्याय विद्वानांकडून 'सिद्धान्त कौमुदी' आणि 'वैयाशिक न्यायमाला' इ. ग्रंथांचा अभ्यास करून पांडित्य प्राप्त करून घेतले. त्यानंतर गावाकडे परतून मठाच्या परंपरेनुसार धार्मिक विधिविधान करीत राहिले.

६२.   **श्री वे.पं. बसवराज शास्त्रीजी सालीमठ**

मु.पो. चळगेरी, ता. कुष्टगी, जि. रायचूरु (कर्नाटक)



कुष्टगी तालुक्याच्या चलगेरी गावचे मठस्थ वे.पं. बसवराज शास्त्री हे श्री.वे. रुद्रय्या आणि सौ. चन्नम्मा या माहेश्वर दंपतीचे पुत्र म्हणून १८८५ मध्ये जन्मास आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१८ मध्ये जंगमवाडी मठात प्रवेश

घेतला. संस्कृत तसेच आयुर्वेदशास्त्रात रुची असणाऱ्या श्री वे.पं. बसवराज शास्त्रीनी अभ्यास करून वैद्यरत्न, वैद्यविशारद, वैद्यालंकार आणि आयुर्वेद वाचस्पती या पदव्या संपादन केल्या. काशीहून आपल्या गावी परतल्यानंतर त्यांनी लातूर, बार्शी, महालिंगपूर इत्यादी ठिकाणच्या संस्कृत पाठशाळांत अध्यापक म्हणून सेवा केली. त्यानंतर चळगेरी आणि हनुमसागर येथे वैद्य म्हणून ते जनप्रिय झाले. तसेच पुराणप्रवचने करीत धर्मजागृतीचे कार्यदेखील त्यांनी केले.

चळगेरीच्या श्री वीरभद्र स्वामी देवस्थान आणि श्री लक्ष्मी देवस्थानच्या जीर्णोद्धाराच्या कामी त्यांनी खूप कष्ट घेतले. परंतु ते कार्य पूर्ण होण्याआधीच म्हणजे १९४८ मध्ये ते लिंगैक्य झाले. कोप्पळ गविमठाचे लिं.श्री म.नि.प्र. मरिशांतवीर महास्वामीजींचे सहपाठी असणारे श्री वे.पं. बसवराज शास्त्रीजी त्या भागात जनप्रिय वैद्य व धर्मप्रसारक होऊन गेले.

## ६३. श्री वे.पं. सर्वनाथ शास्त्रीजी

मु.पो. उरवकोंड, ता. गुत्ती, जि. अनंतपूर (कर्नाटक)

गुत्ती तालुक्याच्या उरवकोंड गावचे मठस्थ श्री वे.पं. सर्वनाथ शास्त्रीजी उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १९१८ मध्ये काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठात प्रवेश घेतला. त्यानंतर काशीच्या व्याकरण तसेच साहित्य विद्वानांकडून त्या त्या शास्त्रांच्या ग्रंथांचा अभ्यास करून कलकत्त्याच्या काव्यमध्यमा आणि व्याकरण-मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. काशीतील अध्ययन पूर्ण करून आपल्या गावी परतले.

## ६४. श्री १००८ जगद्गुरू कैलासलिंग शिवाचार्य महास्वामीजी



केदारपीठ, मु.पो. उखीमठ,
जि. रुद्रप्रयाग (उत्तरांचल)

हे पूर्वाश्रमीचे रायचूरु जिल्ह्यातील कुष्टगी तालुक्यातील हनुमसागर जवळच्या पुरगिरी सोमनाथ क्षेत्र बृहन्मठाचे होत. हा बृहन्मठ रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेखाली येणारा मठ होय. या मठाला शिष्यवर्ग व इनामी जमीनही आहे. या मठाचे वे.पं. शिवसंगय्या आणि सौ. सावित्रीदेवी यांच्या पवित्र गर्भी १९०३ मध्ये यांचा जन्म झाला. तेव्हा त्यांचे नाव चिद्घन असे होते. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. बागलकोटच्या वीरशैव संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन तेथे व्याकरण आणि साहित्याचा अभ्यास केला.

पुढे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी २०.८.१९१९ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील व्याकरणाचार्यांकडून पाणिनीचे व्याकरण तसेच महाभाष्याचा अभ्यास करून कलकत्त्याच्या व्याकरण-आद्य आणि व्याकरण-मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. पं. वामाचरण भट्टाचार्यांकडे न्यायशास्त्राचा अभ्यास केला. काशीत अध्ययन करीत असताना शैवभाष्य 'महानारायणोपनिषद्' या ग्रंथावर संशोधन करून श्री केदारनाथ शिवतत्त्व ग्रंथमालेचे प्रथम पुष्प म्हणून ते प्रकाशित केले.

श्री चिद्घनांचे पांडित्य आणि सद्गुण पाहून श्रीकेदारजगद्गुरू रावल नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना केदारपीठात बोलावून घेतले आणि केदारपीठाचा चेला संस्कार करून त्यांचे 'कैलासलिंग' असे नामकरण केले. दि. ९.६.१९३२ रोजी गुरुवारी त्यांना केदारपीठाचा चराधिकार देऊन त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू कैलासलिंग शिवाचार्य महास्वामीजी'

असे नामकरण केले.

जगद्गुरू कैलासलिंग हे विद्वान व लेखक होते. त्यांनी संस्कृतमध्ये 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य चरित्र' हे चंपूकाव्य गद्यपद्यात्मक रूपात रचिले. अद्यापि ते हस्तलिखित रूपातच आहे. त्यांनी लिहिलेला 'श्रीपरम शिवयोगरहस्य विवेक' नामक योगशास्त्रावरील संस्कृत ग्रंथदेखील अजून अप्रकाशित आहे. १९३३ मध्ये त्यांचा 'लिं. जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य' नामक कन्नड ग्रंथ प्रकाशित झाला आहे. काही वर्षेपर्यंत ते केदारपीठात वास्तव्यास होते. प्रकृती अस्वास्थ्यामुळे ते स्वग्रामी परतले आणि तेथेच लिंगैक्य झाले.

६५. **श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी**
हिरेमठ, मु.पो.ता. बिळगी,
जि. बागलकोट (कर्नाटक)



बिळगी हिरेमठ उज्जयिनीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेतील होय. या मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य हे पूर्वाश्रमी बिळगी तालुक्यातील इनाम हंचिनाळ या गावच्या श्री. वे. शांतवीरय्या आणि सौ. सिद्धलिंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १८९९ मध्ये द्वितीय सुपुत्र म्हणून जन्मास आले. हंचिनाळ येथे प्राथमिक शिक्षण घेतल्यानंतर सोन्नदच्या श्री. गंगप्पा देसाई यांनी त्यांना बिळगी हिरेमठावर उत्तराधिकारी नेमून आपल्या नेतृत्वाखाली त्यांचा पट्टाभिषेक करविला. नंतर त्यांना संस्कृत अध्ययनाकरिता बागलकोटच्या आडवी स्वामी मठाच्या संस्कृत पाठशाळेत पाठविले. नंतर सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत त्यांनी काही काळ अध्ययन केले.

पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१९ मध्ये श्री

जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे १२ वर्षे व्याकरण, साहित्य व वेदान्तशास्त्र यांचा अभ्यास करून पांडित्य मिळविले. १९३१ मध्ये ते स्वग्रामी परतले. पुराण-प्रवचन करीत देशात संचार करीत राहिले.

१९४६ मध्ये बिळगीच्या डोंगरातील आणेप्पा यांच्या मठात त्यांनी कठोर तपश्चर्या केली. त्याच्या समारोपास जमखंडी संस्थानचे तत्कालीन मंत्री श्री. बी. डी. जत्ती आले होते. १९५६ मध्ये सज्जल डोंगरीच्या आपल्या मठास बी. डी. जत्तींना आमंत्रित करून त्यांचा षष्ठ्यब्दी कार्यक्रम करून तुलाभार केला. स्वामीजी अत्यंत सरळ स्वभावाचे होते. सर्वांना हवेहवेसे वाटणारे होते. त्यांनी आयुष्यभर धार्मिक कार्यक्रम करीत धर्मजागृती केली. 'मंत्रयोगदर्पण' नामक ग्रंथ त्यांनी लिहिला. १९७१ मध्ये डिसेंबरच्या पौर्णिमेला ते लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, १९५३, पृ. ६३.



६६. **श्री वे.पं. चन्नवीर शास्त्रीजी**

यड्रामी मठ, मु.पो. कमतगी,
ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)

कमतगी गावच्या यड्रामी मठाचे चन्नबसय्या व सौ. तिपम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी १९०१ मध्ये यांचा जन्म झाला. श्री. चन्नवीर शास्त्रीजी हे आपल्या आईवडिलांचे १२ वे संतान होते. यांच्या आधी जन्मलेली अकरा अपत्ये अकाली मृत्यू पावली. शिवकृपेने त्यांचा जन्म झाला. त्यांनी कमतगीत पाचव्या इयत्तेपर्यंत प्राथमिक कन्नड शिक्षण घेतले. पुढे हुच्चेश्वर संस्कृत शाळेत अध्ययनाकरिता प्रवेश घेतला. हुच्चेश्वर मठाचे दहावे हुच्चेश्वर स्वामीजी हे काशीचे पंडित असून स्वतः अध्यापन करीत.

पुढे त्यांचे वडील चन्नबसय्या यांनी त्यांचा विवाह लवकर करावा यासाठी गुळेदगुड्डचे गर्भश्रीमंत श्री.वे. वीरभद्रय्या वस्त्रद यांची तिसरी सुपुत्री संगनबसवम्मा सोबत त्यांचा वैभवाने विवाह करून दिला. सासऱ्यांच्या आर्थिक सहाय्याने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १९१९ मध्ये ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील व्याकरण विद्वान गुलाब झा यांचे शिष्यत्व पत्करून व्याकरण व न्यायशास्त्राचा पाच वर्षेपर्यंत अभ्यास करून १९२४ मध्ये ते स्वग्रामी परतले.

त्यानंतर गृहस्थाश्रमी होऊन कमतगीच्या हुच्चेश्वर पाठशाळेत, इलकल पाठशाळेत, कलबुर्गीच्या गदिगे मठाच्या पाठशाळेत व बळ्ळारी पाठशाळेत त्यांनी प्राध्यापक म्हणून काम केले. वडील लिंगैक्य झाल्यानंतर कमतगीत राहून जीवनाच्या शेवटच्या श्वासापर्यंत पुराणप्रवचने करीत धर्मजागृती करून शिवसायुज्य प्राप्त करून घेतले.

### ६७. श्री वे.पं. विश्वेश्वर शास्त्रीजी

मु.पो. उप्पीन बेटगेरी, ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)

कोप्पळ तालुक्यातील उप्पीन बेटगेरी गावचे मठस्थ वे.पं. विश्वेश्वर शास्त्री विशेष संस्कृत अध्ययनाकरिता १९१९ मध्ये काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील साहित्य विद्वानांकडून काव्यादी ग्रंथांचा अभ्यास करून कलकत्त्याच्या काव्यतीर्थ परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्याबरोबरच सिद्धान्तकौमुदी इत्यादी व्याकरणग्रंथांचा अभ्यास करून व्याकरण व साहित्य या शास्त्रांत पांडित्य मिळवून स्वग्रामी परतले.

## ६८. वैद्यभूषण पं. काशीनाथ शास्त्रीजी

गच्चिनमठ,

मु.पो. नरेगल, ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



पं. काशीनाथ शास्त्रीजी नरेगल गावच्या गच्चिनमठाचे वे. गुरुसिद्ध शास्त्रीजींचे सुपुत्र म्हणून १९०४ मध्ये जन्मास आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. वडिलांच्या प्रोत्साहनाने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९१९ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री विविध विषयांच्या विद्वानांकडून साहित्य, व्याकरण व आयुर्वेद यांचा अभ्यास केला. काशी हिंदू विश्वविद्यालयाची वैद्यभूषण ही पदवी मिळविली. काशीत अध्ययन करताना अब्बिगेरी मठाचे श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य स्वामीजी आणि अब्बिगेरीच्या नंदीकोल मठाचे विश्वनाथ शास्त्रीजी हे त्यांचे सहाध्यायी होते. काशीत १९२९ पर्यंत १० वर्षे जंगमवाडी मठात राहून त्यांनी संस्कृत भाषेबरोबर आयुर्वेदविद्या आत्मसात केली.

काशीतील अध्ययन पूर्ण करून नरेगलला परतल्यानंतर तेथे 'जय कर्नाटक आयुर्वेद रसशाला' व औषध निर्माण संस्थान दवाखाना सुरू केला. तेथे शास्त्रोक्त पद्धतीने औषधी तयार करून ते रुग्णांवर उपचार करीत असत. १९३८ मध्ये आयुर्वेदाच्या प्रचाराकरिता त्यांनी 'श्री मल्लिकार्जुन आयुर्वेद विद्यापीठ' स्थापन केले. त्या विद्यापीठात विद्यार्थ्यांचा आयुर्वेद विद्येचा अभ्यास घेऊन ते त्यांना दिल्लीच्या आयुर्वेद विद्यापीठाच्या आयुर्वेद भिषक् आणि आयुर्वेद विशारद या पदव्या देत होते. एवढेच नव्हे तर ग्रामीण जनतेसाठी त्यांनी विद्यापीठांतर्गत एक चिकित्सा केंद्रही सुरू केले. औषधोपचार करून त्यांनी रुग्णांची सेवा केली. त्यासोबत पुराणप्रवचने करीत धर्मप्रसार व प्रचाराचे कार्यही केले.

राष्ट्रभक्त पं. काशीनाथ शास्त्रीजी जक्कलीचे अंदानप्पा दोड्डमेटी, रोणचे नेल्लूर शिवप्पा, गजेंद्रगडचे अंदानप्पा कुंदरगी आणि हिरेअळगुंदीचे शिवकुमार हिरेमठ यांच्यासोबत स्वातंत्र्यसंग्रामात सहभागी झाले होते. या काळात त्यांनी बेळगाव, हिंडलग येथील तुरुंगांमध्ये तीन वर्षे शिक्षा भोगली. याशिवाय या भागात म. गांधी व पं. नेहरू यांना बोलावून जनतेत स्वातंत्र्य आंदोलनाविषयी जागृती केली. पुढे देशाला स्वातंत्र्य मिळाल्यानंतर आपल्या कार्यक्षेत्रात मोठ्या उत्साहाने ते स्वातंत्र्योत्सव साजरा करीत. राजकीय क्षेत्रात सक्रिय सहभाग घेऊन रोण तालुक्याच्या अभिवृद्धी मंडळात व स्कूल बोर्डात त्यांनी सदस्य व अध्यक्ष म्हणून कार्य केले.

ते आपल्या भाषणातून संस्कृती व परंपरेवर भर देत असत. प्रतिवर्षी बटूंना लिंगदीक्षा देत असत. राजकीय व सामाजिक क्षेत्रांत कार्यतत्पर असूनही ते त्रिकाललिंगपूजा कधीच चुकवीत नसत. पं. काशीनाथ शास्त्रीजी आयुर्वेदनिपुण, स्वातंत्र्यसेनानी, शिक्षणप्रेमी असे समाजाभिमुख व्यक्तिमत्त्व होते. दि. ६.१२.१९८७ रोजी वयाच्या ८३ व्या वर्षी ते लिंगैक्य झाले.

## ६९. श्री ष.ब्र. पं. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी



कट्टीमनी हिरेमठ, चिम्मलगी.
द्वारा- तपोवन मंदिर, पुनर्वस्ती केंद्र, भाग, १-ए,
मु.पो. आलमट्टी डॅम साईट,
बसवन बागेवाडी, जि. विजयपूर (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८४२६-२८१५३६

चिम्मलगी कट्टीमनीचा हिरेमठ रंभापुरी पीठाची शाखा असून पुत्रवर्ग परंपरेचा मठ आहे. या मठाचे मूळ कर्तृ पुरुष श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवयोगी शिवाचार्य होत. शा.श. ७६९ (इ.स. ८४७) मध्ये या मठाची स्थापना झाली. मूळपुरुष श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवयोगी हे शालबिदरी गावाहून संचार करीत कृष्णाकाठावरील चिन्नमृगी अर्थात् चिम्मलगी गावात आले व त्यांनी तेथे एका मठाची स्थापना केली. तेव्हापासून आजपर्यंत या मठाची गुरुपरंपरा अव्याहतपणे चालू आहे. आतापर्यंत या मठावर १३ पट्टाध्यक्ष होऊन गेल्याचे दाखले आहेत. यात तेरावे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. पं. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी हे होत. पूर्वाश्रमी कलबुर्गी जिल्ह्यातील सुरपूर तालुक्यातील कोडेकल्ल गावचे वे.मू. षण्मुख स्वामी व सौ. सिद्धलिंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी शा.श. १८३१, फाल्गुन शुद्ध चतुर्थीला इ.स. १९०९ मध्ये त्यांचा जन्म झाला. चिम्मलगी हिरेमठाचे १२ वे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरू मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी धर्मप्रचाराकरिता कोडेकल्ल गावी जेव्हा आले होते तेव्हा त्यांच्या माता लिंगैक्य झाल्या. त्यांचे प्राथमिक शिक्षण चिम्मलगी येथे झाले. त्यानंतर गुरूंच्या आदेशानुसार त्यांनी बागलकोटच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. नंतर कोटेकल्लच्या दहावे होळेहुच्चेश्वर स्वामीजींकडे उच्च संस्कृत अध्ययन केले.

उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९२० मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री १९३४ पर्यंत

एकूण १४ वर्षे साहित्य व तर्कशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय शिक्षा परिषदेच्या तर्कतीर्थ आणि मथुरा विश्वविद्यालयाच्या न्यायविशारद या परीक्षांत उत्तीर्ण होऊन त्यांनी त्या पदव्या मिळविल्या. तर्कवाचस्पती ही पदवीदेखील त्यांनी प्राप्त केली. काशीतील अध्ययन पूर्ण करून १९३५ मध्ये ते चिम्मलगीला परतले. त्यानंतर जीवनाच्या अंतिम क्षणापर्यंत मठपरंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम करीत राहिले.

कालांतराने आलमट्टी, कृष्णा, आणेकट्टी योजनेत चिम्मलगी गाव बुडून गेले. आणेकट्टीच्या कॉलनीजवळ त्याचे पुनर्वसन करण्यात आले. स्वामीजींनी तेथे एक मठ बांधून त्याचे 'कट्टीमनी हिरेमठ तपोवन मंदिर' असे नामकरण केले. पूर्वाचार्यांच्या समाध्या बुडाल्यामुळे त्यांच्या अस्थी आणून तपोवनात बारा शिवाचार्यांच्या समाध्या दि. २५.१०.१९८४ रोजी पुन्हा प्रतिष्ठापित केल्या. त्या समाध्यांवर १२ शिवलिंगांची स्थापना करून त्याला 'द्वादश ज्योतिर्लिंग देवालय' असे नाव दिले.

वयोवृद्ध झाल्यावर त्यांनी चिम्मलगी कट्टीमनी हिरेमठाचे वे.मू. रुद्रस्वामी व सौ. अन्नपूर्णम्मा यांचे सुपुत्र श्री. शशिधर स्वामी यांना आपले उत्तराधिकारी नेमले. त्यांच्या नावाने इच्छापत्र लिहून दि. १०.७.१९८७ रोजी ते लिंगैक्य झाले. पुढे दि. ३१.७.१९८७ रोजी श्री शशिधर स्वामीजींना मठाच्या भक्तांनी पट्टाधिकार दिला. सध्या ष.ब्र. शशिधर शिवाचार्य स्वामी हे चिम्मलगी कट्टीमनी हिरेमठाच्या तपोवनाचे सर्व धार्मिक कार्यक्रम करीत आहेत.

---

परिचय : डी. जी. मरोळ, आलमट्टी.

## ७०. श्री वे.पं. गुरुमूर्ती शास्त्री

होळिनहंपेश्वर मठ, मु.पो. कडेनंदीहळ्ळी,
ता. शिकारीपूर, जि. शिवमोग्गा (कर्नाटक)



कडेनंदीहळ्ळीचा होळिनहंपेश्वर मठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठाचे मठाध्यक्ष परंपरागत संस्कृत विद्वान असून त्यांनी काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययन केले होते. श्री गुरुमूर्ती शास्त्री या मठाच्या वे. अडिवेप्पय्या आणि सौ. वीरम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १९०१ मध्ये जन्मास आले. यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. आपल्या मठाचे पट्टाध्यक्ष असणाऱ्या श्री ष.ब्र. चरमूर्ती महालिंग शिवाचार्यांकडून अमरकोश तसेच संस्कृत प्रथम पुस्तकांचे अध्ययन केले.

पुढे उच्च शिक्षणासाठी १९२० मध्ये काशीस गेले. तत्कालीन जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. ५ वर्षेपर्यंत निरंतर अध्ययन करून काव्यतीर्थ परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर स्वग्रामी परतले. आपल्या मठात एक पाठशाळा सुरू केली. स्वतःच प्राध्यापक होऊन अध्यापन केले. काशीपीठाचे लिंगैक्य जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी हे आपल्या पूर्वाश्रमात यांच्याकडूनच संस्कृत शिकले होते.

पं. गुरुमूर्ती शास्त्रीजी कलाप्रेमी होते. खेड्यातील तरुणांना संगीत तसेच नाटक शिकवीत होते. 'सत्य हरिश्चंद्र' आणि 'रेणुकविजय' ही यांची नाटके लोकप्रिय झाली होती. यांनी लोकांकडून मानमान्यता व पुरस्कार मिळविले होते. शास्त्रीजी स्वभावतः शीघ्रकोपी होते. मंत्रतंत्रात त्यांनी सिद्धी प्राप्त केली होती. श्रीशैलजगद्गुरू वागीश पंडिताराध्य आणि रंभापुरी जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य या महास्वामीजींचे एजंट बनून शास्त्रीजींनी सेवा केली होती. ते १९७४ च्या श्रावण सोमवारी लिंगैक्य झाले. आज होळिनहंपेश्वर मठाला शास्त्रीजींचे चिरंजीव श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य पट्टाध्यक्ष झाले आहेत.

## ७१. श्री वे.पं. चंद्रशेखर शास्त्रीजी

मु.पो. छत्रदहळ्ळी (कर्नाटक)

स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण करून हे उच्च शिक्षणासाठी इ.स. १९२० मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपाशीर्वादास पात्र होऊन श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील विद्वानांकडून साहित्यशास्त्र आणि तर्कशास्त्र यांचा अभ्यास करून त्या विषयांत प्रखर पांडित्य प्राप्त केले.

इ.स. १९३० मध्ये काशीतील अभ्यास पूर्ण करून कर्नाटकास परतले. धारवाडच्या मुरुघामठाच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून काम करीत श्री रुद्राध्यायाचा श्री वीरशैव सिद्धान्तपर अर्थ लिहून त्याचे प्रकाशन केले. त्याचप्रमाणे इ.स. १९३३ मध्ये श्रीचन्नबसवण्णांचे मंत्रगोप्य ग्रंथाचे संशोधन, संपादन करून ते प्रसिद्ध केले. नैष्ठिक ब्रह्मचर्य पालन करणाऱ्या यांनी शिवयोग मंदिरात वास करून शिवयोगानुष्ठान आचरिले.

नंतर सौंदत्ती तालुक्यातील मुनवळ्ळी गावच्या श्री पंचलिंगेश्वर देवस्थानात काही काळपर्यंत एकांतवास केला. काशीपीठाकडून प्रकाशित 'लिंगधारणचंद्रिका' या ग्रंथावर व्याख्यान लिहिले. त्यांच्या त्या व्याख्यानाचा पूर्वार्ध शिवयोग मंदिराच्या 'सुकुमार' मासिकात प्रकाशित झाला आहे. यांनी श्रीप्रभुदेवाची वचने संस्कृतमध्ये भाषांतरित करण्याचे महत्कार्य केले. त्यांची ही कृती मूरसाविर मठाच्या प्रकाशनयोजनेखाली आहे. यांनी आपले संपूर्ण आयुष्य शिवयोगाभ्यास, ग्रंथसंशोधन तसेच स्वाध्यायासाठी वाहिले आहे.

---

संदर्भ : शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३५३-३५४.

## ७२. श्री वे.पं. गुरुमूर्ती शास्त्रीजी

मु.पो. होनगनहळ्ळी,

ता. बसवन बागेवाडी, जि. विजयपूर (कर्नाटक)

होनगनहळ्ळीच्या मठस्थलाचे वे.मू. गुरुमूर्ती शास्त्रीजी स्वग्रामी शिक्षण पूर्ण करून संस्कृतच्या अभ्यासाकरिता सोलापुरात आले. तेथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्य होऊन चार वर्षेपर्यंत साहित्यशास्त्राचा अभ्यास केला.

नंतर उच्च शिक्षणाकरिता काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात इ.स. १९२० मध्ये प्रवेश घेतला. येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात ४ वर्षांपर्यंत अभ्यास करून व्याकरणाचार्य ही उपाधी प्राप्त केली. काशी येथील अध्ययन पूर्ण करून हुब्बळी मूरुसाविर मठाच्या संस्कृत महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून सेवा रुजू केली.

---

संदर्भ : पुण्यश्लोक वारद, पृ. २९८.

## ७३. श्री वे.पं. अन्नदानशास्त्री

मु.पो. होन्निगनूरू, ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)

आजच्या रोण तालुक्यातील होन्निगनूरूच्या मठाचे श्री वे.पं. अन्नदानशास्त्रीजी उच्च संस्कृत अध्ययनाकरिता इ.स. १९२० मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील व्याकरणशास्त्राच्या विद्वानांकडून लघुसिद्धान्त कौमुदी, सिद्धान्त कौमुदी इ. ग्रंथांचा अभ्यास करून व्याकरणशास्त्रात विद्वता प्राप्त केली. येथील अभ्यास पूर्ण करून स्वग्रामी परतले.

## ७४. श्री वे.पं. शिवनाथ शास्त्रीजी

मु.पो. अर्धगिरी, ता. गुब्बी, जि. तुमकूरु (कर्नाटक)

गुब्बी तालुक्यातील अर्धगिरी गावचे मठस्थ श्री वे.पं. शिवनाथ शास्त्रीजी उच्च संस्कृत अध्ययनाकरिता इ.स. १९२० मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या संमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात यांनी प्रवेश घेतला.

नंतर न्यायशास्त्राच्या विद्वानांकडून व्याप्तिपंचलक्षणि इत्यादी न्यायविषयक ग्रंथांचा अभ्यास करून न्यायपदवी प्राप्त केली. याशिवाय इंग्रजी भाषेचा अभ्यास करून आधुनिक विद्यांमध्ये पारंगत झाले. अशा रीतीने काशी येथील अभ्यास पूर्ण करून स्वग्रामी परतले.

## ७५. श्री वे.पं. सिद्धराम शास्त्रीजी

मु.पो. चिक्कसागर, ता.जि. रायचूरु (कर्नाटक)

रायचूरु तालुक्यातील चिक्कसागर गावचे श्री वे.पं. सिद्धराम शास्त्रीजी व्याकरणाध्ययनासाठी काशीक्षेत्रास इ.स. १९२० मध्ये आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुज्ञेने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

त्यानंतर येथील व्याकरणाचार्यांकडून सिद्धान्तकौमुदी यासारख्या ग्रंथांचा अभ्यास करून व्याकरणशास्त्राचे पंडित होऊन परतले.

## ७६. श्री वे.पं. सोमनाथ शास्त्रीजी

मु.पो.ता. परळी, जि. बीड (महाराष्ट्र)

महाराष्ट्र प्रांतीच्या मराठवाडा भागातील बीड जिल्ह्यातील परळीनिवासी श्री वे.पं. सोमनाथ शास्त्रीजी इ.स. १९२० मध्ये वेदान्तशास्त्राच्या अभ्यासाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन श्रीकाशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील वेदान्त विषयाच्या विद्वानांकडून ब्रह्मसूत्र शांकरभाष्य, पंचदशी इ. वेदान्तपर ग्रंथांचा अभ्यास करून वेदान्ताची उपाधी प्राप्त केली. काशीहून स्वग्रामी परतले. पुढे त्यांनी वेदान्ताचा प्रचार आणि प्रसार केला.

## ७७. श्री वे.पं. शिवशंकर शर्मा

मु.पो. खापा, ता. सावनेर, जि. नागपूर (महाराष्ट्र)

नागपूर जिल्ह्यातील सावनेर तालुक्यातील खापानिवासी वे.पं. शिवशंकर शर्मा हे प्रारंभिक संस्कृत अध्ययनाकरिता इ.स. १९२० मध्ये काशीक्षेत्रास आले. येथे श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे अष्टाध्यायी, अमरकोश, धातुरूपावली, समासचक्र इत्यादी ग्रंथांचा अभ्यास केला. यासोबत वैदिक विद्या संपादिली. तेथून स्वग्रामी परतले आणि वैदिक कार्य करीत भक्तादींना सहकार्य करीत कालक्रमणा करू लागले.

## ७८. श्री वे.पं. संगमेश्वर शर्मा

मु.पो.ता. अंबाजोगाई, जि. बीड (महाराष्ट्र)

मराठवाडा विभागातील बीड जिल्ह्यातील अंबाजोगाई ग्रामनिवासी संगमेश्वर शर्मा हे प्राथमिक संस्कृत अध्यनाकरिता इ.स. १९२० मध्ये काशीक्षेत्री आले. येथे श्री १००८ जगद्‌गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे अमरकोश, अष्टाध्यायी इ. ग्रंथांचा त्यांनी अभ्यास केला. प्राथमिक संस्कृत ज्ञान प्राप्त केले. यासोबत वैदिक विद्यादेखील करतलामलावत् प्राप्त केल्या. नंतर स्वग्रामी परतले.

## ७९. श्री वे.पं. बसवराज शास्त्रीजी

मु.पो. मनिहाळ, ता. रामदुर्ग, जि. बेळगाव (कर्नाटक)

रामदुर्ग तालुक्यातील मनिहाळ ग्रामनिवासी वे.पं. बसवराज शास्त्री यांचे पूर्ण नाव बसवनगौड. यांनी दीक्षासंस्कार घेऊन बसवराज शास्त्री असे नवीन अभिधान प्राप्त केले. नंतर हे इ.स. १९२० मध्ये वेदान्ताध्ययनाकरिता काशीक्षेत्रास आले. तत्कालीन पीठाचार्य श्री जगद्‌गुरू शिवलिंग शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे येथील वेदान्तशास्त्राच्या विद्वानांकडे अध्ययन करून कलकत्त्याची वेदान्त-मध्यमा या परीक्षेत उत्तीर्ण झाले. नंतर स्वग्रामी येऊन आपल्या भागातील जनतेला वेदान्तावर प्रवचने करून सुसंस्कृत करण्याकरिता कष्ट घेतले.

## ८०. श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. चिक्कमण्णूरु,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



चिक्कमण्णूरु गावचा हिरेमठ रंभापुरी पीठाचा शाखामठ होय. हा पुत्रवर्ग परंपरेतील मठ असून ह्या मठाला इनामी जमिनी व परंपरागत शिष्यवर्गही आहे. या मठावर अनेक शिवाचार्य पट्टाध्यक्ष झाले आहेत. या परंपरेत श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमी चिक्कमण्णूरु हिरेमठाच्या वे. आडवेंद्र स्वामी व सौ. गुरुसिद्धम्मा यांच्या पवित्र गर्भी इ.स. १९०३ मध्ये जन्मास आले. दि. २२.११.१९२० मध्ये चिक्कमण्णुरू हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारून नंतर संस्कृत अध्ययनासाठी काशीक्षेत्रास आले.

तत्कालीन पीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींकडून अनुमती घेऊन इ.स. १९२० मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे ३-४ वर्षांपर्यंत टीकमणी संस्कृत महाविद्यालयात संस्कृत तसेच संगीताचा अभ्यास केला. नंतर काही वर्षे यांनी केदारजगद्गुरू रावल नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजींचे सचिव म्हणून तसेच श्रीशैलपीठाचे श्री १००८ वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींचे कारभारी म्हणून काम पाहिले. नंतर धर्मप्रचारासाठी संचार करून गाव-नगरांतून धर्मजागृती केली. आचारसंपन्न, वाक्पटू, शिवपूजानिष्ठ, असणाऱ्या यांनी गदग नगरात श्रीजगद्गुरू रेणुक मंदिराची निर्मिती केली. आपल्या शेवटच्या श्वासापर्यंत रेणुक मंदिरात निवास करून ५.८.२००५ मध्ये श्रावणमासात शतायुषी होऊन शिवलोकास प्राप्त झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ७०.

## ८१. वे.पं. बसवलिंग शास्त्रीजी

सुरपुर मठ, द्वारा- जगदेवय्या सुरपुरमठ,
मु.पो. गुडिगेरी, ता. कुंदगोळ,
जि. धारवाड (कर्नाटक)



गुडगेरी शहरनिवासी वे.पं. बसवलिंग शास्त्रीजी उच्च संस्कृत अध्ययना-करिता इ.स. १९२० मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर येथील न्याय व साहित्याच्या विद्वानांकडून अवच्छेदकत्वनिरुक्ति तसेच साहित्यदर्पण इ. ग्रंथांचा अभ्यास केला. एवढेच नव्हे तर कलकत्त्याच्या न्यायमध्यमा परीक्षेतही ते उत्तीर्ण झाले. नंतर स्वग्रामी आल्यानंतर त्यांनी श्री मुरुघामठ चित्रदुर्ग आणि धारवाड येथे धर्मप्रसारकार्यात जीवन व्यतीत केले.

## ८२. श्री वे.पं. वीरभद्र शास्त्रीजी चरंतिमठ

मु.पो.ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)



हुनगुंद चरंतिमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठाचे श्री वे. मुरगय्या यांचे हे सुपुत्र इ.स. १९०० मध्ये जन्मास आले. स्वग्रामी प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण पूर्ण करून यांनी त्यासोबत संस्कृतचा अभ्यास केला. पुढे उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १९२० मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्रीच्या शासकीय संस्कृत महाविद्यालयाच्या वेदान्त विभागात प्रवेश घेतला. तेथील श्रेष्ठ विद्वानांकडून चित्सुखी, खंडनखंडखाद्य, अद्वैतसिद्धी इ. वेदान्तपर ग्रंथांचा पूर्णपणे अभ्यास करून 'वेदान्ताचार्य' ही पदवी मिळविली.

याप्रमाणे सुमारे १० वर्षेपर्यंत वेदान्तशास्त्राचा अभ्यास करून प्रखर पांडित्य संपादून ते हुनगुंदला आले. त्यानंतर कर्नाटकात अनेक संस्कृत पाठशाळांत प्राध्यापक म्हणून कार्य केले. त्यासोबत जनतेत आपल्या प्रवचनांतून वेदान्ततत्त्वांचा प्रचार केला. हे गृहस्थाश्रमी असून यांना सौ. दोडम्मा, सौ. गौरम्मा अशा दोघी धर्मपत्नी होत्या. गौरम्माच्या पोटी चंद्रशेखर नावाचा सुपुत्र जन्मास आला. चंद्रशेखर आईच्या गर्भात असतानाच वीरभद्रशास्त्री लिंगैक्य झाले. आपल्या जन्माआधीच आपल्या वडिलांच्या मायेला पारखा झालेल्या चंद्रशेखरला आपल्या वडिलांसारखे पांडित्य मिळविणे शक्य झाले नाही. त्यामुळे जेमतेम लौकिक विद्या संपादून ते व्यापाराकरिता बागलकोटला गेले. पुढे गुडेद्गुड्डचे सुप्रसिद्ध नारळाचे व्यापारी संगय्या वस्त्रद यांची सुपुत्री कु. बसलिंगव्वा हिचेसोबत यांचा विवाह झाला. श्री. चंद्रशेखरय्या आपल्या व्यापार-उद्योगासोबत बागलकोटच्या

सुप्रसिद्ध श्री बसवेश्वर वीरशैव विद्यावर्धक संघाचे सदस्य म्हणून कार्य करीत होते. पुढे इ.स. १९८० मध्ये एका वाहन अपघातात चंद्रशेखरय्या लिंगैक्य झाले.

दि. ३१.५.१९५८ रोजी जन्मास आलेले यांचे ज्येष्ठ सुपुत्र श्री. वीरभद्रय्या (वीरण्णा) यांनी वडिलांच्या जागी सदस्य होऊन कार्य केले. श्री वीरभद्रय्या ऊर्फ वीरण्णा यांची प्रामाणिकता, संस्थेच्या कार्याविषयीची निष्ठा पाहून सदस्यांनी त्यांना प्रशासन समितीवर घेतले. १० वर्षेपर्यंत श्री. वीरण्णांची अभिवृद्धीकरिता अहर्निश कष्ट करण्याची प्रवृत्ती पाहून सगळ्या सदस्यांनी एकमताने १९९१ मध्ये त्यांना श्री बसवेश्वर वीरशैव विद्यावर्धक संघाचे चेअरमन केले. १९९१ पासून आजपर्यंत २९ वर्षे श्री. वीरण्णा चरंतिमठ हेच चेअरमन म्हणून शिक्षणसंस्थेचा विकास करीत आहेत. त्यांच्या कार्यकाळात मेडिकल कॉलेज, आयुर्वेद कॉलेज, डेंटल कॉलेज, इंजिनिअरिंग कॉलेज, फार्मसी कॉलेज, नर्सिंग कॉलेज आणि डिप्लोमा कॉलेज यांची स्थापना झाली. त्यांनी शैक्षणिक क्षेत्रात खूप मोठे यश मिळवले आहे. शिक्षणसंस्थेत काम करण्यासोबत राजकीय क्षेत्रातही ते कार्य करीत आहेत. ते सध्या बागलकोट येथील आमदार आहेत. त्यांचे आजोबा वीरभद्रशास्त्री हे काशीचे पंडित होते. त्यांच्या वंशात जन्मलेले वीरण्णा यांनी आजोबापेक्षा पुढे जाऊन शैक्षणिक, सामाजिक, धार्मिक तसेच राजकीय क्षेत्रांत केलेले कार्य सर्वांना समाधान देत आहे. लहान वयात फार मोठी जबाबदारी स्वीकारून कार्य करणारे श्री. वीरण्णा चरंतिमठ हे बागलकोट विभागात एक आदर्श व्यक्ती म्हणून नावारूपाला आले आहेत. सर्व क्षेत्रांत त्यांची सेवा अव्याहत चालू आहे.

---

परिचय : प्रा. आ. सि. हिरेमठ, राणेबेन्नूर.
संपर्क- श्री. वीरण्णा चरंतिमठ, बागलकोट.
चरभाष- ९४४८१४३७०२, ८८८४४५२९८९.

## ८३. श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी



तेंकलगुड्ड बृहन्मठ, मु.पो. एसळुरू,
ता. सकलेशपूर, जि. हासन (कर्नाटक)
दूरभाष (०८१७३) २४८२४०,
चरभाष ९४४८२५७०३९

श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमीचे कोप्पळ जिल्ह्याच्या यलबुर्गा तालुक्यातील भानापूर गावचे होत. भानापूरच्या वे. गेणय्या आणि सौ. सिद्धम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १९०० मध्ये ते जन्मास आले. यांचे नंदिगोत्र. यांनी भानापूर येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर हालकेरीच्या अन्नदान संस्कृत पाठशाळेत काही वर्षेपर्यंत अध्ययन करून उच्च शिक्षणाबरोबर संस्कृत भाषेचा अभ्यासदेखील केला. पुढे आपल्या गावच्या श्रीमान गुरुप्पा पोलीस पाटील यांच्या प्रेरणेने आणि मदतीने उच्च शिक्षणासाठी ते काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने काशी जंगमवाडी मठातील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १०.१२.१९२१ रोजी प्रवेश घेतला. यांनी काशीक्षेत्री दि. २५.३.१९३५ पर्यंत १४ वर्षेपर्यंत व्याकरणाचा आणि साहित्याचा अभ्यास करून वेदान्तशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला. काशी हिंदू विश्वविद्यालयाची 'वेदान्ताचार्य' परीक्षा उत्तीर्ण करून तीन सुवर्णपदके मिळविली. यांचे वेदान्तातील पांडित्य पाहून श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी दि. २५.३.१९३५ ला आयोजित केलेल्या त्यांच्या निरोपसमारंभात यांना 'वेदान्तशिरोमणी' प्रशस्ती देऊन त्यांचा गौरव केला.

याप्रमाणे विद्याविभूषित होऊन व सन्मानित होऊन ते काशीहून भानापुरास आले. पुढे काही वर्षात श्रीमद् रंभापुरी जगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य भगवत्पादांनी यांची विद्वत्ता पाहून हासन जिल्ह्याच्या एसळुरू गावच्या श्रीतेंकलगुड्डू बृहन्मठास उत्तराधिकारी म्हणून नेमले. त्या मठाच्या श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्यांकडून पट्टाधिकार देववून 'श्री ष.ब्र. नीलकंठ

शिवाचार्य' असे नामकरण केले. काही वर्षेपर्यंत गुरुसेवा करून श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य यांनी बळ्ळारी सक्री करड्यप्पा संस्कृत महाविद्यालयात अध्यापक म्हणून काही वर्षे सेवा केली. नंतर यसळुरू गावी येऊन ते मठाच्या धार्मिक परंपरा यथावत् पाहू लागले. पुढे या मठाची परंपरा अव्याहत चालू राहावी या उद्देशाने बटू निवडून त्यांना पट्टाधिकार करून त्यांचे 'श्री ष.ब्र. चन्नमल्लिकार्जुन शिवाचार्य' नामकरण करून गौरविले. त्यानंतर काही महिन्यांत वृद्धापकाळामुळे आरोग्य बिघडून श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी दि. ७.१.१९८० रोजी लिंगैक्य झाले. त्यानंतर त्या मठास पट्टाध्यक्ष असलेले श्री ष.ब्र. चन्नमल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजींनी मठाची धार्मिक परंपरा चालू ठेवण्यासोबत शैक्षणिक क्षेत्रात महत्त्वाचे कार्य केले. यसळुरूच्या हायस्कूलला ७ एकर जमीन दान दिली. त्याशिवाय ते या मठाकडून एक माध्यमिक शाळा देखील चालवीत आहेत. श्रावणमास अनुष्ठान, कृषि-सुधारणा, मठाचा जीर्णोद्धार इ. कार्ये करीत पंच पीठाधिपतींच्या कृपेला ते पात्र झाले आहेत.

## ८४. श्री म.नि.प्र. सिद्धराम महास्वामीजी

आडवी सिद्धेश्वर मठ, मु.पो. अंकलगी,
ता. गोकाक, जि. बेळगाव (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे गदग जिल्ह्यातील रोण गावच्या शांतस्वामी मठाचे श्री वे.मू. चन्नवीरय्या आणि सौ. नीलम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी इ.स. १८९९ मध्ये जन्मास आले. यांनी आपले प्राथमिक शिक्षण रोण गावी पूर्ण केले. नंतर रोणच्या शांतस्वामी मठाचे उत्तराधिकारी झाले. त्यानंतर संस्कृतच्या अध्ययनासाठी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्रवेश घेतला. तेथे संस्कृत तसेच योगाभ्यास पूर्ण करून उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने यांनी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९२१ मध्ये प्रवेश घेतला. नंतर काशीच्या संस्कृत पाठशाळेत निरंतर १२ वर्षे साहित्य आणि व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याची काव्यतीर्थ परीक्षा उत्तीर्ण झाले.

याप्रमाणे काशी येथील अभ्यास पूर्ण करून १९३३ मध्ये स्वतःच्या गावी परतून धारवाडच्या मुरुघा मठात, हुब्बळीच्या रुद्राक्षमठात, श्री शिवयोग मंदिरात आणि निडगुंदीकोप्पच्या संस्कृत पाठशाळेत प्राध्यापक म्हणून सेवा केली. नंतर हालकेरीच्या श्री मुप्पिन बसवलिंग स्वामीजींकडून अनुग्रहित होऊन गजेंद्रगडच्या विरक्त मठाचा अधिकार ग्रहण केला. त्यानंतर शिरसीमठाचे अधिकारी म्हणून कार्य केले. नंतर अंकलगी गावचे अडवी सिद्धेश्वर मठास चौथे मठाधिपती म्हणून १९३८ मध्ये अधिकार ग्रहण केला. हे विद्वान, तपस्वी होते. त्यांनी अनेक चमत्कार करून जनतेचा उद्धार केला. १९७३ मध्ये महाशिवरात्रीच्या पर्वकाळी आडवी सिद्धेश्वराचा रथोत्सव चालू असताना ते लिंगैक्य झाले. त्या दिवशी

अंकलगीच्या आडवी सिद्धेश्वराचा रथोत्सव श्री सिद्धराम शिवयोगीचा रथोत्सव एकाच वेळी आयोजित केला जातो. हे दृश्य भक्तांच्या हृदयावर फार परिणाम करणारे असते.

---

परिचय : डॉ. कोट्टुरेश्वर स्वामीजी, कलमठ गंगावती.

## ८५. न्याय–वैशेषिकाचार्य, दर्शनविशारद श्री ज. चतुर्थ शिवलिंगेश्वर महास्वामीजी

सिद्धसंस्थान मठ, मु.पो. निडुसोसी (संकेश्वर),
जि. बेळगाव (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे बेळगाव जिल्ह्यातील तालुका हुक्केरीतील अम्मणगी सुक्षेत्रीच्या हिरेमठाचे वंशज. अम्मणगी हिरेमठाला चालुक्य विक्रमादित्याने भूदान करून ताम्रपत्र लिहून दिला, ही इतिहासप्रसिद्ध घटना आहे. या हिरेमठाचे षट्स्थल ब्रह्म घनलिंग चरचक्रवर्ती श्री सुज्ञानी शिवाचार्य स्वामीजी हे महामहिमाशाली होऊन गेले आहेत. याच अम्मणगी हिरेमठाच्या श्री वे. सिद्धलिंग स्वामी आणि सौ. नीलाम्बिका देवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी श्री शिवलिंगेश्वर महास्वामीजी पुत्ररत्नरूपाने दि. १०.१२.१९०० ला जन्मास आले. तेव्हा त्यांचे गुरुलिंग देव असे नामकरण करण्यात आले. जन्मल्यानंतर १० महिन्यांत यांचे आई–वडील लिंगैक्य झाले. नंतर यांचे आजी–आजोबा यांनी त्यांना हत्तरकीस नेऊन तीन वर्षेपर्यंत त्यांचा सांभाळ केला. पुढे त्यांची मावशी यांना हेरेपाटणला घेऊन गेली. दोन वर्षे यांचा सांभाळ केला. लहान असतानाच त्यांच्या मामांनी म्हणजे बेळगावचे चंद्रशेखर मठाचे श्रीगुरुबसव महास्वामीजींनी यांना आपल्या मठाचा उत्तराधिकारी म्हणून नेमले. थोरले बंधू वे.पं. सुज्ञानस्वामी अम्मणगी यांनी श्री गुरुलिंगदेव यांचे प्राथमिक शिक्षण पूर्ण करविले. नंतर हुक्केरी मठाच्या संस्कृत पाठशाळेत चार वर्षेपर्यंत संस्कृतचे प्रारंभिक अध्ययन करविले. १९१६ मध्ये त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्रीजी नालवार यांचे शिष्य होऊन काव्य, नाटक, साहित्यशास्त्राचा अभ्यास केला.

नंतर श्री गुरुलिंगदेव उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९२१ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात

प्रवेश घेतला. त्यांनी काशीक्षेत्रीच्या काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या प्राच्यविद्या धर्मविद्या संकायात न्याय, वैशेषिक आणि सर्वदर्शन या शास्त्रांचा १२ वर्षेपर्यंत पं. बाळकृष्ण मिश्र, पं. शंकर भट्टाचार्य आणि पं. गोपीनाथ कविराज इ.कडे अध्ययन करून तर्कतीर्थ, न्याय-वैशेषिकाचार्य आणि सर्वदर्शनविशारद या उपाधी प्राप्त करून घेतल्या. यांच्या अपार विद्वत्तेचे फळ म्हणून वेदान्तभास्कर, विद्यावाचस्पती इ. उपाधी त्यांना प्राप्त झाल्या. काशी येथील शिक्षण पूर्ण करून ते १९३३ मध्ये कर्नाटकास परतले.

मैसूरच्या रेडिओ स्टेशनवर 'मी' या विषयावर त्यांनी केलेले विद्वत्तापूर्ण भाषण फार प्रभावी झाले होते. यांच्या विद्वत्तेने प्रभावित झालेल्या मूरुसाविर मठाचे श्री म.नि.प्र. ज. गंगाधर राजयोगिंद्र महास्वामीजींनी आपल्या मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात त्यांना प्राचार्य म्हणून नियुक्त केले. येथे विद्यार्थ्यांना शिकवत असतानाच यांनी श्री मरितोंटदार्यविरचित 'वीरशैवानंदचंद्रिका' नावाच्या संस्कृत ग्रंथाचे परिष्करण करून तो मुद्रित केला. आज तो ग्रंथ संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य परीक्षेसाठी पाठ्यपुस्तक म्हणून स्वीकृत केला आहे. धारवाड नगरात झालेल्या अखिल भारत शिवानुभव संमेलनाचे अध्यक्षपद त्यांना प्राप्त झाले होते. हा त्यांच्या विद्वत्तेचा गौरव होता.

पुढे दि. ११.२.१९५० मध्ये निडुसोसी सिद्धसंस्थान मठाचे चतुर्थ निजलिंगेश्वर महास्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर त्या जागेवर बेळगावच्या श्री म.नि.प्र. गुरुलिंग महास्वामीजींची उत्तराधिकारी म्हणून नियुक्ती करण्यात आली. पुढे विधिवत् त्या मठाचा निरंजनाधिकार प्राप्त झाल्यानंतर त्यांचे 'श्री म.नि.प्र. जगद्गुरू पंचम शिवलिंगेश्वर' असे नामकरण करण्यात आले. निडुसोसी सिद्धसंस्थान मठाचा अधिकार स्वीकारल्यानंतर त्यांनी मठाच्या परंपरेनुसार यथावत् त्याचे पालन करून शैक्षणिक क्षेत्रात लक्षणीय सुधारणा केली. दि. १३.६.१९६० मध्ये एक स्वतंत्र विद्यासंस्था स्थापून त्याद्वारे श्रीमठाच्या परिसरात माध्यमिक शाळा, उचित बोर्डिंग स्थापून ग्रामीण भागातील गरीब विद्यार्थ्यांची सोय करून दिली. शेतकऱ्यांविषयी

कळवळा असणाऱ्या महास्वामीजींनी त्यांना ऊसलागवडीसाठी प्रोत्साहित केले. श्री एम. पी. पाटील आणि अप्पण्णा गौड पाटील यांना प्रेरणा देऊन संकेश्वर येथे हिरण्यकेशी सहकारी साखर कारखाना स्थापण्यास मूळ प्रेरक शक्ती झाले. श्रीमठात एक संस्कृत पाठशाला स्थापून त्याला शासनाची मान्यता मिळविली. अम्मरगी हिरेमठाचे साहित्याचार्य श्री पं. शिवकुमार शास्त्रीजींना अध्यापक नेमून निडुसोसी येथे उत्तम संस्कृत शिक्षणाची व्यवस्था केली. आपल्या मठात धान्यभिक्षेवर चालणाऱ्या महादासोहास नवे रूप देण्यासाठी मठातील शेतातच विहिरी खोदून पाईपलाईन करून नांगरयोगी होऊन, कष्ट करून स्वावलंबनाने दासोह चालवून ते सर्व स्वामीजींना आदर्शवत् झाले. एवढेच नव्हे, तर शेतकऱ्यांना नवनवीन पिके घेण्यासाठी मार्गदर्शक झाले.

धारवाडच्या श्री म.नि.प्र. मृत्युंजय स्वामीजींच्या सूचनेवरून निडुसोसी येथे अखिल भारत शिवानुभव संमेलनाचे आयोजन केले. श्रीजगज्योती बसवेश्वर अष्टशतमानोत्सव आणि एडेयुरू श्री सिद्धलिंगेश्वर पंच शतमानोत्सवाचे आयोजन करून बेंगळुरचे बी. शिवमूर्ती शास्त्री, डॉ. आर. सी. हिरेमठ, डॉ. एस. सी. नंदिमठ, पं. नागभूषण शास्त्रीजी यांना सन्मानित करून पांडित्यप्रेम दाखवून दिले. याप्रमाणे निडुसोसी सिद्धसंस्थान मठाचे श्री म.नि.प्र. जगद्गुरू पंचम शिवलिंगेश्वर महास्वामीजी विद्वान, उत्तम वक्ते, बहुभाषाविद होऊन धार्मिक, शैक्षणिक, सांस्कृतिक कार्यासोबत कृषिक्षेत्रात देखील लक्षणीय साधना करून लोकगौरवास पात्र झाले. ते दि. २३.३.१९७१ मध्ये लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : गौरीशंकर शास्त्रीजी हिरेमठ, अम्मणगी यांचा लेख.

## ८६. श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध महास्वामीजी

राजगुरू संस्थान कल्मठ,
मु. कित्तूर, ता.जि. बेळगाव (कर्नाटक)



कित्तूरचा राजगुरू संस्थान कल्मठ हा देशातील वीरशैव मठांपैकी एक प्रमुख मठ आहे. या मठाला एक ऐतिहासिक परंपरा आहे. या परंपरेत अनेक स्वामीजी होऊन गेले आहेत. ते सर्व मठाधिपती वीरराणी कित्तूर चन्नम्माच्या कुळातील होते. या परंपरेत श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध महास्वामीजी हे बेळगाव जिल्ह्यातील खानापूर तालुक्यातील गंदीगवाड गावातील हिरेमठ वंशात इ.स. १९०३ मध्ये जन्मले.

त्यांचे गंदीगवाडमध्ये प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले. नंतर कित्तूर कल्मठ संस्थानच्या भक्तांनी त्यांना कल्मठचे उत्तराधिकारी म्हणून नियुक्त करून उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्रास पाठवून दिले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९२१ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. १९३३ पर्यंत १२ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून काशीच्या विविध विद्वानांकडून व्याकरण, न्याय, साहित्य आणि वेदान्त या शास्त्रांचा पूर्ण अभ्यास केला.

काशी येथील अभ्यास पूर्ण करून आल्यानंतर १९३३ मध्ये कित्तूरच्या राजगुरू संस्थान कल्मठचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारला. नंतर कित्तूर क्षेत्रात चोहीकडे संचार करून लोकांत धर्मजागृती केली. शिक्षणाचे महत्त्व जाणून खेड्यातील गरीब विद्यार्थ्यांसाठी त्यांनी कित्तूर येथे 'कित्तूर नाड वीरशैव विद्यावर्धक संघ' नावाची शिक्षणसंस्था १९५० मध्ये स्थापन केली. त्या काळी महाविद्यालयीन शिक्षणासाठी धारवाड किंवा बेळगावला जावे लागत असे, हे ओळखून त्यांनी आपल्या शिक्षणसंस्थेत पूर्वप्राथमिक शिक्षणापासून प्राथमिक, माध्यमिक, पदवीपूर्व व पदवी महाविद्यालयाची

स्थापना करून त्या भागातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक सोयी उपलब्ध करून दिल्या. हिरेकल्मठचा शाखामठ असणाऱ्या कित्तूरच्या चौकी मठाचा जीर्णोद्धार करून १९५३ मध्ये गरगच्या मडिवाळेश्वर प्रसाद निलय स्थापून परगावच्या मुलांसाठी भोजन तसेच निवासाची व्यवस्था केली.

याप्रमाणे श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध महास्वामीजी कित्तूर प्रदेशात धार्मिक, सामाजिक तसेच शैक्षणिक अभ्युदय करून सर्वांना आदरणीय ठरले. शेतीत अभिरुची असल्याने मठाची शेती सुधारून शेतकऱ्यांचे मार्गदर्शक झाले. याप्रमाणे मठाची सर्वांगीण उन्नती करून इ.स. १९७४ मध्ये लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर या मठाचा श्री म.नि.प्र. शिवबसव स्वामीजींनी अधिकार ग्रहण केला. हल्ली श्री म.नि.प्र. मडिवाळेश्वर स्वामीजी मठाचे निरंजनाधिकार स्वीकारून अभिवृद्धि-कार्यात मग्न झाले आहेत.

८७. **श्री ष.ब्र. चिद्घन शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ**

मु.पो. मोळकाल्मुरू,
ता.जि. चित्रदुर्ग (कर्नाटक)

चित्रदुर्ग जिल्ह्यातील मोळकाल्मुरू गावचा हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ आहे. हा पुत्रवर्ग परंपरेतील मठ असून या मठाला इनामी जमिनी आहेत. तसेच परंपरागत शिष्यदेखील आहेत. या मठावर बरेच मठाध्यक्ष होऊन गेले आहेत.

श्री ष.ब्र. चिद्घन शिवाचार्य हे या मठाचे पट्टाध्यक्ष होत. त्यांनी बालपणी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन केले. नंतर कोहूरीच्या श्री उज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृत अध्ययन केले. पुढे संस्कृत अध्ययनाकरिता सोलापुरात येऊन तेथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्यत्व

पत्करून साहित्यशास्त्राचा अभ्यास केला.

पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता दि. १२.१२.१९२२ रोजी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर काव्य-व्याकरणादी शास्त्रांचा अभ्यास करून काव्यतीर्थ आणि व्याकरणतीर्थ या उपाधी मिळविल्या.

विद्याध्ययन पूर्ण करून इ.स. १९३३-१९३४ मध्ये उज्जयिनी जगद्गुरू श्री सिद्धलिंग शिवाचार्यांच्या धर्मप्रचार मंडळाचे नेतृत्व स्वीकारून सोलापूर, बार्शी इ. नगरांत चाललेल्या धार्मिक कार्यक्रमात भाग घेऊन विद्वत्तापूर्ण प्रवचने करून ते महास्वामीजींच्या कृपेस पात्र झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ७३.

## ८८. श्री ष.ब्र. शिवकुमार शिवाचार्य स्वामीजी

मुत्तिन कंथिमठ, कोट्टिगे गल्ली, बेंगळूरु (कर्नाटक)



बेंगळूरुचा मुत्तिन कंथिमठ हा केदारपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेतील मठ आहे. या मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. शिवकुमार स्वामीजींनी बेंगळूरु येथे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. आपले गुरू श्री ष.ब्र. ईश्वर शिवाचार्य स्वामीजींकडून पट्टाधिकार संस्कार ग्रहण केला. नंतर गुरुवर्यांच्या प्रेरणेनुसार उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले.

श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्यांच्या अनुमतीने दि. २६.४.१९२२ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे त्यांनी साहित्य तसेच व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. त्यासोबत आयुर्वेदशास्त्राचा अभ्यास करून त्यात प्राविण्य मिळविले. दि. १३.२.१९३५ पर्यंत एकूण १३ वर्षे काशीपीठात राहून अध्ययन केले. पुढे दि. १५.२.१९३५ रोजी काशीपीठात श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षरी शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात पार पडलेल्या पदवीदान समारंभात त्यांना 'वैद्यमार्तंड' पदवी देऊन गौरविण्यात आले.

पुढे त्यांनी बेंगळूरुच्या मुत्तिन कंथिमठात राहून धार्मिक कार्यक्रमांसोबत लोकांची आयुर्वेद चिकित्सा करून आयुष्यभर सेवा केली. त्यांनी 'आरोग्यदर्पण' नावाचा ग्रंथ कन्नड भाषेत प्रसिद्ध केला. कर्नाटकात हा ग्रंथ अत्यंत लोकप्रिय आहे.

## ८९. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी

कंबाळीमठ, मु. पो. हिरेबेंडिगेरी,
ता. शिग्गाव, जि. हावेरी (कर्नाटक)



हिरेबेंडिगेरी गाव पूर्वी काशी कल्याणपट्टण नावाने प्रसिद्ध होते. येथील कंबाळीमठ हा काशी महापीठाची शाखा आहे. या मठाचे मूळपुरुष श्री ष.ब्र. कंबाळीश्वर शिवाचार्य स्वामीजी होते. म्हणून या मठाला कंबाळीमठ असे नाव पडले आहे. इतिहासानुसार हा मठ सोळाव्या शतकाहून प्राचीन आहे, असे लक्षात येते. या मठाचे हिरेबूदिहाळ आणि सोगी या गावांत शाखामठ आहेत. या तीनही मठांना ब्रिटीश राणी पहिली एलिझाबेथ आणि पेशवे यांच्यांकडून सनदी प्राप्त झाल्या आहेत.

या मठाचे मूळपुरुष श्री ष.ब्र. कंबाळीश्वर शिवाचार्यानंतर श्री ष.ब्र. संगनबसव शिवाचार्यजी, श्री ष.ब्र. गुरुबसव शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य, श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य आणि श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य हे पट्टाध्यक्ष होऊन गेले आहेत.

शेवटचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी हिरेबेंडिगेरी कंबाळीमठाचे श्री वे. निरंजनस्वामीजी आणि सौ. विरूपाक्षम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १९०१ मध्ये जन्मास आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. पुढे बंकापूरच्या संस्कृत पाठशाळेत श्री वे.पं. हरीश्वर शास्त्रीजींकडून संस्कृत तसेच वैदिक विद्येचा अभ्यास पूर्ण केला.

पुढे १९१८ मध्ये बंकापूरच्या अरळेले हिरेमठाच्या श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजींच्या अमृतहस्ते हिरेबेंडिगेरीच्या कंबाळीमठाचा पट्टाधिकारी संस्कार ग्रहण केला. मठाच्या परंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम करीत गेले. अध्ययनाची भूक न भागल्याने उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री जावे अशी इच्छा यांच्याठायी निर्माण झाली. तेव्हा भक्तांच्या मदतीने ते

उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले.

तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी इ.स. १९२२ मध्ये जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री शासकीय संस्कृत कॉलेजमध्ये विविध विद्वानांकडून काव्य, न्याय तसेच वेदान्तादी शास्त्रांचा पूर्ण अभ्यास करून भाषा तसेच शास्त्रांतील पांडित्य प्राप्त करून घेतले. इ.स. १९३२ पर्यंत १० वर्षेपर्यंत काशी जंगमवाडी मठात वास्तव्य करून अध्ययनाबरोबर जगद्गुरूंच्या कृपाशीर्वादास पात्र झाले. नंतर पीठाचार्यांचा आशीर्वाद मिळवून स्वग्रामी परतले.

श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी हिरेबेंडिगेरीस आल्यावर यथावत् मठाचे धार्मिक कार्यक्रम व्यवस्थित पार पाडू लागले. पुढे त्यांच्या विचारात परिवर्तन होऊन त्यांनी इ.स. १९३२ मध्ये गृहस्थाश्रम स्वीकारला. त्यांना राजशेखर स्वामी आणि गिरिराज स्वामी अशी दोन मुले झाली.

कालांतराने इ.स. १९६५ मध्ये सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी लिंगैक्य झाले. यामुळे हिरेबेंडिगेरीच्या कंबाळीमठाची पट्टाधिकारी परंपरा सध्या कुंठित झाली आहे. भविष्यात पूर्वपरंपरेनुसार चालू ठेवण्याचा विचार त्यांचे वंशज करीत आहेत.

## ९०. श्री वे. वामदेवशास्त्री हिरेमठ

मु.पो. उप्पिनबेटगेरी, ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)

यांनी कोट्टूरच्या उज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळेत साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. वयाच्या १८ व्या वर्षी १२.१०.१९२३ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे न्यायशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला.

## ९१. श्री वे. पट्टदार्य स्वामीजी हिरेमठ

होसपेट, कुंभार गल्ली,
मु.पो.जि. बागलकोट (कर्नाटक)



बागलकोटचा हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. हा पुत्रवर्ग परंपरेतला मठ होय. या मठाच्या परंपरेत शिष्य आणि इनामी जमिनी असतात. या मठपरंपरेत अनेक शिवाचार्य होऊन गेले. श्री पट्टदार्य स्वामीजी हे त्याच वंशातले होत. श्री. वे. रेवप्पय्या आणि सौ. चन्नबसव्वा या हिरेमठ दंपतीचे हे सुपुत्र होत. दि. ९.२.१९०५ रोजी यांचा जन्म झाला. ते पाच वर्षांचे असतानाच त्यांचे वडील लिंगैक्य झाले. पुढे थोड्या दिवसांतच आई चन्नबसवा देखील शिवसान्निध्य पावल्या. पट्टदार्य अनाथ झाले. तरी मठाचे शिष्य आणि गल्लीतील वडीलधाऱ्यांनी त्यांना आपल्या हिरेमठाचे वारसदार म्हणून त्यांचे पालनपोषण केले. इ.स. १९१९ मध्ये यांनी बागलकोट येथे मुल्की परीक्षा (इयत्ता सातवी) उत्तीर्ण केली.

नंतर गावचे वडीलधारे श्रीमान पल्लेद शिवप्पाजी आणि रेवडीगार शिवलिंगप्पांनी श्री पट्टदार्यांना संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्रास पाठविण्याचा निर्णय घेतला. गावातल्या सद्भक्तांनी अर्थसहाय्य केले. बिळगी हिरेमठाच्या श्री ष.ब्र. गुरुवार शिवाचार्यांच्या बरोबर त्यांना काशीक्षेत्रास पाठविले. तत्कालीन काशीजगद्गुरू श्री शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १९२३ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर तेथील संस्कृत पाठशाळेत व्याकरण, साहित्य, शास्त्र यांचा चार वर्षांपर्यंत म्हणजे इ.स. १९२७ पर्यंत अभ्यास पूर्ण केला.

तेव्हा गावचे गुड्डद वीरसंगप्पनजींनी बागलकोटच्या बाकीच्या वडीलधाऱ्यांशी चर्चा करून पट्टदार्यांना पट्टाभिषेक करण्याच्या उद्देशाने बागलकोटला परतण्याची विनंती केली. भक्तांच्या अपेक्षेप्रमाणे काशीचा अभ्यास पूर्ण करून ते बागलकोटला परतले. २०० वर्षांहून अधिक भव्य

परंपरा असणाऱ्या या मठावर श्री पट्टदार्यांना पट्टाभिषेक करण्याचा विचार पुढे ठेवल्यानंतर श्री पट्टदार्यांनी लगेच स्वीकृती दिली नाही. जबरदस्तीने त्यांना पट्टाभिषेक करणे योग्य नाही असा विचार करून भक्त गप्प बसले.

पुढे १९२७ मध्ये चौडय्या दानपूरच्या श्री शांतवीर वडेयर कलेक्टरांची कन्या कुमारी तंगेव्वा नावाच्या कन्यारत्नाबरोबर त्यांचा विवाह झाला. पट्टदार्यांचा विवाह होऊन ते गृहस्थाश्रमी झाले. आजदेखील हा मठ पट्टाध्यक्षाच्या प्रतीक्षेत आहे. श्री पट्टदार्यांना दोन मुली आणि तीन मुले अशी संतती झाली. त्यांच्यापैकी शिवयोगी नावाच्या मुलास पट्टाभिषेक करण्याचे योजिले. तरी ते आधुनिक विद्येत पारंगत होऊन पुढे कुवेंपु विश्वविद्यालयाचे कुलगुरू होऊन निवृत्त झाले. तेच डॉ. एस. पी. हिरेमठ होत. श्री पट्टदार्यजी दि. ९.२.१९८६ ला लिंगैक्य झाले.

हल्ली श्री डॉ. एस. पी. हिरेमठ यांनी बागलकोटच्या कृष्णा धरणाच्या मागे साठलेल्या पाण्यात बुडून गेलेला हा मठ पुन्हा नूतन जागेत बांधला आहे. त्याची व्यवस्था एस.पी. हिरेमठ पाहतात.

---

संदर्भ : बागलकोटचे वे. पट्टदार्य, ले. श्रीमती शिवलिंगम्मा कट्टी, २००६.

## ९२.    श्री वे.पं. नागभूषण शास्त्रीजी

शास्त्रीमठ,
मु.पो.ता.जि. धारवाड (कर्नाटक)



हे कोप्पळ जिल्ह्यातील यलबुर्गा तालुक्यातील संगनाळ गावच्या शास्त्रीमठच्या श्री वे. पर्वतराजय्या आणि सौ. लिंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ८.४.१९०६ मध्ये जन्मास आले. बालपणीच त्यांचे आईवडील लिंगैक्य झाले. आजी (वडिलाची आई) सौ. वीरम्मा यांनी त्यांचा सांभाळ केला. संगनाळ गावच्या नागनाथ मंदिराच्या खाजगी शाळेत यांचे शिक्षण सुरू झाले.

द्यांपूरच्या श्री वे. कल्लय्या पुराणिक यांच्याकडे अमरकोश, ज्योतिष, बालबोधे इ.चा बाळपणीच अभ्यास केला. श्री नागभूषण यांची आत्या त्यांना आपल्या गावी रोण तालुक्यातील निडगुंदीला घेऊन गेली. तेथे त्यांनी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. चौथ्या इयत्तेत असताना त्यांच्या आत्येने आपली मुलगी शिवगंगा हिच्याबरोबर त्यांचा बालविवाह केला.

पाचव्या इयत्तेपर्यंत प्राथमिक शिक्षण निडगुंदी येथे पूर्ण करून त्यांनी इ.स. १९१८ मध्ये हालकेरे श्री अन्नदान स्वामीजींच्या संस्कृत पाठशाळेत संस्कृत अध्ययन सुरू केले. तेथे काशीचे पंडित उप्पिन बेटगेरीचे श्री वे.पं. विश्वनाथ शास्त्रीजींचे शिष्य होऊन लघुकौमुदी, पंचकाव्ये आणि नाटकांचे सहा वर्षेपर्यंत पूर्णपणे अध्ययन केले. आपल्या विद्यागुरूंनी काशी येथे अध्ययन केल्याचे ऐकून त्यांनाही काशीला जावे अशी उत्कट इच्छा झाली. तेव्हा योगायोगाने पूज्य अन्नदान स्वामीजींनी आपल्या पाठशाळेतील हुशार विद्यार्थ्यांना पुढील शिक्षणासाठी काशीला पाठवावे असे ठरवून तीन विद्यार्थ्यांची निवड केली. त्यात नागभूषण हे एक होते. श्री नागभूषण अन्नदान स्वामीजींचा आशीर्वाद घेऊन सोलापूरला येऊन तेथील शिवशरणी रुद्रम्मा मातेच्या आशीर्वादाने इ.स. १९२४ मध्ये काशीक्षेत्री आले.

श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश मिळविला. काशीक्षेत्री विविध शास्त्रांच्या विद्वानांकडून साहित्य, न्याय, मीमांसा आणि वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या काव्यतीर्थ, वेदान्ततीर्थ इ. पदव्या प्राप्त केल्या. काशी येथे आपल्या विद्यागुरू म.म. पं. गोपीनाथ कविराज यांचा विशेष लोभ प्राप्त केला. यांनी काशीक्षेत्री इ.स. १९३० पर्यंत सहा वर्षे अध्ययन केले. शेवटची दोन वर्षे तेथील जयदेववाडी मठात राहिले होते. काशीतील शिक्षण पूर्ण करून कर्नाटकात आल्यानंतर धारवाडच्या मुरुघामठाच्या श्री म.नि.प्र. मृत्युंजय अप्पाजींनी त्यांचे पांडित्य पाहून त्यांना आपल्या मठाचे विद्वान म्हणून मान्यता दिली.

श्री मुरुघामठाचे सर्व धार्मिक, साहित्यिक, सांस्कृतिक कार्यक्रम व्यवस्थित पार पाडण्याचे कार्य हे करीत होते. प्रत्येक वर्षी यात्रेच्या संदर्भात वीरशैव विद्वत्परिषदेस हेच स्वागताध्यक्ष असत. अखिल भारतीय शिवानुभव संस्थेचे मुखपत्र 'सावधान' या पत्रिकेचे संपादक म्हणून त्यांनी ५५ वर्षे कार्य पाहिले. 'साधकांना एक कानमंत्र' हा त्यांचा लेख प्रभावी झाला होता. कर्नाटक विश्वविद्यालयाच्या कन्नड अध्ययन पीठाच्या वचनवाङ्मय विभागात अनेक वर्षे कार्य करून वचनांत येणाऱ्या संस्कृत श्लोकांचा स्रोत ते शोधून देत. ते श्रेष्ठ वाक्पटू, चिंतनशील रचनाकार असून त्यांनी साहित्यकृती रचल्या. धारवाडच्या डॉ. डी. एम. हिरेमठ यांनी 'पंडित नागभूषण शास्त्रीजी : एक अध्ययन' नावाच्या एका शोधप्रबंधात शास्त्रीजींच्या जीवन-लेखनासंबंधी पूर्ण विवेचन केले आहे. असे सार्थ जीवन जगलेले शास्त्रीजी १९९८ मध्ये लिंगैक्य झाले. गुरु-विरक्तांठायी समान श्रद्धा ठेवून आयुष्यभर वीरशैव समाजाच्या एकतेसाठी प्रयत्नशील राहिले. त्यांचे जीवन सर्वांना आदर्शवत् झाले आहे.

---

लेखक : डॉ. डी. एम. हिरेमठ, धारवाड.

## ९३. श्री वे. शिवदेव शास्त्री वडील गुरुसंगय्या

मु.पो.ता. कुष्टगी, जि. रायचूरु (कर्नाटक)

यांनी बागलकोटच्या वीरशैव संस्कृत पाठशाळेत साहित्याचा अभ्यास करून अठराव्या वर्षी दि. २०.२.१९२४ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे न्याय, साहित्यशास्त्र इ.च्या अध्ययनासोबत वैदिक शास्त्रांचा अभ्यास केला.

## ९४. श्री वे.पं. शिवबसव देव



खास्गतेश्वर विरक्त मठ,
मु.पो.ता. ताळिकोटी, ता. मुद्देबिहाळ,
जि. विजयपूर (कर्नाटक)

ताळीकोटीचा खासूगतेश्वर मठ हा विरक्त मठ आहे. या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री म.नि.प्र. रुद्रस्वामीजी यांच्यानंतर श्री शिवपूजे स्वामीजी, श्रीतोटी स्वामीजी, श्री गुरुशांत स्वामीजी, श्री विरक्तप्पा स्वामीजी, श्री पंचाक्षरी स्वामीजी, श्री भिक्षेश्वर स्वामीजी, श्री शांतप्पा स्वामीजी, श्री शिवलिंग स्वामीजी, श्री चन्नबसव स्वामीजी, श्री राचोटी स्वामीजी, श्री मुरुघेंद्र स्वामीजी, श्री सिद्धबसव स्वामीजी आणि श्री विरक्तप्पा स्वामीजी (खास्गतेश्वर स्वामीजी) हे स्वामीजी होऊन गेले आहेत.

मूलकर्तृपासून आजपर्यंत १४ स्वामीजी या मठपरंपरेत होऊन गेले आहेत. १४ वे श्री म.नि.प्र. विरक्तप्पनवरू अर्थात् खास्गतेश्वर स्वामीजी अत्यंत महिमाशाली होते. १८९३ पासून १८९६ पर्यंत हे मठाधिपती होऊन त्यांनी कार्य पाहिले. ते हुब्बळीच्या सिद्धारूढ स्वामीजींचे समकालीन होते.

श्री म.नि.प्र. विरक्तप्पा स्वामीजी श्री सिद्धारूढ स्वामींना अत्यंत प्रिय होते. म्हणून ते सिद्धारूढ मठास गेले असताना यांना आपल्या आसनावर बसवून घेऊन ते यांना वेदान्तपाठ सांगत असत. श्री सिद्धारूढ स्वामीजींनी यांचे श्री खास्‌गतेश्वर असे नामकरण केले होते. असे अत्यंत सात्त्विक, शिवपूजानिष्ठ, लीलामूर्ती श्री खास्‌गतेश्वर स्वामीजी अनंत लीला करून इ.स. १८९६ मध्ये लिंगैक्य झाले.

त्यांच्यानंतर या मठावर उत्तराधिकारी म्हणून आलेले शिवबसवदेव हे बागलकोट जिल्ह्यातील शिरूर गावचे हिरेमठाचे होते. हा मठ काशीपीठाचा शाखामठ होय. या मठाच्या वंशपरंपरेनुसार श्री खास्‌गतेश्वर विरक्त मठावर पट्टाधिकारी होत आले आहेत. या मठावर होऊन गेलेले १४ स्वामीजी शिरूर मठाचे वंशजच होते.

श्री वे.पं. शिवबसव देवरू हे हिरेमठाच्या श्री वे. विरूपाक्षय्या आणि सौ. बसम्मा यांच्या पुण्यगर्भी दि. १.१२.१९०८ मध्ये जन्मास आले. तेव्हा त्यांचे शिवबसवदेव असे नामकरण झाले होते. यांनी ताळिकोटीमध्ये प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे खास्‌गतेश्वर मठाच्या संस्कृत पाठशाळेत यड्रामी शास्त्रीजींचा शिष्य होऊन संस्कृताध्ययन केले. नंतर आलमट्टेच्या पट्टाध्यक्ष मठात राहून तिथे हर्डेकर मंजप्पांनी सुरू केलेल्या माध्यमिक शाळेत प्रवेश घेऊन इंग्लिश भाषेचा अभ्यास केला. त्यासोबत योगशास्त्रात प्राविण्य मिळविले.

त्यानंतर संस्कृतच्या उच्च शिक्षणाकरिता वडीलधाऱ्यांच्या प्रोत्साहनाने ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्‌गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १९२४ मध्ये श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री इ.स. १९३१ पर्यंत म्हणजे ७ वर्षेपर्यंत सतत अभ्यास करून न्याय तसेच वेदान्तात पारंगत झाले. काशी हिंदू विश्वविद्यालयाची वेदान्ताचार्य परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. अशा रीतीने काशी येथील अभ्यास पूर्ण करून ताळिकोटीस परत आले.

ताळिकोटी येथे खास्‌गतेश्वर विरक्त मठास १८९६ पासून कोणी

मठाधिपती नसल्याने मठाच्या सद्भक्तांनी मिळून काशीहून पंडित होऊन परतलेल्या श्री वे. शिवबसवदेव यांनाच श्री मठावर उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केले. हे त्या मठाचा निरंजनाधिकार न मिळवताच उत्तराधिकारी म्हणून मठाचे सारे व्यवहार पाहत होते.

पुढे निरंजनाधिकारी होण्याऐवजी शिवबसवस्वामीजी गृहस्थाश्रमी झाले. काशीत अध्ययन करीत असताना ते उत्तर भारतात चाललेल्या म. गांधीजीच्या स्वातंत्र्य चळवळीत वेळोवेळी सहभागी झाले होते. त्या संस्काराच्या प्रभावामुळे ताळिकोटी येथे देखील श्रीमान श्रीशैलप्पा मसळी यांच्यासोबत ब्रिटीश सरकाराविरुद्ध प्रभात फेरी, भाषणे आदींच्या माध्यमाने स्वातंत्र्यचळवळीची चूड पेटविली. त्यांच्या उग्र प्रदर्शनास शांत करण्यासाठी ब्रिटीश सरकारने त्यांना जेलमध्ये डांबले. कितीही कष्ट झाले तरी त्यांनी स्वातंत्र्याची चळवळ थांबविली नाही. खादी धोतर, खादी शर्ट आणि खादी गांधीटोपी असा आदर्श पेहराव आयुष्यभर ठेवला. त्यांनी दि. १८.८.१९३९ पासून दि. ११.१०.१९४७ पर्यंत विजयपूर जिल्हा स्कूल बोर्डाचे चेअरमन म्हणून कार्य पाहिले. मुद्देबिहाळ तालुक्याच्या कॉंग्रेस कमिटीचे अध्यक्ष म्हणून देखील ६ वर्षेपर्यंत कार्य केले. १९४२ मध्ये ग्रुपग्राम व्यवस्थेच्या सेवा सहकारी संघाचे चेअरमन म्हणून कार्य केले. ताळिकोटी येथे १९३६ मध्ये त्यांनी शिक्षकांचे ट्रेनिंग कॉलेज एस. के. हायस्कूल आणि गरीब विद्यार्थ्यांसाठी योग्य अशा निवासाची, मोफत प्रसादाची व्यवस्था करणारे निलय स्थापन केले.

१९६४ मध्ये अंध मुलांसाठी संगीत पाठशाळा सुरू करून त्या मुलांच्या उपजीविकेसाठी मार्ग करून दिला. याप्रमाणे श्री शिवबसवदेवरूंनी आपल्या भागात शैक्षणिक, सामाजिक कार्य करून तालुका तसेच जिल्ह्याच्या विकासासाठी परिश्रम केले. इ.स. २००१ मध्ये यांच्या ९४ व्या वाढदिवसाचे आयोजन श्री एस. एस. नरसणगी यांच्या प्रमुख संपादकत्वाखाली 'शिवबसवदेवरू' नावाचा अभिनंदनपर ग्रंथ समितीच्या वतीने त्यांना समर्पित करण्यात आला. त्या ग्रंथात यांच्या धार्मिक, सामाजिक तसेच शैक्षणिक

सेवेचा उल्लेख करण्यात आला आहे.

श्री शिवबसवदेव यांना खास्गतेश्वर विरक्त मठाचा निरंजनाधिकार प्राप्त झाला नसला तरी एका निरंजनमूर्तीला जे कार्य करायला हवे त्याहून अधिक कार्य करून ते समाजाच्या गौरवास पात्र झाले. असे अत्यंत गौरवान्वित झालेले शिवबसव देव वृद्धापकाळी दि. ४.९.२००३ रोजी लिंगैक्य झाले. सध्या त्यांचे सुपुत्र श्री म.नि.प्र. विरक्त स्वामीजी खास्गतेश्वर मठाचे १५ वे मठाधिपती म्हणून मठाची परंपरागत कार्ये व्यवस्थित पार पाडत आहेत.

---

संदर्भ : शिवबसवदेवरू अभिनंदन ग्रंथ,

संपादक : वीरसंगप्पा हगरटगी बाळेभावी, इ.स. २००१.

९५. **श्री ष.ब्र. अमरेश्वर शिवाचार्य स्वामीजी**

मु.पो. शाहजहान औराद, जि. बीदर (कर्नाटक)



यांनी अथणी येथील संस्कृत पाठशाळेत साहित्यशास्त्राचा अभ्यास करून २१ व्या वर्षी दि. २०.३.१९२५ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे न्याय तसेच वेदान्त या शास्त्रांचा संपूर्ण अभ्यास केला.

## ९६. श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी



उज्जयिनी पीठ, ता. कूड्लगी,
जि. बळ्ळारी (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमी चित्रदुर्ग जिल्ह्यातील मोणकाल्मूरु तालुक्यातील आनेसिद्धापूर हिरेमठाच्या वे.मू. दोड्डवीरभद्रय्या तसेच सौ. वीरम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १९०६ शा.श. १८२८ प्लवंगनाम संवत्सरात पुष्य कृष्ण तृतीया, मंगळवार रोजी सायं. ५ वा. जन्मास आले. स्वग्रामी कन्नडचा विद्याभ्यास पूर्ण केला.

वयाच्या १४ व्या वर्षी म्हणजे इ.स. १९२० दुर्मतिनाम संवत्सर-कार्तिक शुद्ध दशमीच्या शुभमुहूर्ती आनेसिद्धापूर हिरेमठाचे पट्टाध्यक्ष झाले. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. त्रिलोचन शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. नंतर बळ्ळारी येथे त्यांनी काही वर्षे संस्कृत अध्ययन केले. त्यानंतर १९२५ मध्ये उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले.

काशी येथे श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी महामठात प्रवेश घेतला. इथल्या विद्वानांकडून विभिन्न शास्त्रांचा अभ्यास करून इ.स. १९३० मध्ये स्वग्रामी परतले. पुढे उज्जयिनी पीठासाठी बटूचा शोध चालू असताना पं. काशीनाथ शास्त्रीजींनी भक्तांच्या अपेक्षेनुसार त्रिलोचन शिवाचार्यांनाच उज्जयिनी पीठाचे उत्तराधिकारी म्हणून निवडले. पुढे दि. २.२.१९३६ युवनाम संवत्सर, माघ शुद्ध दशमी या शुभ मुहूर्तावर रंभापुरी पीठाचे श्रीजगद्गुरू शिवानंद राजेंद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या आणि केदार पीठाचे चरपट्टाध्यक्ष श्रीजगद्गुरू चिद्घनलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात श्री त्रिलोचन शिवाचार्यांना उज्जयिनी पीठाचा अधिकार देण्यात आला. तेव्हा त्यांचे 'श्रीजगद्गुरू सिद्धेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

त्यांनी आपल्या कार्यकाळात अनेक धार्मिक कार्यक्रमांचे आयोजन

केले. दि. १०.१०.१९३८ रोजी बळ्ळारी जिल्हा पट्ट-चराधिकारी संमेलन त्यांच्या सान्निध्यात पार पडले. नंतर श्रीशैलपीठाचे जगद्गुरू वागीश पंडिताराध्यांचा पट्टाभिषेक आणि रंभापुरी पीठाचे जगद्गुरू गंगाधर शिवाचार्य महास्वामीजींचा पट्टाभिषेक, काशीपीठाच्या विश्वेश्वर शिवाचार्यांचा पट्टाभिषेक केला. काशीपीठाचे विद्यमान जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचा पट्टाभिषेक अन्य तिन्ही पीठाचार्यांसोबत १९८९ नोव्हेंबर १७ तारखेस पार पाडला.

याशिवाय रंभापुरी पीठाच्या श्री रुद्रमुनी शिवाचार्यांच्या तसेच सध्याच्या श्रीजगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर शिवाचार्यांच्या पट्टाभिषेकांत सहभागी होऊन आशीर्वाद दिले. वार्धक्यामुळे उज्जयिनी जगद्गुरू मरुळाराध्यांना चरपट्टाधिकार दिले. आकस्मिकपणे ज. मरुळाराध्य शिवाचार्य शिवैक्य झाल्याने त्यानंतरचे सध्याचे जगद्गुरू मरुळसिद्ध शिवाचार्य महास्वामीजींना चर-स्थिराधिकार दोन्ही ५.११.१९९५ रोजी दिले. दि. १७.१२.१९९८ रोजी ते लिंगैक्य झाले.

जगद्गुरू मरुळसिद्ध शिवाचार्य प्रकृती अस्वास्थ्यामुळे दि. १७.१०.२०११ रोजी शिवैक्य झाले. मरुळसिद्ध शिवाचार्य महास्वामीजींच्या इच्छापत्रानुसार सध्या त्या गादीवर श्री जगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी विराजमान आहेत. दि. ३.११.२०११ रोजी श्री रंभापुरी, श्रीशैल आणि काशी जगद्गुरूंच्या अमृतहस्ते त्यांचा पट्टाभिषेक झाला.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ.२६.

## ९७. श्री म.नि.प्र. चंद्रशेखर स्वामीजी



निरंजन पीठ, मु. माडाळू, ५७३११७
ता. अरसिकेरे, जि. हासन (कर्नाटक)
चरभाष ०९४४८३०८१५९

अरसिकेरे तालुक्याच्या माडाळू गावचे हे निरंजन पीठ आपली परंपरा चालवीत आहे. या मठावर परंपरानुगत अनेक स्वामीजी होऊन गेले आहेत. आजचे श्री म.नि.प्र. चंद्रशेखर स्वामीजी या मठाचे पट्टाधिकारी आहेत. हे मूलत: हासन जिल्ह्यातील अरसिकेरे तालुक्यातील सिद्धरहळ्ळी गावचे. यांनी श्री. वे. मरुळसिद्धय्या व सौ. जयम्मा या माहेश्वरांच्या पुण्यगर्भी इ.स. १९१० मध्ये जन्म घेतला. यांचे चन्नबसव असे नामकरण करण्यात आले. प्राथमिक शिक्षण स्वग्रामी पूर्ण केले. पुढे बेंगळूरु महानगरीच्या सुलतानपेठ स्कूलमध्ये इ.स. १९२४ मध्ये माध्यमिक शिक्षण घेतले.

पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १९२५ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. तेव्हा त्यांना 'चंद्रशेखर' असे नवीन अभिधान देण्यात आले. श्री चंद्रशेखर देवरू काशी क्षेत्रीच्या विविध संस्कृत महाविद्यालयांत अध्ययन करून साहित्यविश्वात प्राविण्य मिळवून पंडित चंद्रशेखर शास्त्री म्हणून प्रख्यात झाले. त्यानंतर त्यांनी काशी हिंदू विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन इ.स. १९३८ मध्ये बी.ए., इ.स. १९४० मध्ये संस्कृतमधील एम.ए. ही पदवी संपादन केली. १५ वर्षेपर्यंत काशीक्षेत्री राहून उच्च अध्ययन पूर्ण करून स्वग्रामी परतल्यानंतर अरसिकेरे तालुक्याच्या माडाळू गावात निरंजनाधिकार स्वीकारला. तेव्हा त्यांचे श्री म.नि.प्र. चंद्रशेखर स्वामीजी म्हणून नामकरण करण्यात आले.

साधी राहणी व उच्च विचारसरणी असणाऱ्यो श्रीनी गांधीजींच्या आदर्शाचे

आयुष्यभर पालन केले. अधिकार ग्रहण केल्यानंतर त्यांनी मठाचा विकास केला. इ.स. १९८८ मध्ये मठाचा जीर्णोद्धार केला. पुढे त्यांनी सिद्धरहळ्ळीच्या श्री वे. महेश्वरय्या आणि सौ. गौरम्मा यांचा सुपुत्र चि. रुद्रेश नावाच्या बटूस आपला उत्तराधिकारी म्हणून १९९२ मध्ये त्याच्यावर निरंजनाधिकाराचा अनुग्रह केला. २००५ मध्ये मठात 'श्री बसवचेतन विद्यापीठ' नावाची शिक्षणसंस्था आपल्या उत्तराधिकारी स्वामीजींच्या हस्ते स्थापिली. आज या संस्थेच्या अधिकारात आय.टी.आय. कॉलेज चालले आहे. हे ९७ वर्षांपर्यंत लिंगपूजानिष्ठ, कायकयोगी, धार्मिक, शैक्षणिक तसेच सामाजिक सेवा करून दि. १३.१.२००७ रोजी ते लिंगैक्य झाले.

सध्या या माडाळू मठाचे अधिपती श्री म.नि.प्र. रुद्रमुनी स्वामीजी परंपरेनुसार मठ चालवीत आहेत.

## ९८. श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध स्वामीजी

हुणसिकोळ्ळ मठ, मु. यमकनमरडी,
ता. हुक्केरी, जि. बेळगावी (कर्नाटक)



यमकनमरडी हुणसिकोळ्ळमठ हा विरक्त परंपरेचा मठ आहे. या मठाला देखील प्राचीन परंपरा आहे. या परंपरेत श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध महास्वामीजी ख्यातनाम आहेत.

हे पूर्वाश्रमीचे हुक्केरी तालुक्यातील उळागड्डी खानापूर हिरेमठाच्या श्री वे. अप्पय शास्त्रीजी व सौ. गुरुलिंगम्मा या माहेश्वरांच्या पुण्यगर्भी दि. ५.१२.१९०४ मध्ये जन्मास आले. त्यांचे 'गुरुसिद्धय्या' असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण करून तिपटूरूच्या

वीरशैव आश्रमात प्रवेश घेऊन तेथील विरूपाक्ष शास्त्रीजी, पं. उमापती शास्त्रीजी यांच्याकडे संस्कृताध्ययन करीत महाभारताचा पूर्ण अभ्यास केला. त्यासोबत वैदिक विद्यादेखील परिश्रमपूर्वक आत्मसात केली.

पुढे ते उच्च अभ्यासाकरिता काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १९२५ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर तेथील संस्कृत विद्वान पं. केदारनाथ शास्त्री, पं. भास्कर शास्त्री, पं. देवनारायण तिवारी यांच्याकडून साहित्य, वेदान्त व आयुर्वेदविद्येचा अभ्यास केला. कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या काव्यतीर्थ, काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या वेदान्तशास्त्री, आयुर्वेदाच्या भिषक् या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. इ.स. १९३२ पर्यंत म्हणजे आठ वर्षे जंगमवाडी महामठात राहून विविध शास्त्रांमध्ये पांडित्य मिळवून परत आपल्या जन्मगावी उळागड्डी खानापूरला आले. उळागड्डी खानापूरचा हिरेमठ काशीपीठाची शाखा आहे. ते स्वग्रामी परतल्याचे ऐकून कित्तूर कल्मठचे श्री गुरुसिद्ध स्वामीजी यांनी त्यांना आपल्या मठाच्या पाठशाळेत प्राध्यापक म्हणून नियुक्त केले. पं. गुरुसिद्ध स्वामीजींनी तिपटुरू तसेच काशीत संपादन केलेली संस्कृत, वैदिक आयुर्वेद विद्या पाठशाळेतील विद्यार्थ्यांना शिकविली. ते पाठशाळेत प्राध्यापक म्हणून अध्यापनकार्य करण्यासोबत अनेक मठ-मंदिरांतील धार्मिक पूजासमारंभात प्रधान पुरोहित म्हणून सर्व विधी शास्त्रोक्तपणे पार पाडत. याशिवाय विविध रोगांनी ग्रस्त रोग्यांना आयुर्वेदिक औषधे देऊन त्यांचे रोग दूर करीत. वैद्य म्हणून ते ख्यात झाले. पुढे त्यांच्याजवळील विविध ज्ञान पाहून यमकनमरडीच्या हुणसिकोळ्ळ मठाच्या भक्तांनी यांना त्या मठाचे अधिकारी होण्याची विनंती केली.

भक्तांच्या अपेक्षेप्रमाणे गुरुसिद्ध स्वामीजींनी १९५१ मध्ये यमकनमरडीच्या हुणसिकोळ्ळ मठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारला. त्यांनी अधिकार ग्रहण केला त्यावेळी तो मठ एक छोटा कौलारू मठ होता. पुढे त्यांनी आपल्या विद्येच्या प्रभावाने धन संग्रहित करून तो मठ

संपूर्ण नवीन बांधला. शिल्पशास्त्र व वास्तुशास्त्र यानुसार बांधलेला हा मठ भक्तांसाठी आकर्षणाचे केंद्र झाला आहे. हा मठ विरक्त परंपरेचा असला तरी त्या मठाच्या सर्वांत वरच्या मजल्यावर पंचपीठांचे शिवाचार्य तसेच त्यांचे क्षेत्र शिल्परूपात स्थापिल्याचे पाहिल्यास यांच्याठायी असणाऱ्या गुरु-विरक्त समन्वयभावनेचा परिचय होतो.

निरंजनाधिकार प्राप्त केल्यानंतरही आपल्या वैदिक विद्येचा उपयोग करून ते भक्तांचा गृहप्रवेश, नवग्रहपूजा, होमहवन तसेच साभारी-निराभारी पट्टाधिकार विधिविधान हे सर्व प्रधान पुरोहित म्हणून पार पाडीत, हे त्यांचे वैशिष्ट्य होते.

याप्रमाणे मठाधिपती, वैदिक शिरोमणी, आयुर्वेदविशारद श्री गुरुसिद्ध स्वामीजींनी आपल्या वृद्धापकाळात वकुंद गावच्या श्री राचोटेश्वर मरिदेवरू यांना आपला उत्तराधिकारी म्हणून नेमले. ११.३.१९९५ मध्ये ते लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी यमकनमरडीच्या हुणसिकोळ्ळ मठात करण्यात आली आहे. यांच्यानंतर या मठाचे अधिकारी म्हणून आलेले श्री म.नि.प्र. राचोटी महास्वामीजी मठाच्या परंपरेनुसार सर्व धार्मिक कार्यक्रम यथावत् पार पाडत आहेत.

## ९९. श्री म.नि.प्र. गुरुशांत स्वामीजी

गोंबी विरक्त मठ,
मु.पो. शहापूर, जि. बेळगाव (कर्नाटक)



हे १९१२ मध्ये बेळगावच्या शहापूरमध्ये जन्मास आले. त्यांचे प्राथमिक शिक्षण शहापुरातच झाले. त्यावेळी गोंबी विरक्त मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांना नियुक्त करण्यात आले. १९२५ मध्ये पुढील संस्कृत शिक्षणासाठी ते काशीस गेले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

१९२७ पर्यंत चार वर्षे अध्ययन करून संस्कृत तसेच ज्योतिषशास्त्रात पारंगत झाले. मातृभूमीस परतून १९३२ मध्ये गोंबी विरक्त मठाचे निरंजनमूर्ती होऊन अधिकार स्वीकारला. त्यावेळी त्यांचे 'श्री म.नि.प्र. गुरुशांत स्वामीजी, गुरू मडिवाळ स्वामीजी, गोंबी विरक्तमठ, शहापूर' असे नामकरण करण्यात आले. ते पूजानिष्ठ, शिवानुभावी असून खेडोपाडी जाऊन धर्मप्रचार करीत असत. ज्योतिषशास्त्रात पारंगत असल्यामुळे ते लोकप्रिय झाले होते.

## १००. श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी

साविरदेवर संस्थान मठ,
मु.पो. बिच्चाली, ता.जि. रायचूरु (कर्नाटक)



श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी पूर्वाश्रमीचे रायचुरू जिल्ह्याच्या देवदुर्ग तालुक्यातील गब्बुरू गावातील हिरेमठाच्या माहेश्वर दंपतीच्या पोटी जन्मास आले. गब्बुरूमध्ये प्राथमिक शिक्षण पूर्ण केल्यानंतर गब्बुरू

हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून वयाच्या १५ व्या वर्षी नियुक्ती झाली तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. वृषभलिंग शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. त्यानंतर आंध्र प्रदेशच्या मक्तल तालुक्यातील निरडगुंब गावच्या श्री सिद्धलिंग स्वामीजींच्या संस्कृत पाठशाळेत काव्याचा अभ्यास केला. पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले.

श्री १००८ जगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २८.११.१९२६ रोजी त्यांनी प्रवेश घेतला. येथील विभिन्न विद्वानांकडून काव्य, तर्क, व्याकरण, मीमांसा आणि वेदान्तादी शास्त्रांचा अभ्यास केला. दि. १५.२.१९३५ मध्ये काशीपीठात झालेल्या पदवीदान कार्यक्रमात श्रीजगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना 'तर्करत्न' असे बिरूद दिले. काशी येथील अध्ययन पूर्ण करून गोब्बूरला परतल्यानंतर त्यांच्या पांडित्याने प्रभावित झालेल्या बिच्चाली हिरेमठाच्या श्री ष.ब्र. महांत शिवाचार्य स्वामीजींनी त्यांना आपला उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले. इ.स. १९३५ मध्ये त्यांना पट्टाधिकार देऊन त्यांचे 'श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण केले. हा साविरदेवर मठ रंभापुरी पीठाचा शाखामठ असून शिष्यवर्ग परंपरेचा आहे. या मठाची परंपरा पाहिल्यानंतर ११ व्या शतकापूर्वी हा मठ होता हे लक्षात येते. श्री ष.ब्र. महांत शिवाचार्य स्वामीजी मठाचे मूळ कर्तृपुरुष होते. तुंगभद्रा नदीच्या काठी हा मठ विराजमान झाला आहे. रायचूरु, गुलबर्गा आणि बीदर या जिल्ह्यांत यांचे शाखामठ आहेत. श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्यांनी या मठाचा अधिकार स्वीकारल्यानंतर शाखामठांचा जीर्णोद्धार, हायस्कूल तसेच प्रसाद निलयाची स्थापना इ. लक्षणीय शैक्षणिक, धार्मिक आणि सामाजिक कार्य केले. ते १९६५ मध्ये बिच्चाली येथे लिंगैक्य झाले.

## १०१. केदारपीठ चरपट्टाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू चिद्घनलिंग शिवाचार्य महास्वामीजी

हिमवत् केदार पीठ (उत्तरांचल)

यांचा ता.जि. गदगमधील तिम्मापूर गावच्या हिरेमठाच्या घरी जन्म झाला. त्यांचे पूर्वाश्रमीचे नाव वे.मू. शिवमूर्ती होते. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. पुढे उच्च संस्कृत अध्ययनासाठी इ.स. १९२७ मध्ये ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील विद्वानांकडे व्याकरण, साहित्य इ. शास्त्रांचा अभ्यास केला. नंतर केदारपीठाच्या नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजींकडून केदारपीठाची चेला दीक्षा स्वीकारली. तेव्हा त्यांचे 'चिद्घनलिंग' असे नामकरण करण्यात आले.

पुढे त्यांनी केदारपीठाचा चरपट्टाध्यक्षपदाचा अधिकार स्वीकारला. विद्यावंत, जितेंद्रिय तसेच शांतमूर्ती या जगद्गुरूंनी विभिन्न प्रांतांत संचार करून धर्मप्रचाराचे कार्य केले. अशी काही वर्षे जगद्गुरू चिद्घनलिंग शिवाचार्य महास्वामीजी आपले गुरू जगद्गुरू नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामींसोबत संचार करीत असताना दि. १६.२.१९४३ या दिवशी केदारपीठात लिंगैक्य झाले.

## १०२. श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ

मु.पो. असुगोडू, ता. जगळुरू,
जि. दावणगेरे (कर्नाटक)



दावणगेरे जिल्हा जगळुरू तालुक्यातील असुगोडू गावचा हिरेमठ ही रंभापुरी मठाची शाखा होय. पुत्रवर्गपरंपरेतील हा मठ असून या मठाला परंपरानुगत शिष्यवर्ग आहे. या मठाला कोट्टरू, उत्तांगी, कडलेबाळू, बाचिगोंडनहळ्ळी इ. गावांत असंख्य शिष्य आहेत. या मठावर पूर्वीपासून अनेक पट्टाध्यक्ष होऊन गेले आहेत. या मठाच्या परंपरेत आलेले श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या गावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. इ.स. १९२७ मध्ये उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीक्षेत्रास आले. जगद्गुरू श्री शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे व्याकरण, साहित्य, न्याय आणि वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास करून काव्यतीर्थ आणि व्याकरणतीर्थ या पदव्या प्राप्त केल्या. काशीतील अभ्यास पूर्ण करून ते स्वग्रामी परतले. आयुष्यभर धार्मिक समारंभ करीत त्यांनी धर्मप्रचार केला. ते पार्थिव नाम संवत्सर, मार्गशीर्ष महिन्यात हरपनहळ्ळी तालुक्यातील बेणेहळ्ळी गावी लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर इ.स. १९४८ मध्ये श्री ष.ब्र. शिवकुमार शिवाचार्य स्वामीजी उत्तराधिकारी झाले. हा अधिकार त्यांना वयाच्या ९ व्या वर्षी प्राप्त झाला. कालांतराने पट्टाधिकार त्यागून ते गृहस्थाश्रमी झाले. डॉ. एम. शिवकुमार स्वामी बेंगळूरु विश्वविद्यालयाचे संस्कृत विभाग प्रमुख म्हणून काम पाहत होते. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'चा त्यांनी इंग्रजीत अनुवाद केला असून ही संस्कृत साहित्याला मोलाची देणगी आहे. त्यामुळे असुगोडुमठ पट्टाध्यक्ष परंपरा सध्या खंडित झाली आहे.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण पृ. ७८.

१०३. **श्री वे. शांतबसव शास्त्री हिरेमठ**

मु. जालिहाळ, पो. बेलुरू, ता. बदामी, जि. बागलकोट (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय होते. त्यांनी दि. २४.८.१९२७ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

१०४. **श्री वे. काशीनाथ शास्त्री**

मु. खानापूर, पो. हालकर्णी, जि. बेळगाव (कर्नाटक)

यांनी बेंगळूरुच्या शारदा गुरुकुलवास संस्कृत पाठशाळेत पंचकाव्याचा अभ्यास करून दि. ३.१२.१९२७ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे व्याकरणशास्त्र मुख्य विषय घेऊन पूर्णपणे अभ्यास केला.

१०५. **श्री वे. शितिकंठ शर्मा**

मु.पो. हंचिनाळ, ता. कुंदगोळ, जि. धारवाड (कर्नाटक)

यांनी कोट्टूरच्या उज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळेत पंचकाव्यांचा अभ्यास करून वयाच्या २० व्या वर्षी दि. १६.१२.१९२७ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे विशेषत्वाने न्यायशास्त्राचा अभ्यास केला.

## १०६. श्री ष.ब्र. पंडित गुरुदेव शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. चिक्कमण्णूरु,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



चिक्कमण्णूरुचा हिरेमठ रंभापुरी पीठाची शाखा होय. पुत्रवर्ग परंपरेचा हा मठ आहे. या मठाला इनामी जमिनी आहेत. या मठाच्या परंपरेत शास्त्री, कवी कलाकार, कीर्तनकार, आयुर्वेद पंडित, ज्योतिषतज्ज्ञ, संगीतकार तसेच अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. या मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरुदेव शिवाचार्य स्वामीजी पूर्वाश्रमी याच हिरेमठाच्या श्री वे. गौरय्या आणि सौ. वीरम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. १४.३.१९०९ रोजी गुरुवारी जन्मास आले. त्यांचे 'गुरुमूर्ती' असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले.

पूर्वीचे पट्टाध्यक्ष अत्यंत वयोवृद्ध झाल्याने आपल्या हयातीतच पट्टाभिषेक करावा या उद्देशाने त्यांनी आपल्या वंशातील श्री गुरुमूर्ती यांना शा.श. १८४२ (इ.स. १९२०) रौद्रनाम संवत्सर निज श्रावण शु. सप्तमीला शुक्रवारी मठाच्या शिष्यवृंदासमोर पट्टाभिषेक पार केला. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. गुरुदेव शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

पुढे संस्कृताध्ययनाकरिता इ.स. १९२० मध्ये रोण तालुक्यातील अब्बिगेरी गावच्या श्री मल्लण्णार्य संस्कृत पाठशाळेत पं. राजशेखर शास्त्रीजी पुराणिकमठ यांच्याकडे तसेच कोट्टरीच्या श्री उज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळेत पं. शंकर शास्त्रीजी उमचिगी यांच्याकडे अशी एकूण सात वर्षे त्यांनी पंचकाव्यांचा अभ्यास केला. नंतर उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १६.१२.१९२७ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील शासकीय संस्कृत कॉलेजात साहित्य मध्यमा आणि शास्त्री या परीक्षा उत्तीर्ण केल्या. १९३७ पर्यंत

एकूण दहा वर्षे काशीपीठात राहून अध्ययन पूर्ण केले. परत चिक्कमण्णूरूला आले. अरहुणसी, असूटी, बेळवणिकी इ.कडे अनुष्ठान करीत धर्मप्रचाराचे कार्य हाती घेतले. इ.स. १९३९ मध्ये बेळवणिकी गावात श्रीजगद्गुरू विश्वाराध्य संस्कृत पाठशाळा सुरू केली.

इ.स. १९४० मध्ये श्रीशैल श्री १००८ जगद्गुरू नागलोटी वीरभिक्षावृत्ती शिवाचार्य महास्वामीर्जींच्या धर्मप्रचारयात्रेत आप्त सल्लागार म्हणून सेवा केली. नंतर इ.स. १९४१ मध्ये बेळगाव कर्नाटक आयुर्वेद कॉलेजमध्ये आयुर्वेद अभ्यास करून वैद्यकीय वृत्ती मिळवून अनेक ठिकाणी संचार केला. पुढे नवलगुंद येथे दि. २४.३.१९४७ मध्ये आयुर्वेद दवाखाना काढून रुग्णांची शुश्रूषा करू लागले. पार्श्ववायू, कुष्ठरोग, कोड इ. रोगांवर उपचार करणारे ते सिद्धहस्त वैद्य होते.

आयुर्वेद उपचारातून आलेले उत्पन्न ते शिक्षणासाठी खर्च करीत. त्यांनी आपल्या अध्यक्षतेखाली पंचग्रह हिरेमठाचे श्री ष.ब्र. बसवलिंग शिवाचार्य यांच्या उपाध्यक्षतेखाली नवलगुंद तालुक्यात शिक्षण समिती प्रतिष्ठापित केली. त्याची अंगीकृत संस्था श्री शंकर आर्टस् कॉलेज दि. २.७.१९७० गुरुवारी स्थापन केले. कॉलेजच्या बांधकामासाठी नवलगुंद पंचग्रह हिरेमठाच्या बसवलिंग शिवाचार्य महास्वामीर्जींनी आपल्या मठाची ४० एकर जमीन दान दिली.

श्री ष.ब्र. डॉ. गुरुदेव शिवाचार्य स्वामीर्जींनी आपल्या वैदिकी वृत्तीसोबत शैक्षणिक विशेष कार्य करून ग्रामीण विद्यार्थ्यांना शिक्षणाची सोय करून दिली. ते उत्तम लेखक, विमर्शक होते. त्यांनी शिवतत्त्वदर्शन, पूर्णायुष्य, वाराणसी वर्णनम्, हिंदू सण, पंचाचार्य विमर्श, श्रीजगद्गुरू रेवणसिद्धेश्वर आणि आद्य शंकराचार्यांचा कालनिर्णय इ. ग्रंथ लिहून कन्नड साहित्याच्या समृद्धीत भर घालण्याचे कार्य प्रामाणिकपणे केले. काशीपीठाविषयी अपार श्रद्धा असणारे डॉ. गुरुदेव शिवाचार्य आयुष्यभर ज्ञानाचा प्रचार-प्रसार करून दि. २५.११.१९८० रोजी मंगळवारी ते नवलगुंद येथे लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी शंकर आर्टस् कॉलेजमध्ये केली आहे.

## १०७. श्री वे.पं. मडिवाळय्या सातवीरय्या हिरेमठ



मु.पो. इब्राहिमपूर, ता.जि. विजयपूर (कर्नाटक)
चरभाष ९८४५६९३१७८

इब्राहिमपूरचे हिरेमठ वे. सातवीरय्या आणि सौ. निर्मला या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १९०१ मध्ये यांचा जन्म झाला. इब्राहिमपुरात प्राथमिक अभ्यास करून ते मुलकी परीक्षा (७ वी इ.) उत्तीर्ण झाले. पुढे संस्कृत व्यासंगाकरिता त्यांनी श्री शिवयोग मंदिरात प्रवेश घेतला. तेथे संस्कृत भाषेचा अभ्यास करून पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले.

तत्कालीन पीठाचार्य श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने इ.स. १९२७ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील संस्कृत विद्वानांकडे व्याकरण आणि साहित्य या शास्त्रांचा अभ्यास करून पांडित्य मिळविले.

काशीतील अध्ययन पूर्ण करून ते स्वग्रामी आले. गृहस्थाश्रम स्वीकारून ते तिकोटा, बिज्जरगी, बाबानगर, तेलसंग इंगरगी, बसवन बागेवाडी, बैलवाडगी इ. आजूबाजूच्या खेड्यांत श्रावणात तसेच नवरात्रीत पुराण प्रवचन सांगत. त्यांनी जनतेत धर्मजागृती केली. शेवटच्या श्वासापर्यंत धर्मप्रचार करून इ.स. १९७९ मध्ये इब्राहिमपूरच्या हिरेमठात ते लिंगैक्य झाले.

१०८. **श्री ष.ब्र. पट्टद स्वामीजी**

मु.पो. हनगंडी, ता. जमखंडी, जि. बागलकोट (कर्नाटक)

हनगंडी गावच्या हिरेमठाला इनामी जमिनी, परंपरागत शिष्यवर्ग आहे. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले. या मठाचे विद्यमान पट्टाध्यक्ष संस्कृताध्ययनासाठी इ.स. १९२७ मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाचार्य श्रीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील विद्वानांकडे सिद्धान्तकौमुदी, न्यायसिद्धान्त, मुक्तावली इ., व्याकरण तसेच न्यायशास्त्राचा अभ्यास पूर्ण केला. पुढे आपल्या गावी परतले. हनगंडी हिरेमठाच्या परंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम आयुष्यभर करीत राहिले.

१०९. **श्री शांतवीर शर्मा**

पिता कोट्टुरय्या,

मु.पो. बेलुरू, ता. बदामी, जि. बागलकोट (कर्नाटक)

यांनी होसपेटच्या संस्कृत पाठशाळेत प्राथमिक साहित्याभ्यास करून वयाच्या १८ व्या वर्षी दि. १४.८.१९२७ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेची व्याकरण-आद्य परीक्षेत उत्तीर्ण झाले.

## ११०. श्री ष.ब्र. अन्नदान शिवाचार्य स्वामीजी

मुत्तिनकंथी हिरेमठ,
मु.पो. जमखंडी, जि. बागलकोट (कर्नाटक)



जमखंडीचा मुत्तिनकंथी हिरेमठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेतील मठ होय. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत.

श्री ष.ब्र. अन्नदान शिवाचार्य स्वामीजी पूर्वाश्रमी याच मुत्तिनकंथी मठाच्या श्री वे. संगनबसय्या व धर्मपत्नी सौ. बसम्मा यांच्या पवित्र गर्भी इ.स. १९०७ मध्ये जन्मले. त्यांनी जमखंडीतच प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर मठाच्या परंपरेनुसार त्यांना चरपट्टाध्यक्ष करण्यात आले. त्यानंतर भक्तांच्या अपेक्षेनुसार संस्कृत अध्ययनाकरिता ते संस्कृत पाठशाळेत दाखल झाले. तेथे संस्कृताध्ययन करीत असतानाच तत्कालीन उज्जयिनी पीठाचे श्री १००८ जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या सेवेत राहिले आणि त्यांच्या कृपाशीर्वादास पात्र झाले. अनेक स्थळांच्या धर्मयात्रेत त्यांच्यासोबत राहून सेवा केली.

त्यानंतर उज्जयिनी जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या आज्ञेनुसार उच्च संस्कृत शिक्षणाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात २०.२.१९२८ मध्ये प्रवेश घेतला. येथे त्यांनी साहित्य, व्याकरण, न्यायशास्त्राचा अभ्यास केला. कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या व्याकरणतीर्थ परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. काशीक्षेत्री दहा वर्षे राहून सर्व शास्त्रांचा अभ्यास करून पांडित्य मिळविले. काशीपीठाचे लिंगैक्य जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी पूर्वाश्रमी श्री ष.ब्र. अन्नदान शिवाचार्य महास्वामीजींचे सहपाठी होते. १९३३ मध्ये काशीत काशी वीरशैव विद्वत्संघ स्थापनेच्या वेळी हे

सक्रिय सदस्य होते. श्रीपीठात प्रत्येक आठवड्यात होणाऱ्या विद्यार्थ्यांच्या सभेत ते विद्वत्पूर्ण भाषण करीत. त्यामुळे त्याकाळी ते विद्यार्थ्यांमध्ये प्रिय झाले होते.

काशीचे शिक्षण पूर्ण करून ते जमखंडीस परतले. श्री ष.ब्र. अन्नदान शिवाचार्य स्वामीजी कार्तिक आणि श्रावण महिन्यात पुराणप्रवचन करीत. ते जनतेत धर्मजागृतीचे काम करीत होते. त्यांनी विद्वान, वक्ते म्हणून अपार कीर्ती मिळविली. इ.स. १९७६ मध्ये जमखंडीत ते लिंगैक्य झाले. हल्ली या मठावर श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी पट्टाध्यक्ष असून ते त्या मठाच्या परंपरा, धार्मिक कार्य तसेच सामाजिक कार्य व्यवस्थित पार पाडत आहेत.

## १११. श्री वे. शिवकुमार शास्त्री ऊर्फ चन्नप्पा

बृहन्मठ, मु. इटगी, पो. कुकनूरु, जि. कोप्पळ (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होते. त्यांनी गदग येथील संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृत अध्ययन पूर्ण केले. पुढे आपल्या गावातील श्री. मल्लेशप्पा पट्टशेट्टी यांच्या प्रोत्साहनामुळे उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले.

## ११२. श्री वे. विश्वनाथ शर्मा

खास्गतेश्वर स्वामी विरक्त मठ,
मु.पो. ताळिकोटी, ता. मुद्देबिहाळ, जि. विजयपूर (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय. यांनी दि. ४.९.१९२९ ला श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात उच्च संस्कृत अध्ययनाकरिता प्रवेश घेतला.

## ११३. विद्वान श्री सी. एम. रुद्राराध्य शर्मा

मु. चंचनकुप्पे, होबळी तावरकेरे,
ता. मागडी, जि. रामनगर (कर्नाटक)
दूरभाष : ०८०–२६७६.

विद्वान रुद्राराध्य शर्मा हे चंचनकुप्पे गावच्या श्री मुद्दबसप्पा आणि सौ. पुट्टबसम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. ८.६.१९०६ रोजी जन्मास आले. यांनी मागडी तालुक्यातील गणपती गावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढील शिक्षणाकरिता त्यांनी सिद्धगंगा मठात १९२६ मध्ये प्रवेश घेतला. सिद्धगंगा क्षेत्रीच्या संस्कृत महाविद्यालयात प्राथमिक संस्कृत शिक्षण पूर्ण केले. नंतर चंचनकुप्पेच्या श्री चन्नगंगप्पा यांच्या प्रोत्साहनामुळे उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले.

तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १८.२.१९२९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर तेथील क्विन्स कॉलेजच्या संस्कृत विभागात प्रवेश घेतला. तेथे व्याकरण विषय प्रधान ठेवून १२ वर्षेपर्यंत सतत अभ्यास केला. पुढे इ.स. १९४१ मध्ये त्याच महाविद्यालयातून व्याकरणाचार्य पदवी प्राप्त केली.

१९२९ पासून १९४१ पर्यंत काशी जंगमवाडी मठात राहून अभ्यास पूर्ण करून ते व्याकरणशास्त्राचे मूर्धन्य विद्वान झाले. काशीतील अध्ययन पूर्ण करून स्वग्रामी परतले. तेव्हा त्यांचे पांडित्य व प्रतिभा पाहून श्रीसिद्धगंगा मठाच्या श्री शिवकुमार महास्वामींनी आपल्याकडे बोलावून घेतले. दि. ७.६.१९४२ रोजी श्रीसिद्धलिंगेश्वर संस्कृत महाविद्यालयात संस्कृत प्राध्यापक म्हणून त्यांना नेमले.

प्राध्यापक म्हणून काम करण्यापर्यंत त्यांनी स्वतःला मर्यादित राखले नाही. पुढे शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्राचा आणि नव्य न्यायशास्त्राचा पूर्ण अभ्यास करून न्याय–वेदान्तात पांडित्य प्राप्त करून घेतले. प्रतिवर्षी

गणेशचतुर्थीपासून चालणाऱ्या शृंगेरी पीठाच्या विद्वत्संगोष्ठीत भाग घेऊन व्याकरण तसेच वेदान्त या विषयांत पारितोषिके मिळविली. संस्कृत भाषेप्रमाणेच त्यांनी राष्ट्रभाषेला महत्त्व देऊन हिंदी भाषेचा अभ्यास केला. त्यात पदवी प्राप्त केली. पुढे इ.स. १९६६ मध्ये सरकारी नियमानुसार ते महाविद्यालयाच्या सेवेतून निवृत्त झाले.

निवृत्तीनंतर डॉ. शिवकुमार स्वामीजींच्या अपेक्षेप्रमाणे त्यांनी मठाचे व्यवस्थापक म्हणून काम केले. वयाच्या ८० व्या वर्षांपर्यंत निरलसपणे कार्य करीत, जीवनाच्या शेवटच्या श्वासापर्यंत अध्ययन, अध्यापन आणि सेवाकार्य करीत दि. १४.४.१९९५ शुक्रवारी सकाळी ७.३० वाजता ते लिंगैक्य झाले. कर्नाटक राज्याच्या शिक्षणखात्याने त्यांचे संस्कृत भाषेवरील प्रभुत्व पाहून त्यांचा सन्मानपत्र देऊन गौरव केला.

## ११४. श्री १००८ जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी

श्रीशैलपीठ (आंध्र प्रदेश)



हे पूर्वाश्रमीचे हावेरी जिल्हाच्या राणेबेन्नूर तालुक्यातील मुदेनुरू गावचे होत. तेथील हिरेमठ वे.मू. बसय्या आणि सौ. रुद्रम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २६.६.१९०८ रोजी शालिवाहन शके १८३० कीलकनाम संवत्सरात ज्येष्ठमास कृष्णपक्ष त्रयोदशी रोहिणी नक्षत्राच्या शुभमुहूर्तावर जन्मास आले. त्यांचे लहानपणीचे नाव चन्नबसवार्य असे होते. ते वृषभगोत्रीय. त्यांनी आपल्या गावीच प्राथमिक कन्नड भाषेचा अभ्यास पूर्ण केला.

नंतर अथणी येथील मुरघेंद्र संस्कृत पाठशाळेत तसेच बागलकोटच्या श्री वीरशैव संस्कृत पाठशाळेत साहित्यशास्त्राचा अभ्यास पूर्ण केला. पुढे संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता वयाच्या २१ व्या वर्षी दि. ११.८.१९२९ रोजी काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

त्यांना मुदेनूरच्या करेगौडर फकीर गौडर डोळ्ळेश्वरांच्या प्रोत्साहन आणि सहकार्याने काशीस पाठविले. येथील टीकमणी संस्कृत महाविद्यालयात तसेच शारदा संस्कृत विद्यालयात यांनी न्याय व साहित्य या शास्त्रांचा अभ्यास केला. याशिवाय आयुर्वेदशास्त्रात प्राविण्य मिळविले. इ.स. १९३४ मध्ये काव्यतीर्थ परीक्षेत उत्तीर्ण झाले. साहित्याचार्य व वेदान्ताचार्य या उपाधी मिळविल्या. सुमारे १० वर्षेपर्यंत काशी येथे अध्ययन केले. इ.स. १९३९ मध्ये स्वग्रामी परतले. तेव्हा मुदेनूरु हिरेमठचा पट्टाधिकार स्वीकारून 'श्री ष.ब्र. वागीश शिवाचार्य' म्हणविले गेले.

त्यांनी हरिहर गावामध्ये 'धर्मराज्य' नामक मासिक सुरू केले. पुढे श्रीशैलपीठाचार्य नागलोटी भिक्षावृत्ती महास्वामीजींनी उज्जयिनी जगद्गुरू

सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजींसोबत विचारविनिमय करून काशीचे विद्वान मुदेनूरु हिरेमठाचे श्री ष.ब्र. वागीश शिवाचार्य हे आपल्या पीठास योग्य उत्तराधिकारी आहेत, असा निर्णय घेतला. दि. ७.७.१९४० विक्रमनाम संवत्सर, आषाढ शुक्ल द्वितीया या शुभमुहूर्तावर गुंतकलच्या शाखापीठात श्री वागीश शिवाचार्यांना आपल्या अमृतहस्ते पट्टाधिकार दिला.

तेव्हा त्यांना 'श्रीजगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी' असे नूतन अभिधान देण्यात आले. या पट्टाधिकार कार्यक्रमाचे प्रधान वैदिकत्व चिदरेमठाचे पं. वीरभद्र शास्त्रीजींनी केले होते. श्रीजगद्गुरू वागीश पंडिताराध्य महास्वामीजींनी श्रीशैलपीठाचा अधिकार ग्रहण केल्यानंतर ४६ वर्षेपर्यंत अव्याहतपणे धर्मकार्य करीत यशस्वीपणे श्रीपीठ कर्जातून मुक्त केले. याशिवाय 'श्रीजगद्गुरू पंचाचार्य विश्वधर्म विद्यापीठ' हरिहर येथे स्थापन केले. या विद्यापीठाच्या माध्यमातून अनेक शाळा, महाविद्यालये चालविली. दि. १६.२.१९८१ रोजी पूज्य महास्वामीजींनी श्रीशैलपीठातील एका विशेष समारंभात श्री रंभापुरी, काशी व उज्जयिनी जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात बसवन बागेवाडीच्या श्री उमापती देव यांना आपल्या पीठाचा उत्तराधिकार पट्टाभिषेक केला. पुढे अस्वास्थ्यामुळे दि. १५.९.१९८६ सोमवारी वयाच्या ७८ व्या वर्षी ते लिंगैक्य झाले. श्री जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींनी सुद्धा धर्मप्रचार करीत सर्व प्रांतांत परिभ्रमण केले. लिंगैक्य होण्याआधी हिप्परगी आणि यडूर मठाचे श्री ष.ब्र. डॉ. सिद्धराम शिवाचार्य यांना उत्तराधिकारी करून दि. ८.१०.२०१० रोजी त्यांना उज्जयिनी आणि श्रीकाशी जगद्गुरूंच्या सान्निध्यात उमापती पंडिताराध्यांनी पट्टाभिषेक केला. सध्या डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी श्रीशैलपीठाचे जगद्गुरू म्हणून कार्य करीत आहेत.

---

संदर्भ : १. गुरुवर्ग दर्पण, पृ. ३५ ते ३९.
२. वीरशैव पंचपीठ परंपरा, चन्नचेतन प्रकाशन, होन्नाळी १९८८, पृ. १०७-११२.

## ११५. श्री सोमशेखर

मु. हुस्कूरु, पो. गोल्लहळ्ळी, जि. बेंगळूरु

सिद्धगंगा संस्कृत पाठशाळेत काव्यशास्त्राचा अभ्यास करून १६ व्या वर्षी दि. १८.२.१९२९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यांनी काशीक्षेत्रात संस्कृत, व्याकरण शास्त्रांबरोबर इंग्रजी भाषेचाही अभ्यास केला.

## ११६. श्री वे. करवीर शर्मा

मु. इटगी, पो. कुकनूरु, ता. जि. कोप्पळ (कर्नाटक)

यांनी कोट्टूरच्या उज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळेत काव्यशास्त्राचा अभ्यास करून आपल्या वयाच्या विसाव्या वर्षी दि. ५.५.१९२९ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे विशेषकरून व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला.

## ११७. श्री वे. शितिकंठ शर्मा शास्त्री



मु. भैरापूर, पो. तेक्कलकोट,
ता. शिरगुप्प, जि. बळ्ळारी (कर्नाटक)
द्वारा– बी. एम. रुद्रमुनी, शास्त्री निवास,
अल्लम ले आऊट, बळ्ळारी.
चरभाष : ९८४५१५०६७२

वे.मू. शितिकंठ शर्मा यांचा भैरापूरचे श्री वे.मू. शंकरय्या व सौ. राचम्मा यांच्या पुण्यगर्भी दि. ५.२.१९०५ रोजी जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. हावेरी संस्कृत पाठशाळेमध्ये व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. नंतर उज्जयिनी पीठाचे श्री जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रेरणेने दि. २२.५.१०२९ रोजी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्यांच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील विविध विद्वानांकडे व्याकरण–साहित्यादी शास्त्रांचा अभ्यास केला. त्यानंतर मद्रास विश्वविद्यालयामध्ये कन्नड विषय घेऊन एम.ए.ची पदवी संपादन केली. शिरगुप्पी येथील शासकीय माध्यमिक शाळेत कन्नड अध्यापक म्हणून काम केले. दि. ४.१.१९६२ रोजी ते निवृत्त झाले. त्यानंतर त्यांनी शंभुलिंग शतक, श्री बेट्टद मलेलेश्वर शतक आदी साहित्याची रचना केली. शिरगुप्प्यात निवास करून दि. १७.९.१९९९ रोजी ते शिवैक्य झाले.

---

परिचय : बी. एम. रुद्रमुनी, बळ्ळारी

११८. श्री वे. नीलकंठ शर्मा

मु.पो. कडपट्टी, ता. कुंदगोळ, जि. धारवाड (कर्नाटक)

यांनी कोट्टूरूच्या श्री उज्जयिनी जगद्गुरू दारुकाचार्य संस्कृत पाठशाळेत काव्यशास्त्राचा अभ्यास केला. वयाच्या विसाव्या वर्षी दि. १८.६.१९२९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे त्यांनी विशेषत्वाने न्यायशास्त्राचा अभ्यास केला.

११९. श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. मेहकर, ता. बसवकल्याण, जि. बीदर (कर्नाटक)

मेहकर हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. हा पुत्रवर्गपरंपरेतील मठ असून या मठाला इनामी जमिनी आहेत. याशिवाय कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र या प्रदेशांत परंपरागत शिष्यवर्गही आहे. या हिरेमठाच्या वंशात १९१६ मध्ये एका तेजस्वी बालकाचा जन्म झाला. मेहकर हिरमठावर १९२९ मध्ये त्यांचा पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी असे नामकरण करण्यात आले.

त्याचवर्षी उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत पाठशाळेत विविध विद्वानांकडून १० वर्षे अभ्यास करून पांडित्य संपादन केले. १९३९ मध्ये ते मेहकरला परतले.

श्री विरूपाक्ष शिवाचार्यानंतर श्री ष.ब्र. मरिबसव शिवाचार्य आणि श्री ष.ब्र. राचोटेश्वर शिवाचार्य हे मठाधिपती होऊन गेले. सध्या या गादीवर श्री ष.ब्र. राजेश्वर शिवाचार्य असून दि. २३.४.१९९९ रोजी वैशाख शु. अष्टमीला शुक्रवारी त्यांचा पट्टाभिषेक झाला. ते विद्वान व शिवपूजानिष्ठ असून त्यांनी कृषिकार्यात नैपुण्य मिळविले आहे. त्यांच्या ह्या कार्याबद्दल कर्नाटक शासनाकडून त्यांना पुरस्कारही मिळाला आहे.

## १२०. श्री वे. शिवशंकर शर्मा

मु.पो. कुटकूरु, जि. मेहबूबनगर (तेलंगणा)

यांनी कलबुर्गी येथील संस्कृत पाठशाळेत ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. वयाच्या बाविसाव्या वर्षी दि. २९.८.१९२९ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे ज्योतिष आणि व्याकरण या शास्त्रांचा अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या व्याकरण-आद्य या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

## १२१. श्री वे. काळाचारी रामाचारी शहापूरकर

मु.पो. शिरसंगी, ता. नवलगुंद, जि. धारवाड (कर्नाटक)

हे सोनार समाजाचे असून अहभुवनगोत्रीय होते. त्यांनी आलकेरी अन्नदान संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृताध्ययन केले. शिरसंगीचे गोविंदप्पा ईश्वरअप्पा पत्तार (सोनार) यांच्या प्रोत्साहनाने ते उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. २८.१०.१९२९ रोजी श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने त्यांनी श्री विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन न्यायशास्त्राचा अभ्यास केला.

## १२२. श्री सिद्धलिंग शर्मा

विरक्त मठ, मु.पो. इनांहोंगल, जि. बेळगाव (कर्नाटक)

हे नंदिगोत्राचे असून त्यांनी स्वग्रामी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर ग्रामस्थ आणि गुरू चन्नवीर स्वामींच्या प्रेरणेने उच्च संस्कृत व्यासंगासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने त्यांनी २१.११.१९३० रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. ८.७.१९३५ पर्यंत पाच वर्षे काशीपीठात राहून आयुर्वेद व साहित्य या शास्त्रांचा अभ्यास केला. त्यांचे साहित्यशास्त्रातील पांडित्य पाहून १९३५ मध्ये झालेल्या पदवीप्रदान समारंभात श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना 'काव्यालंकार' ही प्रशस्ती देऊन त्यांचा गौरव केला.

## १२३. श्री ष.ब्र. करबसवेश्वर शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. म्हैसाळ,

ता. शिरोळ, जि. कोल्हापूर (महाराष्ट्र)



म्हैसाळचा हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेचा आहे. इ.स. १०८९ मध्ये श्री ष.ब्र. महंत (महंतय्या) शिवाचार्य यांनी या मठाची स्थापना केली. त्यांची संजीवन समाधी तिकोटा (जि. विजयपूर) या गावी आहे. तेच म्हैसाळ मठाचे मूळ कर्तृपुरुष होत. त्यांच्यानंतर श्री ष.ब्र. वीरय्या स्वामी, श्री ष.ब्र. पवाडय्या स्वामी, श्री ष.ब्र. रामेश्वरदेव स्वामी, श्री ष.ब्र. बबय्या स्वामी, श्री ष.ब्र. महंतय्या स्वामी, श्री ष.ब्र. मुरुगय्या स्वामी, श्री ष.ब्र. अप्पय्या स्वामी, श्री ष.ब्र. गुरुबसव पट्टचरमूर्ती स्वामी हे शिवाचार्य या मठावर होऊन गेले. नंतर आलेले अकरावे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. करबसवेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे होत. या मठाचे शिरोळ, नांदणी, तिकोटा, विजापूर, तेरदाळ, कागवाड, बेडद, बोरगाव, उदगाव आणि सारबाळ या गावांमध्ये शाखामठ आहेत. या सर्व गावांतील शाखामठांची जमीन कुळकायद्यामध्ये गेली असून केवळ म्हैसाळ आणि शिरूर येथील मठ व जमीन मठाधिपतींच्या ताब्यात आहे.

या परंपरेचे अकरावे पट्टाध्यक्ष श्री करबसवेश्वर शिवाचार्य स्वामीजी यांचा पूर्वाश्रमात शिरोळ हिरेमठाचे वे. राचय्या व सौ. नीलव्वा या दंपतीच्या पवित्र गर्भी १९१० मध्ये जन्म झाला. स्वग्रामी प्राथमिक व माध्यमिक अध्ययन पूर्ण करून संस्कृत अध्ययनाकरिता त्यांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्रवेश घेतला. तेथे संस्कृत, ज्योतिष, योग, रमल या शास्त्रांचा अभ्यास केला. नंतर यादगिरीच्या शंकर संस्कृत महाविद्यालयात त्यांनी साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. त्यानंतर म्हैसाळचे श्री. नारायण शिंदे (मोकाशी) यांच्या प्रोत्साहनाने ते उच्च संस्कृताध्ययन करण्यासाठी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य

महास्वामीजी यांच्या अनुमतीने त्यांनी १९३० मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीतील अनेक विद्वानांकडून व्याकरण, साहित्य या शास्त्रांचा अभ्यास करून १९३३ मध्ये काव्यतीर्थ ही पदवी प्राप्त केली. गुरुकुलातील सर्व विद्यार्थ्यांनी ५.९.१९३३ रोजी काशी वीरशैव विद्वत्संघाची स्थापना केली. श्री ष.ब्र. ईश्वर शिवाचार्य यांची सर्वानुमते कार्यदर्शी म्हणून निवड करण्यात आली.

१९४२ पर्यंत काशीपीठात राहून त्यांनी संघाची बांधणी केली. दहा-बारा वर्षे काशीत राहून संस्कृत, कन्नड, मराठी, हिंदी, इंग्रजी व तेलुगू या भाषांत त्यांनी प्राविण्य मिळविले. त्यांचे अनेक भाषांवर असलेले प्रभुत्व पाहून श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी दिनांक ४.२.१९३६ रोजी आयोजिलेल्या पदवीदान समारंभात त्यांना 'साहित्य प्रवीण' ही उपाधी प्रदान करून त्यांचा सत्कार केला. १९४२ साली ते परतले आणि मठाचे धार्मिक कार्यक्रम विधिपूर्वक करू लागले. ३०.१२.१९६२ रोजी रंभापुरी जगद्गुरू श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींनी 'महाचार्य धर्मप्रसारक' अशी उपाधी देऊन त्यांचा गौरव केला. ४४ वर्षापर्यंत कार्य करून शिरोळ गावचे विश्वनाथ हिरेमठ यांचे सुपुत्र चि. शिवमूर्ती याला मठाचे उत्तराधिकारी नेमून ९.३.१९८६ रोजी महाशिवरात्रीच्या पर्वकाली ते शिवैक्य झाले. नंतर शिवमूर्ती यांचा पट्टाभिषेक झाला. ते सध्या श्री शिवयोगी शिवाचार्य या नावाने पट्टाध्यक्ष होऊन परंपरा चालवीत आहेत.

## १२४. श्री म.नि.प्र. शंकरस्वामीजी केंपिनमठ

मु.पो. आलमपल्ली

ता. विकाराबाद, जि. रंगारेड्डी (आंध्र प्रदेश)



श्री म.नि.प्र. शंकरस्वामीजी पूर्वाश्रमीचे रंगारेड्डी जिल्ह्यातील परगी तालुक्याच्या मंचनपल्ली गावचे होत. त्या गावातील हिरेमठाच्या वे. कव्वं चंद्रय्यास्वामी आणि सौ. राचमांबा या माहेश्वरांच्या पुण्यगर्भी दि. ८.४.१९०९ मध्ये जन्मास आले. यांच्या जन्माआधी यांच्या आईवडिलांनी आलमपल्ली केंपिनमठाच्या श्री बसवप्रभु महास्वामीजींकडून संतानासाठी म्हणून आशीर्वाद घेतले होते. तेव्हा केंपिन श्रींनी त्यांना 'मुलगा मठास द्या' अशी आज्ञा केली होती. श्रींच्या आदेशानुसार मुलाला आठव्या वर्षी मठास आणून दिले. त्यानंतर मठाच्या श्रींनी त्या बालकास अय्याचार संस्कार दिले. आपल्या गावातील अनंत पद्मनाभ देवालयाचे प्रमुख पुजारी विद्वान नारायणाचार्याकडून संस्कृत तसेच तेलुगू भाषेचा प्राथमिक अभ्यास करवून घेतला.

त्यांनी सेडम नगरीच्या श्री गुरुमठकल स्वामीजींच्या संस्कृत पाठशाळेत संस्कृतचा पुढील अभ्यास केला. नंतर सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन साहित्यशास्त्राचा पूर्ण अभ्यास करून कलकत्त्याच्या काव्यतीर्थ परीक्षेत उत्तीर्ण झाले.

पुढील उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री. १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९३० मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयातून न्याय व वेदान्त या विषयांचा सखोल अभ्यास केला. येथील प्रख्यात हिंदू विश्वविद्यालयातील प्राच्यविद्या धर्मविद्या संकायमधून न्याय तसेच वेदान्ताचार्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. वीरशैवधर्माचा अभ्यास करून यांनी पुराण-प्रवचनांत प्राविण्य मिळविले.

१९३० पासून १९४२ पर्यंत बारा वर्षेपर्यंत काशी जंगमवाडी मठात राहून संस्कृतशास्त्रामध्ये प्राविण्य प्राप्त करून ते स्वग्रामी परतले.

नंतर तेथील केंपिन मठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारला. या मठाच्या परंपरेतील हे आठवे निरंजनाधिकारी होते. १९४७ मध्ये आलमपल्ली गावातील प्रमुख व्यापारी व मठाचे सद्भक्त श्रीमान मुद्दमल्लप्पा आणि मुद्दवीरमल्लप्पा या दोन भावांच्या संकल्पानुसार त्यांनी हेमरेड्डी मल्लम्माचे पुराण सांगून १०८ सामूहिक विवाह पार पाडले. ते पुराणप्रवचनपटु होते. त्यांनी या माध्यमातून वीरशैव बांधवांना धर्माचे तत्त्वज्ञान, सिद्धान्त साध्या सोप्या भाषेत समजावून सांगितले.

पुढे त्यांनी आलमपल्ली येथे संस्कृत वैदिक पाठशाळा सुरू केली. त्या पाठशाळेत ५० विद्यार्थ्यांची राहण्याची व भोजनाची सोय आहे. ते स्वतः संस्कृत शिकवीत. या पाठशाळेत शिक्षण घेतलेले अनेक विद्यार्थी आंध्र प्रदेशातील श्रीशैल तसेच इतर प्रमुख देवालयांत पुजारी म्हणून कार्य करीत आहेत. ते चतुर संघटक होते. त्यांनी तेलंगणातील मेहबूबनगर, गंगारेड्डी, मेदक, नलगोंड, निजामाबाद या जिल्ह्यांत प्रवास करून त्या भागातील वीरशैवांना संघटित केले. त्यांना धार्मिक संस्कार देऊन त्यांच्यात धर्मजागृती केली.

पुढे त्यांनी १९९० मध्ये चन्नबसवप्रभु स्वामीजींना आपल्या मठाचा उत्तराधिकारी म्हणून निवडले. आपल्या मठाचा नववा निरंजन पट्टाधिकार घडवून आणला. आयुष्यभर संघटना, धर्मसंस्कार, धर्मजागृती कार्य करीत दि. २५.३.२००० रोजी आलमपल्ली येथे ते लिंगैक्य झाले. सध्या श्री म.नि.प्र. चन्नबसवप्रभु स्वामीजी मठाची परंपरा चालवीत आहेत.

१२५. **श्री. वे. रामराव खंडेराव मुजुमदार** (वैष्णव)
मु.पो. बेळवणिकी,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)

हे श्रीवत्सगोत्राचे होते. त्यांनी पुढील व्यासंगाकरिता श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १२.८.१९३१ मध्ये प्रवेश घेतला. त्यापूर्वी बेळगावच्या मिशन हायस्कूलमध्ये इंग्लिश सहावीपर्यंत अभ्यास केला. बेळवणिकीच्या श्री लच्चप्पजी फत्तेपूर यांनी त्यांना काशीक्षेत्रास जाण्याची प्रेरणा दिली. श्री रामरावांनी काशीत संस्कृतसोबत इंग्लिश भाषेचा विशेषत्वाने अभ्यास केला.

१२६. **श्री. पं. चंद्रशेखर शास्त्री आराध्यमठ**
मु. सुणकल्ल बिदरी,
पो.ता. राणीबेन्नूरु, जि. हावेरी (कर्नाटक)

हे वृषभगोत्राचे होते. त्यांनी दि. १०.९.१९३० रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. दि. २५.३.१९३५ पर्यंत पाच वर्षे साहित्यशास्त्राचा यथासांग अभ्यास केला. त्यांचा साहित्याचा अभ्यास पाहून श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामींनी दि. ४.२.१९३६ ला त्यांना 'साहित्य विशारद' प्रशस्ती दिली. त्या समारोपात ते स्वतः उपस्थित नसल्याने बेंगळूरुच्या जी. आर. सिद्धप्पांच्या हस्ते त्यांना देण्यात आली. पंडित चंद्रशेखर शास्त्रीजींनी पुढे अध्यापक होऊन कार्य केले.

१२७. **श्रीमत् केदार वैराग्यसिंहासनाधीश्वर**
**श्री १००८ जगद्गुरू**
**'रावल' शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी**
केदारपीठ, मु.पो.ता. उखीमठ,
जि. रुद्रप्रयाग (उत्तरांचल प्रदेश)



हिमवत् केदार वैराग्यपीठ हा सनातन वीरशैव धर्माच्या पाच पीठांपैकी एक पीठ असून या पीठाला प्राचीन इतिहास व परंपरा आहे. या पीठपरंपरेत ३२२ वे पीठाधिपती श्रीजगद्गुरू शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी होत. हे पूर्वाश्रमीचे मुत्तनाळ (ता.जि. बेळगाव) या गावचे. या गावातील हिरेमठ श्री. वे. चन्नबसय्या यांचे ते सुपुत्र होते. त्यांनी आपल्या गावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. मुत्तनाळ हिरेमठ पुत्रवर्ग परंपरेतील मठ असून केदारपीठाचा शाखामठ आहे.

या मठास पट्टाधिकारी नसल्याने श्री शांतलिंगांना वयाच्या तेराव्या वर्षीच १९२४ मध्ये मुत्तनाळ हिरेमठाचे पट्टाधिकारी म्हणून नियुक्त केले. नंतर त्यांना संस्कृताध्ययनासाठी हुबळ्ळीच्या मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत पाठशाळेत घातले. तेथील अध्ययन पूर्ण करून सोलापूर येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन त्यांनी वेदमूर्ती पं. जगदीश शास्त्रीजींकडे अध्ययन करून काव्य-आद्य आणि काव्य-मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले.

नंतर मुत्तनाळचे श्रीमान गदिगेप्पगौडा पाटील यांच्या प्रोत्साहनाने आणि सहकार्याने ते उच्च व्यासंगासाठी काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महासन्निधींच्या अनुमतीने दि. २.७.१९३१ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात त्यांनी प्रवेश घेतला. येथे काव्यशास्त्राच्या ग्रंथांचा अभ्यास करून कलकत्त्याच्या काव्यतीर्थ परीक्षेत उत्तीर्ण झाले. सोबत तर्कशास्त्राचा देखील अभ्यास केला. ९ वर्षेपर्यंत काशीपीठात राहून अध्ययन पूर्ण केले. दि. २०.२.१९४० मध्ये झालेल्या प्रशस्तिप्रदान

कार्यक्रमात श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींकडून 'साहित्य भूषण' अशी प्रशस्ती मिळविली.

काशीक्षेत्री विद्याध्ययन पूर्ण करून मुत्तनाळला परतल्यावर त्यांचे पांडित्य पाहून तत्कालीन केदारपीठाचे श्री १००८ जगद्गुरू 'रावल' नीलकंठलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना केदारला बोलावून घेतले. १९४५ मध्ये पीठाच्या पद्धतीनुसार चेलासंस्कार दिला. त्यानंतर महास्वामीजी दि. २३.४.१९४५ रोजी सोमवारी उखीमठात लिंगैक्य झाले.

त्यांच्यानंतर त्यांचे ज्येष्ठ चेला विश्वनाथलिंग नावाचे केदारपीठाचे 'रावल' म्हणून नियुक्त झाले. तरी त्यांना जगद्गुरू पट्टाभिषेक झाला नाही. ते अनारोग्याने लिंगैक्य झाल्यानंतर मुत्तनाळ हिरेमठच्या श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्यांना ज्येष्ठताक्रमाने 'रावल' पदवी प्राप्त झाली. पुढे दि. १०.६.१९६६ रोजी श्रीमद् रंभापुरी वीर सिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजी आणि श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात उखीमठाच्या पवित्र प्रांगणात त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक करण्यात आला. तेव्हा त्यांना श्री १००८ जगद्गुरू 'रावल' शांतलिंग शिवाचार्य असे नामाभिधान देण्यात आले.

केदारपीठाचे ३२२ वे पीठाधिपती झाल्यावर त्यांनी निरंतर १४ वर्षे पीठाधिकारी होऊन अनेक धर्म समारंभात सान्निध्य देऊन आपल्या आशीर्वचनांनी भक्तोद्धाराचे कार्य केले. काशीपीठातल्या गुरुकुलात राहून एका विद्यार्थ्याने 'रावल' पदवी मिळवून धर्मकार्य केले, ही या पीठास अभिमानास्पद गोष्ट आहे. पूज्य जगद्गुरू शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी दि. ६.२.१९८० रोजी मुत्तनाळ हिरेमठात लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी मुत्तनाळ येथे आहे.

त्यांच्यानंतर श्री १००८ जगद्गुरू 'रावल' श्री सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी केदारपीठाचे जगद्गुरू झाले.

---

संदर्भ : वीरशैव पंचपीठ परंपरे, १९८८, पृ. ८८.

## १२८. श्री वे. संगमेश्वर स्वामीजी हिरेमठ

मु.पो. नारायणपेठ, ता. मक्तल,
जि. महबूबनगर (तेलंगणा)



नारायणपेठचा हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा पट्टाधिकार मठ आहे. या मठाचे श्री वे. सिद्धरामय्या आणि सौ. नीलम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी इ.स. १९०८ मध्ये श्री संगमेश्वर स्वामी यांचा जन्म झाला. प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण नारायणपेठेत घेतल्यानंतर त्यांनी 'नीरडगुंभ'च्या श्री सिद्धलिंग संस्कृत पाठशाळेत संस्कृतचे अध्ययन केले. त्यानंतर आपल्या पुत्रवर्ग परंपरेप्रमाणे मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

त्यानंतर नारायणपेठची गंदे चन्नबसप्पा यांच्या प्रोत्साहनाने तसेच प्रेरणेने उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २.११.१९३१ रोजी प्रवेश घेतला. त्यांनी काशीक्षेत्री साहित्याचा ५ वर्षेपर्यंत अभ्यास करून ते कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या 'काव्य-आद्य' आणि 'काव्य-मध्य' या परीक्षांत उत्तीर्ण झाले.

पुढील अध्ययन चालू असताना त्यांचे वडील श्री. वे. सिद्धरामय्या दि. २५.९.१९३६ मध्ये लिंगैक्य झाले. त्यामुळे मठाची जबाबदारी पाहण्यासाठी अध्ययन थांबवून दि. २७.९.१९३६ रोजी काशी गुरुकुल सोडून ते नारायणपेठेस परतले. गावी आल्यानंतर त्यांचे बंधू पंचाक्षरी यांचे दोन विवाह झाले, तरी मुले झाली नाहीत. त्यांच्या मातोश्री सौ. नीलम्माने वंशाला संतान नसल्याने श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य यांना पट्टाधिकार त्यागून विवाह करण्याचा आग्रह केला. १९३७ मध्ये देवदुर्गच्या गंधमठाचे

कु. गंगम्मा हिचेशी त्यांनी विवाह केला. पुढे त्यांना उपमन्यु, विद्याभरण, ज्योतिर्नाथ, हिरण्यगर्भ अशी चार मुले आणि दोन मुली झाल्या. पुढे ते १९८६ मध्ये श्रावण मासात शुक्ल पक्ष चतुर्दशीस लिंगैक्य झाले. हल्ली यांचे चिरंजीव ज्योतिर्नाथ आणि हिरण्यगर्भ हे नारायणपेठेच्या हिरेमठातील धार्मिक कार्यक्रम पार पाडत आहेत.

**१२९. डॉ. वे.पं. सिद्धलिंग शास्त्रीजी अरळेलेमठ**



मु.पो. बंकापूर, ता. शिग्गांव, जि. हावेरी (कर्नाटक)
दूरभाष : (०८३७८) २५४३२४,
चरभाष : ९४४८०२७४५८

डॉ. सिद्धलिंग शास्त्रीजी हे हानगल तालुक्यातील कुसनूर गावच्या वीरगोत्रीय श्री. वे. गुरुपादय्या आणि सौ. चन्नबसम्मा या दंपतीच्या उदरी १९१० मध्ये जन्मास आले. त्यांनी आपले प्राथमिक शिक्षण बंकापूर येथे पूर्ण केले. नंतर यादगिरीच्या शंकर संस्कृत महाविद्यालयात संस्कृतचे अध्ययन केले.

त्यानंतर बंकापूरचे श्री. बसवण्णप्पा कोतंबरी यांच्या प्रोत्साहनाने आणि सहकार्याने वैद्यकीय अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ९.२.१९३२ रोजी त्यांनी काशी जंगमवाडी मठाच्या श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्रीच्या आयुर्वेद विद्वानांकडे आयुर्वेदशास्त्राचा अभ्यास केला. अखिल भारतीय आयुर्वेद विद्यापीठाकडून वैद्यकीय उपाधी मिळविली. दि. ९.२.१९१२ पर्यंत म्हणजे १० वर्षेपर्यंत आयुर्वेदविद्येचा अभ्यास करून ते बंकापुरास परतले.

श्रीकाशीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी दि. ५.७.१९४२ रोजी डॉ. सिद्धलिंग शास्त्रीजींना काशीक्षेत्री बोलावून घेतले. त्या वर्षीच्या प्रशस्तिप्रदान कार्यक्रमात त्यांना 'आयुर्वेद विशारद' ही पदवी देऊन अनुग्रह

केला. याप्रमाणे काशी महापीठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य, काशी विश्वनाथ आणि अन्नपूर्णेचा कृपाशीर्वाद प्राप्त करून आलेल्या डॉ. पं. सिद्धलिंग शास्त्रीजींनी १९४४ मध्ये बंकापूर येथे वैद्यकीय सेवा सुरू केली.

१९४५ मध्ये यांचा विवाह सौ. काशीदेवीसोबत झाला. त्यांना दोन मुले व एक मुलगी आहे. श्री. शास्त्रीजी १९८४ पर्यंत म्हणजे ४० वर्षे बंकापूर तसेच जवळपासच्या ग्रामीण जनतेची स्वास्थ्यसेवा करून सर्वांच्या आदरास पात्र झाले आहेत. रंभापुरी पीठाचे श्री १००८ जगद्गुरू वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या पीठाकडून त्यांना 'वैद्यभूषण' अशी पदवी देऊन आशीर्वाद दिला. हल्लीचे रंभापुरी जगद्गुरू वीरसोमेश्वर शिवाचार्य भगवत्पादांनी आपल्या दसरा दरबारात 'गुरुरक्षा' आशीर्वाद देऊन त्यांना प्रशस्ती प्रदान केली. याशिवाय हावेरी जिल्हा वैद्यसंघाकडून व हावेरीच्या नगरपालिकेकडून त्यांना अनेक पुरस्कार मिळाले आहेत.

सध्या त्यांचे पहिले सुपुत्र डॉ. रुद्रमुनी एस. अरळेले मठ हे आपल्या वडिलांप्रमाणे वैद्यकीय सेवा करीत आहेत. डॉ. सिद्धलिंग शास्त्रीजींचे द्वितीय सुपुत्र श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी बंकापूरच्या अरळेले हिरेमठाचे पट्टाध्यक्ष होऊन मठाचे धार्मिक कार्यक्रम चालवीत आहेत. आपले गुरू लिं. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजींच्या पुण्याराधनेच्या निमित्ताने प्रतिवर्षी बृहत् प्रमाणात धार्मिक कार्यक्रम करीत आहेत. श्री. शास्त्रीजींची सुपुत्री सौ. नागरत्ना यांना गदगच्या हुबळीमठाच्या घरी दिले आहे.

डॉ. सिद्धलिंग शास्त्रीजी ९७ वर्षीही आरोग्य चांगले राखून होते. आपले कार्य आपण स्वतः करीत असत. अशा रीतीने गावकऱ्यांना त्यांचे जीवन मार्गदर्शक ठरले. काशीक्षेत्री अध्ययन करीत असताना त्यांनी जंगमवाडी मठाच्या काशी वीरशैव विद्वत् संघाचे कार्यदर्शी म्हणून काम केले होते. डॉ. सिद्धलिंग शास्त्रीजी आपल्या शेवटच्या क्षणापर्यंत स्वतःचे कार्य स्वतः करीत आदर्श जीवन जगण्याचा मार्ग दाखवून शिवैक्य झाले.

---

परिचय : डॉ. आर. एस. अरळेले हिरेमठ, बंकापूर.

१३०. श्री सिद्धेश्वर देव

मु.पो. नारायणपेठ,

ता. मक्तल, जि. महबूबनगर (तेलंगणा)

उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री येऊन येथील ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. ९.१.१९३२ रोजी प्रवेश घेतला.

१३१. श्री चिद्घनार्य हिनहळ्ळी

मु. अय्यनहळ्ळी,

पो.ता. बिरूरु, जि. चिक्कमंगळूरु (कर्नाटक)

हे वृषभगोत्रीय. यांनी काशीक्षेत्री संस्कृत उच्च व्यासंगाकरिता दि. १५.८.१९३२ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

## १३२. श्री वे.पं. गुरुशांत शास्त्रीजी हिरेमठ



मु.पो. हिरेहडगली ५८३ २१६
ता. हूविन हडगली, जि. बळ्ळारी (कर्नाटक)
दूरभाष : (०८३९९) २५०८१६

श्री. वे.पं. गुरुशांत शास्त्रीजी हिरेमठ हे वीरगोत्रीय. हे हूविनहडगली तालुका बावीहळ्ळी हिरेमठच्या श्री. वे. बेट्टय्याजी आणि सौ. वीरबसम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी १९१३ मध्ये जन्मले. प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण होळगुंदी तसेच होसपेटे येथे पूर्ण केले. नंतर सोलापूर येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृताध्ययन केले.

संस्कृत उच्च व्यासंगाकरिता वडिलांचा सल्ल्याने आणि होळगुंदीच्या श्री. सिद्धलिंगप्पा शानभोग मुंदलमनी यांच्या प्रोत्साहनाने व सहकार्याने दि. २१.८.१९३३ रोजी ते काशीस आले. श्रीकाशीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथे व्याकरणशास्त्राबरोबर साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. संस्कृतची 'काव्यतीर्थ' परीक्षा उत्तीर्ण केली. त्यांचे साहित्यशास्त्रातील परिश्रम पाहून श्री १००८ काशी जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी दि. ४.२.१९३६ रोजी प्रशस्ती प्रदान समारंभात त्यांना 'साहित्यसुधाकर' प्रशस्ती देऊन आशीर्वाद दिले.

लक्कुंडी हिरेमठाच्या सौ. कोट्रम्मा आणि श्री वे. वीरय्या यांची सुपुत्री चि. कु. गंगम्मासोबत १९३७ मध्ये त्यांचा विवाह झाला. नंतर मार्च १९४५ मध्ये ते आयुर्वेदाचार्य परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. हिरेहडगलीस येऊन कायम राहून खासगी वैद्यवृत्ती सुरू केली. त्यांना दोन मुले आणि सहा मुली असा मोठा परिवार होता. वैद्यवृत्तीबरोबर पुराण, प्रवचनकार म्हणून जनमान्यता मिळवून १९६१ ज्येष्ठ कृष्ण सप्तमीला ते लिंगैक्य झाले.

---

परिचय : एम. पी. एम. शांतवीरय्या, कन्नड उपन्यासकार, हरपनहळ्ळी, जि. दावणगेरी.

## १३३. श्री. ज. शिवकुमार शिवाचार्य महास्वामीजी



श्री. ज. तरळबाळू बृहन्मठ,
मु. शिरिगेरे, जि. चित्रदुर्ग (कर्नाटक)
स्थिरभाष : (०८१९४) २६८८२९

श्री ज. शिवकुमार शिवाचार्य महास्वामीजी हे पूर्वाश्रमी चित्रदुर्ग जिल्हा होळल्केरे तालुक्याच्या मुत्तुगदूरु गावच्या श्री. महादेवय्या व सौ. बसम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २८.४.१९१४ रोजी जन्मले. तेव्हा त्यांचे रेवणसिद्धदेव नाव ठेवले होते. त्यांनी जन्मगावीच प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर त्यानी बिरूरच्या संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृताध्ययन केले.

त्यानंतर उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ७.३.१९३३ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. १९३६ पर्यंत तीन वर्षेपर्यंत काशीपीठात राहून साहित्य, व्याकरण, न्याय आदी विषयांचे विविध विद्वानांकडे अध्ययन केले. काशीचे सुप्रसिद्ध पं. गौरीनाथ पाठक श्री. रेवणसिद्ध देव त्यांचे अत्यंत आदरणीय गुरुजी होते.

काशीत अध्ययन करीत असतानाच यलहंक (ता.बेलूरु, जि. हासन) या गावच्या तरळबाळू बृहन्मठाचे चरपट्टाधिकारी म्हणून दि. १२.८.१९३३ रोजी त्यांनी अधिकार ग्रहण केला. पुढे १९३६ मध्ये काशी येथील अध्ययन पूर्ण करून यलहंक मठास परतले. तेव्हा सिरिगेरे तरळबाळू बृहन्मठाचे श्री ज. गुरुशांत राजदेशिकेंद्र महास्वामीजी लिंगैक्य झाल्यामुळे ते स्थान रिक्त झाले होते.

श्री शिवकुमार स्वामीजी काशीहून यलहंकला नुकतेच परतले होते. त्यांच्याकडे असणारे विद्यावैभव, समाजसंघटना शक्ती इ. उत्कृष्ट गुण पाहून भक्तांनी शिरिगेरे बृहन्मठास श्री शिवकुमार स्वामीजी योग्य आहेत

असा निर्णय घेऊन दि. १०.५.१९४० रोजी त्यांना पट्टाभिषेक केला.

'स्वामित्व हे सुख भोगण्यासाठी नसून ते एक समाजसेवेचे उत्कृष्ट साधन' असे मानणाऱ्या श्री शिवकुमार स्वामीजींनी तरळबाळु विद्यासंस्था स्थापून सुमारे पाच दशकांपर्यंत फार मोठे शैक्षणिक तसेच सामाजिक कार्य केले. त्यांनी आपल्या कालावधीत तरळबाळु विद्यासंस्थेत शंभरेक शाळा-कॉलेजेस् व प्रसाद विद्यालये स्थापून विद्येवाचून वंचित असणाऱ्या ग्रामीण भागातील मुलांच्या शिक्षणाची व्यवस्था केली. देशात दुष्काळ पडला असताना उत्तर कर्नाटकात अन्नछत्र उघडून आपली जनहित भावना दाखवून दिली. तरळबाळु पौर्णिमेनिमित्त धार्मिक, सामाजिक, सांस्कृतिक जागृती केली. जातिभेद दूर ठेवून सर्व जनतेवर ते प्रेम करीत. ते कृषितज्ज्ञ होते. ते मठाच्या जमिनीत केळी, सुपारी, नारळ, नाचणी, ज्वारी, हुलगा, राळ, तीळ, कापूस आणि मिरची इ. पिके घेत होते. शिवाय आपल्या शिष्यांनाही कृषिनिष्ठ राहण्यासाठी त्यांनी मार्गदर्शन केले.

राष्ट्राला धर्म आणि राजकारण असे दोन डोळे असतात, असे मानणाऱ्या स्वामीजींनी आपल्या आयुष्यात धर्म तसेच राजकीय सुधारणेसाठी कार्य केले. समाजाच्या सर्वांगीण उन्नतीसाठी सर्वशरण संमेलन, शरणजयंती, साहित्य प्रकाशित केले. इतकेच नव्हे तर शरणांची नाटके सादर केली. मठ, शाळा, कॉलेजेस् उत्पन्नाची केंद्रे समजू नयेत, असे आदर्श विचार ते वेळोवेळी व्यक्त करीत.

धर्मरक्षण करणे त्याचा विकास करणे हे मठाधिपतीचे आद्य कर्तव्य असून मठाधिपतीने त्याग आणि सेवा मनोभावे करावी, असे स्पष्ट विचार वेळोवेळी त्यांनी व्यक्त केले. असे आदर्श जीवन जगून समाजसेवा करून शैक्षणिक तसेच सामाजिक क्रांतीत प्रसिद्ध होऊन गुरुवार, दि. २४.९.१९९२ रोजी ते लिंगैक्य झाले.

लिंगैक्य होण्याआधी त्यांनी आपले प्रिय शिष्य डॉ. शिवमूर्ती शिवाचार्य स्वामीजींना दि. ११.२.१९७९ रोजी आपले उत्तराधिकारी नेमून त्यांचा पट्टाभिषेक केला. विद्वान, सामाजिक चिंतक श्री. ज. डॉ. शिवमूर्ती शिवाचार्य

स्वामीजी शिरिगेरेच्या तरळबाळु बृहन्मठाची परंपरा समर्थपणे पेलून पुढे चालले आहेत. एवढेच नव्हे तर आपल्या लिंगैक्य गुरूहून एक पाऊल पुढे जाऊन शैक्षणिक तसेच सामाजिक कार्य करीत आहेत.

---

परिचय : श्री पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी, श्रीमठ, साणेहळ्ळी.

१३४. **पं. गौरीशंकर शास्त्री ऊर्फ महालिंग शास्त्री**



मु. पो. गुंचिगनूरु, ता. चिक्कजाजूरु, जि. चित्रदुर्ग
द्वारा- एम. प्रकाशकुमार बुक्कसागर
पो. बिस्लेहळ्ळी, ता. कडूरु,
जि. चिक्कमगळुरू (कर्नाटक)
चरभाष : ९४४८२०१९०१

हे गुंचिगनूरुच्या श्री महादेवप्पय्या आणि सौ. महादेवम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २.१२.१९१३ रोजी जन्मास आले. गौरीशंकर असे त्यांचे नामकरण करण्यात आले. आपल्या गावच्या जवळ असणाऱ्या चिक्कजाजूरी येथे त्यांनी पूर्व प्राथमिक शिक्षण घेतले. पुढे संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात त्यांनी दि. ७.३.१९३३ रोजी प्रवेश घेतला.

येथील शासकीय संस्कृत विद्यालयात विविध शास्त्रांचा अभ्यास करून अपार पांडित्य अर्जित केले. अध्ययन काळात ते तरळबाळु बृहन्मठाच्या श्री ज. शिवकुमार महास्वामीजी यांचे सहाध्यायी होते. पुढे हे स्वामीजी न होता गोडबनहाळच्या पाटील घराण्यातील सौ. शांतम्मा आणि श्री. कल्लप्पा गौडर यांची तृतीय कन्या कु. साकम्मा हिच्याशी विवाह करून ते गृहस्थाश्रमी झाले. पुढे हेच महालिंग शास्त्री नावाने प्रसिद्ध झाले. काही वर्षे वेदपाठशाळेत उपाध्याय म्हणून त्यांनी काम पाहिले. नंतर यलहंक मठाचे एजंट झाले.

शास्त्रीजी परगावी असताना आणि बुकसागरला आल्यानंतर गुरुसेवा यथावत् चालत असे. कितीही लोक आले तरी ते हसतमुखाने दंपतींची सेवा करीत असत. सामाजिक, धार्मिक काम करीत प्रसिद्ध झालेले श्री महालिंग शास्त्रीजी ६ एप्रिल १९९० रोजी लिंगैक्य झाले.

१३५. **श्री. मल्लिकार्जुन शर्मा**
वडील सिद्धरामय्या, वीरभिक्षावर्ती मठ,
मु. कूनबेवू, पो. तुरुवनूर, जि. चित्रदुर्ग (कर्नाटक)

हे वृषभगोत्रीय होते. दि. ९.६.१९३३ मध्ये श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

१३६. **श्री. सदाशिव शर्मा**
वडील शांतवीर शर्मा, बृहन्मठ,
मु. रावलुडीकी, पो. रायल चरवु,
ता. गुत्ती, जि. अनंतपूर (आंध्र)

हे नंदिगोत्रीय. सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृत अध्ययन केले. तेथे कलकत्त्याच्या वंगीय शिक्षा परिषदेच्या 'काव्यतीर्थ' परीक्षेत उत्तीर्ण झाले. नंतर रावलुडीकीच्या तिरुपलरेड्डी यांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या २५ व्या वर्षी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ३१.१०.१९३३ मध्ये प्रवेश घेतला. न्याय व व्याकरण या शास्त्रांचा अभ्यास केला.

**१३७. श्री. सदाशिव सिद्रामप्पा गुरुकुले**

मु.पो. मानवत,

ता. पाथरी, जि. परभणी (महाराष्ट्र)

वीरगोत्रीय. मुखेडच्या मिडल स्कूलमध्ये इंग्लिश सातवीपर्यंत शिक्षण घेऊन दि. २८.१०.१९३३ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने प्रवेश घेतला. येथे संस्कृत भाषेबरोबर इंग्लिश आणि उर्दूचा अभ्यास केला.

**१३८. श्री. शंकर शर्मा**

वडील गुरुबसवार्य हिरेमठ,

मु. बेकिनाळ, पो. कलकेरि, ता. सिंदगी, जि. विजयपूर (कर्नाटक)

नंदिगोत्रीय. हे श्रीमद् वीरशैव वारद पाठशाळेत काव्य-आद्य आणि काव्य-मध्यमा या परीक्षांत उत्तीर्ण झाले. बेकिनाळच्या शिवशंकरप्पा पाटील यांच्या सहकार्य आणि प्रोत्साहनामुळे उच्च व्यासंगाकरिता काशीस आले. येथील श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने दि. १४.४.१९३४ रोजी प्रवेश घेऊन साहित्यशास्त्रासोबत तर्कशास्त्राचा अभ्यास केला.

## १३९. श्री ष.ब्र. शिवानंद शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ

मु.पो. आहेरवाडी, ता.जि. सोलापूर (महाराष्ट्र)



सोलापूर जिल्ह्यातील आहेरवाडी गावचा हिरेमठ हा श्री रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी हे तपोधनी, लिंगपूजानिष्ठ, अनंत महिमाशाली असून त्यांनी करजगी, अक्कलकोट, देवणगाव, आहेरवाडी येथे मठ स्थापिले.

या सर्व मठांना इनामी जमिनी व परंपरागत शिष्य आहेत. या परंपरेत श्री राचलिंग शिवाचार्य, श्री चन्नबसव शिवाचार्य, श्री विरूपाक्ष शिवाचार्य आणि श्री  शांतलिंग शिवाचार्य इ. गुरू होऊन गेले. या परंपरेत श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी, सोलापूर हे श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेतून काव्य-आद्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. सोलापूरचे सुप्रसिद्ध वकील श्री. सिद्रामप्पा बसप्पा धुम्मा यांचे प्रोत्साहन व सहकार्य मिळवून पुढील शिक्षणासाठी ते काशीक्षेत्रास आले. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ४.५.१९३५ मध्ये  श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने प्रवेश घेतला. साहित्यासोबत विशेषतः व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून पांडित्य मिळविले. काशीचा अभ्यास पूर्ण करून स्वग्रामी परतले. आयुष्यभर धार्मिक कार्य करीत शिवसायुज्यास प्राप्त झाले. या मठाची परंपरा यथावत् चाललेली आहे.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ८९.

### १४०. श्री गुरुलिंगय्या स्वामी

गुरू सोमय्या स्वामी, थोरला मठ,
मु.पो. कळंब, जि. यवतमाळ (महाराष्ट्र)

स्कंदगोत्रीय. हे यवतमाळच्या नारायणप्पा हमदापुरे यांच्या प्रोत्साहन आणि सहकार्याने संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. दि. २.९.१९३५ मध्ये येथील सुप्रसिद्ध जंगमवाडी मठाच्या श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. साहित्य तसेच व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला.

## १४१. श्री वे.पं. चन्नबसव शास्त्रीजी हिरेमठ

मु.पो. मुगळी, ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



हे मुगळी हिरेमठच्या वे. अडवय्या व सौ. तोटम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. १.५.१९१५ रोजी जन्मास आले. लहानपणी मुगळी गावी कन्नड प्राथमिक अध्ययन करून इटगीच्या संस्कृत पाठशाळेत त्यांनी प्रारंभिक संस्कृताध्ययन केले. त्यानंतर हुब्बळीच्या मूरुसाविर मठाच्या गंगाधर संस्कृत महाविद्यालयात संस्कृतचे पुढील अध्ययन केले. इटगीचे श्रीमंत मल्लसर्ज देसाईकडून आर्थिक सहाय्य घेऊन १९३५ मध्ये ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील विभिन्न विद्वानांकडे आठ वर्षे व्याकरण तसेच साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. नंतर १९४३ मध्ये मुगळीस परत आले. त्यांची विद्वत्ता पाहून अनेक मठाधिपतींनी त्यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी होण्याचा आग्रह केला. परंतु त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला. स्वातंत्र्य चळवळीत भाग घेऊन इटगी, मुगळी, शांतगिरी, सूडी, हणमसागर आणि सर्जापूर इ. १५ खेड्यांतील स्वातंत्र्ययोद्ध्यांच्या मंडळाचे ते अध्यक्ष झाले. इटगी गावच्या भीमांबिकेचे पुराण सांगून तेथे एक मोठा मठ स्थापिला. धर्मप्रचारात स्वतःला गुंतवून घेतले. श्रावणादी पर्वकाळात अनेक नगरांत आणि गावांत श्रीशरणबसवेश्वर पुराण, सोलापूरचे शिवयोगी वीरेश्वर पुराण आणि अन्य हरगुरू चरमूर्ती, त्याप्रमाणे शिवशरणांचे पुराण सांगून जनतेत धर्मजागृती करून त्या त्या गावातील मठ-मंदिरांचा जीर्णोद्धार केला. मुगळी गावातील द्यामव्वाच्या मंदिरात ५० वर्षेपर्यंत नवरात्री, कालिकादेवी पुराण सांगून सिद्धी प्राप्त करून घेतली. संपूर्ण आयुष्य धर्मप्रचारासाठी झिजवून दि. ३.५.१९९२ रोजी लिंगैक्य झाले.

## १४२. श्री ष.ब्र. गुरुमूर्ती निर्वाण रुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजी

कोळेकर संस्थान मठ, मु.पो. निमसोड,
ता. खटाव, जि. सातारा (महाराष्ट्र)



कोळेकर मठसंस्थान ही काशीपीठाची शाखा आहे. ही शिष्यवर्ग मठपरंपरा असून या मठाचे मूळपुरुष श्रीलिंग बडदेवरू यांनी जिवंत समाधी घेतली. त्यांची समाधी मेरुलिंग गावात आहे. या गावात एकूण १३ समाध्या आहेत. या मठात आतापर्यंत २१ पट्टाधिकारी होऊन गेले आहेत. त्यांच्यापैकी अनेकांनी जिवंत समाधी घेतली आहे. या समाध्या टेंभुर्णी, मन्नौळी, कोळे, निमसोड या गावांत आहेत.

या परंपरेतील २१ वे शिवाचार्य श्री ष.ब्र. गुरुमूर्ती निर्वाण रुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमीचे सातारा जिल्ह्यातील वाळवा तालुक्यातील रेटेरे धरण गावचे. या गावच्या श्री विठोबाअप्पा शेटे आणि सौ. कोंडाबाई यांच्या पवित्र गर्भी दि. १५.१२.१९२० रोजी ते जन्मास आले. तेव्हा त्यांचे धोंडीराम असे नाव ठेवण्यात आले होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण त्यांच्या जन्मगावी रेटेरे येथे झाले. पुढे सोलापूर येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्य होऊन त्यांनी संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. त्यांचे शील, स्वभाव आणि विद्याध्ययन प्रवृत्ती पाहून कोळेकर मठाचे कारभारी श्री. देवकर यांनी धोंडीराम यांना कोळेकर मठाचे उत्तराधिकारी नियुक्त केले. १९३५ मध्ये त्यांचा पट्टाधिकार झाला. हा पट्टाधिकार श्री. सदाशिव देवधारे यांच्या नेतृत्वाखाली पार पडला.

पुढे सर्व भक्तांनी मिळून उच्च व्यासंगासाठी त्यांना काशीस पाठवून दिले. तत्कालीन काशीपीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९३५ मध्ये प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात व्याकरण आणि साहित्य

या विषयांचा चार–पाच वर्षे अभ्यास करून त्यांनी संस्कृत भाषेत पांडित्य संपादन केले. १९४० मध्ये ते काशीहून आपल्या गावी परतले. त्यांनी स्वतःला निरंतर धार्मिक कार्यक्रमात गुंतवून घेतले. या मठाच्या शाखा महाराष्ट्र, कर्नाटक तसेच आंध्र या प्रदेशांत आहेत. श्री ष.ब्र. गुरुमूर्ती निर्वाण रुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजींनी संस्थानचे २९ वे मठाधिपती म्हणून खूप मोठे धार्मिक जागृतीचे कार्य केले आहे. ते अनुष्ठानप्रिय असून कठोर हठयोगांत तत्पर होते. प्रतिवर्षी श्रावण महिन्यात वेगवेगळ्या गावी एक महिना तपोनुष्ठान करून समाप्तीच्या दिवशी वीरभद्रस्वामींचा अग्निकुंड कार्यक्रम घेत असत. त्यात स्वतः प्रथम प्रवेश करीत, त्यानंतर पुरवंत आणि भक्तांना प्रवेशाला अनुमती देत.

याप्रमाणे वयाच्या बावन्न वर्षांपर्यंत पीठाधिपती होऊन धार्मिक जागृती करून दि. १२.५.१९७२ रोजी ते लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर श्री ष.ब्र. गुरुमूर्ती रुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजींनी ३० वे मठाधिपती म्हणून पट्टाधिकार स्वीकारला आहे. हे स्वामीजीदेखील विद्यावंत, पूजानिष्ठ असून आपल्या मठाची परंपरा सर्व धार्मिक कार्यक्रम यथावत् करीत आहेत.

---

परिचय : श्री पांडुरंग नारायण महाराज, विटा.

## १४३. श्री ष.ब्र. चिक्कवीर शिवाचार्य

गुरू श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य मठ,
मु. पुर, पो. निट्टूरु, ता. गुब्बी, जि. तुमकूरु (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होते. बेंगळूरूच्या श्री जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयात काव्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. आपल्या गावच्या सिद्धरामय्या यांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या २२ व्या वर्षी ते उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीस आले. येथील ज्ञानसिंहासनाच्या जंगमवाडी महामठातील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ९.६.१९३७ मध्ये प्रवेश घेतला. पुढे त्यांनी साहित्यशास्त्रासोबत वेद आणि ज्योतिष या शास्त्रांचा देखील चांगला अभ्यास केला.

## १४४. श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य स्वामीजी नंदीमठ

मु.पो. ता.जि. सोलापूर (महाराष्ट्र)



सोलापुरातील एक प्रमुख मठ नंदिमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील आहे. या मठावरही परंपरेप्रमाणे बरेच शिवाचार्य होऊन गेले आहेत. या परंपरेतील श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य स्वामीजी हे सोलापूरच्या नंदिमठाचे श्री वे. संगनबसव यांचे सुपुत्र होत. सोलापुरातील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेतून काव्य-आद्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. आपल्या मठातील वडीलधारे श्री वे. नूरंदय्या संगनबसय्या स्वामी नंदिमठ यांच्या प्रोत्साहनामुळे ते उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्रास आले. त्यावेळी ते १८ वर्षांचे होते. येथील सुप्रसिद्ध जंगमवाडी महामठाच्या श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. ७.७.१९३७ रोजी प्रवेश घेतला. नंतर साहित्यशास्त्रासोबत न्यायशास्त्राचा अभ्यास केला. परत सोलापुरास आल्यानंतर आयुष्यभर या मठाचे धार्मिक कार्यक्रम पार पाडले.

१४५. **श्री. गुरुलिंग वडील सदाशिव विभुते (जंगम)**

मु.पो. वावधरे, ता.जि. सातारा (महाराष्ट्र)

हे नंदिगोत्रीय होत. आपल्या गावातील भगवान महादेव पाटील यांच्या प्रोत्साहनाने संस्कृत अध्ययनाकरिता काशीस आले. येथील सुप्रसिद्ध जंगमवाडी महामठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ५.७.१९३७ रोजी प्रवेश घेतला. यांनी व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला.

१४६. **श्री. विरूपाक्ष स्वामी वडील मडिवाळ स्वामी मठ**

मु. रेकुळगी, पो. हळ्ळीखेड, ता. चिटगुप्पा, जि. कलबुर्गी (कर्नाटक)

वीरगोत्रीय असणारे यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत काव्य–आद्य आणि मध्यमा परीक्षा उत्तीर्ण केल्या. ते मडिवाळप्पा महारुद्रप्पा खेणी, मु. रंजेरी यांच्या प्रोत्साहनामुळे आपल्या वयाच्या २१ व्या वर्षी उच्च संस्कृत शिक्षणासाठी म्हणून काशीक्षेत्री आले. येथील सुप्रसिद्ध जंगमवाडी महामठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १२.९.१९३८ रोजी प्रवेश घेतला. काव्यतीर्थाचा अभ्यास येथे पूर्ण केला.

१४७. **श्री. चन्नबसव शर्मा वडील गुरुलिंगय्या स्वामी स्थावरमठ**

मु. देवणगाव, पो. आलमेल, ता. सिंदगी, जि. विजयपूर (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय होत. त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत 'साहित्य–मध्यमा' आणि 'वेदान्त–आद्य' परीक्षा उत्तीर्ण केल्या. सोलापूरच्या वे. राचय्या गुरुसिद्धय्या विजयपूर यांच्या प्रोत्साहनाने वयाच्या २० व्या वर्षी संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता ते वाराणशीला आले. येथील जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २८.२.१९३८ रोजी प्रवेश घेतला. येथे साहित्य, न्याय इ. शास्त्रांचा पूर्ण अभ्यास केला.

**१४८. श्री शरणबसव शर्मा ऊर्फ शरणय्या शास्त्री**

मु. अचलेरी, पो. बंगारकिणी,

ता. तुळजापूर, जि. उस्मानाबाद (महाराष्ट्र)



हे वीरगोत्रीय होत. सोलापूर येथील श्री मद्वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पं. जगदीशशास्त्रींचे शिष्यत्व पत्करून 'काव्यतीर्थ' परीक्षेत उत्तीर्ण झाले. नंतर पं. जगदीशशास्त्री नालवार यांच्या प्रेरणेने वयाच्या २४ व्या वर्षी संस्कृत व शास्त्रांच्या उच्च व्यासंगाकरिता वाराणशीला आले. श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. २७.७.१९३८ रोजी प्रवेश घेतला. येथे न्यायशास्त्राचा अभ्यास पूर्ण करून प्राविण्य संपादन केले. पुढे गृहस्थाश्रमी होऊन त्यांनी सोलापूर येथील अण्णप्पा काडादी प्रशालेत संस्कृतचे अध्यापक म्हणून कार्य केले. यांनीच विद्यमान श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींना पूर्वाश्रमी सोलापुरात व्याकरणशास्त्र शिकवले, हे नमूद करण्यासारखे आहे.

**१४९. श्री. वीरभद्र शर्मा बसवय्या चिंचखंडी**

मु. हलगली, पो.ता. मुधोळ,

जि. बागलकोट (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होते. त्यांनी सोलापूरच्या श्री मद्वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत पं. जगदीशशास्त्री नालवार यांच्याकडून काव्य-मध्यमापर्यंतचे शिक्षण घेतले. हलगली गावच्या वीरप्पा मास्तर होसूर यांच्याकडून प्रेरणा घेऊन वयाच्या २१ व्या वर्षी उच्च व्यासंगाकरिता ते वाराणशीस आले. येथील सुप्रसिद्ध श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २६.११.१९३८ रोजी प्रवेश घेतला. नंतर साहित्यशास्त्राचा विशेष अभ्यास करून प्राविण्य मिळविले.

## १५०. श्री. षडक्षरी शांतवीरय्या हिरेमठ

मु.पो.ता. बिळगी, जि. बागलकोट (कर्नाटक)

हे नंदिगोत्रीय. त्यांनी बागलकोट येथील बसवेश्वर माध्यमिक शाळेत मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण घेतले. बिळगीच्या सोमनगौडा सिद्धनगौडा पाटील यांच्या प्रेरणेने वयाच्या २२ व्या वर्षी काशीक्षेत्री आले. येथील सुप्रसिद्ध श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १३.७.१९३९ रोजी प्रवेश घेतला. येथे इंग्लिश भाषेच्या उच्च शिक्षणासोबत वैद्यक शास्त्राचाही अभ्यास केला.

## १५१. श्री वै. एम्. गंगाधरप्पा मरुळप्पा

मु.पो. यळ्ळंबरसे, ता. कडूरु, जि. चिक्कमगळूरु (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होते. यांनी म्हैसूरच्या इंटरमिडियेट कॉलेजमध्ये इंटरपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. पुढे आपल्या गावच्या पटेल वै. टी. भद्रप्पा यांच्या प्रेरणेने वयाच्या २२ व्या वर्षी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २.८.१९३९ रोजी प्रवेश घेतला. पुढे काशी हिंदू विश्वविद्यालयात बी.एस्.सी.चा अभ्यास करीत वेद तसेच वेदान्तशास्त्राचा अभ्यास केला.

१५२. **श्री ष.ब्र. घनलिंग शिवाचार्य स्वामीजी दोड्डमठ**
मु.पो. कंचकल्लु बिदरे,
ता. कडूरु, जि. चिक्कमगळूरु (कर्नाटक)

दि. १०.१.१९२३ मध्ये कंचकल्लु बिदरे गावात यांचा जन्म झाला. स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. दोड्डमठाचे लिंगैक्य श्री प्रभुकुमार पट्टाध्यक्षांचा उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती झाली. १९३४ मध्ये त्यांनी श्री मद्वीरशैव शिवयोग मंदिरात संस्कृताध्ययनासाठी प्रवेश घेतला.

येथील पं. बसवराज शास्त्री पगडदिन्नी यांच्याकडे साहित्य तसेच व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. एवढेच नव्हे तर योगाभ्यासदेखील केला. पुढे १९३८ मध्ये दोड्डमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. त्यानंतर संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता ते १९३९ मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपेस पात्र होऊन श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

काशीत काही वर्षे व्याकरण व साहित्यशास्त्राचा अभ्यास करून ते स्वग्रामी परतले. धार्मिक तसेच सांस्कृतिक कार्यक्रमांचे आयोजन करीत त्यांनी धर्मजागृतीचे काम केले. आपले गुरुवर्य लिंगैक्य 'श्री ष.ब्र. प्रभुकुमार पट्टाध्यक्षांचे चरित्र' यासह आणखी काही ग्रंथ प्रकाशित करून साहित्यसेवा केली.

---

संदर्भ : शिवयोग मंदिर बेळगु, १९६०,पृ. ३१६.

### १५३. श्री ष.ब्र. डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी

वीरमठ, मु.पो.ता. अहमदपूर (राजूर),
जि. लातूर (महाराष्ट्र)



अहमदपूरचा वीरमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील मठ आहे. या मठातील प्राचीन हस्तलिखित पुराव्यानुसार इ.स. ९३१ पासून या मठाची परंपरा चालत आली आहे असे दिसून येते. या मठावर आजपर्यंत १५ मठाधिपती होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. मडिवाळ शिवाचार्य हे मूळपुरुष होऊन गेले. हल्लीचे मठाधिपती श्री ष.ब्र. डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी हे पंधरावे मठाध्यक्ष होत. ते पूर्वाश्रमी अहमदपूरच्या श्री वे. विश्वनाथ स्वामी तसेच सौ. प्रयागबाई या दंपतीच्या पवित्र गर्भी शनिवार दि. २५.२.१९१७ रोजी जन्मास आले. त्यांनी अहमदपूर येथील उर्दू शाळेत आपले प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर अहमदपूरच्या तुकारामशास्त्रींकडे संस्कृतच्या अध्ययनास प्रारंभ केला. संस्कृतचा प्रारंभिक अभ्यास पूर्ण करून पुढील संस्कृतच्या अभ्यासाकरिता सोलापूर येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्यत्व पत्करून साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. १९३८ मध्ये काव्य-आद्य ही परीक्षा ते हुब्बळ्ळी केंद्रातून उत्तीर्ण झाले.

त्यानंतर त्यांचे गुरू श्री ष.ब्र. मडिवाळ शिवाचार्य यांनी वयोवृद्ध झाल्याने आपल्या हयातीतच त्यांचा १९३७ च्या माघ मास कृष्ण सप्तमीच्या शुभ मुहूर्तावर वीरमठावर पट्टाधिकार केला. पट्टाभिषेकानंतर आपले शिक्षण पुढे चालू ठेवण्याकरिता ते पुन्हा सोलापुरास आले. १९३८-३९ मध्ये काव्यतीर्थ, व्याकरण-मध्यमा आणि वेदान्त या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. पुढे बार्शी परंडकर मठाचे श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. तत्कालीन पीठाध्यक्ष श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामींच्या अनुमतीने त्यांनी दि. २३.७.१९३९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

काशीतील न्यायशास्त्राच्या विद्वांनाकडे नव्यन्यायाचा अभ्यास केला. तेव्हा पीठाच्या बँकेचे व्यवहार कोर्टाच्या विचाराधीन होते. कोर्टाच्या कामातही स्वामीजींनी सहकार्य केले. मठात कारभारी म्हणून काम पाहत असणारे श्री. शंकरप्पा नावाच्या गृहस्थामुळे मनस्ताप होऊन मनात विरक्त भाव आल्याने तपस्या करण्यासाठी ते हिमालयात निघून गेले. देशसंचार करीत असताना १९४०-४१ मध्ये देशाच्या स्वातंत्र्यचळवळीत भाग घेतला. राष्ट्रीय स्वयंसेवक संघात प्रवेश केला. १९४५ मध्ये वैद्यकशास्त्राचा अभ्यास करून डॉक्टर उपाधी प्राप्त केली.

१९५२ पर्यंत सुमारे १२ वर्षेपर्यंत देशाटन करून विविध अनुभव प्राप्त करून पुन्हा अहमदपूरला येऊन मठाचा कार्यभार हाती घेतला. विद्वान स्वामीजींनी मराठी वीरशैव संतवाङ्मय प्रसिद्ध करण्याच्या उद्देशाने मन्मथस्वामींचा 'परमरहस्य' ग्रंथ संपादून १९६१ मध्ये प्रकाशित केला. (हा ग्रंथ तत्पूर्वी पारलिंग प्रभुअय्या बार्शीकर यांनी इ.स. १८८७ मध्ये सर्वप्रथम प्रकाशित केला होता.) महाराष्ट्रात चालणाऱ्या सप्ताह आदीच्या पारायणात त्यांचा ग्रंथच लोक वापरत असल्याने एक लाखाहून अधिक ग्रंथांची विक्री झाली आहे. २००१ मध्ये 'परमरहस्य' चतुःशताब्दी महोत्सव खूप वैभवात महाराष्ट्रभर साजरा करण्यात आला. स्वामीजी सुमारे पन्नास वर्षांपासून कार्तिक पौर्णिमेला कपिलधार क्षेत्राची पदयात्रा करीत आहेत. त्यांनी काही ग्रंथरचना करून मराठी वीरशैव साहित्यात भर घातली आहे. महाराष्ट्रात शिवसांप्रदायिक कीर्तन ते स्वतः करतात. अनेक कीर्तनकारांना तयार करण्याचे श्रेय त्यांना जाते. 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर संस्कृत व्याख्या लिहिणारे पंडित अशी त्यांची ख्याती आहे. श्रीपलसिद्ध बृहन्मठ, साखरखेर्डा, जि. बुलडाणा येथे २५ व २६ मे २००८ रोजी अ.भा. दुसरे वीरशैव मराठी साहित्य संमेलन श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य महाराज यांच्या अध्यक्षतेखाली पार पडले. ते निःस्वार्थी आणि निर्भय असून १०२ वर्षांतही तरुणांसारखे धर्मप्रचार कार्यात निरंतर मग्न असणाऱ्या त्यांचा विश्वाराध्य गुरुकुलास अभिमान आहे.

## १५४. श्री. शिवाजी मल्लिकार्जुन तडकसे

मु.पो. पुसद, जि. यवतमाळ (महाराष्ट्र)

हे भृंगीगोत्रीय होत. यांनी पुणे महाराष्ट्रात मॅट्रिक परीक्षा उत्तीर्ण करून वयाच्या १८ व्या वर्षी दि. २४.११.१९४० रोजी काशीक्षेत्राच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश मिळविला. येथे विज्ञान विषय घेऊन इंटरपर्यंत अभ्यास केला.

## १५५. श्री वे.पं. चन्नबसव शास्त्रीजी हिरेमठ

मु.पो. इटगी, ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



वे.पं. चन्नबसव शास्त्री इटगी हिरेमठचे सुप्रसिद्ध विद्वान पं. सोमनाथशास्त्री आणि सौ. चन्नबसम्मा यांचे सुपुत्र असून दि. १०.८.१९२० मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांनी इटगीत प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. हुब्बळ्ळीच्या मूरुसाविर मठाच्या गंगाधर संस्कृत महाविद्यालयात संस्कृतचे अध्ययन केले. नंतर उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. २९.२.१९४० रोजी प्रवेश घेतला. काशी येथील पं. चंद्रशेखर शास्त्रीजी, पं. शिवनारायण तिवारी आणि पं. शशिकांत शास्त्रीजी यांच्याकडे साहित्य तसेच व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याच्या 'काव्यतीर्थ' आणि 'व्याकरणतीर्थ' या पदव्या प्राप्त केल्या. त्यांचे व्याकरणातील पांडित्य

पाहून श्रीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींनी 'व्याकरणरत्न' उपाधी देऊन त्यांना सन्मानित केले. श्री चन्नबसव शास्त्रीजींनी 'शिवभक्ति गीतांजली', 'श्रीअन्नदानेश्वर स्तुती मंगल कुसुमांजली' या ग्रंथांची रचना केली. काशीक्षेत्राहून परतल्यानंतर त्यांनी श्री शिवयोग मंदिर पाठशाळेत बटूंना साहित्य व व्याकरण आपल्या जीवनाच्या शेवटच्या क्षणापर्यंत शिकवून विद्यादानाचे पुण्य मिळविले. याप्रमाणे आपले संपूर्ण आयुष्य संस्कृत भाषेचे अध्ययन-अध्यापन करून भारतीय संस्कृतीचे संरक्षण करून ते दि. ४.८.२००० मध्ये इटगीत लिंगैक्य झाले.

### १५६. श्री ष.ब्र. राचोटी शिवाचार्य स्वामीजी

संस्थान मठ, मु.पो. मेहकर,
ता. भालकी, जि. बीदर (कर्नाटक)



मेहकर (ता. भालकी, जि. बीदर) या गावातील कल्याण कट्टिमनी संस्थान हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. श्री ष.ब्र. विरूपाक्षेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे या मठाचे मूळ कर्तृपुरुष होत. हा मठ हजारो वर्षांपूर्वीचा आहे. मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. विरूपाक्षेश्वर शिवाचार्य हे शिवयोगनिष्ठ व शिवपूजाधुरंधर होते. त्यांच्या तपश्चर्येने प्रभावित होऊन कर्नाटक-आंध-महाराष्ट्रात १६००० शिष्य त्यांच्याकडून अनुग्रहित झाले. या मठाच्या परंपरेतील सर्व शिवाचार्य हे त्रिकाल लिंगपूजानिष्ठ व शिवयोगरत होते. या मठात कर्तृपुरुषाच्या समाधीजवळ अखंड नंदादीप तेवत असतो. येथे अन्नदासोह, सामूहिक जपानुष्ठान सदैव चालत आले आहे. या मठाचे श्री ष.ब्र. मरिबसव देशिकेंद्र स्वामीजींनी गोरटा गावच्या हिरेमठाच्या श्री वे. रेवणसिद्ध स्वामीजींचे पुत्र श्री. प्रभुदेव यांना मेहकर मठाचा उत्तराधिकारी म्हणून नेमले आणि पुढे या वंशाचेच या मठास उत्तराधिकारी होतील अशी सर्व भक्तांची सहमती घेऊन तशी परंपरा सुरू केली. तेव्हापासून आजपर्यंत

गोरटा हिरेमठ या वंशाचेच मेहकर कल्याण कट्टिमनी संस्थानात मठाधिकारी होत आले आहेत. या मठाच्या परंपरेने श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी आणि ष.ब्र. राचोटी शिवाचार्य स्वामीजी अशी दोनच नावे परंपरेने प्रत्येक शिवाचार्याला देण्याची परंपरा चालत आली आहे.

या परंपरेत आलेले श्री ष.ब्र. राचोटी शिवाचार्य स्वामीजी आपल्या पूर्वाश्रमी गोरटा हिरेमठाच्या श्री. वे. रेवणसिद्ध स्वामी आणि मातोश्री गुरुदेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९१८ मध्ये जन्मास आले. त्यांनी प्राथमिक अध्ययन गोरटा गावी आपल्या वडिलांकडेच पूर्ण केले. नंतर विजयपूर जिल्ह्यातील हंदिगनूरु गावी शालेय शिक्षणासोबत कोरवार बसवण्णप्पा शास्त्रीजीकडे संस्कृताध्ययनही केले. रायचूर किल्ला मठाच्या पट्टाध्यक्षाकडून अय्याचार संस्कार गोरटा गावी मिळविला. नंतर मेहकर मठाचे तत्कालीन सर्वाधिकारी असणाऱ्या देशिकेंद्र मरिबसव स्वामीजींनी त्यांना मेहकर मठाचा पट्टाधिकार १९३६ मध्ये दिला. त्योवळी त्यांना श्री ष.ब्र. राचोटी शिवाचार्य असे नूतन अभिधान मिळाले.

पुढे सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्रींचे शिष्य होऊन त्यांनी संस्कृतचा अभ्यास केला. नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात १९४० मध्ये प्रवेश घेतला. काही वर्षे काव्यशास्त्राचा अभ्यास करून कलकत्ता वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेची काव्यतीर्थ परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. नंतर स्वग्रामी परतले. मेहकर मठाच्या परंपरेनुसार अनेक अनुष्ठाने, जपयज्ञ, शिवदीक्षा कार्यक्रमांचे आयोजन करीत भक्तांच्या अपार आदरास तसेच श्रद्धेस पात्र झाले. त्यांनी अनेक ग्रंथ मुद्रित केले. बसवकल्याणच्या त्रिपुरांतकेश्वर तलावाशेजारी गोरट्याचे महादेव मंदिर, गोरक्षनाथ मंदिर, विमलखेड, गौडगाव, डोणगापूर, उंबरगी, उस्तुरगी, शहापूर इ. गावी जपयज्ञ करून तेथे शिवलिंगांची स्थापना करून सर्वांना पूजेसाठी सोय करून दिली.

याशिवाय १९५६ मध्ये गोरटा गावच्या श्री. वे. विरूपाक्षय्या सिद्रामय्या मठपती आणि श्री. वे. विरूपाक्षय्या शिवलिंगय्या मठपती या दोघांना हैदराबादला पाठवून तेथील सुप्रसिद्ध संगीततज्ज्ञ नागेश गणेश दिवाण यांच्याकडून संगीताचा अभ्यास करवून वैदिक मंत्रांना संगीत स्वरांची जोड देऊन संगीत रुद्रसंघाची प्रतिष्ठापना केली. गोरटा गावच्या संगीत रुद्रसंघाने त्यांच्या छत्रछायेत वाढून ख्याती मिळवली आहे. अशा रीतीने आयुष्यभर जपानुष्ठान आणि धार्मिक कार्यक्रम पार पाडीत आपल्या सहोदराचे सुपुत्र श्री ष.ब्र. राजेश्वर यांना तिरुपती येथे संस्कृत अध्ययन करवून आपल्या अमृतहस्ते त्यांना मेहकर मठाचा पट्टाधिकार करवून त्यांचे श्री ष.ब्र. राजेश्वर शिवाचार्य असे नामकरण केले. हल्ली श्री ष.ब्र. राजेश्वर शिवाचार्य स्वामीजी आपली गुरुपरंपरा व्यवस्थित चालवीत आहेत.

### १५७. श्री. शंकरस्वामी विरूपाक्ष स्वामी खळेगावकर

मु.पो. खळेगाव, जि. बीड (महाराष्ट्र)

हे वीरगोत्रीय होत. हे २१.५.१९४१ रोजी उच्च संस्कृत शिक्षणासाठी वाराणशीस आले. येथे व्याकरण तसेच ज्योतिषशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला.

### १५८. श्री. माणिक सोनप्पा कीर्तने

मु. परसोड, पो. नंदगाव, ता.जि. अमरावती (महाराष्ट्र)

यांनी दि. १६.७.१९४१ रोजी काशीक्षेत्रीच्या जंगमवाडी मठात श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन कॉमर्स विषयाचा इंटरपर्यंत अभ्यास केला. पूर्वी हे यवतमाळच्या गव्हर्मेंट हायस्कूलमध्ये (सरकारी माध्यमिक शाळेत) मॅट्रिक उत्तीर्ण झाले होते. वयाच्या १९ व्या वर्षी काशीस आले.

## १५९. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी



संस्थान कट्टिमनी हिरेमठ, मु.पो. अळवंडी,
ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)
चरभाष : ९४४८४८२३४०

अळवंडीचा श्रीसिद्धेश्वर संस्थान कट्टिमनी हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग मठ आहे. उज्जयिनी महापीठाचे जगद्गुरू मरुळसिद्ध शिवाचार्य महास्वामीजी धर्मप्रचारासाठी संचार करीत अळवंडी गावात आले. १९ वर्षांपूर्वी तप आचरून त्या तपोभूमीत मठ बांधून त्यांनी त्याला 'श्रीसिद्धेश्वर संस्थान कट्टिमनी हिरेमठ' असे नाव दिले. या मठाला हजारो वर्षांचा प्राचीन इतिहास आहे.

बाराव्या शतकात कल्याणक्रांती झाली तेव्हा अनेक शरणांनी अळवंडी गावच्या मठाजवळील शेतात वस्ती करून मठाकडून संरक्षण घेतले होते. त्यासाठी चालुक्य राजवंशजांनी सदरील जमीन मठास दान म्हणून दिली. याशिवाय विजयनगर राजाकडून या मठास पाचशे एकर जमीन इनाम मिळाली आहे. हैदराबादच्या सालारजंग नवाब निजाम सरकारच्या आज्ञेनुसार केसलापूर आणि पुर गावांची जहागिरी दान मिळाली.

श्री सिद्धेश्वर संस्थान मठाच्या शाखा गदग जिल्ह्यातील शिंगटालूर, मुंडरगी, कलकेरी आणि डंबळग येथे व बळ्ळारी जिल्ह्यातील मसलवाड, होळगुंदी कोप्पळ जिल्ह्यातील कोप्पळ, सिंदोगी, बिसरळ्ळी, कातरकी आणि बेटगेरी या गावांत आहेत. या सर्व मठांचे धार्मिक कार्यक्रम अळवंडी संस्थानमठाकडून चालत आले आहेत. या मठाच्या परंपरेत शिवाचार्यांची जी नावे उपलब्ध आहेत त्यात श्री ष.ब्र. करिसिद्ध स्वामीजी, श्री ष.ब्र. सालंक स्वामीजी, श्री ष.ब्र. पट्टद स्वामीजी ही उल्लेखनीय होत. या मठाच्या परंपरेत १९१५ पासून १९८३ या कालावधीत पट्टाधिकारी झालेले श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य पूर्वाश्रमी अळवंडी कट्टिमनी हिरेमठाच्या श्री. वे. सिद्धप्पय्या स्वामीजी तसेच सौ. सिद्धम्मा यांच्या पवित्र गर्भी दि.

१०.४.१९१५ रोजी जन्मास आले. प्राथमिक शिक्षण तेथेच पूर्ण करून त्यांनी पुढे अब्बिगेरी अरळेले मठात प्राथमिक अभ्यासासोबत संस्कृत तसेच वैदिक शिक्षण घेतले. दि. १८.६.१९४१ मध्ये मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १९४१ मध्ये काशीक्षेत्रास येऊन श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जंगमवाडी मठाच्या श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश मिळविला. काशी येथे विविध विद्वानांकडे साहित्य आणि व्याकरणादी शास्त्रांचा अभ्यास करून त्यात उत्तीर्ण होऊन ते १९४६ मध्ये परत स्वग्रामी आले.

शिक्षणप्रेमी महाराजांनी आपल्या मठात कर्नाटक विद्यावर्धक समिती स्थापून आपल्या मठाचे श्री. वे. शिवमूर्ती स्वामी, माजी सांसद यांना त्या समितीचे अध्यक्ष केले. स्वत: गौरवाध्यक्ष राहून अनेक शैक्षणिक संस्था सुरू केल्या. त्यात प्राथमिक शाळा, माध्यमिक शाळा, सिद्धेश्वर संयुक्त पदवीपूर्व महाविद्यालय, सिद्धेश्वर फ्री जनरल हॉस्पिटल, श्री सिद्धेश्वर अनाथ बालक निलय, अळवंडी तसेच श्रीजगद्गुरू पंचाचार्य शिक्षण महाविद्यालय, श्रीजगद्गुरू पंचाचार्य प्रॅक्टिसिंग माध्यमिक शाळा गदग येथे स्थापिली. याप्रमाणे मठाच्या धार्मिक परंपरेबरोबर शैक्षणिक क्षेत्रात उल्लेखनीय कार्य करून दि. १७.३.१९८३ रोजी ते लिंगैक्य झाले. त्यांचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. अभिनव सिद्धलिंग शिवाचार्य मठाध्यक्ष होऊन कार्य करीत आहेत.

---

संदर्भ : गुरुमूर्ती स्वामी इनामदार, अळवंडी. गुरुवर्ग दर्पण, पृ. ७८.

१६०.  **श्री. लिंगप्पा वडील रामानंद स्वामी**

मु.पो. हुलकोटी, ता.जि. गदग (कर्नाटक)

हे बदामी शाळेत व्हर्नाकुलर फायनल परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांनी वयाच्या २२ व्या वर्षी दि. १०.३.१९४२ मध्ये काशी जंगमवाडी मठाच्या जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे येथे व्याकरण व न्यायशास्त्राचा अभ्यास करून संन्यासाश्रम स्वीकारला.

१६१.  **श्री. विरूपाक्ष शर्मा वडील अमरय्या हिरेमठ**

मु. नौली (नवली), पो. कनकगिरी,
ता. गंगावती, जि. रायचूरु (कर्नाटक)

हे वृषभगोत्रीय होत. त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्यत्व पत्करले. काव्य-आद्य आणि काव्य-मध्यमा परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. वयाच्या २३ व्या वर्षी संस्कृत उच्च व्यासंगाकरिता वाराणशीस आले. दि. १७.६.१९४२ रोजी श्री विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे 'काव्यतीर्थ' उपाधी प्राप्त केली. न्यायशास्त्राचाही पूर्णपणे अभ्यास केला.

## १६२. श्री. वे. गंगाधर शास्त्री बसवलिंग स्वामी सालीमठ



मु. अनुगोंडा, पो. मक्तल,
जि. महबूबनगर (तेलंगणा)

हे नंदिगोत्रीय होते. यांनी सोलापुरातील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्यत्व पत्करून काव्य-आद्य आणि काव्य-मध्यमा परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. पुढे वयाच्या २२ व्या वर्षी दि. १३.६.१९४२ रोजी काशी जंगमवाडी मठात श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यांनी काशीक्षेत्रात साहित्य तसेच व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून 'काव्यतीर्थ' पदवी संपादिली. त्यासोबत न्यायशास्त्राचा चांगला रीतीने अभ्यास केला. काशी येथील अभ्यास पूर्ण करून सोलापुरास परतले. येथील होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्राध्यापक म्हणून कार्य पाहू लागले. त्यांचे बरेच शिष्य मठाधिपती तसेच शास्त्री झाले. काशीक्षेत्रीचे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी लहानपणी यांच्याकडेच १९६३ ते १९६९ पर्यंत संस्कृतचा अभ्यास करून काव्य-आद्य, मध्यमा आणि तीर्थ या परीक्षांत उत्तीर्ण झाले.

## १६३. श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य

गुरू श्री ष.ब्र. करबसव शिवाचार्य हिरेमठ
मु. रौडकुंदी, पो.ता. सिंधनूरु,
जि. रायचूरु (कर्नाटक)



हे नंदिगोत्रीय होत. यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्री नालवार यांच्याकडे काव्यशास्त्राचा अभ्यास करून ते 'काव्यमध्यमा' परीक्षेत उत्तीर्ण झाले. वयाच्या २० व्या वर्षी दि. १७.७.१९४२ रोजी श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने काशी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे येथील शासकीय संस्कृत कॉलेजात पं. बलदेव उपाध्याय यांचे शिष्यत्व पत्करून १९५१ मध्ये वेदान्तशास्त्री परीक्षेत उत्तीर्ण झाले. तसेच हिंदी विशारद परीक्षेत देखील उत्तीर्ण झाले. त्यानंतर कलकत्त्याच्या संस्कृत शिक्षा परिषदेची 'काव्यतीर्थ' उपाधी मिळवली. त्याबरोबर व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला.

लहानपणापासूनच कवितारचना चातुर्य असल्याने त्यांना 'बालकवी' ही उपाधी प्राप्त झाली होती. अशा रीतीने काशीत एक वर्षपर्यंत राहिले. पुढे काही कारणाने पट्टाधिकार त्यागून गृहस्थाश्रमी झाले. तेव्हा त्यांनी 'पंडित प्रभानंद शास्त्रीजी' असे नामांतर केले. त्यांनी बरीच पुराणे लिहून प्रसिद्ध केली.

१६४. श्री. शिवमूर्तेप्पा ऊर्फ शिवमूर्ती शास्त्री मल्लप्पा वारद
मु.पो.ता.जि. गदग (कर्नाटक)

हे गदगच्या म्युनिसिपाल्टी हायस्कूलमध्ये मॅट्रिक झाले. आयुर्वेदशास्त्राचा अभ्यास करून बी.ए.एम.एस. प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. पुढील आयुर्वेद अभ्यासाकरिता स्नातकोत्तर अभ्यासासाठी वयाच्या २५ व्या वर्षी दि. ११.८.१९४२ मध्ये काशी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढचे शिक्षण पूर्ण करून 'आयुर्वेदाचार्य' पदवी संपादिली.

१६५. श्री. शिवलिंग नंजय्या जंगम
मु.पो. काटेरी, जि. निलगिरी (तमिळनाडु)

हे वीरगोत्रीय होत. त्यांनी वयाच्या २३ व्या वर्षी दि. १.१०.१९४२ मध्ये काशीक्षेत्रीच्या जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विंश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे त्यांनी योगशास्त्राचा आणि चित्रकलेचा अभ्यास केला.

## १६६. श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ चित्तरगी

मुळ्ळूरू, बेळगावी, मु.पो. चित्तरगी,
ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)



चित्तरगी (ता. हुनगुंद, जि. बागलकोट) येथील हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. हा गुरुस्थळाचा पुत्रवर्गपरंपरेतील मठ असून या मठास परंपरागत शिष्यवर्ग व इनामी जमिनी आहेत. या मठाचे मूळपुरुष श्री ष.ब्र. मुप्पिन शिवाचार्य स्वामीजी होते. हे शिवपूजानिष्ठ, शांत व महिमाशाली होते. अनेक गावी तेथील भक्तांनी या मठाचे शाखामठ उभे केले आहेत. या मठपरंपरेत श्री ष.ब्र. नुरोंदु शिवाचार्य स्वामीजींनी ख्याती मिळविली होती. अशा प्राचीन परंपरा असणाऱ्या चित्तरगी हिरेमठाचे पट्टाध्यक्ष असणारे श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजींनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. भक्तांच्या सहाय्याने संस्कृताध्ययनाकरिता १९३५ मध्ये ते सोलापुरास आले आणि येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. वे.मू. पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्य होऊन ७-८ वर्षेपर्यंत साहित्यशास्त्राचा अभ्यास करून 'काव्यतीर्थ' परीक्षेत उत्तीर्ण झाले.

नंतर उच्च व्यासंगाकरिता दि. १३.६.१९४२ मध्ये काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे व्याकरण तसेच वेदान्तशास्त्रांचा पूर्ण अभ्यास केला. काशीक्षेत्रात ७-८ वर्षे राहून येथील अभ्यास पूर्ण करून स्वग्रामी परतले. मुळ्ळूरु हिरेमठावर (ता. रामदुर्ग, जि. बेळगाव) भक्तांच्या अपेक्षेनुसार त्यांचा पट्टाभिषेक झाला. चित्तरगी आणि मुळ्ळूरु हिरेमठांचा त्यांनी विकास केला. पुढे सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत ते स्वतः १९५३ मध्ये अध्यापक म्हणून कार्य पाहू लागले.

---

संदर्भ : १. गुरुवर्ग दर्पण, १९५३, पृ. ६४. २. पुण्यश्लोक वारद, १९४९, पृ. २९६.

## १६७. श्री ष.ब्र. शिवशंकर शिवाचार्य स्वामीजी शिलामठ



हिरेमठ, मु.पो. कोंडकुंदी,
ता. गुत्ती, जि. अनंतपूर (आंध्र प्रदेश)

अनंतपूर जिल्हा, गुत्ती तालुक्यातील कोंडकुंदी गावचा शिलामठ श्रीशैल-पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. या मठाला परंपरागत शिष्यवर्ग व इनामी जमिनी देखील आहेत. याचे शाखामठ गळदाळ, इंचिनाळ या गावांत आहेत. या परंपरेत १०-१५ मठाधिपती होऊन गेले आहेत.

श्री ष.ब्र. शिवशंकर शिवाचार्य स्वामीजी या शिलामठाचे पट्टाध्यक्ष असून त्यांनी लहानपणी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता १९४२-४३ मध्ये ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथे अनेक विद्वानांकडून साहित्य, व्याकरण आणि वेदान्तशास्त्राचा अभ्यास करून 'वेदान्तभूषण' परीक्षेत उत्तीर्ण झाले. काशी येथील अध्ययन पूर्ण करून स्वग्रामी परतले. पुढे अनेक वर्षे धार्मिक कार्यक्रम हाती घेतले. शांतमूर्ती व शिवपूजाधुरंधर होते. भक्तांना धर्मोपदेश करीत शेवटी ते शिवसायुज्यास प्राप्त झाले.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ७५.

१६८. **डॉ. काशीनाथ हिरेमठ**

मु.पो. गोडची, ता. रामदुर्ग, जि. बेळगाव (कर्नाटक)
हुब्बळ्ळी स्थिरभाष : ०८३६ – २३७४२५५,
चरभाष : ९२४३२८३८५५

हे गोडची गावचे वीरगोत्रीय श्री. वे. अप्पय्या स्वामी यांचे सुपुत्र असून १९२२ मध्ये जन्मले. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केल्यानंतर गोडची हिरेमठास श्री. गुरुसिद्ध स्वामीजी हिरेमठ गुरुजींनी त्यांना आपला उत्तराधिकारी म्हणून नेमले. पुढे बैलहोंगलच्या तिप्पी मठास त्यांना संस्कृत अध्ययनाकरिता पाठविण्यात आले. तेथे त्यांनी अमरकोश, व्याकरण तसेच श्रीरुद्राचा अभ्यास केला. नंतर हुब्बळ्ळीच्या मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेतला.

हुब्बळ्ळी मूरुसाविर मठात वे. श्री. सोमशेखर शास्त्रींकडे साहित्य तसेच वे. चंद्रशेखर शास्त्रींकडे व्याकरणाचा अभ्यास करून कलकत्त्याची काव्यमध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर यादगिरीच्या संस्कृत कॉलेजमध्ये अध्ययन करून 'काव्यतीर्थ' परीक्षेत उत्तीर्ण झाले. पुढे सोलापूर येथे श्रीमद् वीरशैव गुरुकुलात अध्ययन केले. नंतर उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले.

श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या संमतीवरून दि. १७.७.१९४२ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील क्विन्स कॉलेजात पं. शिवदत्त यांच्याकडे न्यायशास्त्राचा अभ्यास केला. काशी येथील अध्ययन पूर्ण करून गोडची गावी आल्यानंतर पट्टाधिकाराचा विचार सोडून बेळगाव येथील आयुर्वेद महाविद्यालयात अध्ययन प्रारंभ करून 'भिषक्' परीक्षेत उत्तीर्ण झाले. नंतर सरकारी वैद्य म्हणून १९५२ पासून १९६३ पर्यंत सेवेत राहिले. पुढे गृहस्थाश्रम स्वीकारला. हुब्बळ्ळी येथील होसूर येथे स्वतंत्र घर आणि दवाखाना थाटून रुग्णांची सेवा करीत दि. २८.७.१९९९ रोजी लिंगैक्य झाले.

## १६९. श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीररुद्रमुनिदेव शिवाचार्य महास्वामीजी

रंभापुरी पीठ, मु.पो. बाळेहोन्नूरु,
जि. चिक्कमगळुरू (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमी महाराष्ट्रातील बार्शी येथील वैरागकर मठाचे श्री. वे. बाळलिंग स्वामी आणि सौ. लक्ष्मीबाई या माहेश्वर दंपतीच्या पोटी जन्मास आले. पुढे त्याच मठाचे पट्टाध्यक्ष झाले. त्यावेळी त्यांचे नाव 'श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजी' ठेवण्यात आले. हे वीरगोत्रीय होते. त्यांनी बार्शी येथे प्राथमिक मराठी अध्ययन केले. पुढे संस्कृताध्ययनाकरिता इ.स. १९३८ मध्ये सोलापुरास आले. येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे श्री वे. जगदीश शास्त्रीजी नालवार यांचे शिष्य होऊन पाच वर्षेपर्यंत साहित्याचा अभ्यास करून १९४३ मध्ये 'काव्यतीर्थ' परीक्षेत उत्तीर्ण झाले.

त्याच वर्षी उच्च संस्कृत शास्त्राध्ययनाकरिता १९४३ मध्ये काशीक्षेत्री आले. त्यावेळचे पीठाचार्य श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर येथील कर्णघंटा संस्कृत महाविद्यालयात पं. रामवृक्ष सिंह (संघ) यांचे शिष्य होऊन न्याय, वेदान्त, मीमांसा इ. शास्त्रांचा अभ्यास करून प्रत्येक विषयात 'शास्त्री' पदवी घेतली. त्याशिवाय काशी हिंदू विश्वविद्यालयात हिंदीमधील एम.ए. पदवी मिळविली.

ते लहानपणापासून प्रतिभासंपन्न होते. त्यांनी हिंदी, संस्कृत, मराठी या भाषांत अपार पांडित्य संपादिले. काशीत अध्ययन करीत असताना श्रीमठाचे व्यवस्थापक म्हणून कार्य केले. १९५२ मध्ये काशीनाथ शास्त्रीजींनी लिहिलेल्या 'वीरशैवरत्न' या मराठी पुस्तकाच्या द्वितीय आवृत्तीचे कार्य श्री पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजी यांनी समर्थपणे पार पाडले.

काशीचे अध्ययन पूर्ण करून ते बार्शीला परतले. महाराष्ट्रात प्रवचनादींच्या माध्यमातून धर्मप्रचाराचे कार्य पार पाडले. त्यांचे सदाचारत्व, विद्वत्ता,

लोकप्रसिद्धी पाहून रंभापुरी जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजी प्रसन्न झाले. त्यांनी पीठाचा उत्तराधिकार यांना देण्याचे निश्चित केले. दि. १५.५.१९७२ रोजी शालिवाहन श. १८९४ परिधावीनाम संवत्सर, निज वैशाख मास, शुद्ध तृतीया सोमवारी मध्याह्न १२.१० या शुभमुहूर्तावर रंभापुरी पीठाचा उत्तराधिकार पट्टाभिषेक अत्यंत वैभवाने आयोजित करण्यात आला. तेव्हा त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी' असे नूतन नामकरण करण्यात आले. उज्जयिनी जगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैल जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी, काशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या सान्निध्यात हा कार्यक्रम पार पडला. केदारपीठाचे जगद्गुरू शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी शुभ संदेश पाठविला होता. पुढे त्यांनी रंभापुरी पीठपरंपरेनुसार धर्मजागृतीचा कार्यक्रम १९ वर्षेपर्यंत अव्याहतपणे पार पाडला. प्रकृती अस्वास्थाने ते दि. १८.८.१९९१ रोजी रंभापुरी पीठात लिंगैक्य झाले.

त्यांच्यानंतर त्यांच्या इच्छापत्रानुसार हळ्याळ (ता. हुब्बळ्ळी, जि. धारवाड) येथील हिरेमठाच्या शिवलिंग क्षेत्रीचे मेलणगवी मठाचे पट्टाध्यक्ष असणारे श्री सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी यांना पीठाचा उत्तराधिकार देण्यात आला. उज्जयिनी श्रीजगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीकेदारजगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैल-जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी, श्रीउज्जयिनी जगद्गुरू मरुळाराध्य शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अमृतहस्ते दि. ६.२.१९९२ रोजी वैभवपूर्णरित्या पट्टाभिषेक संपन्न झाला. तेव्हा त्यांना 'श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी' असे नूतन नामाभिधान देण्यात आले.

---

संदर्भ : पुण्यश्लोक वारद, पृ. २९७.

## १७०. वे.पं. एम. बी. गुरुसिद्ध स्वामीजी

श्रीशैलपीठाचे सर्वाधिकारी (माजी)

मु.पो. मुदेनूरु, ता. राणेबेन्नूरु, जि. हावेरी (कर्नाटक)



हे वृषभगोत्रीय होत. हे मुदेनूरु हिरेमठ वे. बसय्या व सौ. रुद्रम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ९.५.१९२३ मध्ये जन्मले. मुदेनूरु हे गाव मृकंडु महामुनीच्या तपश्चर्येचे फळ. येथे तुंगभद्रा आणि कुमुद्वती या नद्यांचा संगम आहे. या गावाला पूर्वी मृकंडरनूर असे नाव होते. कालांतराने मृडनूरु झाले. सध्या मुदेनूरु हे नाव रूढ झाले आहे.

हा मठ श्रीशैलपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. इ.स. १८६१ मध्ये व्हिक्टोरिया महाराणीने सर्व्हे नंबर १ मध्ये २० गुंठे आणि सर्व्हे नंबर ९५ मध्ये २० एकर इनामी जमीन दिली आहे. या जमिनी आजदेखील मठाच्या स्वाधीन आहेत. आजपर्यंत ११ पट्टाध्यक्ष या मठास होऊन गेल्याचे पुरावे आहेत. यांच्यात श्री ष.ब्र. रुद्राख्य देशिकेंद्र स्वामीजी, वीराख्य देशिकेंद्र स्वामीजी आणि शांतवीर देशिकेंद्र स्वामीजी हे प्रमुख होत. या मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. वागीश पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी हे श्रीशैलपीठाचे जगद्गुरू झाल्यानंतर रिक्त स्थानावर श्री. एम. बी. गुरुसिद्ध स्वामीजींना उत्तराधिकारी म्हणून नियुक्त करण्यात आले.

प्राथमिक शिक्षण मुदेनूरु येथे, माध्यमिक शिक्षण राणेबेन्नूरु येथे पूर्ण करून उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. ९.८.१९४३ रोजी प्रवेश घेतला. येथे प्रथम चार वर्षेपर्यंत आयुर्वेदाचा अभ्यास केला. नंतर बंगाली टोला इंटर कॉलेजात इंटरमिडियेट परीक्षा उत्तीर्ण केली. नंतर काशी हिंदू विश्वविद्यालयातून स्नातक पदवी आणि त्याच विश्वविद्यालयाच्या मानसशास्त्र विभागातून स्नातकोत्तर (एम.ए.) पदवी परीक्षेत ते उत्तीर्ण

झाले.

अशा रीतीने त्यांनी काशीक्षेत्री १९५३ पर्यंत अध्ययन केले. या १० वर्षांच्या काळात काशी वीरशैव विद्वत् संघाचे कार्यदर्शी म्हणून कार्यक्रम पार पाडले. तसेच संघाचे मुखपत्र 'विपंची' हस्तलिखित मासिकाचे संपादक म्हणून कार्य केले.

श्री गुरुसिद्ध स्वामीजींनी येथे विद्यार्थी असताना १९४४ मध्ये झालेला श्रीवीरभद्र जगद्गुरूंच्या पट्टाभिषेकात आणि १९४८ मध्ये झालेल्या श्री विश्वेश्वर जगद्गुरूंच्या पट्टाभिषेकात सक्रिय भाग घेतला होता. १९५३ मध्ये ते स्वग्रामी आले. 'धर्मराज्य' नामक मासिकाचे संपादक म्हणून काम पाहिले. पुढे १९५५ पासून १९९५ पर्यंत ४० वर्षे श्रीशैलपीठाचे सर्वाधिकारी म्हणून सेवा केली. हरिहर येथे स्थापिलेल्या श्रीजगद्गुरू पंचाचार्य विश्वधर्म विद्यापीठाचे संस्थापक उपाध्यक्ष म्हणून शैक्षणिक क्षेत्रात अपार सेवा केली. दि. १७.११.१९८९ मध्ये चाललेल्या श्रीजगद्गुरू चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींच्या पट्टाभिषेकात सहभागी होऊन त्यावेळी निर्माण झालेल्या कायदेशीर अडचणी दूर करून पट्टाभिषेक सरळ तसेच सर्वांगसुंदर करण्यात त्यांची सेवा उल्लेखनीय आहे. आपल्या दैनंदिन जीवनात दिवसातून एकदा का होईना काशीला स्मरल्याशिवाय ते राहत नव्हते. वृद्धापकाळाने दि. १६.६.२००७ रोजी ते लिंगैक्य झाले.

## १७१. वे. संगनबसव स्वामीजी हिरेमठ

मु.पो. जत, जि. सांगली (महाराष्ट्र)



हा पुत्रवर्ग परंपरेतील मठ. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. या मठाचे पट्टाधिकारी श्री संगमेश्वर शास्त्रीजी विजयपूर जिल्ह्यातील येरनाळ गावचे होत. तेथील हिरेमठाचे श्री. वे. रेवणसिद्धय्या आणि सौ. सिद्धलिंगव्वा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९२३ मध्ये त्यांचा जन्म झाला. तेव्हा त्यांचे राचय्या असे नामकरण करण्यात आले होते.

त्यांनी येरनाळ आणि डोणूरु या गावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. पुढे जत हिरेमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या थोरल्या भावाचा मुलगा राचय्या यास आपल्या मठाचा उत्तराधिकारी म्हणून १९३४ मध्ये नेमले. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. संगनबसव शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

पुढे त्यांनी आपल्या गुरुवर्यांच्या आदेशानुसार अथणी येथील संस्कृत पाठशाळेत प्रारंभिक संस्कृत शिक्षण घेतले. नंतर सोलापूर येथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्रींच्या शिष्यत्वाखाली साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. पुढे उच्च संस्कृत व्यासंगाकरिता पं. जगदीशशास्त्रीजींच्या आदेशानुसार ते काशीक्षेत्री आले.

तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २९.११.१९४३ रोजी प्रवेश घेतला. त्यानंतर येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात सहा वर्षेपर्यंत संस्कृताध्ययन करून 'साहित्याचार्य' पदवी मिळविली. लिंगैक्य जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी आणि रंभापुरी पीठाचे लिंगैक्य श्रीजगद्गुरू वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी हे पूर्वाश्रमी त्यांचे सहाध्यायी होते. संस्कृतचे अध्ययन पूर्ण केल्यानंतर

श्रीकाशीजगद्गुरू काशी विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीनुसार त्यांनी १९४९ पासून १९५८ पर्यंत ९ वर्षे अलाहाबाद येथील जंगमवाडी मठाचे व्यवस्थापक म्हणून कार्य पाहिले.

अलाहाबाद जंगमवाडी मठात व्यवस्थापक म्हणून असताना आपला पट्टाधिकार त्यागून ते गृहस्थाश्रमी झाले. १९५८ मध्ये जतला परतल्यानंतर आपल्या गावच्या हायस्कूलमध्ये हिंदी-संस्कृतचे अध्यापक म्हणून काम पाहू लागले. पुढे प्रकृती अस्वास्थामुळे १९६२ मध्ये वयाच्या ३९ व्या वर्षी लिंगैक्य झाले. ते लिंगैक्य झाल्यानंतर जत हिरेमठास आजपर्यंत कोणासही पट्टाधिकारी म्हणून नेमलेला नाही. म्हणून त्या मठाचा पट्टाधिकार हल्ली खंडित झाला आहे.

### १७२. श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजी

शिखरमठ, मु.पो. रायचूर आणि हावगीस्वामी मठ,
मु.पो.ता. उदगीर, जि. लातूर (महाराष्ट्र)



रायचूरचा शिखरमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. अनेक शिवाचार्य या मठावर होऊन गेले आहेत. या मठास शिष्यवर्ग तसेच इनामी जमिनी आहेत. या मठाचे सध्याचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजी हे होत.

ते पूर्वाश्रमीचे रायचूरु शिखरमठचे वे.पं. सिद्धरामशास्त्री आणि सौ. संगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९२३ मध्ये जन्मास आले. त्यांनी रायचूरु येथे सातवीपर्यंतचे शिक्षण घेतले. नंतर रायचूरच्या वीरशैव विद्यार्थी निलयात प्रवेश घेतला. त्यांनी पं. गलगली शास्त्री आणि वडील पं. सिद्धाराम शास्त्री यांच्याकडे प्राथमिक संस्कृताध्ययन केले. वडिलांच्या प्रेरणेने पुढील संस्कृताध्ययनाकरिता यादगिर येथील शंकर संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन तेथे वे.पं. होळ्लु चंद्रशेखर शास्त्रींचा शिष्य

होऊन साहित्यशास्त्राचा अभ्यास केला आणि तेथूनच 'काव्यतीर्थ' परीक्षा देऊन ते उत्तीर्ण झाले.

त्यानंतर पुढील उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९४३ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील पं. शिवदत्त मिश्र, गोस्वामी इ.कडे न्याय तसेच वेदान्त या शास्त्रांचा चार वर्षेपर्यंत अभ्यास केला. याशिवाय येथील आयुर्वेद महाविद्यालयात 'आयुर्वेद भिषक्' परीक्षेत उत्तीर्ण झाले.

काशीच्या अखिल भारतीय सनातन ब्राह्मण परिषदेकडून त्यांना 'विद्याभास्कर' अशी पदवी देण्यात आली. काशी येथील अध्ययन पूर्ण करून रायचूरला आल्यानंतर महाराष्ट्रातील लातूर जिल्ह्यातील उदगीर येथील हावगी स्वामी मठाच्या भक्तांनी त्यांना आपल्या मठाचे पट्टाधिकारी म्हणून निवडले. नंतर १.६.१९५१ रोजी रंभापुरी पीठाचे श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात उदगीर येथे हावगी स्वामी मठावर त्यांचा पट्टाधिकार झाला.

त्या समारंभास भारतीय सेनेचे सरसेनापती जनरल करिअप्पा उपस्थित होते हे विशेष. मेधावी, कार्यकुशल असे श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजी रायचूरु शिखर मठाचे आणि उदगीर हावगी स्वामी मठाचे अधिपती होऊन कार्य पाहत होते. ते २००७ मध्ये लिंगैक्य झाले.

**१७३. श्री. सदाशिवमूर्ती ऊर्फ चन्नबसवय्या**

वडील वीरय्यागारु कुंतलगुंटी, मु. देवरपल्ली,

पो. तोटवोल्लूरू, ता. बेरवाड, जि. कृष्णा (आंध्र प्रदेश)

हे वीरगोत्रीय होत. ते वयाच्या सोळाव्या वर्षी दि. ११.८.१९४४ रोजी संस्कृत उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. येथील सुप्रसिद्ध जंगमवाडी महामठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात संस्कृत, इंग्लिश, हिंदीचा अभ्यास केला.

**१७४. श्री. मल्लिकार्जुन शर्मा बी. ऊर्फ रेवणसिद्धय्या**

वडील वीरप्पय्या,

मु. पिळ्ळेनहळ्ळी, पो. सखराय पट्टण, जि. चिक्कमगळूरु (कर्नाटक)

हे नंदिगोत्रीय होत. त्यांनी बिरूरीच्या वीरशैवानंदाश्रमात अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेची 'काव्यमध्यमा' परीक्षा उत्तीर्ण केली. वयाच्या २१ व्या वर्षी दि. १८.७.१९४४ मध्ये काशी जंगमवाडी मठातील श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे काव्य तसेच वेदान्ताचा अभ्यास केला.

**१७५. श्री. वे. सिद्धय्या ऊर्फ श्रीपती पंडित**

मु. पिळ्ळेनहळ्ळी, पो. सखराय पट्टण, जि. चिक्कमगळूरु (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होत. बीरुरीच्या वीरशैवानंदाश्रमात अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या 'काव्यमध्यमा' परीक्षा उत्तीर्ण केली. पुढे वयाच्या २२ व्या वर्षी दि. १८.७.१९४४ रोजी काशीच्या जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे काव्य, न्याय तसेच वेदान्त शास्त्रांचा अभ्यास केला.

## १७६. श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी

मानूरकर मठ,

मु.पो. माणूर, जि. बीड (महाराष्ट्र)



मराठवाड्यातील बीड जिल्ह्यातील माणूर येथील हिरेमठ रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठास खूप मोठी जमीन तसेच परंपरागत भक्तवर्ग आहे. पाचशे वर्षांपूर्वी या मठाच्या परंपरेत श्री ष.ब्र. नागेश्वर शिवाचार्य पट्टाध्यक्ष होते. त्यांच्या आशीर्वादानेच महाराष्ट्रातील सुप्रसिद्ध संत मन्मथस्वामींचा जन्म झाला, असा इतिहास आहे.

माणूर मठ शिष्यवर्गपरंपरेतला आहे. या मठाचे उत्तराधिकारी म्हणून आलेले विरूपाक्ष स्वामीजींनी १९४० मध्ये सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत वे.पं. जगदीशशास्त्रींचे शिष्य होऊन साहित्याचे अध्ययन पूर्ण केले. पुढे १९४४ मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाचार्य श्रीजगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील विभिन्न विद्वानांकडून व्याकरण तसेच साहित्य या शास्त्रांचा अभ्यास करून पांडित्य संपादिले. त्यानंतर स्वस्थानी परतले. धर्मप्रचारास स्वतःला वाहून घेतले. ९१ वर्षेपर्यंत धर्मकार्य केले. हे २००६ मध्ये लिंगैक्य झाले.

हल्ली लिं. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजींच्या इच्छापत्रानुसार श्री ष.ब्र. गिरी शिवाचार्य स्वामीजी माणूरमठाचे पट्टाध्यक्ष झाले. आजारपणाने काही वर्षांनी ते दि. २७.९.२०११ रोजी लिंगैक्य झाले. आता त्यांच्या स्थानी श्री विरूपाक्ष शिवाचार्य स्वामी आहेत. दि. १७.८.२०१६ ला त्यांचा पट्टाभिषेक झाला. तेच मठाचे सर्व व्यवहार पाहात आहेत.

**१७७. श्री. वे. सोमशेखर शास्त्री बृहन्मठ**



काळी बिल्डिंग, काळे लेऔट, बेंगेरी,
(खादी ग्रामोद्योग केंद्राजवळ),
मु.पो.ता. हुब्बळ्ळी, जि. धारवाड (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८३६-२२८४४६९

श्री सोमशेखर शास्त्रीजी दावणगेरे जिल्ह्यातील चन्नगिरी तालुक्याच्या संतेबेन्नूरु होबळी नीतिगेरे गावचे. वडील सिद्धय्या व आई गंगम्मा यांच्या पोटी दि. ४.१०.१९२२ रोजी जन्मास आले. त्यांनी आपल्या गावीच प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. १९३६ मध्ये मुल्की परीक्षा द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण केली. पुढे शिवमोग्गा येथे माध्यमिक शिक्षण घेऊन १९३९ मध्ये एस.एस.एल.सी. परीक्षेत उत्तीर्ण झाले.

त्यांनी काही दिवस शिक्षक म्हणून काम केले आणि नंतर व्यापारउद्योगात गुंतले. त्यानंतर स्वातंत्र्य-आंदोलनात सहभागी झाले. दि. १९.२.१९४५ रोजी संस्कृताध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीनुसार श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

काशी येथे विभिन्न विद्वानांकडून व्याकरणादी शास्त्रांचा अभ्यास केला. अध्ययनकाळात योगाभ्यास करण्याच्या महत् उद्देशाने विंध्याचल येथे असणाऱ्या एका योग्याकडून कुंडलिनी विद्येचा अभ्यास केला. पुढे १९४९ मध्ये काशीहून आपल्या गावी परतले. सध्या ते हुब्बळ्ळीतील बेंगेरी उपनगरात गृहस्थाश्रमी जीवन व्यतीत करीत आहेत. वैदिक, आयुर्वेद तसेच ज्योतिषशास्त्राचा लोककल्याणार्थ उपयोग करीत आहेत. सध्या ते ९७ वर्षांचे वयोवृद्ध झाले तरी बौद्धिक तसेच शारीरिकदृष्ट्या निरोगी आहेत.

## १७८. श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ, मु.पो. पडसावळगी (पडुसलगी),
ता. आळंद, जि. कलबुर्गी (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमी बागलकोट जिल्ह्यातील हुनगुंद तालुक्यातील दम्मूरु गावच्या हिरेमठाचे होते. त्यांनी बालपणीच श्रीमद्वीरशैव शिवयोग मंदिरात १९३० मध्ये प्रवेश घेतला. तेथे कन्नड शिकत पगडदिन्नीचे पं. बसवराज शास्त्रींचे शिष्यत्व पत्करून संस्कृत भाषेबरोबर साहित्य तसेच वेदान्तशास्त्राचा अभ्यास केला. पुढे उच्च संस्कृताध्ययनाकरिता ते १९४५ मध्ये काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाध्यक्ष श्री १००८ जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या कृपाशीर्वादास पात्र होऊन त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील शासकीय संस्कृत कॉलेज (क्विन्स कॉलेज) मध्ये प्रवेश घेऊन ७ वर्षेपर्यंत शास्त्रांचा अभ्यास केला. पुढे १९५२ मध्ये पडसावळगी हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. यांनी आपल्या काळात या मठाचा जीर्णोद्धार करून मठातच कन्नड प्राथमिक शाळा सुरू केली.

श्री विनोबा भावेंच्या भूदानयज्ञात त्यांनी आपल्या मठाची ५ एकर भूमी दान दिली. त्याशिवाय आपल्या भक्तांकडून ६१ एकर जमीन दान करविली. प्रतिवर्षी यात्रेत पुराण, कीर्तनाच्या माध्यमातून धर्मजागृती करीत ते मठाची परंपरा पुढे चालवीत राहिले. पडसावळगी हिरेमठ हा रंभापुरीचा शाखामठ आहे.

त्यांच्यानंतर या मठात श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी पट्टाधिकारी झाले. ते मठाची परंपरा व्यवस्थितरित्या चालवीत आहेत. याशिवाय २००९ मध्ये उदगीरच्या हावगीस्वामी मठाचे पट्टाधिकारी होऊन दोन्ही मठांची परंपरा चालवीत आहेत.

---

संदर्भ : शिवयोग मंदिर बेळगु, १९६०, पृ. ३१६.

### १७९. श्री. वीरनगौडा मल्लिकार्जुन गौडा पाटील

मु. कोलशिरसी, पो.ता. सिद्धापूर, जि. उत्तर कन्नड (कर्नाटक)

हे नंदिगोत्रीय होते. त्यांनी शिरसीच्या मारिकांबा माध्यमिक शाळेत सहावी इयत्तेपर्यंत शिक्षण घेतले. वयाच्या २१ व्या वर्षी दि. १०.८.१९४६ रोजी त्यांनी श्रीकाशीज्ञानसिंहासनाधीश्वर जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यांनी येथे आर्टस् विषय घेऊन पुढील शिक्षण पूर्ण केले.

### १८०. श्री. एस. आर. सोमशेखर शर्मा



वकील, विजयवाडा, पार्वती निवास,
घर क्र. ११-४५-६०,
तावावरी स्ट्रिट, विजयवाडा ५२० ००१ (आंध्र)

हे मुळातले रायचूरु जिल्ह्यातले. त्यांच्या वडिलांचे नाव एस. सुगरय्या. त्यांचे गोत्र स्कंद. त्यांनी प्राथमिक शिक्षण रायचूर येथे पूर्ण केले. नंतर तिरुपती वेंकटेश्वर ओरिएंटल कॉलेजात अभ्यास करून मद्रास विश्व-विद्यालयाच्या 'साहित्यशिरोमणी' या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

पुढे श्रीकाशीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या सल्ल्यानुसार उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री येऊन दि. २०.६.१९४६ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे दोन वर्षेपर्यंत इंग्रजीचा अभ्यास करून इंटरमिडिएट परीक्षेत उत्तीर्ण झाले. नंतर धारवाडला गेले. तेथे बी.ए. प्रथम वर्षाचा अभ्यास कर्नाटक कॉलेजमध्ये केला. काही कारणाने तो अभ्यास अपूर्ण सोडून बागलकोट जिल्ह्यातील हुनगुंदच्या हायस्कूलमध्ये अध्यापनकार्यास वाहून घेतले. पुढे काही दिवसांतच

काशीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य झाल्याचे ऐकून ते पुन्हा काशीक्षेत्रास गेले.

काशीपीठाचे तत्कालीन नूतन पीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या सूचनेनुसार त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात पुन्हा प्रवेश घेतला. काशी हिंदू विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन १९५० मध्ये बी.ए. पदवी प्राप्त केली. नंतर दोन वर्षेपर्यंत अभ्यास करून त्याच विद्यापीठाची मानसशास्त्र विषयातील एम.ए. पदवी प्राप्त केली. त्यासोबत सांध्य महाविद्यालयात एल्.एल्.बी.चा अभ्यास करून कायद्याची पदवीदेखील मिळविली. याप्रमाणे १९५४ पर्यंत आपला अभ्यास पूर्ण करून श्रेष्ठ कायदेतज्ज्ञ म्हणून हैदराबाद, गुंटूर, विजयवाडा येथे वकिली करू लागले. ते हैदराबाद येथे वास्तव्याला आहेत. काशीजगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या विशेष कृपाशीर्वादास पात्र असून विजयवाडा येथील काशीपीठाच्या विश्वाराध्य मंदिराची व्यवस्थादेखील पाहत आहेत.

## १८१. पं. जी. एम. उमापती शास्त्रीजी

मु.पो. गौरापूर, ता. तरीकेरी,
जि. चिक्कमगळूरु (कर्नाटक)



पं. जी. एम. उमापती शास्त्रीजी तरीकेरे तालुक्यातील आज्जमपूरजवळ असणाऱ्या गौरापूर गावचे होते. तेथील मळाल हिरेमठाचे श्री. वे. मल्लय्या यांचे ते ज्येष्ठ सुपुत्र होत. त्यांचा जन्म १९२६ मध्ये झाला. ते सहा वर्षांचे असतानाच सकराय पट्टणचे श्री ष.ब्र. सदाशिव शिवाचार्य स्वामीजी यांनी १९३२ साली त्यांना श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात आणून सोडले.

श्री उमापतींनी शिवयोग मंदिरात कन्नडचे प्राथमिक शिक्षण तसेच योगशिक्षण घेतले. पुढे ते हुब्बळ्ळीला आले. तथील होसमठ श्री म.नि.प्र. शिवबसव स्वामीजींकडे संस्कृतचे अध्ययन करून पंचकाव्यांचा अभ्यास केला. त्यांची बुद्धिमत्ता आणि आचारविचार पाहून आनंदपूरच्या मुरुघामठचे श्री म.नि.प्र. ज. सच्चिदानंद महास्वामीजींनी त्यांना आपल्या संस्थानमठास मरिदेवरु (बटु) म्हणून स्वीकारले आणि संस्कृतच्या उच्च व्यासंगासाठी काशीक्षेत्रास पाठविले.

यांनी तेथील जयदेववाडी मठात १९४१ मध्ये प्रवेश घेतला. नंतर शासकीय क्विन्स संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेतला. तेथील सुप्रसिद्ध न्यायशास्त्राचे विद्वान पं. शिवदत्त मिश्र यांचे शिष्यत्व पत्करून न्यायशास्त्राचा अभ्यास केला. १९४७ मध्ये त्यांनी नव्यन्यायशास्त्र परीक्षा द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण केली. पुढे आचार्य परीक्षेची तयारी देखील केली.

याप्रमाणे संस्कृतचा अभ्यास करीत असतानाच हिंदी व इंग्लिश भाषांचा अभ्यास करण्यासाठी तेथील सनातन धर्म माध्यमिक शाळेत नाव नोंदविले. १९४५ मध्ये बाहेरून मॅट्रिक परीक्षा देऊन ते उत्तीर्ण झाले. पुढे अँग्लो बंगाली इंटर मिडिएट कॉलेजमध्ये नाव नोंदवून १९४६ मध्ये इंटरमिडिएट परीक्षा द्वितीय श्रेणीत उत्तीर्ण झाले.

नंतर काशी हिंदी विश्वविद्यालयातील कला विभागात प्रवेश घेऊन हिंदी व मानसशास्त्र या विषयांत १९४९ मध्ये बी.ए. पदवी मिळविली.

१९४६ ते १९४९ पर्यंतच्या त्यांच्या अध्ययनात काही प्रतिकूल परिस्थिती निर्माण झाल्यामुळे ते जयदेववाडी मठ सोडून श्री जंगमवाडी मठात आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींनी अनुमती दिल्याने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. सुशील, विद्याविनयसंपन्न अशा पं. उमापती शास्त्रीजींनी काशीतील शेवटची दोन वर्षे जंगमवाडी मठात राहून येथील विद्यार्थ्यांच्या मनात स्नेह व सौहार्द भावना निर्माण केली.

अशा रितीने काशीत राहून उच्चविद्याविभूषित होऊन कर्नाटकात परतल्यानंतर श्री म.नि.प्र. सदाशिव स्वामीजी हानगल यांच्या आज्ञेनुसार श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिर येथे प्राध्यापक म्हणून ते रुजू झाले. त्याशिवाय 'सुकुमार' नावाचे मासिक सुरू करून पाच वर्षेपर्यंत स्वतः संपादक म्हणून काम पाहिले. शिवयोग मंदिरात राहून ताडपत्रांवरील लेख संशोधित करून 'सुकुमार' ग्रंथरूपाने प्रसिद्ध केले.

पुढे १९५४ मध्ये त्यांनी बसवेश्वर कॉलेजात हिंदीचे प्राध्यापक म्हणून कार्य केले. कर्नाटकात राहून काशी हिंदू विश्वविद्यालयाची हिंदी एम.ए. आणि साहित्य संमेलनाची 'साहित्यरत्न' परीक्षा उत्तीर्ण केली. बागलकोट येथील डॉ. शि. चि. नंदिमठ यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधनकार्यही केले. श्री बसवेश्वर, प्रभुदेव आणि अक्कमहादेवींची वचने हिंदी भाषेत अनुवादिली.

पं. उमापती शास्त्रीजी चित्रकलेत प्रवीण आहेत. हल्ली ते धर्मस्थळ येथील श्री मंजुनाथ देवालयाच्या हस्तलिखित ग्रंथालयाचे प्रमुख म्हणून कार्य पाहत आहेत.

## १८२. श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ

मु.पो. सुरुकोड, ता. नरगुंद, जि. गदग (कर्नाटक)



सुरकोड हिरेमठ रंभापुरी पीठाचा हा शाखामठ पुत्रवर्गपरंपरेतील आहे. या मठाला देखील स्वतःची ऐतिहासिक परंपरा आहे. आजपर्यंत या मठावर २० पट्टाध्यक्ष होऊन गेले आहेत. यातील १६ वे श्री ष.ब्र. शिवरुद्र शिवाचार्य लिंगैक्य झाल्यानंतर त्या मठाचे अधिकारी म्हणून आलेले श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी होत. ते पूर्वाश्रमी हिरेमठाचे कीर्तनकेसरी श्री वीरार्य शास्त्रीजी आणि सौ. शंकरम्मा यांच्या पवित्र गर्भी १९२२ मध्ये महानवमीच्या दिवशी जन्मले. त्यांचे 'गुरुपादय्या' असे नाव ठेवण्यात आले.

चि. गुरुपादय्यांचे प्राथमिक शिक्षण सुरुकोड येथे पूर्ण झाले. ते आपल्या वडिलांकडून वीरशैवधर्माचे आचारविचार शिकले. पुढे सुरुकोड येथील हिरेमठाचे तत्कालीन पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. शिवरुद्र शिवयोगी शिवाचार्य स्वामीजींनी चि. गुरुपादय्यांना आपल्या मठाचा उत्तराधिकारी नियुक्त केले.

नंतर त्यांना गुरुवर्यांनी संस्कृताध्ययनाकरिता सोलापुरास पाठवून दिले. तेथील सुप्रसिद्ध श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन पं. मल्लिकार्जुन शास्त्रीजींचे शिष्यत्व पत्करून त्यांनी संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. ते कलकत्त्याच्या वंगीय शिक्षा परिषदेच्या काव्य-आद्य तसेच काव्य-मध्य या परीक्षांत उत्तीर्ण झाले. माघ शुद्ध पंचमी, दि. १५.२.१९४६ रविवारी हुब्बळ्ळी हन्नेरडु मठाचे वीरतपस्वी श्री ष.ब्र. मडिवाळ शिवाचार्य स्वामीजींकडून त्यांचा पट्टाभिषेक कार्यक्रम मोठ्या वैभवात पार पडला. तेव्हा त्यांचे 'श्री गुरुपाद शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले.

त्यानंतर ते उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. ११.७.१९४९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश

घेतला. येथे पाच वर्षेपर्यंत वास्तव्य करून साहित्यशास्त्राचा चांगला अभ्यास केला. कलकत्त्याच्या 'काव्यतीर्थ' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. नंतर स्वग्रामी परतून धार्मिक अनुष्ठान करू लागले.

श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या मठात अनुष्ठान करताना 'मंत्रबीज कोश', 'पंचाक्षर प्रभेद', 'बिल्वोपनिषत्तु' आणि 'पुरुषसूक्त' नामक छोटे छोटे ग्रंथ मुद्रित करून प्रसिद्ध केले. याप्रमाणे श्रीगुरुपाद शिवाचार्य स्वामीजी धार्मिक कार्यक्रम पार पाडताना कोप्पळ जिल्ह्यातील यलबुर्गा नगरीचे संस्थान हिरेमठाचे पट्टाधिकारी श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या वंशोद्धारासाठी पट्टाधिकार त्यागून गृहस्थाश्रम स्वीकारला. तेव्हा या यलबुर्गा मठाचे परंपरागत धार्मिक कार्यक्रम पुढे चालू ठेवण्यासाठी केदारपीठाचे श्री १००८ जगद्गुरू 'रावल' शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने सुरुकोडच्या श्री गुरुपाद शिवाचार्य स्वामीजींनी यलबुर्गा हिरेमठाचा पट्टाधिकार दि. १७.५.१९७० रोजी स्वीकारला.

यलबुर्गा हिरेमठाचे पट्टाधिकारी झाल्याने मठाच्या परंपरेनुसार त्यांचे 'श्री ष.ब्र. सिद्धाराम शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. पुढे ते मठाचा जीर्णोद्धार करीत धार्मिक कार्यक्रम अव्याहतपणे ३२ वर्षे चालवीत राहिले. श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजींनी येथे देखील श्री सिद्धरामेश्वर प्रकाशन संस्था स्थापून 'बसवादी प्रमथर पदगळु', 'नागलिंग त्रिविधी', 'मंत्रगौप्य' आणि 'सिद्धाराम संपद' इ. वीरशैव ग्रंथ प्रकाशित केले. याप्रमाणे त्यांनी यलबुर्गा हिरेमठाचे सर्व धार्मिक कार्यक्रम निरंतर ३२ वर्षे चालविले. त्या मठाचे पूर्वीचे पट्टाध्यक्ष असणारे श्री सिद्धराम स्वामीजींच्या तृतीय पुत्रास दि. १०.२.२००० रोजी पट्टाधिकार देऊन त्यांचे 'श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य' असे नामकरण केले. पुढे दि. १९.६.२००४ मध्ये ८२ व्या वर्षी यलबुर्गा येथे लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी यलबुर्गा मठात आहे.

१८३. **श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी**
हिरेमठ, मु.पो.ता. कूड्लगी,
जि. बळ्ळारी (कर्नाटक)



हे बेंगळूरुच्या जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयातून 'वेदान्त विद्वत्' परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. पुढे कूड्लगी हिरेमठाच्या सिद्धरामय्या आणि कूड्लगी पटेल वीरभद्रगौड यांच्या प्रेरणेने आणि प्रोत्साहने उच्च व्यासंगाकरिता वयाच्या २० व्या वर्षी काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ३.७.१९४९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात संस्कृत साहित्य हा विषय घेऊन त्यांनी व्यासंग केला. त्यांच्या विद्यागुरूचे नाव पंडित बटुकनाथ शास्त्री खिस्ते असे होते. कूड्लगी गावचा हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. त्याला परंपरानुगत शिष्य, इनामी जमिनी आहेत. बंडे बसापुर, अम्मनकेरे, बुटगण्णहळ्ळी, तुप्पन केरी इ. गावी त्याचे शाखामठ आहेत. या मठावर देखील अनेक पट्टाधिकारी होऊन गेले आहेत. या मठाचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी लिंगैक्य झाल्यानंतर वीस वर्षेपर्यंत हा मठ रिक्त होता. पुढे पुत्रवर्ग परंपरेत श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी पट्टाधिकारी झाले.

पुत्रवर्ग मठाचे श्री प्रशांत देवरू यांचा उत्तराधिकारी म्हणून स्वीकार करून दि. २.२.२०१२ रोजी त्यांचा पट्टाभिषेक करून त्यांचे श्री ष.ब्र. प्रशांतसागर शिवाचार्य असे नामकरण केले. पुढे २७.८.२०१८ रोजी ते लिंगैक्य झाले. सध्या प्रशांतसागर शिवाचार्य त्या मठाचे परंपरानुसार धार्मिक विधिविधान सांभाळत आहेत.

---

संदर्भ : गुरुवर्ग दर्पण, पृ. ८४.

## १८४. श्री ष.ब्र. राजेश्वर शिवाचार्य



गुरू श्री ष.ब्र. शिवस्वामी शिवाचार्य नडुवीन हळ्ळी,
पट्टद देवरमठ, मु. नीलगुंद,
ता. हरपनहळ्ळी, जि. बळ्ळारी (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय होत. सोलापूर होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेऊन कलकत्त्याच्या वंगीय शिक्षा परिषदेच्या काव्य-मध्यमा या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढे वयाच्या २२ व्या वर्षी दि. ३०.६.१९४९ मध्ये आपल्या गावच्या मुलाली शिवरुद्रप्पा आणि श्री. बडगेर मुदियप्पा यांच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. श्रीमत् काशीज्ञानसिंहासनाचे श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या आज्ञेनुसार त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे संस्कृत साहित्याचा चांगला अभ्यास केला. आपले अध्ययन पूर्ण करून स्वग्रामी परतले. पुढे आयुष्यभर धर्मकार्य करून दि. २९.५.१९८५ रोजी लिंगैक्य झाले.

## १८५. श्री. विश्वाराध्य शर्मा

वडील वे. चनबसय्या चिक्कमठ,
मु. मुक्कल्लु, पो. ता. कलघटगी, जि. धारवाड (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय होत. सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रारंभिक संस्कृताध्ययन केले. आपल्या गावच्या श्री. तिप्पण्णा कुसूगल, श्री. बी. एस. हूलिकट्टी आणि बी. सी. गौडर यांच्या प्रेरणेने वयाच्या १९ व्या वर्षी ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या आज्ञेनुसार जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २६.६.१९४९ रोजी प्रवेश घेतला. त्यांनी तेथे साहित्यशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला.

## १८६. वेदान्ताचार्य श्री नंदीश्वर महास्वामीजी

शिवानंद मठ, मु.पो.ता. जि. गदग (कर्नाटक)



गदगला शिवानंद मठ लि. श्री शिवानंद स्वामीजींकडून स्थापिलेला होता. ते हुब्बळ्ळीच्या श्री सिद्धारूढ स्वामीजींचे समकालीन होते. पूर्वाश्रमी रोण (जि. गदग) या गावच्या तोटगंटी घराण्याच्या श्री. लिंगनगौड आणि सौ. बसम्मा या वीरशैव शिवभक्तांच्या पुण्यगर्भी इ.स. १८५८ मध्ये ते जन्मले. त्यांचे नाव वीरनगौड. स्वग्रामी मुल्की परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर गृहस्थाश्रमी होऊन सुरेभान जवळच्या मनिहाळ गावचे पाटील होऊन कार्य केले. नंतर सत्संगाच्या प्रभावाने विरक्तभावाने शबरीकोळ्ळ येथे तपश्चर्या केली. पुढे बनहट्टीच्या हिरेमठाचे श्री ष.ब्र. शिवाचार्य स्वामी रुद्रमुनीकडून संन्यास ग्रहण केल्यानंतर त्यांचे शिवानंद असे नामकरण झाले. पुढे त्यांनीच गदग येथे एक मठ स्थापिला. त्याचे मुक्तेश्वर असे नामकरण केले. कालांतराने त्या मठाचे 'शिवानंद मठ' असे नाव रूढ झाले.

या मठाचे तिसरे स्वामीजी श्री नंदीश्वर महास्वामीजी. ते पूर्वाश्रमी हावेरी जिल्हा राणेबेन्नूरु तालुक्यातील सुणकल्ल बिदरी गावच्या श्री हालनगौड आणि सौ. चन्नबसम्मा या वीरशैव शिवभक्तांच्या पुण्यगर्भी दि. ५.६.१९२० रोजी जन्मास आले. तेव्हा त्यांचे बसनगौड असे नामकरण करण्यात आले. त्यांनी प्राथमिक शिक्षण स्वग्रामी पूर्ण केले. इ.स. १९३४ मध्ये ते मुल्की परीक्षा उत्तीर्ण झाले.

एकदा श्रावणमासात यांच्या गावात गदगच्या मुक्तेश्वर मठाचे श्री शिवानंद स्वामीजी आले होते. त्यांच्या पूजेच्या कार्यक्रमात सहभागी झालेल्या चि. बसनगौडाने आपल्या मधुर कंठाने गीत गायिले. ते ऐकून प्रसन्न झालेले श्री शिवानंद स्वामी त्याला आपल्या सोबत गदगला घेऊन

गेले. पुढे शिवानंद स्वामींचे शिष्य श्री. सदाशिवानंद स्वामीजी यांना संस्कृताध्ययनाकरिता काश्मीर प्रांतीच्या जम्मूला घेऊन आले. तेथे रघुनाथ शर्मा संस्कृत महाविद्यालयात यांना प्रवेश देऊन त्यांना श्री. नंदीश्वर शर्मा हे नवीन नाव देण्यात आले. तेथे १९३८ पासून १९४७ पर्यंत ९ वर्षे त्यांनी न्याय व वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास केला. पुढे हिंदुस्थान आणि पाकिस्तान विभाजन होऊन काश्मीरमध्ये हिंदूंवर अत्याचार होऊ लागले. तेव्हा नंदीश्वर शर्माजींना काश्मीर सोडून गदगला यावे लागले.

अभ्यासाची भूक न भागल्याने गुरुवर्यांच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता ते काशीस आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ३०.७.१९४९ रोजी प्रवेश घेतला. येथील सरकारी क्विन्स कॉलेजात आणि काशी हिंदू विश्वविद्यालयात साहित्य आणि वेदान्ताचा अभ्यास करून 'साहित्याचार्य' आणि 'वेदान्ताचार्य' या पदव्या मिळविल्या. त्यावेळी त्यांना दोन सुवर्णपदकेही मिळाली.

निरंतर आठ वर्षेपर्यंत काशी महापीठात राहून अभ्यास करून ते गदगला परतले. नंतर दि. २.२.१९८२ मध्ये मुक्तेश्वर मठ अर्थात् शिवानंद मठाचा अधिकार स्वीकारला. पुढे १८ वर्षे त्या मठाच्या परंपरेनुसार धार्मिक, आध्यात्मिक आणि शैक्षणिक कार्य करून ते दि. २०.३.२००० रोजी लिंगैक्य झाले.

---

संदर्भ : सज्जनिकेय साकार मूर्ती श्री. ज. नंदीश्वररु,
लेखक- बी. जी. मेणसगी, २००२.

१८७. **श्री. स्वामी शंकरानंद गिरी**

मु. कुंदनगुर्ती, पो. चिप्पगिरी,

ता. आवारु, जि. बळ्ळारी (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे आंध्र प्रदेशच्या अनंतपूर जिल्ह्यात लत्तवर (रत्नगिरी) गावचे. येथील हिरेमठ काशीपीठाचा शाखामठ आहे. या मठाचे श्री. वे. शिवय्या स्वामी आणि सौ. गंगमा यांच्या पवित्र गर्भी दि. १४.६.१९२० रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे चन्नबसव असे नामकरण करण्यात आले. त्यांनी प्राथमिक अध्ययन स्वग्रामी केले. उरवकोंडच्या करबसव स्वामी बोर्ड हायस्कूलमध्ये माध्यमिक शिक्षण पूर्ण केले.

पुढे वैराग्यवृत्तीमुळे घर सोडून त्यांनी अनंतपूर जिल्ह्याच्या गंजीगुंट गावी श्री सद्गुरू प्रणवानंदाच्या आश्रमात २२.६.१९३९ रोजी प्रवेश घेतला. तेथे काही वर्षे अभ्यासासोबत साधना केली. सद्गुरू प्रणवानंद स्वामीजींनी लत्तवर गावी 'उमा महेश्वर गुरुपीठ' स्थापन केले. पुढे चन्नबसव स्वामीजीनाच 'उमा महेश्वर' गुरुपीठाचे दि. २२.६.१९४५ रोजी पट्टाध्यक्ष करून त्यांचे 'श्री शंकरानंद गिरी' असे नामकरण केले.

त्यानंतर हे ब्रह्मश्री वीरप्पा स्वामीजींच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. येथे श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ५.७.१९४९ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर येथील सरकारी क्विन्स संस्कृत महाविद्यालयात वेदान्तशास्त्राचा पूर्ण अभ्यास केला. अध्ययन पूर्ण करून ते स्वग्रामी परतले. उमा महेश्वर पीठाच्या परंपरेनुसार अनेक धार्मिक कार्यक्रम करीत वैश्य समाजाचे गुरू होऊन शेवटच्या श्वासापर्यंत पूजा, अनुष्ठान, प्रवचने करीत निर्वाणपदास गेले.

## १८८. श्री. महेशानंद सिद्ध उखीमठ

मु.पो.ता. उखीमठ, जि. रुद्रप्रयाग (उत्तरांचल)



हे केदारनाथचे प्रमुख पुजारी श्री. सिद्धलिंग शर्मा व सौ. कस्तुरी यांच्या पवित्र गर्भी दि. ३०.१.१९३० मध्ये उखीमठात जन्मले. त्यांनी प्राथमिक शिक्षण उखीमठ येथे व माध्यमिक शिक्षण उत्तराखंड विद्यापीठाच्या गुप्तकाशीत पूर्ण केले. नंतर १९४९ मध्ये ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथ त्यांनी केवळ एक वर्ष संस्कृताध्ययन केले. पुढे १९५० पासून १९८८ पर्यंत उखीमठातील माध्यमिक शाळेत शिक्षक म्हणून कार्य केले. त्यांनी वीरशैवधर्म आणि सिद्धान्ताचा चांगला अभ्यास केला. १९८५ मध्ये केदार पीठाचे 'रावल' श्री सिद्धेश्वरलिंग शिवाचार्यांच्या पट्टाभिषेकात सक्रिय सेवा केली. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींकडून 'व्यवस्था विशारद' ही पदवी मिळविली. ते सामाजिक क्षेत्रात कार्यरत होते. त्यांनी उखीमठाचे काँग्रेस (आय) पक्षाध्यक्ष म्हणून कार्य केले आहे. सध्या केदारनाथचे पुजारी आणि 'रावल' यांच्या सेवेत कार्यरत आहेत.

## १८९. श्री. प्रल्हाद सोनप्पा कीर्तने

घर नं. १०७, सिद्धेश्वर पेठ, मु.पो. ता.जि. सोलापूर (महाराष्ट्र)

यांनी सोलापूरच्या हरिभाई देवकरण शाळेत मॅट्रिकपर्यंत शिक्षण घेतले. वयाच्या १८ व्या वर्षी काशीक्षेत्री येऊन ज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्यांच्या अनुमतीने दि. ६.७.१९५० रोजी काशी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे गणित तसेच विज्ञान या विषयांचा अभ्यास केला.

## १९०. श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी



मुत्तिन कंथीमठ
मु.पो.ता. जमखंडी, जि. बागलकोट (कर्नाटक)
स्थिरभाष : (०८३५३) २२०४०९

जमखंडीचा मुत्तिन कंथी मठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा आहे. या मठाचे श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी पूर्वाश्रमीचे श्री. वे. पंचाक्षरय्या व सौ. मुरीगेम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी १९३२ मध्ये जन्मास आले. त्यांनी जमखंडीत प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे १९४४ मध्ये मुत्तिन कंथी मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. नंतर संस्कृताध्ययनाकरिता सोलापूर श्रीमद् वीरशैव गुरुकुल, होटगी मठ येथे १९४७ मध्ये प्रवेश घेतला. श्री वे.पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्य होऊन चार वर्षेपर्यंत अध्ययन केले.

तदनंतर उच्च संस्कृताध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९५० मध्ये प्रवेश घेतला. त्यानंतर साहित्यासोबत ज्योतिषशास्त्राचा ५ वर्षेपर्यंत अभ्यास केला. १९५५ मध्ये काशीहून परतल्यानंतर आपल्या मठात मुलांसाठी वैदिक तसेच ज्योतिष शिकवण्यासोबत जवळपासच्या गावागावांतून व शहरांतून धार्मिक कार्यक्रमांत भाग घेऊन समाजाभिमुख होऊन कार्य करीत आहेत.

## १९१ . श्री ष.ब्र. ईश्वर शिवाचार्य स्वामीजी

लासिन मठ संस्थान,

मु.पो.ता. वसमत, जि. हिंगोली (महाराष्ट्र)



श्री ष.ब्र. ईश्वर शिवाचार्य यांचा जन्म १५.८.१९२२ रोजी शनिवारी श्री शिवलिंग व सौ. पार्वतीबाई या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी झाला. हे मूळचे कर्नाटकातील चिकोडी गावचे वतनदार होते. पूर्वाश्रमी त्यांचे नाव गुरुमूर्ती असे होते. त्यांच्या जन्मानंतर अल्पावधीतच मातापित्यांचे छत्र हरवले. त्यांच्या बहिणीने मोठ्या स्नेहाने त्यांचे पालनपोषण केले. परंतु तीदेखील नंतर शिवैक्य झाली. त्यानंतर ईश्वर शिवाचार्य यांचे संगोपन वयाच्या आठव्या वर्षापर्यंत त्यांच्या नातेवाईकांनी केले.

श्री ईश्वर शिवाचार्य यांना त्यांचे मामा जगद्‌गुरू श्री १००८ विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी पुढील अध्ययनाकरिता १९४८ मध्ये काशीला जंगमवाडी मठात नेले. माध्यमिक शिक्षण पूर्ण केल्यावर त्यांनी काशी विद्यापीठाची बी.ए. (संस्कृत) ही पदवी संपादन केली. १९४८ ते १९५० या काळात त्यांनी काशी येथे पारंपरिक व आधुनिक शिक्षण घेतले. त्यावेळी पांढुर्णा येथील पूर्व पट्टाधिकारी आणि नेरपिंगळाईचे देशिक हे दोघे ईश्वर शिवाचार्य यांचे सहाध्यायी होते.

श्रीकाशीजगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या आदेशानुसार ईश्वर शिवाचार्य यांनी १९५० मध्ये यावल व वसमत येथील लासिन या मठांचा पट्टाधिकार स्वीकारला. त्यांनी मठाचा आध्यात्मिक, सामाजिक, शैक्षणिक व आर्थिकदृष्ट्या विकास केला. कपिलधार यात्रा, शिवनाम सप्ताहाचे आयोजन, जगद्‌गुरूंचे अनुष्ठान, ग्रंथप्रकाशन, कीर्तन व प्रवचन यांद्वारे त्यांनी समाजाचे उद्‌बोधन केले. वयोमानानुसार शरीर क्षीण झाल्यामुळे श्री रेवणसिद्धदेव मानूरकर, नागपूर यांना त्यांनी उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केले. त्यांचा पट्टाधिकार दि. १६.५.२००६ रोजी निश्चित करण्यात आला.

परंतु २२.४.२००६ रोजी नागपूर येथे ईश्वर शिवाचार्य लिंगैक्य झाले. सध्या श्री ष.ब्र. करबसव शिवाचार्य स्वामीजी हे पट्टाधिकारी असून ते मठाच्या सर्वांगीण विकासासाठी अहर्निश प्रयत्न करीत असतात.

---

परिचय : डॉ. शशिकांत दरगू, नांदेड.

## १९२. श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी

आदिमठ संस्थान, धारेश्वर मठ,
मु.पो. धारेश्वर, ता. पाटण जि. सातारा (महाराष्ट्र)



धारेश्वरचा आदिमठ हा उज्जयिनी पीठाच्या वृष्टिसूत्र नंदिगोत्राचा मठ आहे. या गादीवर ३० शिवाचार्य होऊन गेले. त्यानंतर श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी हे ३१ वे शिवाचार्य झाले. पूर्वाश्रमी भिकवडी खुर्द (ता. खानापूर, जि. सांगली) येथील मा.मू. गुरुलिंग आणि सौ. काशीबाई यांच्या पुण्यगर्भी १९०८ मध्ये त्यांचा जन्म झाला. बालपणी वडील शिवैक्य झाल्यामुळे त्यांची आई मारूळ (ता. पाटण, जि. सातारा) येथे माहेरी आली. त्यावेळी प्लेगची साथ सुरू होती. त्यामुळे घरातील सर्वजण शिवैक्य झाले. फक्त आई व मुलगा वाचले. सासरी व माहेरी कोणीच जिवंत न राहिल्यामुळे आई मुलाला घेऊन धारेश्वर येथे आली.

मुलाचे मामा श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य हे धारेश्वरला तिसावे

मठाधिपती होते. त्यांनी बहिणीला व भाच्याला मठात आश्रय दिला व भाच्याचे शिक्षण पूर्ण केले. मल्लिकार्जुन शिवाचार्य तिसरीपर्यंत शिकले. तोपर्यंत ते सोळा वर्षांचे झाले होते. त्यानंतर त्यांनी आईला मठात सोडले व ते मुंबईला गेले. तेथे त्यांनी धान्यबाजारात हमाली केली. फळांच्या दुकानात व कापडदुकानात काम केले. आई काशीबाई अत्यंत आजारी आहे असे समजल्यावर ते मुंबईहून धारेश्वरला आले. आईची प्रकृती सुधारली. परंतु त्यांचे मामा धारेश्वरचे शिवाचार्य यांचा आजार वाढून ते १९३२ मध्ये भाद्रपद वद्य द्वितीयेला शिवैक्य झाले. त्यावेळी जमलेल्या सद्भक्तांनी श्री मल्लिकार्जुन यांना धारेश्वरच्या आदिमठ संस्थानच्या गादीचे ३१ वे उत्तराधिकारी घोषित केले.

त्यानंतर नियोजित बटूला नरहर स्वामी, कराड व शि.भ.प.पांडुरंगतात्या वाठारकर यांनी पौरोहित्य, पंचांग, ज्योतिष व भजन–कीर्तन प्रवचन शिकविले. अधूनमधून पुणे, कोडोली, सांगाव, तारळे आणि धारेश्वर परिसरातील शाखामठांच्या मालमत्तेचे संरक्षण करण्यासाठी त्यांना न्यायालयात धाव घ्यावी लागली. त्यांनी स्वातंत्र्यचळवळीतही भाग घेतला. परंतु मानधन घेण्यास विरोध केला. भूमिगत राहून राजाराम फल्ले, अण्णाबाळा राऊत वगैरे भक्तांना सहकार्य केले. तेवढ्यात पुणे मठातील कुलमुखत्याराने व उंबरदंड नावाच्या शिष्याने केलेल्या गोंधळामुळे सर्वच जागा जाणार हे लक्षात घेऊन जंगम स्मशानभूमी अशी नोंद करून ३१/ ब मंगळवार मठाची जागा वाचवली. पुन्हा पुरामध्ये इमारत पडली. दगडी घुमट गाळात बुडाला. तो काढून गाळ काढण्याचे काम करणाऱ्या भक्तभाविकांना राहण्यासाठी सोय केली.

नंतर पट्टाभिषेक करण्यासाठी प्रयत्न सुरू आहेत ते कळताच 'मी सोलापूरच्या वारद पाठशाळेत जाऊन थोडेफार शिक्षण घेतल्यानंतरच पट्टाभिषेक होईल' असे सांगून सोलापूर येथे १९४८–४९ मध्ये व श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या आज्ञेने जंगमवाडी मठात १९५०–५१ पर्यंत अध्ययन केले. पुढे सहपाठी अहमदपूरकर,

वैरागकर, औंधकर, परंडकर वगैरे स्वामीजींसह इतर परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर त्यांनी मठाची जबाबदारी स्वीकारली. पट्टाभिषेक झाला.

नंतर परंडकरबाबा, विश्वंभर शिंगणापूरकर व पोहेकरांसह श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या कोकण, पश्चिम महाराष्ट्र दौऱ्यात धर्मप्रचार-प्रसार केला. श्रावण, नवरात्र आणि अधिक मासानुष्ठाने केली. शिखर शिंगणापूर, कराड, कोल्हापूर, औंढा नागनाथ, परळी वैद्यनाथ, कपिलधार, बार्शी, अहमदपूर, साखरखेर्डा वगैरे ठिकाणी हजारो भक्त-भाविकांसह सामूहिक परमरहस्य पारायणात सहभाग घेऊन भजन-पूजन केले. वीर माहेश्वर जंगम संस्कार शिबिरे आयोजित केली.

त्यातूनच २३ जून१९९१ रोजी शिववाडी पणुंब्रे तर्फ शिराळा येथील स्वातंत्र्यसैनिक पांडुतात्या विष्णुअय्या जंगमस्वामी यांच्या चि. ओम अर्थात् तुकाराम हा बटू दत्तक घेऊन माघ शुद्ध दशमीला गुरुवारी दि. ३१.१.१९८५ रोजी त्याचा पट्टाभिषेक केला. त्यानंतर ते कोठेही गुरू म्हणून गेले नाहीत. सर्व कार्यक्रम दीक्षामूर्ती उत्तराधिकारी नीलकंठ शिवाचार्यांकडूनच करून घेतले. काशी, केदार, श्रीशैलजगद्गुरू यांचा उत्सव ठरविला. परंतु हृदयविकाराच्या तीव्र झटक्याने मंगळवार, दि. १७.१.१९९५ रोजी दुपारी तीन वाजता परंडकरबाबा व नीलकंठ शिवाचार्य यांची स्पर्शभेट घेऊन ते शिवैक्य झाले.

त्यांच्या अंतिम इच्छापूर्तीसाठी उत्तराधिकारी श्री ष.ब्र. १०८ डॉ. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी दर अधिक मासात विविध उपक्रम राबवितात.

---

परिचय : श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य धारेश्वरकर.

## १९३. श्री. सुरेशानंद सिद्ध उखीमठ

मु.पो.ता. उखीमठ,
जि. रुद्रप्रयाग (उत्तरांचल)



हे केदारनाथचे प्रमुख पुजारी श्री. सिद्धलिंग व सौ. कस्तुरी यांचे पवित्र गर्भी दि. २४.१०.१९३२ रोजी उखीमठात जन्मास आले. त्यांनी उखीमठात प्राथमिक अध्ययन केले. उत्तराखंड विद्यापीठात १९५० मध्ये माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर केदारपीठाचे ३२१ वे 'रावल' झालेल्या श्री विश्वनाथलिंगजी यांनी सुरेशानंद सिद्धांना उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास पाठविले.

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १५.६.१९५१ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील सेंट्रल हिंदू कॉलेजात इंटर परीक्षा आणि १९५६ मध्ये काशी हिंदू विश्वविद्यालयातून बी.ए. पदवी प्राप्त केली. नंतर उत्तराखंड विद्यापीठाच्या आदर्श संस्कृत महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून ते कार्य करू लागले. ख्रिश्चन ट्रेनिंग कॉलेज, लखनऊ येथून एल.टी. परीक्षा देऊन त्यात उत्तीर्ण झाले.

१९६५ मध्ये आग्रा विश्वविद्यालयातून राज्यशास्त्र विषयात एम.ए. झाले. पुढे श्रीनगर, गोपेश्वर, उखीमठ आणि देवलकोट इ. ठिकाणी प्राध्यापक म्हणून त्यांनी सेवा केली. शेवटी चमोली (जि. देवकोट) येथील राजकीय इंटर कॉलेजचे प्राचार्य म्हणून कार्य पाहिले. हल्ली निवृत्त जीवन व्यतीत करीत आहेत. केदारपीठाच्या प्रत्येक कार्यात पुढे होऊन सर्व पुजारी आणि केदार 'रावल' जगद्गुरूंचे प्रिय शिष्य होऊन कार्य करीत आहेत.

## १९४. श्री. वीरभद्रलिंग मोहनलिंग जंगम

मु. गौखुरेश्वर धुसाखेल, पो. धुलीखेल, जि. नेपाळ नं. १ (नेपाळ)

हे वीरगोत्रीय असून नेपाळच्या शिवपूर संस्कृत पाठशाळेत प्राथमिक संस्कृताध्ययन करून उच्च व्यासंगाकरिता वयाच्या १६ व्या वर्षी वाराणशीस आले. जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात श्रीज्ञान-सिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २०.६.१९५१ रोजी प्रवेश घेतला. येथील शासकीय संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन व्याकरण, साहित्य, वेदान्त आणि मीमांसा या शास्त्रांचा अभ्यास केला. नेपाळ देशात भक्तपूर येथे एक प्राचीन जंगम मठ असून तो काशी जंगमवाडी मठाचा शाखामठ आहे. तेथील मठाचे पुजारी जंगम असून ते काशीला येऊन धार्मिक संस्कार घेतात. येथे उच्च व्यासंग करून नेपाळमध्ये वीरशैव संस्कृतीचे जतन करून ती जोपासत आले आहेत. नेपाळ देशात आज ऐंशीहून अधिक जंगम परिवार राहतात.

## १९५. श्री. वे. महालिंगस्वामी मल्लिकार्जुन स्वामी

वीरमठ संस्थान (मोठा मठ),
मु.पो.ता. भोकर, जि. नांदेड (महाराष्ट्र)

नांदेड जिल्ह्यातील भोकरचा वीरमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. हा पुत्रवर्गपरंपरेतील मठ असून या मठाचे मूळ पुरुष श्री गंगाधर शिवाचार्य महास्वामीजी हे शिवयोगसिद्ध होते. औरंगजेब हिंदू देवालये उद्ध्वस्त करीत भोकर येथे आला. तेथील अत्यंत प्राचीन हेमाडपंथी महादेव मंदिर उद्ध्वस्त करायला पुढे झाला, तेव्हा तेथील तपस्वी श्री गंगाधर शिवाचार्यांनी त्याला थांबविले. हे जागृत मंदिर आहे त्याला स्पर्श करू नकोस, असे ते म्हणाले. त्यावर औरंगजेब म्हणाला, तो जागृत असेल तर त्याने मला तसा प्रत्यय आणून द्यावा. असे सांगितल्यानंतर गंगाधर शिवाचार्यांनी हिरवा चारा आणून मंदिरातील नंदीसमोर ठेवला आणि त्याला प्रार्थना केली. प्रार्थना करताच चारा हळूहळू दिसेनासा झाला. हे औरंगजेबाने आपल्या डोळ्यांनी प्रत्यक्ष पाहिले. पुढे पाच तासांनी पाषाणी नंदीच्या गुदद्वारातून शेणही विसर्जित झाल्याचे त्याने पाहिले आणि त्या शिवालयास धक्का न लावता तो पुढे निघून गेला. याप्रमाणे पाषाणाच्या नंदीला चारा खाऊ घालून शेणमूत्र-विसर्जनाचा चमत्कार श्रीगंगाधर शिवाचार्यांनी केल्याच्या घटनेची कथा ग्रामस्थ आजही सांगतात.

भोकर वीरमठाचे चमत्कार घडवून आणणारे कर्तृपुरुष श्री गंगाधर शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या आयुष्यात बरेच चमत्कार केले आणि त्यांनी शेवटी जिवंत समाधी घेतली. भोकरचे गावकरी आपल्या लहान मुलांना सर्दी, पडसे, ताप यांसारख्या बाधा झाल्यावर गंगाधर शिवाचार्यांच्या समाधीपुढील अंगारा लावून रोग दूर होतात अशी श्रद्धा बाळगतात. तसा प्रत्ययही त्यांना येतो असे म्हणतात.

अशा चमत्कार घडवून आणणाऱ्या श्री गंगाधर शिवाचार्यानंतर श्री नागय्या शिवाचार्य, श्री बसवलिंग शिवाचार्य, श्री गुरुलिंग शिवाचार्य आणि श्री मल्लिकार्जुन शिवाचार्य मठाधिपती या वीरमठाच्या परंपरेत होऊन गेले आहेत.

याच वीरमठाच्या श्री. वे. मल्लिकार्जुन स्वामी आणि सौ. गंगाबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९२० मध्ये श्री महालिंग स्वामींचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण त्यांच्या जन्मगावी म्हणजे भोकर येथेच पूर्ण झाले. नंतर माध्यमिक शिक्षण मुदखेड गावी, पदवीपूर्व आणि पदवीपर्यंतचे शिक्षण नांदेड येथे आणि १९५० मध्ये औरंगाबादच्या विश्वविद्यालयातून त्यांनी एम.ए. पदवी मिळविली. त्यानंतर ते मुदखेड हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून रुजू झाले.

वडिलांच्या– श्री मल्लिकार्जुन स्वामींच्या अपेक्षेनुसार धार्मिक शिक्षण घेण्यासाठी ते काशीक्षेत्रास आले. त्यावेळचे काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९५१ मध्ये श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे १९५४ पर्यंत म्हणजे तीन वर्षेपर्यंत संस्कृत तसेच वैदिक विद्येबरोबर धार्मिक ज्ञान प्राप्त करून घेतले.

काशी येथील अध्ययन तेवढ्यावरच थांबवून ते भोकरला परतले. परंपरेप्रमाणे भोकर वीरमठावर त्यांना पट्टाभिषेक करण्याच्या विचार असताना त्यांच्या आजीने– भागीरथीबाईने त्यांना गृहस्थाश्रम स्वीकारायला सांगून त्यांच्या पोटी येणाऱ्या संतानापैकी एकास पुढे पट्टाभिषेक कर, अशी अंतिम इच्छा व्यक्त केली. त्यानुसार श्री महालिंग स्वामीजींनी गृहस्थाश्रम स्वीकारला. नंतर पुन्हा मुदखेड येथील हायस्कूलमध्ये शिक्षक म्हणून १० वर्षेपर्यंत सेवा केली.

त्यांना एक मुलगा आणि एक मुलगी होती. पण दुर्दैवाने ती दोन्ही मुले अल्पवयातच देवाघरी गेली. श्री. वे. महालिंगस्वामी गृहस्थाश्रमातून विरक्त होऊन सध्या मठाच्या परंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम पार पाडीत आहेत.

त्यांच्या मठाचे शिष्य महाराष्ट्र-आंध्र-कर्नाटकात मोठ्या संख्येने आहेत. वयाच्या ७७ मध्ये ते आपल्या भक्तांच्या घरी जाऊन धर्मसंस्कार देत असतात. त्याशिवाय आपल्या भक्तांना घेऊन वर्षातून २-३ वेळा काशीला जाऊन येतात. एकदा आपल्या गावातून पत्नीसह पायी चालत ते काशीस गेले होते.

दि. १४.७.२००७ ते २९.११.२००७ पर्यंत काशीत चाललेल्या श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर महास्वामीजींच्या षष्ठ्यब्दी समारंभात १०८ दिवसपर्यंत आपल्या शिष्यांसह जंगमवाडी मठात राहून ते तन-मन-धनाने सेवा करून श्री महास्वामीजींच्या कृपाशीर्वादास पात्र झाले.

१९६. **श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य हिरेमठ**



मु.पो. कसबा जंबगी,
ता. मुधोळ, जि. बागलकोट (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८३५०-२४७०५५

श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी पूर्वाश्रमीचे कसबा जंबगी हिरेमठाच्या श्री. वे. गुरुलिंगय्या आणि सौ. चंबव्वा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २२.१०.१९३० रोजी जन्मले. जन्मगावीच त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. बागलकोट येथे माध्यमिक शिक्षण पूर्ण झाले. पुढे त्यांचे गुरुवर्य श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्यांच्या अपेक्षेनुसार पुत्रवर्ग परंपरेच्या कसबा जंबगी हिरेमठावर १९४८ मध्ये त्यांना उत्तराधिकारी म्हणून नेमले गेले.

नंतर संस्कृत तसेच धार्मिक शिक्षणाकरिता त्यांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात १९४८ मध्ये प्रवेश घेतला. तेथे चार वर्षे अध्ययन केले. पुढे उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले.

तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महासन्निधींच्या अनुमतीने १९५२ मध्ये त्यांनी काशी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर काशीक्षेत्रीच्या संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून साहित्यशास्त्र, काशी विद्यापीठातून बी.ए., काशी हिंदू विश्वविद्यालयातून हिंदी विषयातील एम.ए. अशा अनेक उपाधी प्राप्त केल्या. काशीक्षेत्री १९६६ पर्यंत म्हणजे एकूण १४ वर्षे राहून अभ्यास केला आणि हिंदी तसेच संस्कृत भाषांत प्राविण्य प्राप्त केले.

काशीतून स्वग्रामी परतल्यानंतर १९६६ ते १९९३ पर्यंत बागलकोट येथील श्री बसवेश्वर वीरशैव विद्यावर्धक संघाच्या महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून सेवा केली. नंतर १९९४ मध्ये आपल्या कसबा जंबगी हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारून त्यांनी सध्या मठाच्या धार्मिक कार्यक्रमासोबत सामाजिक सेवेत स्वतःला गुंतवून घेतले आहे.

१९७. **श्री. जगन्नाथ धोंडीअय्या जंगम**

मु. शिवपुरी, पो. तारळे, ता. पाटण, जि. सातारा (महाराष्ट्र)

स्थिरभाष : ०८३५०-२४७०५५

हे नंदिगोत्रीय होत. त्यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत राहून मॅट्रिक तसेच संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. पुढे श्री. महादेव शर्मा तारळेकर यांच्या प्रेरणेने आपल्या वयाच्या १८ व्या वर्षी संस्कृताध्ययनासाठी ते काशीस आले. काशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १६.८.१९५२ रोजी प्रवेश घेतला. येथे साहित्यशास्त्राचा संपूर्ण अभ्यास केला.

## १९८. श्री ष.ब्र. विद्यानंद शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ



मु.पो. हिरेमठ, बणगार गल्ली, विजयपूर,
ता.जि. विजयपूर
वर्तमान पत्ता- मु. योगाश्रम, हुलीयाळु,
ता. जमखंडी, जि. बागलकोट (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होत. हुब्बळ्ळीच्या मूरुसाविर मठाच्या गंगाधर महा-विद्यालयात आणि सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात राहून प्राथमिक संस्कृताध्ययन करून वे.पं. गंगाधरशास्त्रीजी अनुगोंडा यांचे शिष्यत्व पत्करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत परिषेच्या 'व्याकरण आद्य' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

पुढे विजयपूरच्या शिवमूर्ती स्वामी हिरेमठांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या १५ व्या वर्षी उच्च व्यासंगाकरिता वाराणशीस आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या आज्ञेनुसार श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २९.७.१९५३ रोजी प्रवेश घेतला. येथे दर्शनशास्त्राचा अभ्यास करीत असतानाच काशी हिंदू विश्वविद्यालयात हिंदी एम.ए.ची परीक्षा उत्तीर्ण केली. त्यानंतर विजापुरास परतून पट्टाधिकार स्वीकारला. आता शैक्षणिक तसेच धार्मिक कार्यक्रम पार पाडीत आहेत.

आपले गुरुवर्य लिं. शंभुलिंग शिवाचार्य महास्वामीजींकडून स्थापिलेल्या हुल्याळ येथील योगाश्रमात वास्तव्य करून परंपरेनुसार माघ पौर्णिमेचा पारमार्थिकोत्सव मोठ्या वैभवाने पार पाडत असतात. त्याचप्रमाणे अनेक शैक्षणिक संस्था स्थापून त्यातून ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांच्या शैक्षणिक गरजा पूर्ण केल्या आहेत.

## १९९. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य



गुरू श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य हिरेमठ
मु.पो. मळली, ता. जेवरगी, जि. कलबुर्गी (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८४४२-२२०१२२

मळली हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. गंगाधरेश्वर शिवाचार्य स्वामीजींच्या नंतर या परंपरेत २५ शिवाचार्य होऊन गेले. त्याचे पुरावे श्रीमठात आहेत. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी या परंपरेतील २६ वे पट्टाध्यक्ष होत. ते बसवन बागेवाडी तालुक्यातील इंगळेश्वर गावच्या हिरेमठाचे श्री. वे.मू. शरभय्या आणि सौ. बसम्मा यांचे सुपुत्र असून दि. १०.१०.१९३५ रोजी जन्मले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. तत्कालीन मळली पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजींनी त्यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी निवडून १९४७ मध्ये त्यांचा पट्टाधिकार केला.

नंतर त्यांनी सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात वे.पं. गंगाधर शास्त्रीजी अनुगोंडा यांचे शिष्यत्व पत्करून दि. २०.९.१९४८ पासून २०.६.१९५३ पर्यंत काव्यशास्त्राचा मध्यमा परीक्षेपर्यंतचा अभ्यास केला. पुढे आपल्या गावच्या श्री. शिवनगौड पोलिस पाटील आणि श्री. बसनगौडा मालीपाटील या दोघांच्या प्रोत्साहनाने वयाच्या १८ व्या वर्षी उच्च शास्त्राभ्यासासाठी ते वाराणशीस आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने दि. ३.७.१९५३ मध्ये जंगमवाडी मठातल्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथे काव्यतीर्थ परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्यासोबत न्यायशास्त्रात प्राविण्य मिळविले. पुढे हे मळली मठाचे पट्टाध्यक्ष होऊन धार्मिक कार्यक्रम पार पाडत दि. २९.११.१९९५ मध्ये लिंगैक्य झाले. सध्या त्यांच्या जागी श्री ष.ब्र. रुद्रमुनी यांचा पट्टाभिषेक झाला आहे. सध्या ते काशीपीठात संस्कृत अध्ययन करीत आहेत.

## २००. श्री. नीलकंठ शर्मा ऊर्फ
## श्री ष.ब्र. डॉ. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी



गुरू श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य
बृहन्मठ, मु.पो. सावळगी,
ता.जि. कलबुर्गी (कर्नाटक)

सावळगीचा श्री शांतेश्वर संस्थान मठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. या मठावर परंपरेनुसार अनेक शिवाचार्य होऊन गेले. या परंपरेत आलेले श्री ष.ब्र. डॉ. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजी होत. हे सावळगी शांतेश्वर संस्थानमठाचे श्री. वे.मू. घनलिंग स्वामी आणि सौ. अक्कनागम्मा या माहेश्वरांच्या पवित्र गर्भी १९३२ मध्ये जन्मास आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात संस्कृतचे अध्ययन करून 'काव्य–मध्यमा' परीक्षेत उत्तीर्ण झाले. सावळगीच्या श्री. गुरुशांतप्पा माळी पाटील तसेच श्री. चनबसप्पा पोलीस पाटील यांच्या प्रोत्साहनाने वयाच्या २१ व्या वर्षी ते उच्च संस्कृत व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ३.७.१९५३ रोजी प्रवेश घेतला. येथे काव्य, वेदान्तशास्त्राचा अभ्यास करून पंच आचार्य उपाधी मिळवली. त्यातील वेदान्ताचार्य परीक्षा वाराणसी विश्वविद्यालयातून प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होऊन सुवर्णपदक मिळविले. याशिवाय काशी हिंदू विश्वविद्यालयातून दर्शनशास्त्र स्नातकोत्तर पदवी मिळवून त्याच दर्शनशास्त्र विषयात संशोधन करून डॉक्टरेट उपाधीने विभूषित झाले.

पुढे काशीत प्राचीन ब्रह्मविद्या महाविद्यालयाचे प्रधानाचार्य म्हणून कार्य करीत गव्हर्मेंट क्विन्स कॉलेजात कन्नड डिप्लोमा कोर्स चालवीत उत्तर भारतात कन्नडचा प्रचार–प्रसार केला. श्री शांतेश्वर शिक्षणसंस्था स्थापून हिंदी माध्यमातून प्राथमिक तसेच माध्यमिक विद्यालय स्थापून मुलांच्या शिक्षणास आपली अमूल्य देणगी दिली.

येथील चित्रदुर्ग संस्थानचा जयदेववाडी मठ खरेदी करून ते संस्थान विद्यालय करून काशीक्षेत्री अजरामर शैक्षणिक क्रांती केली. याप्रमाणे काशीक्षेत्री अविस्मरणीय शैक्षणिक क्रांती करून दि. २६.५.१९९८ मध्ये काशी येथे लिंगैक्य झाले. यांची क्रियासमाधी काशीक्षेत्रीच्या विद्यासंस्थेतच केली आहे.

२०१. **श्री ष.ब्र. सांब शिवाचार्य स्वामीजी**
संस्थान थोरला मठ, मु.पो. वसमतनगर,
ता. वसमत, जि. हिंगोली (महाराष्ट्र)



हे पूर्वाश्रमीचे नांदेड जिल्ह्यातील अर्धापूर तालुका, बुद्रुक लोणीग्रामचे श्री. सांबप्पा व सौ. प्रयागबाई या दंपतीच्या उदरी दि. १०.२.१९३४ रोजी जन्मले. जन्मनाव दिगंबर. जन्मगावी तिसरीपर्यंतचे शिक्षण घेतले. वसमत येथे नववीपर्यंतचे शिक्षण घेतले. दि. १.६.१९४९ मध्ये संस्कृत अध्ययनाकरिता सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेतला.

पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्य होऊन काव्य, आद्य, मध्यमा, वेदान्त आद्य परीक्षा उत्तीर्ण केल्या. नंतर श्री. श्रीमंत माधवराव देशमुख आणि बुद्धियप्पा बेले यांच्या प्रेरणेने वयाच्या १८ व्या वर्षी उच्च संस्कृत अध्ययनाकरिता वाराणशीला आले. तत्कालीन पीठाधिपती श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ३.७.१९५३ रोजी प्रवेश घेतला.

काशीच्या संस्कृत गव्हर्मेंट कॉलेजमध्ये प्रवेश घेऊन ते साहित्य विषयात पूर्व मध्यमा, तसेच उत्तर मध्यमा या परीक्षांत उत्तीर्ण झाले. १९५५ नंतर वसमतला येऊन येथील थोरला मठ संस्थानचा पट्टाधिकार स्वीकारला. सुमारे ५० वर्षेपर्यंत उज्जयिनी पीठाचा शाखामठ असणाऱ्या थोरला मठाची परंपरा ते अव्याहतपणे चालवीत आले आहेत. आपल्या मठातच त्यांनी

वसमत शिवानुभव मंटप भक्तनिवास, भांडारगृह, महाद्वार हे सर्व नव्याने निर्माण केले आहेत. तामसा गावच्या शाखामठात आपले गुरू दिगंबर शिवाचार्य यांची अमृतशिलामूर्ती स्थापून तेथे एक प्राथमिक शाळादेखील ते चालवीत आहेत. नांदेड, अर्धापूर, कापसी बुद्रुक इ. गावांतील आपल्या शाखामठांचा त्यांनी जीर्णोद्धार केला. याशिवाय शिवदीक्षा, धर्मजागृती इ. कार्यात ते रत झाले आहेत. सध्या वयोवृद्ध झाल्यामुळे २००६ मध्ये त्यांनी आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थी चि. युवराज जंगम यांना उत्तराधिकारी स्वीकारून दि. २३.३.२०१० रोजी त्यांचा पट्टाभिषेक करून 'श्री ष.ब्र. दिगंबर शिवाचार्य स्वामी' असे त्यांचे नामकरण केले. सध्या दिगंबर शिवाचार्य महाराज संपूर्ण महाराष्ट्रात प्रवचन-कीर्तन करीत उत्कृष्ट धर्मप्रचार करीत आहेत. त्यांचे गुरू सांब शिवाचार्य महाराज सध्या ८६ वर्षांचे असून आपल्या उत्तराधिकारी शिवाचार्यांना मार्गदर्शन करीत आहेत.

२०२. **श्री सिद्धलिंग देवरू**

**गुरू श्री ष.ब्र. तीर्थय्या स्वामीजी हिरेमठ**

**मु.पो. कोट्टलगी, ता. अथणी, जि. बेळगाव (कर्नाटक)**

हे वीरगोत्रीय होत. श्रीमद्वीरशैव शिवयोग मंदिरात प्रारंभिक संस्कृताध्ययन पूर्ण करून 'काव्य आद्य' आणि 'व्याकरण आद्य' परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. वयाच्या २१ व्या वर्षी उच्च शास्त्राध्ययनाकरिता काशीक्षेत्रास आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २०.३.१९५३ रोजी प्रवेश घेतला. पुढे त्यांनी विशेषत्वाने साहित्यशास्त्राचा अभ्यास करून उच्च उपाधी मिळविली.

२०३. **श्री म.नि.प्र. महांत स्वामीजी इलकल**

श्री महांतदेव गुरु संगनबसव स्वामी पालभावी मठ,
मु.पो. सवदी, ता. अथणी, जि. बेळगाव (कर्नाटक)



हे वीरगोत्रीय होत. हे सवदी विरक्त मठाचे साधक. श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात संस्कृत अध्ययन करून ते कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या काव्य-आद्य, व्याकरण-आद्य या पदवी परीक्षेत उत्तीर्ण झाले. उच्च संस्कृत अध्ययनाकरिता सवदी गावचे शिवप्पजी औटगी आणि सिद्धगौड पाटील यांच्या प्रेरणेने विद्यानगरी वाराणशीला आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १६.३.१९५३ रोजी प्रवेश घेतला. येथे साहित्य तसेच वेदान्तशास्त्राचा अभ्यास केला. पुढे त्यांनी चित्तरगी इलकल महांतेश्वर संस्थान मठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारला. इलकलचे मठाधिपती होऊन सामाजिक, शैक्षणिक तसेच धार्मिक कार्यक्रमांचे ते संयोजन करीत आहेत. सध्या त्यांनी आपल्या इच्छेप्रमाणे नियोजित बटूला निरंजन पट्टाधिकार केला असून त्यांचे नाव श्री म.नि.प्र. गुरुमहांत स्वामी असे आहे. त्यानंतर अल्पशा आजाराने श्री म.नि.प्र. महांत स्वामीजी १९.५.२०१८ रोजी शनिवारी लिंगैक्य झाले.

२०४. **श्री वे. गुरुसिद्धय्या स्वामी**

श्री रेवणसिद्धय्या पुजारी,
मु. हालहळ्ळी, पो. हळ्ळीखेड, ता.जि. बीदर (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होत. ते बीदरच्या सरकारी माध्यमिक शाळेतून हिंदी भूषण परीक्षेत उत्तीर्ण झाले. वयाच्या १९ व्या वर्षी काशीस आले. येथील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २०.३.१९५३ रोजी प्रवेश घेतला. त्यांनी आधुनिक विद्याभ्यासासोबत संस्कृताध्ययन केले.

## २०५. श्री ष.ब्र. डॉ. गुरुसिद्धदेव शिवाचार्य

मु. केळदी राजगुरू संस्थान मठ, केळदी (कर्नाटक)



पूर्वाश्रमीचे इलकल गावच्या हिरेमठाचे श्री वे.मू. गुरुमूर्तय्या आणि सौ. अन्नदानम्मा यांचे हे सुपुत्र. ते वीरगोत्रीय असून श्रीमद्वीरशैव शिवयोग मंदिरात संस्कृतचे अध्ययन करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या 'काव्य–मध्यमा' आणि 'व्याकरण–आद्य' या परीक्षांत उत्तीर्ण झाले. नंतर संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता इलकलच्या बसवनगौड पोलीस पाटील आणि कळकप्पजी बेनकनाळ यांच्या प्रेरणेने आणि सहकार्याने वयाच्या २० व्या वर्षी विद्यानगरी वाराणशीस आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जंगमवाडी मठातील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १६.३.१९५३ रोजी त्यांनी प्रवेश घेतला.

काशी हिंदू विश्वविद्यालयातील संस्कृत विद्या धर्मविज्ञान संकायच्या दर्शनशास्त्र विभागात 'आचार्य' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढे त्याच विभागात 'अद्वैत वेदान्त शाक्ततंत्र योः साम्य वैषम्य चिंतनम्' विषयावर संशोधन करून 'दर्शनशास्त्र चक्रवर्ती' अर्थात् डॉक्टरेट उपाधी प्राप्त केली. काशीक्षेत्री एकूण १६ वर्षे अध्ययन केले. १९५८ पर्यंत काशी जंगमवाडी मठात आश्रय मिळविला. नंतर हनुमान घाटावर भाड्याच्या घरात राहून अकरा वर्षेपर्यंत अध्ययन केले.

हे संस्कृत विद्वान काशी महापीठाची शाखा असणाऱ्या केळदी राजगुरू संस्थान हिरेमठाचे पट्टाध्यक्ष झाले. त्यांनी 'पूर्णत्व' नामक कन्नड पद्यग्रंथ लिहिला. सध्या मठाच्या धार्मिक परंपरेचे कार्यक्रम पार पाडत आहेत. केळदी हिरेमठाचा पट्टाधिकार मिळवलेले श्री ष.ब्र. डॉ. महेश्वर शिवाचार्य आपल्या गुरुवर्गांचे सहकारी म्हणून कार्य करीत आहेत.

२०६. **श्री. शंकरय्या कोंडय्या जंगम**

मु. पांगर (तळ्याचे),

पो.ता. कंधार, जि. नांदेड (महाराष्ट्र)

हे स्कंदगोत्रीय होत. आपल्या गावातच मराठी विद्यालयात चौथीपर्यंत शिक्षण घेऊन वयाच्या १४ व्या वर्षी ग्रामस्थांच्या सहकार्याने काशीला आले. महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि.१८.२.१९५४ रोजी प्रवेश घेतला. येथे हिंदी तसेच संस्कृत भाषांचा अभ्यास केला.

२०७. **श्री. यल्लप्पा गदीगेप्पा जाधव**

मु. होळे अमरगोळ, पो. होळे आलूरू,

ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)

हे मराठा समाजातील. यांनी गदगच्या श्री वीरेश्वर पुण्याश्रमातील संगीत पाठशाळेत शहनाईवादनाचा ७ वर्षेपर्यंत अभ्यास केला. नंतर होळे आलूरुचे श्री. चन्नप्पा गौड पोलीस पाटील आणि तम्मन गौड पोलीस पाटील यांच्या प्रोत्साहनाने पुढील संगीत शिक्षणाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महासन्निधींच्या अनुमतीने वयाच्या २५ व्या वर्षी दि. ११.८.१९५४ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्रीचे प्रसिद्ध शहनाईवादक उस्ताद बिस्मिल्लाखान यांचे शिष्य होऊन शहनाईवादनात प्राविण्य मिळविले.

२०८. **प्रा. करवीरप्पा शिवप्पा हडपद**



निवृत्त संगीत कलाकार (तबला),
घर नं. १२३, शक्तिनगर, बसथांब्याच्या मागे,
मु.पो.ता.जि. कलबुर्गी (कर्नाटक)
स्थिरभाष : (०८४७२) २३९२११,
चरभाष : ९३४२३०३०३०

प्रा. के. एस. हडपद हे मुळातले गदग जिल्ह्याच्या रोण तालुक्यातील मल्लापूर गावचे. १९३० मध्ये मल्लापूर येथे त्यांचा जन्म झाला. त्यांचे वडील शिवप्पा हडपद आणि आजोबा श्री राचप्पा हडपद हे चर्मवाद्य तबला आणि जानपद (करडीमजलु) गाण्यात प्रवीण होते. या घराण्याचे चर्मवाद्य वाजविण्याचे संस्कार चि. करवीरप्पावर पडले.

करवीरप्पांनी आपले प्राथमिक शिक्षण मल्लापूर येथे पूर्ण केले. त्यासोबत तबलावादन आपल्या वडिलाकडून शिकून घेतले. तबलावादनाची आवड लक्षात घेऊन त्यांच्या वडिलांनी त्यांना गदगच्या गानयोगी पं. पंचाक्षर गवईंच्या वीरशैव पुण्याश्रमात आणून सोडले. तेथे पं. पंचाक्षर गवईंचा प्रिय शिष्य होऊन त्यांनी १९४३ ते १९५३ पर्यंत एकूण १० वर्षे तबलावादनाचे शिक्षण घेतले.

त्यांची तबलावादन शिकण्याची उत्कट इच्छा पाहून काशीचे विद्वान मल्लापूरचे पं. राजशेखर शास्त्री आणि वे. शंकरय्या स्वामीजी यांनी यांना तबलावादनाच्या पुढील शिक्षणासाठी काशीस जाण्यासाठी प्रोत्साहन दिले. या दोघांच्या कडून प्रेरित होऊन करवीरप्पा काशीस आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महासन्निधींच्या अनुमतीने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ११.८.१९५४ रोजी प्रवेश घेतला.

त्यानंतर काशीक्षेत्रात 'ना धि धी ना'चे जादूगार म्हणून प्रसिद्ध झालेले पं. अनोखेलाल मिश्रा यांचे शिष्यत्व पत्करून चार वर्षे सतत तबलाविद्येचा अभ्यास केला. पुढे मुंबई येथील अखिल भारतीय गंधर्व महाविद्यालयाच्या

मंडळाची 'संगीतालंकार' पदवी बेंगळूरु केंद्रातून मिळविली.

अशा रितीने काशीक्षेत्रात १९५४ पासून १९५८ पर्यंत तबलाशिक्षण पूर्ण केल्यानंतर बागलकोटला येऊन १९५८ मध्ये स्वतःचे 'नटराज संगीत विद्यालय' स्थापून संस्थापक प्राचार्य होऊन पाच वर्षेपर्यंत विद्यार्थ्यांना विद्यादान केले. नंतर श्री. आर. एस. मोरे नावाच्या शिष्यास संपूर्ण विद्या देऊन त्या विद्यालयाची सर्व जबाबदारी त्यांना देऊन टाकली. १९६६ मध्ये गदगच्या विजय कला मंदिरात तबलाबोधक म्हणून चार वर्षेपर्यंत सेवा केली.

त्यानंतर गुलबर्ग्याच्या श्री शरणबसवेश्वर कला महाविद्यालयात सुरू झालेल्या संगीत विभागात 'वचन गायन घराने शिल्पी' पं. सिद्धराम जंबलदिन्नी यांना साथीदार होऊन कार्य केले. पुढे कलबुर्गी विश्वविद्यालयाच्या संगीत विभागात १९७० मध्ये तबला प्राध्यापक म्हणून नियुक्त झाले. तेथे १९९० पर्यंत म्हणजे वीस वर्षे कर्तव्य पार पाडून हल्ली सेवानिवृत्त झाले आहेत.

सरकारी सेवेतून निवृत्त झाले असले तरी घरीच शिष्यांना तबलाशिक्षण देत आहेत. हैदराबाद, कर्नाटकच्या कलबुर्गी, रायचूर, बीदर तसेच बळ्ळारी जिल्ह्यांत खेडोपाडी यांचे शिष्य पाहायला मिळतात. प्रोफेसर के. एस. हडपद यांनी विविध संगीत संमेलनांत राष्ट्रीय तसेच आंतरराष्ट्रीय कलाकार पं. मल्लिकार्जुन मन्सूर, पं. बसवराज राजगुरू, गजानन जोशी, प्रभा अत्रे, प्रभुदेव सरदार, डी. आर. पर्वतीकर, पंचाक्षरी स्वामी मत्तिगट्टी, सिद्धराम स्वामी कोरवार आणि पं. सिद्धराम जंबलदिन्नी यांना तबलासाथ करून कीर्ती मिळवली आहे.

प्रोफेसर के. एस. हडपद यांनी संगीतक्षेत्रात केलेली सेवा लक्षात घेऊन कर्नाटक सरकारच्या संगीत-नृत्य अकादमीने त्यांना 'कलाश्री' ही प्रशस्ती देऊन गौरविले आहे. त्यांना पाच कन्या, दोन मुले आहेत. कलबुर्गी येथे तृप्त जीवन जगत असताना अलीकडे कलबुर्गी येथे ते लिंगैक्य झाले.

## २०९. डॉ. राम मनोहर कुलकर्णी

मु.पो. नरसिंहवाडी, ता. शिरोळ,
जि. कोल्हापूर (महाराष्ट्र)

हे काश्यपगोत्रीय होत. सोलापूरच्या डी.ए.व्ही. कॉलेजमधून स्नातक आणि पुण्याहून एम.ए. पदवी मिळवून आपल्या गावातील सौ. लक्ष्मीबाई सीताराम पुजारी यांच्याकडून प्रेरणा घेऊन वयाच्या २६ व्या वर्षी काशीक्षेत्री येऊन त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महासन्निधींच्या अनमुतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २.९.१९५४ रोजी प्रवेश घेतला.

पुढे काशी हिंदू विश्वविद्यालयात कलासंकायच्या हिंदी विभागात शोधकार्य करून पीएच.डी. पदवी मिळविली.

## २१०. श्री. वे.पं. नागनाथ शास्त्री हिरेमठ



मु. कोडल हंगरिगी, पो.ता. आळंद,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)

पं. नागनाथ शास्त्रीजी कोडल हंगरिगी हिरेमठाच्या वे. रुद्रमुनी शास्त्रीजींचे हे चिरंजीव. त्यांचा जन्म दि. १५.१२.१९३६ रोजी झाला. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक तसेच माध्यमिक अध्ययन पूर्ण केले. वडिलांच्या प्रेरणेने पुढे संस्कृताध्ययनासाठी सोलापूरच्या होटगी मठातील श्रीमद् वीरशैव गुरुकुलात पं. जगदीशशास्त्रींचे शिष्य होऊन त्यांनी काव्यशास्त्राचा अभ्यास केला. कलकत्त्याच्या काव्यतीर्थ परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढे आपल्या गावच्या श्रीमान शिवलिंगप्पा शांतप्पा पाटील यांच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. श्री ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने

श्री ज.विश्वाराध्य गुरुकुलात दि.१२.७.१९५५ रोजी प्रवेश घेतला.

काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या संस्कृत विद्या धर्म विज्ञान–संकायच्या न्यायविभागात 'न्यायशास्त्री' परीक्षा उत्तीर्ण केली. १९६४ मध्ये त्याच विश्वविद्यालयाची 'वेदान्ताचार्य' परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. त्यावेळी विश्वविद्यालयातील पदवीदान समारंभात तत्कालीन प्रधानमंत्री श्री. लालबहादूर शास्त्रीजींच्या हस्ते सुवर्णपदक मिळाले. याप्रमाणे १९५६ पासून १९६४ पर्यंत ८ वर्षेपर्यंत काशी जंगमवाडी मठात राहून संस्कृत पांडित्य संपादन केले.

त्यानंतर सोलापुरास येऊन सिद्धेश्वर माध्यमिक शाळेत संस्कृत अध्यापक म्हणून काही वर्षे कार्य केले. नंतर होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रधान आचार्य म्हणून संस्कृत तसेच वैदिक पाठ घेण्यासोबत पुराणप्रवचन करीत समाजात धर्मजागृतीचे कार्य केले. 'भामिनी षटपदी'त अनेक पुराणे लिहिली. वार्धक्याने ते स्वग्रामी शिवैक्य झाले.

## २११. श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी परंडकर



परंडकर बृहन्मठ, बार्शी,
मु. बार्शी, जि. सोलापूर (महाराष्ट्र)
स्थिरभाष : ०२१८४-२२३१४६,
चरभाष : ९८९०६९५८०७

उस्मानाबाद जिल्ह्यातील परंडा गावातील बृहन्मठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून अत्यंत प्राचीन आहे. हा शिष्यवर्ग परंपरेतील मठ असून या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री.ष.ब्र. यज्ञशिवाचार्य स्वामीजींनी तत्कालीन उज्जयिनी जगद्गुरूंकडून आशीर्वाद घेऊन शा.श. ६२८ (इ.स. ७०६) मध्ये या मठाची स्थापना केली. १३०० वर्षे प्राचीन असणाऱ्या या मठावर ३२ शिवाचार्य होऊन गेले आहेत. या मठपरंपरेत श्री यज्ञशिवाचार्यांनंतर आलेल्या सर्व शिवाचार्यांना श्री राचलिंग आणि रेवणसिद्ध शिवाचार्य हीच नावे देण्यात येतात.

१९०५ मध्ये या मठाचे पट्टाध्यक्ष झालेले श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य स्वामीजींनी ५९ वर्षे कार्य केले. त्यांनी 'वीरशैव गर्जना' नामक मराठी साप्ताहिक प्रारंभ करून महाराष्ट्रभर वीरशैव धर्मप्रचार केला. त्यांचे कार्य पाहून रंभापुरी जगद्गुरू श्री वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना 'गुरुकुलालंकार' उपाधी देऊन आशीर्वाद दिला. काशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींना पूर्वाश्रमी काशीला काशीक्षेत्री उच्च व्यासंगाकरिता पाठविलेले पूर्वाश्रमीचे श्री राचलिंग शिवाचार्य हेच होत, हे स्मरणपूर्वक नोंदविले पाहिजे.

श्री ष.ब्र. रामलिंग शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या हयातीत इ.स. १९५६ मध्ये श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्यांना आपला उत्तराधिकारी म्हणून निवडले आणि त्यांचा पट्टाधिकार श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजी, रंभापुरी, श्री १००८ जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैल, श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर

शिवाचार्य महास्वामीजी, श्रीक्षेत्र काशी यांच्या दिव्य सान्निध्यात आपल्या अमृतहस्ते पार पाडला.

श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमी सातारा जिल्हा, पाटण तालुक्यातील तारळे गावातील श्री. वे. धोंडिअय्या आणि सौ. सरस्वतीबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भात दि. १.१.१९३१ रोजी जन्मले. त्यांनी आपल्या गावीच प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर धार्मिक तसेच संस्कृताध्ययनाकरिता त्यांनी सोलापूर येथील होटगी मठातील श्रीमद् वीरशैव गुरुकुलात इ.स. १९४३ मध्ये प्रवेश घेतला. तेथे वे.पं. जगदीशशास्त्री नालवार यांचे शिष्यत्व पत्करून ५ वर्षे पर्यंत व्याकरण तसेच साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. नंतर १९४८ मध्ये सोलापूरच्या वारद संस्कृत पाठशाळेत वे. शरणय्या शास्त्री अचलेर आणि श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य मुळ्ळूरु तसेच पं. बागेवाडीकर शास्त्रीजी यांच्याकडे अध्ययन करून कलकत्त्याच्या 'व्याकरण-आद्य' आणि 'काव्य-मध्यमा' या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले.

इ.स. १९५४ मध्ये पट्टाभिषेक झाल्यानंतर त्यांनी दोन वर्षे आपल्या गुरुवर्यांची सेवा केली. शिवाय जगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या धार्मिक प्रचार दौऱ्यात सक्रिय सहभाग नोंदविला. पुढे १९५६ मध्ये श्रीजगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रेरणेमुळे त्यांनी श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पं. गौरीनाथ पाठक यांचे शिष्यत्व पत्करून 'काव्यतीर्थ' परीक्षेची तयारी केली. परंतु त्यांच्या गुरुवर्यांच्या प्रकृति-अस्वास्थामुळे परीक्षा न देता काशी सोडून त्यांना परतावे लागले. पुढे १९५९ मध्ये पुणे केंद्रातून 'काव्यतीर्थ' परीक्षा देऊन त्यात ते उत्तीर्ण झाले.

श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजींनी श्रीकाशीजगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्यांच्या सोबत सावलीसारखे राहून त्यांची सेवा केली. १९९५ मध्ये पुणे नगरात स्थापिलेल्या श्री ज. विश्वाराध्य विद्यार्थी निलयाचे सचिव म्हणून ते सेवारत राहिले. श्रीकाशीमहास्वामीजींच्या महाराष्ट्रात झालेल्या धर्मप्रचारदौऱ्याचे प्रमुख सारथी तेच होते. त्यांनी वडगाव यूसुफ

या गावी 'श्रीजगद्गुरू पंचाचार्य शिक्षण संस्था' स्थापन केली आणि तेथे संस्कृत तसेच वैदिक पाठशाळा सुरू केली. या पाठशाळेत अनेकांनी शिक्षण घेतले आहे. श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य धारेश्वरकर, श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य बेळंकीकर, श्री ष.ब्र. शिवानंद शिवाचार्य वाळवेकर हे त्यात प्रमुख आहेत.

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी दि. २.१०.१९८९ रोजी पुणे येथे लिंगैक्य झाले. त्यावेळी श्री. नीलकंठराव कल्याणी यांच्या प्रयत्नाने किर्लोस्कर कंपनीच्या खासगी विमानाने श्री महास्वामीजींचे पार्थिव शरीर काशीस आणून क्रियासमाधी करण्यात परंडकर महाराजांचा प्रमुख सहभाग होता. पुढे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या पट्टाभिषेक समारंभात त्यांनी केलेली सेवा अत्यंत महत्त्वपूर्ण होती. आपल्या अमृत महोत्सवात २०.५.२००५ रोजी जगद्गुरू पंचाचार्यांच्या दिव्य सान्निध्यात आपल्या उत्तराधिकारी बटूस आपल्या अमृतहस्ताने पट्टाभिषेक करवून त्याचे 'श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य' असे नामकरण केले. निवृत्त जीवनात स्वाध्याय तपश्चर्यादी यात आपला काळ व्यतीत करून ते दि. २१.४.२०१६ रोजी लिंगैक्य झाले.

## २१२. श्री ष.ब्र. रेणुक शिवाचार्य स्वामीजी परदेशीमठ



मु.पो. देवर हिप्परगी, ता. सिंदगी,
जि. विजयपूर (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमीचे देवर हिप्परगीच्या हिरेमठाच्या श्री. वे. मडिवाळय्या आणि सौ. नीलम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. १५.६.१९२८ रोजी जन्मास आले. तेव्हा त्यांचे सिद्धराम असे नाव ठेवले. नंतर आठव्या वर्षी त्यांना वीरमाहेश्वर (अय्याचार) दीक्षा बबलेश्वरच्या श्री शांतवीर शिवाचार्यांनी दिली. त्यावेळी त्यांचे रेणुकाचार्य असे नामकरण झाले. त्यांनी सिद्धेश्वर हायस्कूलमध्ये अभ्यास केला. पुढे सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात दि. १५.७.१९५१ रोजी प्रवेश घेतला. दि. २०.५.१९५६ पर्यंत वे.पं. गंगाधरशास्त्री यांचे शिष्य होऊन कलकत्त्याच्या 'काव्य-आद्य' आणि 'मध्यमा' या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. पुढे देवरहिप्परगीचे वे.मू. राचय्या लद्दीमठ आणि श्रीयुत दुंडप्पा बिराजदार यांच्या प्रोत्साहनामुळे संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता वाराणशीला काशीपीठाचे ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. १५.७.१९५६ रोजी प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात साहित्य, न्याय आणि वेदान्त या शास्त्रांचा व्यवस्थित अभ्यास केला. उत्तम पुराण प्रवचनकार म्हणून त्यांनी कर्नाटकात ख्याती मिळवली. देवरहिप्परगी मठाचे पट्टदेवरू रंभापुरी पीठाचे लिंगैक्य जगद्गुरू वीरगंगाधर महासन्निधींचे अत्यंत प्रिय होते. म्हणून त्यांच्या प्रत्येक सभेत यांचे विशेष व्याख्यान ठेवले जाई. महास्वामीजी सुळ्ळ गावचे श्री चिदानंद शिवाचार्यांना आणि देवर हिप्परगीच्या श्री रेणुक शिवाचार्यांना लव-कुश असे प्रेमाने संबोधीत असत. या दोघांना 'प्रवचनाचार्य' अशी उपाधी महास्वामीजींनी दिली होती.

२१३. **श्री. संगनबसव शर्मा** (नित्यानंद पुजारी)
वडील शिवलिंग स्वामी हिरेमठ,
मु. इब्राहिमपूर पेठ, विजयपूर,
जि. विजयपूर (कर्नाटक)



हे दि. १६.७.१९३३ रोजी कोरवार गावी जन्मले. हे नंदिगोत्रीय होते. त्यांनी विजापुरात प्राथमिक शिक्षण घेतले. इंगळेश्वर संस्कृत पाठशाळेत प्रारंभिक शिक्षण पूर्ण करून सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात दि. १६.७.१९५३ रोजी प्रवेश घेतला. वे.पं. गंगाधरशास्त्रींकडून काव्यशास्त्राचा अभ्यास करून कलकत्त्याच्या 'काव्यतीर्थ' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. वयाच्या २३ व्या वर्षी उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. १५.७.१९५६ रोजी प्रवेश घेतला. येथील महाविद्यालयात साहित्य, न्याय आणि वेदान्त या शास्त्रांचा व्यवस्थित अभ्यास केला. नंतर केदारपीठाचे जगद्गुरू विश्वनाथलिंग यांच्याकडून चेलासंस्कार स्वीकारून तेथील पुजारी म्हणून नियुक्त झाले. ३३ वर्षेपर्यंत केदारनाथांची पूजा करून २.३.१९९० रोजी लिंगैक्य झाले.

## २१४. प्राचार्य एम. एम. स्वामी

घर नं. ३३, अरुणोदय सोसायटी, सत्यशील नगर,
मु.पो. ता.जि. सातारा ४१५००४ (महाराष्ट्र)



हे सातारा जिल्ह्यातील शिवडे या गावचे. अत्यंत गरीब जंगम कुटुंबात त्यांचा जन्म १९३१ मध्ये झाला. १९४४ मध्ये यांचे वडील वारले आणि ते अनाथ झाले. तरी त्यांच्या आईने अत्यंत धैर्याने पुत्रास विद्याध्ययनासाठी अनुकूलता करून दिली. प्रारंभिक शिक्षण घेत असतानाच त्यांना श्री. अनंतराव जाधव नावाच्या शिक्षकाचे मार्गदर्शन यांना मिळाले. लहान वयात वडिलांच्या मायेला पारखे झाले होते, तरी योग्य गुरूंच्या मार्गदर्शनाखाली यांनी आपले जीवन घडविले.

श्री. महालिंग एम्. स्वामी सातारा शहरात इंटरच्या वर्गात शिकत असताना तेथे श्री १००८ जगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा अड्डपालखी महोत्सव आणि धार्मिक समारंभ झाला. तो संपल्यानंतर रात्री श्री. महालिंग स्वामींनी श्रीकाशीजगद्‌गुरूंचे दर्शन घेऊन त्यांना आपल्या गरीब परिस्थितीची आणि अनाथपणाची कल्पना दिली. महालिंग स्वामींना काशीपीठाकडून आर्थिक मदत देण्यात आली. ते १९५६ मध्ये इंग्लिश विषय घेऊन बी.ए. ऑनर्स परीक्षा उत्तीर्ण झाले. श्रीकाशीजगद्‌गुरूंनी महालिंग स्वामींना तार करून पुढील शिक्षणासाठी काशीस यायला सांगितले.

श्रीमहास्वामीजींच्या आदेशानुसार ते १९५६ मध्ये काशीक्षेत्रास आले आणि श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. सुप्रसिद्ध काशी हिंदू विश्वविद्यालयात एम.ए. इंग्लिशला प्रवेश घेतला. श्री स्वामींनी दोन वर्षे कष्ट करून अध्ययन केले आणि एम.ए. इंग्लिश विषयात ते उच्च श्रेणीत उत्तीर्ण झाले. महालिंग स्वामी काशीत अध्ययन करीत असताना आपल्याला सहाय्य केलेल्या श्री १००८ जगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींना वडिलाच्या स्थानी मानून त्यांची सेवा करीत होते. त्यांचा सेवाभाव आणि

विद्यानिपुणता पाहून महाराज प्रसन्न झाले. दोन वर्षेपर्यंत काशीत राहून १९५८ मध्ये एम.ए. इंग्लिश पदवी प्राप्त करून महास्वामीजींच्या आशीर्वाद घेऊन ते साताऱ्यास परतले. साताऱ्याच्या शिवाजी महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून नियुक्त झाले. याप्रमाणे शैक्षणिक क्षेत्रात उत्तम सेवा करीत असताना साताऱ्याच्या रयत शिक्षणसंस्थेने १९९३ मध्ये त्यांना सचिवपदावर नियुक्त केले. ३४ वर्षे शैक्षणिक सेवेत राहून त्यांनी २८ वर्षे शिवाजी महाविद्यालयाचे प्राचार्य म्हणून कार्य केले. रयत शिक्षण संस्थेचे सचिव म्हणून संस्थेच्या सर्वांगीण उन्नतीसाठी त्यांनी आपले जीवन समर्पिले. १९८९ मध्ये श्रीकाशीमहास्वामीजींची प्रकृती अत्यंत अस्वस्थ असताना दि. १.२.१९८९ पासून ३१.३.१९८९ पर्यंत रजा काढून महास्वामीजींची सेवा करून ते त्यांच्या कृपेस पात्र झाले.

महालिंग स्वामींनी श्रीकाशीजगद्गुरूंचे आप्तसेवक होऊन, त्यांची सेवा करून कृपाशीर्वाद संपादिले आहेत. ते सेवानिवृत्त झाले असून साताऱ्यात त्यांनी 'श्रीसिद्धराम' नावाची सार्वजनिक सेवासंस्था स्थापिली आहे. या संस्थेच्या माध्यमातून गरीब विद्यार्थ्यांना ते धनसहाय्य आणि रुग्णांना उचित औषधोपचार करीत असतात. मानवी सेवेत देवाला परमश्रेष्ठ सेवाकार्यात स्वतःला गुंतवून कार्य करीत आहेत. ते सध्या ८९ वर्षांचे असून शारीरिक अस्वास्थ्याने ग्रस्त आहेत.

२१५. **श्री. वे. शरणय्या बसलिंगय्या मठ**

मु. कोणन तंबिगे, पो. होसदित्ती,

ता.जि. हावेरी (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय होत. त्यांनी बेळगावच्या लिंगराज कॉलेजात बी.ए.पर्यंत अभ्यास केला. पुढे एस. बी. हिरेमठ, चित्रकला शिक्षक, के. जी. हायस्कूल मुधोळ यांच्या प्रेरणेने वयाच्या २५ व्या वर्षी काशीला आले. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २.७.१९५६ रोजी प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कलासंकायच्या इंग्लिश विभागात साहित्याचे अध्ययन करून एम.ए. पदवी मिळविली.



२१६. **श्री ष.ब्र. निरंजनलिंग मरुळाराध्य शिवाचार्य हिरेमठ**

मु.पो. चप्पळगाव, ता. अक्कलकोट,

जि. सोलापूर (महाराष्ट्र)

नंदिगोत्रीय. यांनी सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रारंभिक संस्कृताध्ययन केले. सोलापूरच्या श्रीयुत नागप्पण्णा अफझलपूरकर यांच्या प्रोत्साहनाने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते वाराणशीस आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने वयाच्या १८ व्या वर्षी दि. १९.७.१९५६ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विवाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात संस्कृत प्रथमा, मध्यमा या परीक्षांत उत्तीर्ण होऊन नंतर ते केदारक्षेत्रास गेले. तेथील श्री विश्वनाथलिंग 'रावल' यांच्याकडून चेलादीक्षा घेतली. पुढे केदारनाथचे पुजारी होऊन वयाच्या ६० व्या वर्षी उखीमठ, मध्यमहेश्वर, गुप्तकाशी आणि केदारनाथ मंदिरात पूजापाठ करीत सध्या निवृत्त होऊन स्वतःच्या गावी चप्पळगावला वास्तव्यास आहेत.

## २१७. श्री म.नि.प्र. गुरुबसवलिंग स्वामी

गुरुबसव बृहन्मठ, मक्तंपूर, कलबुर्गी (कर्नाटक)



श्री म.नि.प्र. गुरुबसवलिंग महास्वामीजी पूर्वाश्रमी हुब्बळ्ळी तालुक्यातील ब्याहरी हिरेमठाचे होते. हा मठ काशीपीठाचा शाखामठ आहे. श्री. वे. सिद्धलिंगय्या आणि सौ. पार्वतीम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९३१ मध्ये त्यांचा जन्म झाला. तेव्हा त्यांचे एकोरामाराध्य असे नामकरण केले होते. त्यांनी ब्याहट्टी गावी आपले प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पाच भावंडांत हे सुलक्षणी, तेजस्वी आहेत असे पाहून त्यांना ब्याहट्टी हिरेमठाचे उत्तराधिकारी नेमण्यात आले.

हुब्बळ्ळी हन्यारडू मठाच्या श्री ष.ब्र.मडिवाळ शिवाचार्यांकडून अय्याचार दीक्षा तसेच पट्टाधिकार संस्कार करण्यात आला. तेव्हा त्यांचे श्री ष.ब्र. एकोरामाराध्य शिवाचार्य असे नामकरण केले. पुढील संस्कृताध्ययनासाठी ते सोलापुरास आले. तेथील श्रीमद् वीरशैव संस्कृत वारद पाठशाळेत श्री पं. जगदीशशास्त्रींचे शिष्य होऊन संस्कृत साहित्याचा दोन वर्षेपर्यंत अभ्यास केला. पुढे बेंगळूरुला येऊन तेथे गौडर वीरभद्रय्यन यांच्या छात्रालयात राहून चामराज संस्कृत कॉलेजमध्ये ते अभ्यास करू लागले. तेथे शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त परीक्षा उच्च श्रेणीत उत्तीर्ण केली. बेंगळूरू येथील अभ्यास पूर्ण करून ते ब्याहट्टीस आले. तेव्हा उप्पिन बेटगेरीच्या भक्तांनी त्यांना आपल्या मठास पट्टाधिकारी म्हणून पाठविण्याची विनंती ब्याहट्टीच्या भक्तांना केली. भक्तांच्या विनंतीवरून त्यांनी उप्पिन बेटगिरी मठाचा अधिकार स्वीकारला. ते पुढे उच्च व्यासंगाकरिता काशीस आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १९.७.१९५६ रोजी त्यांनी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री विशेषत: तर्कशास्त्राचा अभ्यास केला. सोबत ज्योतिषशास्त्राचा

अभ्यास केला. १९५६ पासून १९६१ पर्यंत ५ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून तर्क तसेच ज्योतिषशास्त्रात ते पारंगत झाले. ते आयुर्वेदविद्या देखील शिकले. आयुर्वेद तसेच ज्योतिषविद्येमुळे ते लोकविख्यात झाले.

त्यांची ख्याती ऐकून कलबुर्गीचे गुरुबसव बृहन्मठाच्या श्री विरूपाक्ष स्वामीजींनी त्यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी नेमले. दि. ६.७.१९६१ रोजी त्यांना मठाचा अधिकार प्रदान केला. तेव्हा त्यांचे श्री म.नि.प्र. गुरुबसवलिंग महास्वामी असे नामकरण करण्यात आले. पुढे त्यांनी १९६३ मध्ये गुरुबसवेश्वर आर्टस् ॲण्ड एज्युकेशन सोसायटी संस्था स्थापिली. त्या संस्थेच्या अधिकारात संस्कृत पाठशाळा, प्राथमिक व माध्यमिक शाळा सुरू केल्या. श्री रेवणसिद्ध वाचनालय आणि प्रसाद निलय सुरू केले. आपल्या मठात पंचपीठांच्या जगद्गुरूंना निमंत्रण देऊन भक्तांना त्यांच्या दर्शनाचा लाभ घडविला.

१९९० मध्ये आपल्या हायस्कूलचे पदवीपूर्व महाविद्यालयात परिवर्तन केले. १९८८ मध्ये आपल्या मठात केंद्र ग्रंथालयास जागा देऊन ते सार्वजनिक ज्ञानवृद्धीस कारणीभूत झाले. सार्वजनिक कल्याणकार्यासाठी एक मोठा कल्याणमंडप उभारला. आयुष्यभर धार्मिक, सामाजिक कार्य करून ते दि. ८.४.१९९४ रोजी लिंगैक्य झाले.

## २१८. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी

वीरशैव मठ संस्थान,

मु.पो. वाई, ता.जि. सातारा (महाराष्ट्र)



महाराष्ट्रातील वाईचा वीरशैव मठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून या मठाला ऐतिहासिक परंपरा आहे. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी या शतकातील या मठाचे क्रियाशील शिवाचार्य होते. ते पूर्वाश्रमीचे कोरवार (ता. सिंदगी, जि. विजयपूर) या गावचे होत. या गावचे वे. मडिवाळय्या हिरेमठ यांचे ते सुपुत्र असून दि. १.३.१९३३ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे जन्मनाव शंकरय्या असे होते. कोरगावातच त्यांचे प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले. संस्कृताध्ययनाकरिता ते सोलापुरास आले. तेथील वीरशैव होटगी मठाच्या गुरुकुलात त्यांनी १९४६ मध्ये प्रवेश घेतला. वे.पं. जगदीशशास्त्रींचे शिष्य होऊन साहित्यशास्त्राचा अभ्यास केला. १९५६ पर्यंत तेथेच राहून अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या 'काव्यतीर्थ' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

या दरम्यान महाराष्ट्राच्या सातारा जिल्ह्यातील वाईच्या वीरशैव मठाला मठाधिपतीची आवश्यकता होती. त्या गावचे गावकऱ्यांनी सोलापुरात येऊन श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजींना विनंती केली. तेव्हा स्वामीजींनी कोरवारच्या वे. शंकरय्यांचे नाव सुचविले. वाईचे सद्भक्त संतुष्ट होऊन त्यांना आपल्या गावी घेऊन गेले आणि उज्जयिनी सद्धर्मसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात दि. ११.६.१९५६ रोजी त्यांना पट्टाधिकार करण्यात आला. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींना अभ्यासाची ओढ असल्याने

वाई येथील भक्तांच्या सहयोगाने ते उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९५९ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. श्री स्वामीजींनी काशी हिंदू विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन १९५६ पर्यंत तीन वर्षेपर्यंत अध्ययन केले. 'वेदान्तशास्त्री' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. १९६० मध्ये वाईस परतले.

विद्याप्रेमी सिद्धलिंग शिवाचार्य यांनी आपल्या मठात विद्यार्थी वसतिगृह करून अनेक विद्यार्थ्यांच्या शिक्षणाची सोय करून दिली. ते तपस्वी, उत्तम वक्ते होते. त्यांनी धर्मजागृती केली. आपल्या जीवनात मठाचा जीर्णोद्धार, सामाजिक संघटना करून दि. ८.४.२००५ रोजी ते लिंगैक्य झाले. ४९ वर्षेपर्यंत महाराष्ट्रात संचार करून त्यांनी केलेले धर्मकार्य उल्लेखनीय आहे. हल्ली या मठाचे नूतन पट्टाधिकारी श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्य स्वामीजी दि. २२.२.२००७ रोजी पट्टाधिकार स्वीकारून मठाचे सर्व धार्मिक कार्यक्रम यथावत् पार पाडत आहेत.

---

परिचय : शं. स. जंगम, सातारा.

## २१९. ॲड्. एच. गंगाधरन्

एम.ए., बी.एल्.
घर नं. १०८९, विष्णुवर्धन रोड. चामराजपुरम् ,
मैसूरु (कर्नाटक)



श्री. एच. गंगाधरन तुमकूर जिल्ह्यातील गुब्बी तालुक्याच्या हिंडसगेरे गावी १९२६ मध्ये जन्मले. मैसूर विश्वविद्यालयातून त्यांनी बी.ए., बी.एल्. पदवी मिळवली. नंतर उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९५६ मध्ये प्रवेश घेतला. येथील सुप्रसिद्ध काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या इंडालॉजी कॉलेजात भारतीय दर्शनशास्त्र विभागात एम.ए.साठी प्रवेश घेतला. दोन वर्षे अभ्यास करून तत्त्वज्ञानात एम.ए. ही पदवी मिळविली.

येथे अध्ययन करीत असताना जंगमवाडी मठाच्या ज्ञानमंदिर ग्रंथालयात अभ्यास करून ज्ञानार्जन केले. त्यांचा स्वभाव, स्वाध्यायनिष्ठा व व्यक्तित्व पाहून महास्वामीजींनी त्यांना विशेष कृपाशीर्वाद दिले. इ.स.१९५८ मध्ये पुन्हा मैसूरला आल्यानंतर सुत्तूर मठाच्या आश्रयाखाली त्यांनी वकिली सुरू केली.

त्यानंतर जे.एस्.एस्. विधी महाविद्यालयाचे संस्थापक प्राचार्य म्हणून सेवा केली. त्यांना साहित्य तसेच दर्शनशास्त्रात अभिरुची होती. शरणप्रकाश, मुक्तायक्काचे मुक्तिदर्शन, महाज्योती चन्नबसपण्ण, बसवप्रभू, मंत्रमहर्षी, निजगुण शिवयोगी, चिंतनगंगोत्री इ. दार्शनिक कृती तसेच गंगातरंग, गंगाभरण, कवन गंगोत्री इ. काव्यरचना आणि मांगल्यमुक्ति, पद्मविलास इ. कादंबऱ्या लिहिल्या. येडेरु, मलयमहदेश्वर आणि सुतुरु क्षेत्राचे व्यवस्थापक होऊन सेवा केली. मैसूरच्या कृष्णराज मठ क्षेत्रातून दोन वेळा ते निवडून आले. हल्ली मैसूर नगरात वकील असून समाजाचे हितचिंतक म्हणून कार्य करीत आहेत.

२२०. **श्री ष.ब्र. शिवयोगी सिद्धराम**
(चिदानंद) शिवाचार्य स्वामीजी, पंचग्रह हिरेमठ,
मु.पो. सुळ्ळ, ता. हुब्बळ्ळी,
जि. धारवाड (कर्नाटक)



सुळ्ळ गावचा पंचग्रह हिरेमठ हा रंभापुरी पीठाची शाखा असून या मठाला प्राचीन परंपरा आहे. तपस्वी, विद्वान असणारे अनेक शिवाचार्य या मठावर होऊन गेले आहेत. या मठाच्या परंपरेतील श्री ष.ब्र. शिवयोगी सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी होत.

हे मुळात विजयपूर जिल्ह्यातले इरनाळ हिरेमठाचे. त्या हिरेमठाच्या सौ. महंतम्मा व श्री. वे. रेवणसिद्धय्या या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १०.८.१९३७ रोजी जन्मले. त्यांचा जन्म यांच्या आईच्या माहेरी 'इंगळगी' गावी झाला. तेव्हा 'चिदानंद' असे त्यांचे नाव ठेवण्यात आले. त्यांनी आपले प्राथमिक शिक्षण इरनाळ येथे घेतले. माध्यमिक शिक्षण सिंदगी तालुक्यातील देवरहिप्परगी येथे पूर्ण केले. त्यानंतर संस्कृताध्ययनाकरिता ते सोलापुरात आले. तेथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत तसेच श्रीमद् वीरशैव गुरुकुल होटगी मठात अध्ययन करून त्यांनी संस्कृत भाषेत प्राविण्य मिळविले. त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९५७ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्याराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीतील शासकीय संस्कृत महाविद्यालयात विभिन्न विद्वानांकडे व्याकरण, साहित्य आणि वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास केला. काशीत अध्ययन पूर्ण करून ते स्वग्रामी हरनाळ येथे परतले.

संस्कृत उच्चविद्याविभूषित श्री चिदानंद स्वामीजींनी हुल्याळच्या श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजींची सेवा केली. त्यांच्या कृपाशीर्वादाने त्यांनी उत्तम वक्ते म्हणून ख्याती मिळवली. पुढे रंभापुरी जगद्गुरू श्री

वीरगंगाधर महासन्निधींच्या धर्मप्रचारात सहभागी होऊन कर्नाटकात उत्तम प्रवचनकार म्हणून कीर्ती मिळवली. त्यांचे प्रवचनचातुर्य पाहून रंभापुरी जगद्गुरूंनी यांना 'प्रवचनाचार्य' असे बिरुद दिले. सुळ्ळ गावचा पंचग्रह हिरेमठ पट्टाधिकारी नसल्याने रिक्त होता. त्या मठास चिदानंद स्वामी योग्य असा निर्णय झाला. रंभापुरी जगद्गुरू वीरगंगाधर शिवाचार्य यांच्या दिव्य सान्निध्यात दि. ८.५.१९७२ रोजी भक्तांनी त्यांना पट्टाधिकार दिला. त्यांचे 'ष.ब्र. शिवयोगी सिद्धराम शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. श्री ष.ब्र.शिवयोगी सिद्धराम शिवाचार्य स्वामीजींनी आयुष्यभर प्रवचन, पुराण सांगत धर्मप्रचार केला. शेवटी अनारोग्यामुळे सुळ्ळ पंचग्रह हिरेमठावर आपल्या वंशज बटूस १९८५ मध्ये पट्टाभिषेक करून त्याचे श्री ष.ब्र. अभिनव सिद्धराम शिवाचार्य असे नामकरण केले. नंतर ते दि. २२.८.१९९८ रोजी सुळ्ळ येथे लिंगैक्य झाले.

श्री ष.ब्र. अभिनव सिद्धराम शिवाचार्य देखील दि. ८.९.२०१३ रोजी शिवैक्य झाले. सध्या हूली मठाचे श्री ष.ब्र. शिवमहंत शिवाचार्य यांना त्या गादीवर पट्टाभिषेक करण्यात आला असून त्यांचे श्री ष.ब्र. शिवसिद्धराम शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले असून ते सध्या मठाचे सर्व व्यवहार पाहतात.

### २२१. श्री ष.ब्र. सत्यलिंग शिवाचार्य

गुरू श्री ष.ब्र. तोंटदार्य शिवाचार्य हिरेमठ,
मु.पो. पोतनाळ, ता. मानवी, जि. रायचूरु (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय असून त्यांनी आपल्या गावी प्राथमिक शिक्षण घेतले. सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात वे.पं. गंगाधरशास्त्रींचे शिष्य होऊन पुणे टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या प्रथमा आणि द्वितीया या संस्कृत परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. नंतर पोतनाळच्या श्री. पंपापतीराव व

श्री. वीरनगौड यांच्या प्रोत्साहनाने उच्च संस्कृत व्यासंगाकरिता २० व्या वर्षी ते वाराणशीस आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ५.७.१९५७ रोजी त्यांनी प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात वेदान्तशास्त्राचा अभ्यास केला. नंतर स्वस्थानी परतून त्यांनी आपल्या मठाचे धार्मिक कार्यक्रम पार पाडले.

## २२२. श्री ष.ब्र. चिदानंद शिवाचार्य

गुरू श्री ष.ब्र. चन्नसंघ शिवाचार्य हिरेमठ,
मु. इंगळगी, पो. देवरहिप्परगी,
ता. सिंदगी, जि. विजयपूर (कर्नाटक)

नंदिगोत्रीय. यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात वे.पं. गंगाधरशास्त्रींचे शिष्यत्व पत्करून संस्कृताध्ययन केले. पुढे आपल्या गावातील शिवरायप्पा पाटील आणि गुरुबसप्पा पाटील यांच्याकडून प्रेरणा घेऊन शास्त्राध्ययनासाठी वयाच्या १८ व्या वर्षी ते वाराणशीस आले.

श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १५.७.१९५७ रोजी प्रवेश घेतला. नंतर येथील संस्कृत महाविद्यालयात शास्त्राध्ययन करून पांडित्य मिळविले. पुढे इंगळगी हिरेमठाचे पट्टाध्यक्ष होऊन मठाची परंपरा, धार्मिक विधिविधान यथावत् पार पाडत आहेत.

## २२३. श्री वे.पं. संगमनाथ शर्मा

मु.पो. सारवाड, ता.जि. विजयपूर (कर्नाटक)



हे वृषभगोत्रीय होत. यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर सोलापूर येथील होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेतला. श्री वे.पं. गंगाधरशास्त्रीजींचे शिष्यत्व पत्करून ते संस्कृतचे अध्ययन करू लागले. पुण्याच्या टिळक महाराष्ट्र विद्यापीठाच्या 'प्रथमा' परीक्षेत उत्तीर्ण झाले. पुढे आपल्या गावचे मुख्य श्री. एस्. एस्. पाटील आणि एम्. एम्. पाटील यांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या १६ व्या वर्षी ते उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १५.७.१९५७ रोजी प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात अभ्यास करून त्यांनी साहित्याचार्य ही उपाधी मिळवली. याशिवाय काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कला संकायमधून एम.ए. (हिंदी) तसेच एम.ए. (संस्कृत) या पदव्या अर्जित केल्या. त्यानंतर नऊ वर्षे प्रधानाचार्य म्हणून येथील आदर्श सांग वेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात साहित्याचे प्राध्यापक म्हणून कार्य करून सध्या निवृत्त झाले आहेत. त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला असून ते काशीक्षेत्रात स्थायिक झाले आहेत.

सध्या जन्मगाव सारवाड येथे आपल्या मठाचा योगक्षेम पाहात आहेत.

२२४. **श्री. वेदाराध्य शर्मा एस. सी.**

मु. शागरन हळ्ळी, पो. निट्टूरु,

ता. गुब्बी, जि. तुमकुरू (कर्नाटक)



हे वीरगोत्रीय असून त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. नंतर संस्कृताध्ययनाकरिता सोलापूरच्या होटगी मठाच्या गुरुकुलात प्रवेश मिळविला. तेथे वे.पं. गंगाधरशास्त्री यांचे शिष्यत्व पत्करून कलकत्त्याच्या व्याकरण–आध्य आणि काव्य–मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. पुढे पं. गंगाधरशास्त्री आणि गावचे वे. रेवणाराध्य यांच्या प्रोत्साहनाने उच्च शास्त्राध्ययनाकरिता वयाच्या २२ व्या वर्षी काशीक्षेत्री आले.

श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ४.७.१९५८ रोजी प्रवेश घेतला. येथे व्याकरण तसेच साहित्यशास्त्राचा सूक्ष्म अभ्यास केला. तुमकूरच्या चिक्कपेटे हिरेमठाचे अधिपती म्हणून अनेक वर्षे धार्मिक कार्यक्रम पार पाडले. पुढे स्वास्थ बिघडल्यामुळे अकाली लिंगैक्य झाले. श्री ष.ब्र. डॉ. शिवानंद शिवाचार्य स्वामीजी या मठाचे मठाधिपती म्हणून कार्य पाहात आहेत.

## २२५. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी



पलसिद्ध संस्थान मठ,
मु.पो. साखरखेर्डा, ता. सिंदखेडराजा,
जि. बुलडाणा (महाराष्ट्र)

पलसिद्ध संस्थान मठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री पलसिद्ध महास्वामीजी होत. या मठातील प्राचीन हस्तलिखित ग्रंथावरून शा.श. ९८० म्हणजे इ.स. १०५८ मध्ये हा मठ स्थापिला गेला, हे सिद्ध होते. या मठाच्या मूळ कर्तृपुरुषाने आपल्या हातातील पळसाला (पलाश) जमिनीत रोवून आपल्या तप:शक्तीने तिला पालवी फोडली. म्हणून त्यांना पलसिद्ध महास्वामीजी असे नाव भक्तांनी दिले आहे असे म्हणतात.

या मठावर आजवर १९ शिवाचार्य होऊन गेले आहेत, असे मठातील कागदपत्रांवरून दिसून येते. त्यांच्यात श्री सिद्धलिंग शिवाचार्य आणि श्री गंगाधर शिवाचार्य प्रसिद्ध झाले आहेत. सध्याचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य या परंपरेतील २० वे शिवाचार्य पट्टाधिकारी होत. ते पूर्वाश्रमी बुलडाणा जिल्ह्यातील लोणार गावच्या श्री. वे. चंद्रशेखर स्वामी आणि सौ. वत्सलाबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १७.१२.१९३८ रोजी जन्मले. तेव्हा त्यांचे 'सांब' असे नाव ठेवले होते.

त्यांचे कुलगुरू साखरखेर्डा संस्थान मठाचे १९ वे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी बाल सांबाला लहान असतानाच आपल्या मठात बोलावून घेतले. त्यांनी साखरखेर्ड्यात प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे संस्कृताध्ययनाकरिता त्यांना सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात घातले. तेथे वे.पं. गंगाधरशास्त्रीजींचे शिष्यत्व पत्करून राजस्थानमधील पारडी स्वाध्याय मंडळाच्या 'प्रवेशिका' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढे उच्च शिक्षणाकरिता ते काशीक्षेत्रास आले.

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने

दि. २८.६.१९५८ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन वाराणसी संस्कृत विश्वविद्यालयाची 'वेदान्ताचार्य' पदवी प्राप्त केली.

३०.१.१९७२ रोजी ते साखरखेर्डा येथील सुप्रसिद्ध पलसिद्ध संस्थान मठाचे पट्टाधिकारी झाले. त्यांचे 'श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. सध्या महाराज महाराष्ट्रात निंरतर धार्मिक कार्यक्रम करीत धर्मजागृती करीत आहेत. ते श्रेष्ठ वाक्पटू असून वीरशैवधर्म, पंचपीठे व वीरशैव सिद्धान्त आपल्या अस्खलित वाणीने जनमनावर बिंबविण्याचे कार्य करीत आहेत.

'पलसिद्ध दर्शन' नावाचे मासिक काढून त्यातून जनतेला धार्मिक संदेश देण्याचे कार्य काही काळ त्यांनी केले. मन्मथस्वामींचे 'परमरहस्य' ग्रंथपारायण आणि शिवनामसप्ताह तसेच शिवदीक्षादी कार्यक्रम ते निरंतर करीत असतात. त्यांनी आपल्या कार्याने आणि वैखरीने आपल्या मठास आणि काशी पीठास कीर्ती मिळवून दिली आहे.

२२६. **श्री. टी. जी. मल्लाराध्य**

वडील टी. गुब्बय्या स्वामी मठद,
मु.पो. तुबुगेरे, ता. दोड्डमळ्ळापूर,
जि. बेंगळूरु (कर्नाटक)



हे वीरगोत्रीय. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर संस्कृताध्ययनाकरिता सोलापूर येथील होटगी मठाच्या गुरुकुलात प्रवेश घेतला. वे.पं. गंगाधर शास्त्रीजींचे शिष्यत्व पत्करून प्रारंभिक संस्कृत अध्ययन पूर्ण करून आपल्या गावच्या टी. पुट्टप्पन शानभोग आणि सिंगेगौड या दोघांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या १८ व्या वर्षी ते दि. ४.६.१९५८ रोजी श्री वेदाराध्यासोबत काशीक्षेत्री आले.

श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या आज्ञेनुसार श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन व्याकरणशास्त्राचा अभ्यास केला. त्यांनी वैदिक विद्येचा पूर्ण अभ्यास केला म्हणून काशीपीठातच जगद्गुरू विश्वाराध्य मठाचे प्रधान पुजारी म्हणून ते सेवा करीत होते. ते शिवैक्य झाल्यानंतर त्यांचे सुपुत्र सिद्धलिंग आराध्य (रवी) हे यात्रेकरूंचे धार्मिक विधिविधान पार पाडत असतात.

२२७. **श्री. आय्. पी. विश्वाराध्य पुट्टप्पा ऐनहळ्ळी**

मु.पो.ता.जि. दावणगेरी (कर्नाटक)

यांनी दावणगेरी येथे मॅट्रिकपर्यंतचे शिक्षण घेतले. बेंगळूरुच्या वाणिज्य महाविद्यालयात अभ्यास करून बी.कॉम पदवी मिळविली. पुढे उच्च व्यासंगाकरिता वयाच्या २१ व्या वर्षी ते विद्यानगरी वाराणशीस आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १७.६.१९५८ रोजी प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयात वाणिज्य संकायातील वाणिज्य विभागातून एम.कॉम. परीक्षा उत्तीर्ण झाले.

## २२८. श्री. संगप्पा सिद्रामप्पा नुले

मु.पो. उजळंबा, ता. हुमनाबाद, जि. बीदर (कर्नाटक)

यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. गुंजोटी येथे ९ वीपर्यंतचे शिक्षण घेतले. आपल्या गावच्या बाबाराव पाटील यांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या १७ व्या वर्षी ते काशीक्षेत्री आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ११.७.१९५८ रोजी प्रवेश घेतला. येथे मॅट्रिक उत्तीर्ण केली. पुढे संस्कृत तसेच आधुनिक विद्येचा अभ्यास केला.

## २२९. श्री. काशीनाथ राजेश्वर भोबडे

मु.पो.ता.जि. वाराणसी (उत्तरप्रदेश)

हे सेंट्रल हिंदू स्कूलमध्ये १० वी इयत्ता उत्तीर्ण झाले. त्यांनी दि. ८.७.१९५८ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. तेव्हा त्यांचे वय १५ वर्षे होते. पुढे त्यांनी काशी हिंदू विश्वविद्यालयात प्रवेश परीक्षा उत्तीर्ण करून पुढील शिक्षण घेतले.

२३०. **श्री. रमाकांत लिंगो सुरपुर**

मु.पो.ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)

हे गवंडी ज्ञातीचे. त्यांनी प्राथमिक शिक्षण स्वग्रामी घेतले. श्री एस. बी. नागराळ यांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या २५ व्या वर्षी ते काशीस आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात त्यांनी दि. २९.७.१९५८ रोजी प्रवेश घेतला.

येथील काशी हिंदू विश्वविद्यालयात कला संकायातील कला विभागातून एम.ए. पदवी मिळविली. शिवाय विधी महाविद्यालयातून एल्‌एल्‌.बी. परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

## २३१. श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी

मद्दानी हिरेमठ,

मु.पो. कुष्टगी, ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)



कुष्टगी नगरचा मद्दानी हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठाचे श्री. वे सिद्धलिंगय्या आणि सौ. बसम्मा यांच्या पवित्र गर्भी श्री चंद्रशेखर स्वामीजींचा जन्म झाला. कुष्टगीत यांनी प्राथमिक शिक्षण घेतले.

ते १० वर्षांचे असताना मद्दानी हिरेमठाचे श्री ष.ब्र. करिबसव शिवाचार्य स्वामीजींनी यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून नेमले. त्यानंतर त्यांनी शिवयोग मंदिरात काही वर्षे राहून संस्कृताभ्यास व योगाभ्यास केला. नंतर कोप्पळ येथे गविसिद्धेश्वर संस्कृत पाठशाळेत आणि मैसूरच्या शिवरात्री देशिकेंद्र संस्कृत पाठशाळेत संस्कृताध्ययन केले. त्यानंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले.

काशीपीठाधिपती श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. ३०.८.१९५८ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. व्याकरण, साहित्य इ. शास्त्रांचा अभ्यास केला. काशीतील अभ्यास पूर्ण करून कुष्टगीला येऊन तेथे 'मद्दानी विद्यावर्धक संघ' स्थापन केला. या शिक्षणसंस्थेचे कार्य अत्यंत स्पृहणीय आहे. श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी शेवटच्या श्वासापर्यंत मद्दानी हिरेमठाची परंपरा, सर्व धार्मिक कार्यक्रम पार पाडीत लिंगैक्य झाले. हल्लीचे शिवाचार्य पूर्वीची परंपरा पुढे चालवीत आहेत.

## २३२. श्री. शिवयोगी शर्मा हिरेमठ

मु. मासूरु, ता. हिरेकेरुरु, जि. धारवाड
द्वारा जंगमवाडी मठ, वाराणसी (उत्तरप्रदेश)



काशीपीठाचे प्रधान व्यवस्थापक पं. गंगाधरशास्त्री आणि सौ. सर्वमंगलदेवी यांचे हे सुपुत्र असून २३.२.१९४४ रोजी त्यांचा जन्म झाला. तेव्हा त्यांचे शिवयोगी शर्मा असे नामकरण करण्यात आले. वयाच्या पाचव्या वर्षी आपल्या आईवडिलांसोबत ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. ८.७.१९५८ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. प्राथमिक, माध्यमिक, पदवीपूर्व शिक्षण काशीतील विविध विद्यालयांतून घेतले. त्यानंतर काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कला महाविद्यालयात प्रवेश घेतला. तेथे पदवी तसेच पदव्युत्तर अभ्यासक्रम पूर्ण करून एम.ए. (हिंदी) पदवी १९७२ मध्ये मिळविली. पुढे १९७३ ते १९८० पर्यंत भारतीय जीवन विमा कंपनीचे एजंट म्हणून काम पाहिले. पुढे त्या व्यवसायाचा त्याग करून २००४ पर्यंत फोटोग्राफर म्हणून कार्य केले. श्री शिवयोगी शर्मा यांनी काशीच्या कु. मालती शर्मा यांच्याशी विवाह केला. यांना कु. कालिनी, कु. मालिनी नावाच्या दोन कन्या आहेत. त्यांचा विवाह झाला आहे. दोघींनी एम.ए.पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले आहे. शिवयोगी शर्मा जंगमवाडी मठातच राहायला होते. ते लिंगैक्य झाले आहेत.

२३३. **श्री. चंद्रहास रड्डी कृष्णप्पा रड्डी करूर**

मु. अंतरवळ्ळी, पो. हलगेरी,

ता. राणीबेन्नूरु. जि. हावेरी (कर्नाटक)



नामदरड्डी कुळात दि. २.११.१९३२ रोजी यांचा जन्म झाला. त्यांनी स्वग्रामी अंतरवळ्ळीत कन्नड प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर ब्याडगीत कन्नड मुलांच्या शाळेतून १९५० मध्ये सातवी परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे ब्याडगी म्युनसिपालटीच्या एस.जे.जे.एम्. हायस्कूलमधून १९५५ मध्ये हावेरी केंद्रातून दहावीच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले.

एस.एस्.एल्.सी. उत्तीर्ण झाल्यानंतर आपल्या घराण्याच्या परंपरेनुसार ते किराणा व्यापार करू लागले. पुढे १९५६ पासून १९५९ पर्यंत हावेरीच्या हुक्केरी विरक्त मठात राहून एच. जी. बेंगेरी आणि आर. व्ही. कुलकर्णी आणि एल्. जी. नाडकर्णी म्युनिसिपालिटीचे प्रशासकीय अधिकारी यांच्या सहवासात राहून त्यांनी इंग्लिश, कन्नड, संस्कृत या भाषांचा अभ्यास केला. नंतर एच. जी. बंगेरू गुरुवर्य तसेच आपले मामा हनुमंतप्पा रड्डी, देवप्पा रड्डी बेळविगी यांच्या प्रोत्साहनाने हावेरीच्या श्री जवाहर हिंदी विद्यालय, 'राष्ट्रभाषा' प्रवेशिका आणि विशारद परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण करून वयाच्या सत्ताविसाव्या वर्षी उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २०.८.१९५९ रोजी प्रवेश घेतला. गायघाटावरील राष्ट्रभाषा विद्यालयात पं. गंगाधर मिश्र यांच्याकडे हिंदी भाषेचा विशेष अभ्यास करून बनारस हिंदू विश्वविद्यालयातील कला संकायच्या हिंदी विभागात एम.ए.च्या वर्गात प्रवेश घेतला. राष्ट्रभाषेचा अभ्यास केला.

बहुमुखी प्रतिभासंपन्न चंद्रहास करूर यांनी दक्षिणामूर्ती महाविद्यालयातील वेदान्त विभागात नारायण दीक्षित यांच्याकडून उपनिषद, भगवद्गीता,

भागवत आणि पुराणे इ. महान ग्रंथांचा अभ्यास केला. त्याचप्रमाणे विश्वविख्यात ज्योतिषशास्त्री पंडित पं. शंभुनाथ मिश्र, काशी हिंदू विश्वविद्यालयाचे प्रोफेसर आर. जे. गलगली आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाचे प्राध्यापक पं. गोविंद पाठक यांच्याकडून वास्तुशास्त्र, ज्योतिष, हस्तसामुद्रिक इ. शास्त्रांचा अभ्यास केला.

विशेषत: त्यांनी स्वत: विश्वविख्यात अनेक महान व्यक्तींच्या जन्मकुंडल्यांचा अध्ययनाच्या दृष्टीने परिश्रमपूर्वक संग्रह केला होता. त्यांनी काशी महापीठाच्या ज्ञानमंदिर ग्रंथालयाचे ग्रंथपाल म्हणून काम पाहिले आहे. त्याचप्रमाणे श्रीयुत चंद्रहास रड्डी करूर यांनी वेदव्यासप्रणीत 'शिवमहापुराण' हा आपल्या प्रवचनाचा विषय बनवून काशी, बबलेश्वर, बन्निकोप्प, तुमकूरू आणि दावणगेरे येथे प्रवचने केली. याशिवाय हिमालयापासून कन्याकुमारीपर्यंत देशाटन करून १२ ज्योतिर्लिंगांच्या ठिकाणी श्रीशिवपुराणावर प्रवचन करण्याची महत्त्वाकांक्षा ते बाळगून होते.

८० वर्षांपर्यंत स्वस्थ राहून ते आजन्म ब्रह्मचारी राहिले. श्री चंद्रहास करूर हे दिवसातील १८ तास स्वाध्याय अध्ययन करणारे श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल परंपरेत उठून दिसणारे दिव्य व्यक्तिमत्त्व होते. ते काशीत शिवैक्य झाले.

## २३४. श्री ष.ब्र. योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजी

मु. गंगीबावी, ता. शिग्गाव, जि. हावेरी (कर्नाटक)
चरभाष : ९४४८९०३४४९



श्री ष.ब्र. योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजी हे जक्कली गावाचे. राजगुरू बृहन्मठ श्री वे.मू. वृषभेंद्र आणि सौ. वीरम्मा यांच्या पवित्र गर्भी २७.४.१९३५ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण कलघटगी तालुक्यातील कामधेनू या गावी आणि रोण तालुक्यातील जक्कली या गावी झाले. पुढे शाळा सोडून गदग तालुक्यातील हरलावूर येथे आत्त्याच्या घरी राहून त्यांनी सहा वर्षे शेती केली. त्यानंतर वैराग्यभावाने घर त्यागून कप्पनडोंगराच्या गुहेत ११ महिने जपानुष्ठान केले. त्यावेळी मुक्तिमंदिर येथे श्रीमद्रंभापुरी वीरसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजी धर्मप्रबोधन करीत होते. त्यांच्या प्रभावाने योगिराजेंद्र प्रभावित झाले आणि १९५२ मध्ये महास्वामीजींच्या लिंगपूजासेवेत रत झाले.

पूज्य रंभापुरी महास्वामीजींनी १९५३ मध्ये त्यांना संस्कृतच्या अभ्यासाकरिता बेंगळूरुला पाठविले. तेथे दोन वर्षे महंतीन मठात राहून त्यांनी संस्कृताध्ययन तसेच वेदाध्ययन केले. बेंगळूरुच्या विभूतिपूरमठातही राहून अध्ययन केले. पुढे अरसीकेरी तालुक्यातील हिरेकल्ल गावच्या सिद्धरबेट्ट येथे अकरा महिने अनुष्ठान केले. याप्रमाणे अध्ययनासोबत तपोनुष्ठान करीत ते श्रीरंभापुरी जगद्गुरूंच्या कृपाशीर्वादास पात्र झाले.

त्यानंतर श्री जगद्गुरूंच्या प्रेरणेने पुढील व्यासंगाकरिता काशीला येऊन श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९५९ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे रणवीर संस्कृत पाठशाला, संन्यासी संस्कृत पाठशाला आणि ब्रह्मविद्या महाविद्यालयात १९६७ पर्यंत ८ वर्षे पं. गौरीनाथ पाठक, पं. फलहारजी

यांचे शिष्यत्व पत्करून संस्कृतचे अध्ययन केले.

अशा रीतीने काशीतील अध्ययन पूर्ण करून ते कर्नाटकात परतले. गोकर्णादी पवित्र तीर्थक्षेत्री तपोनुष्ठान करून हल्ली गंगीबावी या क्षेत्री स्थायिक झाले. प्रतिवर्षी मकरसंक्रमणाच्या निमित्ताने रथोत्सव आदी कार्यक्रम करीत तेथेच लिंगैक्य झाले.

## २३५. श्री वे. डॉ. करबसय्या शास्त्री हिरेमठ

मु. बरडोल, ता. इंडी, जि. विजयपूर (कर्नाटक)



बरडोल हिरेमठ हा रंभापुरी पीठाची शाखा असून पुत्रवर्गपरंपरेतील मठ आहे. या मठाच्या वे. राचोटय्या आणि सौ. काशीबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ८.१२.१९२० रोजी यांचा जन्म झाला. चि. करबसय्यांनी इंचगेरीमध्ये कन्नड प्राथमिक शिक्षणाबरोबर संस्कृत भाषेचाही अभ्यास केला. पुढे प्रशालेच्या आणि संस्कृतच्या अध्ययनासाठी ते सोलापुरात आले. तेथील श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशालेत प्रवेश घेऊन पं. जगदीशशास्त्रींचे शिष्यत्व पत्करून त्यांनी संस्कृतचे अध्ययन केले. त्याबरोबरच हायस्कूलचे शिक्षणही पूर्ण केले.

त्यानंतर मठाच्या भक्तांच्या अपेक्षेप्रमाणे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २९.५.१९६० रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीच्या श्रीगणेश ज्योतिष पाठशाळेत प्रवेश घेऊन ते संपूर्णानंद विश्वविद्यालयाच्या उत्तर मध्यमा परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्यासोबत त्यांनी ज्योतिषशास्त्राचाही अभ्यास केला. दोन वर्षांनंतर ते स्वग्रामी परतले. त्यांनी चडचणला 'श्रीगुरू करबसव शिवाचार्य वैदिक संस्कृत गुरुकुला'ची स्थापना केली. या गुरुकुलात ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना ते संस्कृत व

ज्योतिषशास्त्र शिकवीत असतात. त्यांनी सोलापूरच्या आरोग्य विभागातर्फे आर.एम.पी. सर्टिफिकेट मिळवले असून ते आयुर्वेद वैद्य म्हणून समाजसेवा करीत आहेत. याबरोबरच त्यांनी 'श्रीगुरू करिबसव सहकारी बँके'ची स्थापनादेखील केली आहे.

२३६. **श्री ष.ब्र. प्रभुलिंग शिवाचार्य स्वामीजी**



औंधकर स्वामी संस्थानमठ,
३५३७, टाकणखार रस्ता, बार्शी,
जि. सोलापूर (महाराष्ट्र).
स्थिरभाष : ०२१८४-२२६३६९

श्री वे. विश्वनाथ स्वामी निंबर्गीकर व सौ. अन्नपूर्णाबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १५.२.१९३५ रोजी यांचा जन्म झाला. बार्शी येथे त्यांनी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. १९५४ पासून १९६१ पर्यंत गुरुवर्य श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामीजींच्या सान्निध्यात राहून त्यांनी धार्मिक शिक्षणाबरोबरच संस्कृतचे अध्ययन केले. त्याबरोबरच पंढरपुरात श्री पं. नम्रशास्त्री, पं. लक्ष्मणशास्त्री, पं. धारूरकरशास्त्री व पं. गोटेशास्त्री यांच्याकडे संस्कृतचे अध्ययन केले.

आपल्या गुरुवर्यांच्या आज्ञेनुसार उच्च संस्कृत अध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९६१ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत पाठशाळेत ४ वर्षे अध्ययन करून संस्कृत प्रथमा, पूर्व मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. १९६५ मध्ये बार्शीच्या औंधकर संस्थानमठावर त्यांना पट्टाभिषेक करण्यात आला. त्यानंतर १९६५ मध्ये ते पुन्हा काशीला आले आणि १९६९ पर्यंत ४ वर्षे साहित्याचा व वेदान्ताचा अभ्यास करून वाराणसी संस्कृत विश्वविद्यालयातून वेदान्तशास्त्री परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. कलकत्त्याच्या व्याकरणतीर्थ या परीक्षेचा त्यांनी

अभ्यास सुरू केला. परंतु मधेच १९६९ मध्ये त्यांचे गुरू ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य लिंगैक्य झाल्यामुळे अभ्यास सोडून ते बार्शीला परतले.

काशीहून परतल्यानंतर ते मठाची धार्मिक परंपरा यथावत् पार पाडत आहेत. ते विद्वान वक्ते असून निरंतर पाठप्रवचन करीत धर्मजागृती करीत आहेत. यांच्या काळात मायणी येथील मठाचा जीर्णोद्धार झाला. वृद्धावस्थेमुळे त्यांनी लिं. महेंद्रस्वामी व सौ. मीना निंबर्गीकर यांचे सुविद्य सुपुत्र मिथिल निंबर्गीकर यांना आपल्या मठाचा उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले असून मायणी येथे २६.८.२००७ रोजी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर महास्वामीजींच्या सान्निध्यात पट्टाभिषेकदेखील केला. त्यांचे श्री गंगाधर शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले.

ष.ब्र. प्रभुलिंग शिवाचार्य यांनी साताऱ्यातील आपल्या मठाची जागा काही वर्षांसाठी स्थानिक वीरशैव समाजाच्या ताब्यात दिली असून त्या ठिकाणी वीरशैव भक्तांनी एक सांस्कृतिक भवन निर्माण केले आहे. सातारा जिल्ह्यातील औंध व मायणी या गावांत आणि सातारा शहरातील बुधवारपेठेत या मठाचे शाखामठ आहेत. त्याचप्रमाणे सोलापूर जिल्ह्यातील बार्शी, पंढरपूर, सांगली जिल्ह्यातील ऐतगाव, रेणावी आणि माहुली या गावांतही त्यांचे शाखामठ आहेत. नगर जिल्ह्यातील खर्डा, औरंगाबाद जिल्ह्यातील कोनड आणि कर्नाटकातील बागलकोट येथेही त्यांचे शाखामठ व स्थावर-जंगम मालमत्ता आहे.

श्रीजगद्गुरू पंचाचार्य समितीने त्यांना जालना जिल्हा अध्यक्ष म्हणून नियुक्त केले आहे. काशी येथील ८ वर्षांच्या अध्ययनकालात त्यांनी काशी वीरशैव विद्वत्संघाचे सक्रिय सदस्य राहून कार्य केले आहे. सरळ आणि मृदू स्वभावामुळे सर्वजनप्रिय असे त्यांचे व्यक्तिमत्त्व होते. ते २९.९.२००८ रोजी बार्शी येथे लिंगैक्य झाले. त्यांची समाधी बार्शी औंधकर मठात केली आहे. सध्या त्यांचे उत्तराधिकारी स्वामीजी मठाचे धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## २३७. निराभारी श्री सिद्धय्यप्पा नावदगी

श्रीसिद्धारूढ मठ,
मु.पो. महालिंगपूर, ता. मुधोळ,
जि. बागलकोट (कर्नाटक)



महाराष्ट्रातील नावदगी (ता. अक्कलकोट, जि. सोलापूर) या गावचे श्री भीमण्णा हत्तुरे आणि सौ. गिरिजादेवी या शिवभक्त दंपतीच्या पवित्र गर्भी १९१० मध्ये यांचा जन्म झाला. त्यांनी नावदगी येथेच मराठी गावठी शाळेत तिसऱ्या इयत्तेपर्यंत प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर आपल्या कुटुंबातील शेतीच्या व्यवसायात ते रममाण झाले. त्यांना शिवभजनाची आवड होती. आपल्या गावात एक भजनी मंडळ स्थापन करून गावातील युवकांचा सहभाग घेऊन त्यांनी गावात भक्तिरसपूर्ण वातावरण निर्माण केले होते. त्यावेळी निलगार करजगीच्या श्री म.नि.प्र. गुड्डद बसवलिंग स्वामीजींच्या प्रभावाखाली येऊन ते त्यांची सेवा करू लागले. बसवलिंग स्वामीजींनी त्यांची आध्यात्मिक प्रवृत्ती ओळखली. बाडद राचप्पा या वेदान्तशास्त्राच्या जाणकाराकडून त्यांना 'अनुभवामृत' ग्रंथाचा अभ्यास करविला. ते २५ वर्षांचे असताना १९३५ मध्ये त्यांच्या आईवडिलांनी त्यांचा विवाह करून दिला.

गृहस्थाश्रमी सिद्धय्यप्पा यांनी सोलापूरच्या सूतगिरणीमध्ये काम करीत जट्टप्प नामक जाणकाराच्या मुखातून 'विचारचंद्रोदय' आणि 'विचारसागर' या ग्रंथांचे श्रवण करून त्यांचा अभ्यास केला. त्याचवेळी सोलापूरच्या निरंजनस्वामीजींच्या सोबत वेळोवेळी अध्यात्मचर्चा करून ते वेदान्तशास्त्रात निष्णात झाले. पुढे 'वृत्तिप्रभाकर' हा वेदान्तपर ग्रंथ वाचताना संस्कृत भाषेचा अभ्यास करण्याची उत्कट इच्छा त्यांच्या मनात निर्माण झाली. दृढ निर्धार करून वयाच्या ५१ व्या वर्षी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९६१ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. वर्षभर

तेथे राहून संस्कृतच्या अध्ययनाबरोबरच अत्यंत कठीण अशा 'वृत्तिप्रभाकर' या वेदान्तपर ग्रंथाचा व त्यावरील हिंदी ग्रंथांचा अभ्यास करून त्यांनी आपली इच्छा पूर्ण केली.

काशीत अध्ययन करीत असताना मरेगुद्दी आडवी सिद्धेश्वर मठाचे श्री म.नि.प्र. निरूपाधी स्वामीजींचे त्यांना सहकार्य लाभले. वेदान्तशास्त्रात पारंगत होऊन ते काशीहून हुब्बळीस परतले. तेथील ज्ञानी व सात्त्विक अशा श्रीशिवपुत्र स्वामीजींकडून निजगुण शिवयोगींच्या ग्रंथांचा अभ्यास करून अखेर त्यांनी संन्यास घेतला. याप्रमाणे विद्वत्संन्यास घेऊन गावोगावी संचार करीत त्यांनी अध्यात्मविद्येचा प्रसार केला. अक्कलकोट तालुक्यातील काशीलिंग जेऊर, जमखंडी तालुक्यातील हिप्परगी या गावी अधिक वास्तव्य करून त्यांनी वेदान्त सांगून लोकप्रबोधन केले. शेवटी महालिंगपूरच्या श्रीसिद्धारूढ मठातील ब्रह्मविद्याश्रमात १९९५ मध्ये ते लिंगैक्य झाले. त्यांनी बालपणापासून वेदान्तशास्त्राचा अभ्यास केला होता, तरीही वीरशैवधर्मोचित इष्टलिंगपूजेचा कधी त्याग केला नाही. तसेच देहापासून इष्टलिंग कधी वेगळे केले नाही. वीरशैव आचारविचाराचे पालन करून वेदान्तात पारंगत असणारे सिद्धय्यप्पन सर्वांना अत्यंत आदरणीय असे व्यक्तिमत्त्व होते.

---

संदर्भ : निराभारी सद्गुरू सिद्धबोधामृत,
लेखक– श्री सहजानंद स्वामीजी, महालिंगपूर.

## २३८. श्री म.नि.प्र. निरूपाधी स्वामीजी



अडवी सिद्धेश्वरमठ,
मु.पो. मरेगुद्दी, ता. जमखंडी,
जि. बागलकोट (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमी मरेगुद्दीचे श्री वे. शिवलिंगय्या आणि सौ. नीलम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २५.५.१९४२ रोजी जन्मले. त्यांनी काखंडकी येथे प्राथमिक शिक्षण व मुधोळ येथे माध्यमिक शिक्षण घेतले. मरेगुद्दीच्या श्री अडवी सिद्धेश्वरमठाचे ते उत्तराधिकारी असल्यामुळे त्यांना उच्च व्यासंगाकरता काशीक्षेत्री पाठविले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९६१ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यांनी येथे संस्कृत अध्ययन करताना अँग्लो-बंगाली कॉलेजातून बी.ए. ही पदवी प्राप्त केली. ३-४ वर्षे काशीला राहून संस्कृतबरोबर इंग्रजी भाषेचा अभ्यास करून ते आपल्या गावी परतले. १७.१२.१९६५ रोजी अडवी सिद्धेश्वर मठाचा निरंजनपट्टाधिकार त्यांनी स्वीकारला.

ते अभ्यासू लेखक आणि समीक्षक आहेत. १९७९ मध्ये अडवी प्रकाशनसंस्था काढून त्यांनी आजपर्यंत २४ ग्रंथ प्रकाशित केले. १९९७ मध्ये 'श्री अडवी सिद्धेश्वर विद्यापीठा'ची स्थापना करून त्याद्वारे श्री अडवी सिद्धेश्वर शिशुमंदिर सुरू केले. ही शिक्षणसंस्था उत्तरोत्तर वृद्धिंगत करण्याची ते महत्त्वाकांक्षा बाळगून आहेत.

## २३९. श्री म.नि.प्र. चंद्रशेखर स्वामीजी

निरंजन मठ, मु.पो.ता. कोडंगल,
जि. मेहबूबनगर (तेलंगणा)

श्री म.नि.प्र. चंद्रशेखर स्वामीजी पूर्वाश्रमामध्ये हंचिनाळ (जि. बागलकोट) गावचे असून श्री वे.मू. सिद्धय्या हिरेमठ आणि सौ. सिद्धम्मा या माहेश्वरांच्या पुण्यगर्भी १९३८ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक अध्ययन हंचिनाळ येथे झाले. नंतर वडिलांच्या प्रेरणेने संस्कृताध्ययनासाठी ते १९४८ मध्ये सोलापूरला आले. सोलापूर येथील किरीट विरक्त मठामध्ये वास्तव्य करून त्यांनी श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत दोन वर्षे अध्ययन केले. त्यानंतर १९५० मध्ये श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिर गुरुकुलात प्रवेश घेतला. तेथे तीन वर्षे राहून संस्कृत आणि योग यांचा अभ्यास केला. नंतर सदाशिवपेठच्या पेद्दमठाचे मठाधिपती श्री म.नि.प्र. विरूपाक्षानंद महाराजांच्या प्रेरणेने संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १.७.१९५३ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील विविध विद्वानांकडे व्याकरण, साहित्य, न्याय आदी विषयांचे पाच वर्षे अध्ययन केले. नंतर श्री म.नि.प्र. विरूपाक्षानंद महाराजांच्या आदेशावरून काशीहून परत आले. त्यावेळी त्यांची कोडंगल निरंजन मठाचे उत्तराधिकारी म्हणून १९५८ साली नेमणूक करण्यात आली. त्यानंतर ते उत्तराधिकारी म्हणूनच अनेक वर्षे धार्मिक कार्ये करीत होते. १९९८ साली कोडंगल गादीवर त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे 'श्री म.नि.प्र. चंद्रशेखर महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. हे १५ वर्षेपर्यंत त्या मठाचे सर्व धार्मिक कार्यक्रम करीत दि. ७.८.२०१३ रोजी कोडंगल येथे लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी कोडंगल निरंजन मठामध्ये करण्यात आली. त्यानंतर काही वर्षे मठाची गादी रिक्त होती. त्या गादीवर रायचूरु (जि. चिक्कसुगुरू) येथील डॉ. म.नि.प्र. सिद्धलिंग स्वामीजी यांना उत्तराधिकारी नेमण्याचा विचार सुरू आहे.

## २४०. डॉ. शंभुनारायण मिश्र



प्रपाठक, नवनीत कुंज, हिंदू स्नातकोत्तर महाविद्यालय,
जमानिया, घर नं. ६५, अग्रसेन नगर, पहडिया,
वाराणसी (उत्तरप्रदेश). चरभाष : ९४५१८८८६७६

डॉ. शंभुनारायण मिश्र हे उत्तरप्रदेशच्या चंदोली जिल्ह्यातील महुअरकला गावचे पं. राजमणी यांचे सुपुत्र असून दि. ५.७.१९५१ रोजी त्यांचा जन्म झाला. पाचवीपर्यंतचे प्राथमिक शिक्षण त्यांनी जन्मगावी पूर्ण केले. त्यांचे वडील राजमणी मिश्र हे वाराणसी येथे प्राथमिक शिक्षक असून ते जंगमवाडी मठातच आश्रयास होते. त्यामुळे त्यांचे चिरंजीव शंभुनारायण हे पुढील शिक्षणासाठी काशीला आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९६१ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीला सहाव्या वर्गात प्रवेश घेऊन त्यांनी अभ्यास सुरू केला. वडिलांच्या मार्गदर्शनाने आणि स्वतःच्या परिश्रमाने त्यांनी विद्येत निरंतर अभिवृद्धी केली. १९६६ मध्ये अलाहाबाद यू.पी. बोर्डाची परीक्षा तसेच १९६८ मध्ये त्याच बोर्डाची इंटरमिडिएट परीक्षा देऊन ते त्या परीक्षांत उत्तीर्ण झाले. काशी हिंदू विश्वविद्यालयातून त्यांनी १९७० मध्ये बी.ए.ची पदवी मिळवली. पुढे १९७२ मध्ये हिंदी विषयात ते एम.ए. झाले. नंतर त्याच विश्वविद्यालयातून 'चरणदासी संत जगदानंद और उनका काव्य' या विषयावर शोधप्रबंध सादर केल्याबद्दल १९७६ मध्ये त्यांना पीएच.डी. पदवी प्रदान करण्यात आली. याप्रमाणे १९६१ पासून १९७८ पर्यंत १७ वर्षे ते जंगमवाडी मठाच्या आश्रयाला होते. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचा विशेष कृपाशीर्वाद त्यांना लाभला. पुढे ते उत्तरप्रदेशच्या गाझीपूर जिल्ह्यातील जगनिया येथील हिंदू डिग्री कॉलेजात प्राध्यापक म्हणून ६.२.१९७९ रोजी रुजू झाले. त्यांनी संपूर्णानंद विश्वविद्यालयातून १९९० मध्ये 'साहित्याचार्य' ही पदवी मिळवली. सध्या कॉलेजमध्ये ते हिंदीचे प्रपाठक म्हणून कार्यरत आहेत. विविध नियतकालिकांतून त्यांचे संशोधनपर लेख प्रसिद्ध झाले आहेत

## २४१. वैदिकरत्न श्री वे.पं. रेवणसिद्ध शास्त्रीजी



चंद्रशेखरमठ, बार्शी, जि. सोलापूर
द्वारा: श्री वे. अरुणशास्त्री चंद्रशेखरमठ,
घ.नं. ६, शिरशिल्प कॉलनी, कारखाना रस्ता,
मु.पो. वैराग, ता.जि. सोलापूर (महाराष्ट्र)
चरभाष : ९४२११०३०३८५

श्री वे. रेवणसिद्ध शास्त्रीजी हे बार्शीच्या चंद्रशेखरमठाच्या श्री वे. रामलिंगशास्त्री आणि सौ. यमुनाबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २८.९.१९२९ रोजी जन्मास आले. बार्शी येथे मराठी माध्यमातून प्राथमिक शिक्षण घेऊन ते संस्कृतध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९६२ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीच्या विविध महाविद्यालयांत साहित्य, व्याकरण आणि ज्योतिष या शास्त्रांचा त्यांनी अभ्यास केला. त्याचबरोबर वैदिक विद्यादेखील हस्तगत केली. १९६२ ते १९७९ अशी सात वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून, अध्ययन करून ते उच्चविद्याविभूषित झाले.

ते उत्तम वक्ते असून पुराणप्रवचन करण्यात अत्यंत निपुण होते. त्यांचे कार्य पाहून श्रीरंभापुरी जगद्गुरू गंगाधर शिवाचार्य भगवद्पादांनी 'वैदिकरत्न' ही पदवी देऊन त्यांचा सन्मान केला. आयुष्यभर वैदिक कार्य करीत ज्योतिषशास्त्राच्या माध्यमातून लोकांच्या विविध समस्यांवर ते उपाय सांगत असत. असे लोककल्याणकारी कार्य करीत १०.१०.१९७६ रोजी ते

२४२. **श्री वे. शांतवीर शर्मा**

वडील शरणय्या गणाचारी,

मु.पो. पोरखंडी, ता. हुमनाबाद, जि. बीदर (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय असून त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर सोलापूरच्या होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेऊन श्री. वे.पं. गंगाधरशास्त्रींचे शिष्यत्व पत्करून पुण्याच्या टिळक विद्यापीठाच्या प्रथम तसेच द्वितीय परीक्षेत उत्तीर्ण झाले. पुढे संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले.

श्री काशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १२.३.१९६२ रोजी प्रवेश घेतला. कलकत्ता वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या काव्यतीर्थ परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या साहित्य विभागात अध्ययन करून 'साहित्याचार्य' ही उपाधी प्राप्त केली. पुढे गृहस्थाश्रम स्वीकारून काशी संस्कृत महाविद्यालयात प्रधानाचार्य म्हणून सेवा केली. हल्ली काशीत राहून निवृत्त जीवन जगत आहेत.

## २४३. श्री ष.ब्र. श्रीपती पंडिताराध्य शिवाचार्य



गुरू श्री ष.ब्र. गुरुशांत शिवाचार्य हिरेमठ,
(शांतशर्मा हिरेमठ), मु.पो. हिरेजेवरगी,
ता. अफझलपूर, जि. कलबुर्गी (कर्नाटक)

हिरेजेवरगी हिरेमठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ असून श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्य या मठाचे मूल कर्तृपुरुष. आजपर्यंत या मठावर १० मठाधिपती होऊन गेले आहेत. या मठाचे ९ वे मठाध्यक्ष श्री ष.ब्र. गुरुशांत शिवाचार्यांनी मठाचा जीर्णोद्धार करून शिक्षणसंस्था स्थापन केली. १० वे मठाध्यक्ष श्री ष.ब्र. श्रीपती पंडिताराध्य शिवाचार्य हे पूर्वाश्रमी दुधनी हिरेमठाचे फकीरय्या आणि सौ. संगम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. १७.१२.१९३९ रोजी जन्मास आले. त्यांचे शांतशर्मा असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. हिरेजेवरगीच्या हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती झाली. संस्कृताध्ययनाकरिता सोलापूरच्या होटगी मठाचे तपोरत्न श्री ष.ब्र. योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजींचे शिष्यत्व पत्करून कलकत्त्याच्या 'काव्य-मध्यमा' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

मंगळूरच्या श्री अण्णाराव पाटील यांच्या प्रोत्साहनाने वयाच्या २३ व्या वर्षी उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २४.७.१९६२ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे साहित्याभ्यास करून 'काव्यतीर्थ' झाले. नंतर काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या संस्कृतविद्या धर्मविज्ञान संकायात वेदान्ताचा अभ्यास करून १९६९ मध्ये 'वेदान्ताचार्य' झाले. काशी विद्यापीठातून १९७३ मध्ये संस्कृत एम.ए. पदवी प्राप्त केली. मैसूर मुक्त विद्यापीठातून कन्नडमध्ये एम.ए. झाले. त्यांनी महात्मा गांधी विद्यापीठात कन्नड विभागाचे अध्यक्ष म्हणून बरीच वर्षे काम पाहिले. ते संपूर्णानंद विश्वविद्यालयात आणि गव्हर्मेंट क्विन्स कॉलेजमध्ये कन्नड डिप्लोमा कोर्सचे कामही पाहत होते. हिरेजेवरगी, दुधनी, अक्कलकोट इ. मठांचे मठाधिपती म्हणून धार्मिक कार्यक्रम चालवीत होते. दि. २१.५.२००२ रोजी हृदयविकाराने ते लिंगैक्य झाले.

## २४४. श्री ष.ब्र. डॉ. महांत शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ



मु.पो. मनगुळी, ता. बसवन बागेवाडी,
जि. विजयपूर (कर्नाटक)

मनगुळी गावाला ऐतिहासिक परंपरा असून याला या पूर्वी माणिक्यवळ्ळी असे नाव होते. तेच आजचे मनगोळी. येथील हिरेमठ हा रंभापुरी मठाची शाखा असून शिष्यवर्गपरंपरा असणारा मठ आहे. या मठास आजपर्यंत १३ जण पट्टाधिकारी होऊन गेले. १३ वे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. संगनबसव शिवाचार्य स्वामीजी हे तपस्वी व धर्मपरायण होते. ते आपल्या कार्यकालात मंटपपूजा, लक्ष दीपोत्सव, पट्ट-चराधिकारी यांचे ४ थे संमेलन आदी अनेक धार्मिक कार्यक्रम करून प्रख्यात झाले. त्यांच्या कार्यकालात मनगुळी गावात अथणीचे श्री मृगेंद्र स्वामीजी, बिळूरूचे श्री गुरुबसव स्वामीजी, बीदरीचे श्री कुमारस्वामीजी येऊन गेले. हे संस्मरणीय असे प्रसंग होत.

वयाच्या ८० व्या वर्षी त्यांनी आपल्या मठावर श्री ष.ब्र. महांत शिवाचार्य स्वामीजींना उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केले. ते दि. ६.७.१९८३ रोजी लिंगैक्य झाले.

महांत स्वामीजी या मठाचे १४ वे पट्टाध्यक्ष होत. पूर्वाश्रमी मनगोळी गावचे तप:शेट्टी घराण्याचे श्री संगनबसव व सौ. काळम्मा या शिवभक्त दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ५.४.१९३९ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे रेवणसिद्ध असे नामकरण करण्यात आले. रेवणसिद्धांनी मनगोळीत प्राथमिक शिक्षण व विजापुरात माध्यमिक शिक्षण घेऊन १९५९ मध्ये ते मॅट्रिकची परीक्षा उत्तीर्ण झाले.

पुढे १९५८ मध्ये मनगोळीचे श्री ष.ब्र. संगनबसव शिवाचार्यांनी चि. रेवणसिद्ध यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले. दि. १०.६.१९५९ रोजी विधिवत् पट्टाभिषेक करून त्यांचे 'श्री महांत शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. नंतर त्यांनी बागलकोटच्या बसवेश्वर

कॉलेजात प्रवेश घेतला. संस्कृत विषय घेऊन १९६३ मध्ये ते बी.ए. झाले. पुढे उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १८.६.१९६३ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयातील संस्कृत विभागात अभ्यास करून १९६५ मध्ये संस्कृतमधील एम.ए. तसेच १९६७ मध्ये तत्त्वज्ञानातील एम.ए. या पदव्या मिळविल्या. त्यानंतर त्याच विश्वविद्यालयात 'वीरशैव आणि अद्वैत वेदान्त यांचा तुलनात्मक अभ्यास' हा शोधप्रबंध सादर करून १९७६ मध्ये पीएच.डी. पदवी प्राप्त केली. याचबरोबर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून 'वेदान्तशास्त्री' आणि 'आचार्य' या उपाधी मिळविल्या.

पुढे त्यांनी गव्हर्मेंट क्विन्स कॉलेजात १९७३ पासून १९८३ पर्यंत कन्नड अध्यापक म्हणून सेवा केली. याप्रमाणे काशी जंगमवाडी मठात १९६३ पासून १९८३ पर्यंत एकूण २० वर्षे अध्ययन व अध्यापनकार्य केले. १८.२.२००८ रोजी हरिहर (कर्नाटक) येथील पंचमसाली पीठाचे ते प्रथम जगद्गुरू झाले. ५ वर्षे त्यांनी धर्मकार्य केले. ४.२.२०१३ ला हरिहर येथे ते लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी हरिहर येथे आहे. त्यानंतर ४.२.२०१४ रोजी नवीन बटूला श्रीशैलजगद्गुरू डॉ. चन्नमल्लिकार्जुन पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींच्या सान्निध्यात बबलेश्वर बृहन्मठाचे श्री ष.ब्र. डॉ. महादेव शिवाचार्य यांच्या अमृतहस्ते पट्टाभिषेक करण्यात आला. त्यांचे संगनबसव शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. सध्या ते मनगुळी हिरेमठात वास्तव्य करून आपल्या मठाच्या परंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम चालवीत आहेत.

## २४५. श्री. शिवसांब स्वामी हिरेमठ



मु.पो. नंदूर (के.) ता.जि. कलबुर्गी (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८४७२-२१९०३९

श्री मादय्या स्वामी हिरेमठ आणि सौ. भागीरथीबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १७.९.१९५१ रोजी यांचा जन्म झाला. काशी जंगमवाडी मठाचे निष्ठावंत सेवक असणारे श्री महालिंग स्वामी काशीकर हे मादय्या स्वामी तसेच भागीरथी यांना मठाच्या सेवेकरिता अलाहाबादेस घेऊन आले. काशीपीठाच्या शाखामठ असणाऱ्या अलाहाबादच्या दारागंज मोहल्ल्यातील जंगमवाडी मठात या दंपतीस सेवेसाठी नेमले होते. आईवडिलांसोबत आलेला मुलगा शिवसांब स्वामी याने १९५३ पासून १९६३ पर्यंत अलाहाबाद येथे प्राथमिक शिक्षण घेतले.

पुढे महालिंग स्वामी काशीकर यांनी या मुलास कलबुर्गी जिल्ह्यातील बी. के. सलगर गावच्या हिरेमठास उत्तराधिकारी घोषित करून तसे इच्छापत्र करून ठेवले. पुढे १९६५ मध्ये उच्च व्यासंगाकरिता तो काशीक्षेत्री आला. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील सनातन धर्म इंटर कॉलेजात १० वी पर्यंत आणि संस्कृत पाठशाळेत मध्यमापर्यंत अध्ययन केले. पुढे सलगर मठाच्या व्यवस्थेसाठी शिक्षण खंडित करावे लागले. सलगर मठांतर्गत कलह सुरू झाला. त्यांनी मठाचा विचार मनातून काढून टाकून गृहस्थाश्रम स्वीकारला. सध्या नंदूर गावात राहून वैदिक विधिविधान करीत सामाजिक तसेच धार्मिक कार्यात त्यांनी स्वतःस गुंतवून घेतले आहे.

२४६. **श्री. मुकेश्वरय्या मल्लय्या हिरेमठ**

मु. क्यासनूरमठ, पो. निसरासी,
ता. सोरब, जि. शिवमोगा (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय. यांनी निसरासीच्या बेसिक स्कूलमध्ये कन्नड सातवीपर्यंतचे शिक्षण घेतले. पुढे आपल्या गावच्या वीरभद्रय्या हिरेमठांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या २० व्या वर्षी संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले.

श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. ४.७.१९६५ रोजी प्रवेश घेतला. पुढे येथील संस्कृत महाविद्यालयात अध्ययन केले.

## २४७. श्री ष.ब्र. देवलिंग शिवाचार्य स्वामीजी

बृहन्मठ, मु.पो. मुत्तनाळ, ता.जि. बेळगाव (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमी बेळगाव जिल्ह्यातील चिक्क बागेवाडीच्या वे. गुरुसिद्धय्या आणि सौ. तंगेम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९५१ रोजी बागेवाडीत जन्मले. स्वग्रामी ४ थी इयत्तेपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. ५ वी पासून १० वी पर्यंतचे शिक्षण कित्तूरच्या कल्मठात पूर्ण केले.

पुढे उच्च अध्ययनाकरिता ते १९६६ मध्ये काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीतील सनातन धर्म इंटर कॉलेजात इंटरची परीक्षा उत्तीर्ण करून काशी हिंदू विश्वविद्यालयातून कलाशाखेची पदवी प्राप्त केली. जवळपास ११ वर्षे काशीक्षेत्री वास्तव्य करून विद्वत्संघाचे सक्रिय सदस्य म्हणून कार्य पाहिले. १९७८ मध्ये आपल्या गावी परतले. दि. ८.४.१९७८ रोजी रंभापुरी जगद्गुरू वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजी तसेच केदारजगद्गुरू शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात मुत्तनाळ बृहन्मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. केदारपीठाचा चेलासंस्कार स्वीकारला. मठाची परंपरा सुव्यवस्थितपणे चालवीत दि. ३१. ५.१९९५ रोजी लिंगैक्य झाले. त्यानंतर मुत्तनाळ बृहन्मठाचे श्री. विश्वनाथ स्वामी व सौ. सुशीला यांचे सुपुत्र श्री शिवानंद स्वामींना पट्टाधिकार करण्यात आला. दि. २२.१२.२००८ रोजी सेडम हिरेमठाचे श्री शिवशंकर शिवाचार्य स्वामी यांच्या अमृतहस्ते श्रीमद् रंभापुरी, श्रीमद् उज्जयिनी, श्रीहिमवत्केदार, श्रीशैल आणि काशी जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात त्यांचा पट्टाभिषेक संपन्न झाला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. शिवानंद शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. सध्या शिवानंद शिवाचार्य स्वामी मठाची धार्मिक परंपरा चालवीत आहेत.

## २४८. श्री सोमनाथ महाराज गुरूओंकारनाथ महाराज

मु. बेंडकाड, पो. लोहारा बुद्रुक,
ता. उमरगा, जि. उस्मानाबाद (महाराष्ट्र)

हे नाथपंथीय होत. यांनी आपल्या गावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे सोलापूरच्या श्री. मुत्यप्पा सिद्रामप्पा मेंगाणे यांच्या प्रोत्साहनामुळे संस्कृतच्या अध्ययनासाठी ते काशीला आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी वयाच्या २७ व्या वर्षी १३.१०.१९६६ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. दोन वर्षेपर्यंत अभ्यास करून कलकत्त्याच्या वंगीय संस्कृत शिक्षा परिषदेच्या 'काव्य–आद्य' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. नंतर आपल्या गावी परतले. त्यांनी आपल्या परिसरात धर्मजागृतीचे कार्य केले. शिवरात्री व त्यासारख्या अन्य पुण्यपर्वात भक्तांना घेऊन ते काशीयात्रा करीत. अशीच काशीयात्रा करण्यासाठी भक्तांसोबत आले असता हृदयविकाराने जंगमवाडी मठातच ते शिवाधीन झाले. त्यावेळी काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांचा अंत्यसंस्कार करून गंगेत जलसमाधी देवविली.

## २४९. डॉ. जी. जी. हिरेमठ

मु. बेळवणिकी, ता. रोण जि. गदग (कर्नाटक)

श्री. वे. गुरुसंगय्या गुरुदेवय्या हिरेमठ भृंगीगोत्रीय होते. त्यांनी बेळगावच्या के. एल. ई. सोसायटीच्या वैद्यकीय महाविद्यालयात जी.सी.आय.एम. अर्थात् ग्रॅज्युएट ऑफ इंटिग्रेटेड मेडिसीन ही वैद्यकशास्त्राची स्नातक पदवी मिळविली. पुढे हूली सांबय्यनवर मठाच्या श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने ते वयाच्या २८ व्या वर्षी पुढील वैद्यकीय शिक्षणाकरिता काशीक्षेत्रास आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २५.८.१९६६ रोजी प्रवेश घेतला. पुढे काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या स्नातकोत्तर वैद्यकीय संशोधन केंद्रातून मेडिसन विषयात पोस्टग्रॅज्युएट (एम.डी.) उपाधी मिळवली. अनेक वर्षेपर्यंत जनतेची वैद्यकीय सेवा करीत आकस्मिकपणे रेल्वे अपघातात शिवाधीन झाले.

२५०. **श्री म.नि.प्र. नीलकंठ स्वामीजी**

दुरदुंडीश्वर मठ, मु.पो. मुरुगोड, ता. सौंदत्ती,
जि. बेळगाव (कर्नाटक)



पूर्वाश्रमी बेळगाव जिल्ह्यातील बैलहोंगल तालुक्याच्या बैलवाड येथील हिरेमठ वीरगोत्रीय श्री. वे. गुरुसिद्धय्या आणि सौ. संगम्मा या दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ३.५.१९४७ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे चंद्रशेखर असे नामकरण करण्यात आले. बैलहोंगल येथे प्राथमिक शिक्षण घेत असताना त्याच गावच्या वर्ती मठावर त्यांना उत्तराधिकारी नेमण्यात आले. तेव्हा त्यांना नीलकंठ स्वामी असे नामाभिधान देण्यात आले.

पुढे संस्कृताध्ययनाकरिता ते श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्री कुमारेश्वर संस्कृत महाविद्यालयात आले. तेथे हानगल श्री सदाशिव स्वामीजींचे शिष्यत्व पत्करून पाच वर्षेपर्यंत संस्कृत तसेच धार्मिक शिक्षण घेतले. त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २५.९.१९६७ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या संस्कृतविद्या धर्मविज्ञान संकायाच्या वेदान्त विभागात प्रवेश घेतला. निरंतर पाच वर्षेपर्यंत अध्ययन

करून 'वेदान्तशास्त्री' आणि 'आचार्य' या परीक्षांत उत्तीर्ण झाले. त्याशिवाय कलकत्त्याच्या 'काव्यतीर्थ' परीक्षेत देखील उत्तीर्ण झाले. एवढ्यात बैलहोंगलच्या मेटगुड्ड बंधूने यांना मुरुगोड दुरदुंडीश्वर मठाच्या निमित्ताने बोलावून घेतले. दि. २२.१.१९७२ रोजी त्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केले.

पुढे शतायुषी श्री म.नि.प्र. महांत शिवयोगी दि. २५.२.१९७२ रोजी लिंगैक्य झाले. या आधी उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केलेल्या श्री नीलकंठ स्वामीजींना दि. २८.८.१९७२ रोजी विधिवत् मठाचा निरंजन पट्टाधिकार देण्यात आला. सध्या श्री म.नि.प्र. नीलकंठ स्वामीजी या मठाच्या शिक्षणसंस्थेचे चेअरमन आहेत. शिशुविहार ते पदवीपूर्व महाविद्यालयापर्यंतचे आणि वृत्ती शिक्षण कॉलेज स्थापून शैक्षणिक अभिवृद्धी करण्यासोबत महादासोह चालवीत परंपरागत धार्मिक कार्यक्रम करीत अत्यंत जनप्रिय झाले आहेत. अलीकडे आपल्या षष्ठ्यब्दी समारंभाच्या निमित्ताने लोककल्याणकारी काम केले. याप्रमाणे बेळगाव जिल्ह्यातील मुदगोडच्या दुरदुंडीश्वर मठाची कीर्तिपताका त्यांनी उंचावली.

## २५१. श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी

बेरुगंडी बृहन्मठ, वीरशैव गुरुकुल, श्रीक्षेत्र श्रीशैल, जि. कर्नूल (आंध्र प्रदेश)



हे पूर्वाश्रमी बेळगाव जिल्हा अथणी तालुक्याच्या रड्डेर हट्टी गावचे श्री. वे. राचय्या आणि सौ. गुरुसंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.१.१९५१ रोजी जन्मले. त्यांनी रड्डेर हट्टी गावी तिसऱ्या इयत्तेपर्यंत अभ्यास केला. नंतर श्रीशैल मल्लिकार्जुन देवस्थानच्या आपल्या मामाकडे- श्री. वे. संगनबसव स्वामींकडे श्रीशैलक्षेत्रास आले. संगनबसव स्वामीजींनी

त्यांना १९६१ मध्ये मैसूरच्या श्री शिवरात्रीश्वर पाठशाळेत पाठवून दिले. तेथे तीन वर्षेपर्यंत अभ्यास करून १९६४ मध्ये आंध्रप्रदेशाच्या विकाराबादच्या मुद्दमल्लप्पा यांच्या संस्कृत पाठशाळेत श्री म.नि.प्र. शंकरस्वामीजींकडून रघुवंशादी काव्यांचा अभ्यास केला. त्यानंतर श्रीशैलक्षेत्री येऊन मंदिरात परिचारक बनून सेवा करू लागले. येथील वेदपंडित श्री. नरसिंहगुप्त शास्त्रीजींकडे वेदाध्ययन केले.

पुढे उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २०.५.१९६७ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात सात वर्षेपर्यंत अभ्यास करून व्याकरण तसेच साहित्यशास्त्राचा अभ्यास केला.

श्रीशैल देवस्थानचे प्रमुख पुजारी श्री. वे. संगनबसव स्वामीजी लिंगैक्य झाल्याने त्या जागी त्यांना १९७४ मध्ये नेमण्यात आले. त्यापूर्वी काही काळ त्यांनी विदर्भातील वाशीमच्या चिंतामणेश्वर मठावर पट्टाधिकारी म्हणून कार्य केले. नंतर ते श्रीशैलला गेले. १९८३ मध्ये देवस्थानच्या वीरशैवागम पाठशाळेचे प्रधानाचार्य म्हणून काही वर्षे कार्य केले. नंतर देवस्थानच्या कमिटीकडून जागा मिळवून त्यांनी आपल्या वीरशैव गुरुकुलाचा ५.१.१९९१ रोजी श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींच्या अमृतहस्ते शिलान्यास केला. सुमारे २५ लक्ष रु. खर्चून पाठशाळेच्या इमारतीचे दि. ८.४.१९९५ रोजी श्रीशैल जगद्गुरू तसेच केदार जगद्गुरू श्री १००८ 'रावल' सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या पवित्र हस्ते उद्घाटन करण्यात आले.

गुरुकुलात स्वतः वैदिक पाठ सांगत सुस्वर वेदमंत्र म्हणणारे शेकडो विद्यार्थी त्यांनी प्रशिक्षित केले आहेत. विभिन्न प्रांतांत चालणाऱ्या मोठमोठ्या यज्ञयागांत, धार्मिक पूजा समारंभांत मठाधिपती तसेच सामाजिक धुरीण या पाठशाळेच्या विद्यार्थ्यांना अत्यंत आदराने बोलावतात.

त्यांच्याठायी असणारी कर्तृत्वशक्ती पाहून श्रीशैलजगद्गुरू उमापती

पंडिताराध्य जगद्गुरू आणि रंभापुरी श्रीजगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांना चिक्कमगळुरू जिल्हा आल्दूरु होबळीय बेरुगंडी बृहन्मठावर दि. १७.५.१९९७ रोजी पट्टाभिषेक केला. मठाच्या व्यवहारासोबत श्रीशैलचे वीरशैव गुरुकुल त्यांनी व्यवस्थितपणे चालविले.

२००१ मध्ये काशी महापीठात आयोजिलेल्या श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्यांच्या पीठारोहण द्वादश वार्षिक महोत्सवानिमित्त अतिरुद्राभिषेकात त्यांनी या वीरशैव गुरुकुलातील २५ विद्यार्थ्यांसमवेत वैदिक कार्य व्यवस्थितपणे पार पाडले. त्यांच्या वैदिक विधिविधानाने संतुष्ट होऊन श्रीकाशीजगद्गुरूंनी त्यांना एक लक्ष रुपये दिले.

याप्रमाणे दि. २९.५.२००६ पासून दि. ५.६.२००६ पर्यंत केदार महापीठात चाललेल्या केदार जगद्गुरू 'रावल' श्री भीमाशंकरलिंग शिवाचार्यांच्या जन्म व सुवर्णमहोत्सव तसेच श्रीजगद्गुरू नीलकंठ भवनाच्या उद्घाटनाच्या निमित्ताने आयोजित 'शतचंडी' तसेच 'श्रीरुद्रयाग' विधिवत् पार पाडल्याने केदार जगद्गुरूंनी देखील त्यांच्या वीरशैव गुरुकुलास रु. ५१,००० आशीर्वाद म्हणून दिले. याचप्रमाणे दि. १४.८.२००७ पासून दि. २९.११.२००७ पर्यंत श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या षष्ठ्यब्दी कार्यक्रमाच्या निमित्ताने काशीपीठात १०८ दिवस चाललेल्या लक्षकुंभाभिषेक, कोटी बिल्वार्चन आणि कोटी कुंकुमार्चनाचे वैदिकत्व श्री. चंद्रशेखर शिवाचार्यांनी पार पाडले आणि ते गुरुकृपेस पात्र झाले. या रीतीने श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींनी अत्यंत परिश्रम घेऊन वैदिक विद्यार्थी तयार करण्याचे काम करून ते काशीपीठास गौरवास्पद ठरले आहेत.

पुढे ते कर्नूल येथे २९.१२.२०१० रोजी हृदयघाताने ते शिवैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी श्रीशैलच्या वीरशैव गुरुकुलामध्ये केली आहे.

## २५२. श्री श्रो. ब्र. शिवकुमार स्वामीजी

चिदंबराश्रम, मु.पो. ता.जि. बीदर (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे विजयपूर जिल्ह्यातील इंडी तालुक्याच्या पडनूर गावचे. त्यांच्या वडिलांचे नाव शरणकल्लप्पा सोलापूरकर व आईचे नाव शरणी पार्वतम्मा. हे सोलापूर येथील मातोश्री रुद्रम्माताई शरणय्यांच्या मठाशेजारीच राहायला होते. एकुलत्या एक मुलावर नालवतवाड वीरेश्वरांचे आशीर्वाद राहावेत या आशेने त्यांचे 'वीरकुमार' असे रुद्रम्माताईंनी मठात नामकरण केले. जन्मल्यापासून सहाव्या महिन्यातच त्यांचे वडील शिवैक्य झाले. आई पार्वतम्मानेच त्यांचे पालनपोषण केले.

हे वृषभगोत्रीय असून त्यांनी आधी सोलापूरनंतर कर्नाटकातील पडनूर येथे प्राथमिक शिक्षण घेतले. विजापुरात हायस्कूलचे शिक्षण घेत असताना हुब्बळ्ळी शांताश्रमाच्या श्री श्रो.ब्र. शिवपुत्र स्वामीजींच्या वेदान्तपर प्रवचनांनी प्रभावित होऊन आपले शिक्षण अर्ध्यावर सोडून गुरुवर्यांसोबत ते हुब्बळ्ळीस आले. तेथे चार वर्षेपर्यंत गुरुसेवा करीत सिद्धारूढ मठात वास्तव्य करून श्री म.नि.ज. शिवयोगींच्या षट्शास्त्रांचा अभ्यास केला. पुढे हुब्बळ्ळीच्या श्री नित्यानंद स्वामींच्या प्रेरणेने उत्तर प्रदेशातील अति प्राचीन तीर्थक्षेत्र हरिद्वारला जाऊन तेथील महामंडलेश्वर श्री महेश्वरानंद गिरी यांच्याकडे तीन वर्षेपर्यंत संस्कृत तसेच हिंदी भाषेचा अभ्यास केला. १९६६ मध्ये प्रयागक्षेत्रीच्या महाकुंभ मेळ्यात महामंडलेश्वरांकडून संन्यासदीक्षा घेतली. तेव्हा त्यांचे 'स्वामी विद्यानंद' असे नामकरण करण्यात आले.

संन्यासदीक्षेनंतर हुब्बळ्ळीस आल्यानंतर तेथील जनता त्यांना 'शिवकुमार स्वामी' असे संबोधू लागली. नंतर कमडोळ्ळीच्या श्री वीरनगौडा आणि इंगळ्ळीय मुरीगेप्पा शिग्गावी यांच्या सहकार्याने तसेच प्रोत्साहनामुळे उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते वयाच्या २३ व्या वर्षी काशीक्षेत्री आले.

श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुज्ञेने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १९.९.१९६७ रोजी प्रवेश घेतला.

येथील श्री दक्षिणामूर्ती संस्कृत महाविद्यालयात त्यांनी व्याकरण, न्याय आणि वेदान्त यांचा व्यवस्थित अभ्यास केला. वाराणसी संस्कृत विश्वविद्यालयातून 'वेदान्ताचार्य' उपाधी मिळविली. त्याचप्रमाणे म. गांधी काशी विद्यापीठात तत्त्वज्ञान हा विषय घेऊन एम्.ए. परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्यांनी इंग्लिश अध्ययनाकरिता पुण्याच्या सदाशिव पेठेतील 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विद्यार्थी निलया'त २ वर्षे वास्तव्य केले होते.

श्री शिवकुमार स्वामींनी अध्ययन पूर्ण करून कर्नाटक, महाराष्ट्र, आंध्र या प्रदेशांत संचार करीत वेदान्त-सिद्धान्तपर प्रवचने करून लोकप्रबोधन केले. सध्या बीदर येथे चिदंबराश्रम, सिद्धारूढ मठ स्थापून तेथे स्थायिक झाले आहेत. त्या परिसरात त्यांनी लहान मुलांची वसती शाळा, हायस्कूल, बी.एड्. कॉलेज, आयुर्वेद मेडिकल कॉलेज इ. शिक्षणसंस्था चालवीत शैक्षणिक क्षेत्रात उल्लेखनीय कार्य केले. ते श्रेष्ठ वक्ते व उत्तम लेखक असून त्यांनी अनेक ग्रंथ लिहिले आहेत. आध्यात्मिक प्रवचनाकरिता विदेश यात्रा केल्या आहेत. आपल्या ६० व्या वाढदिवसाच्या निमित्ताने सर्व संप्रदायांच्या गुरूंना बीदरला बोलावून सर्वधर्मसमभावनेचा पुरस्कार केला. शारीरिक व मानसिकदृष्ट्या स्वस्थ असल्यामुळे त्यांनी उत्तरायुष्यात स्वत:ला आध्यात्मिक प्रचारात गुंतवून घेतले आहे.

फेब्रुवारी २०१९ मध्ये बीदर येथे त्यांचा अमृत महोत्सव अत्यंत वैभवाने संपन्न झाला. या कार्यक्रमात श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीशैल जगद्गुरू यांनी सान्निध्य स्वीकारले होते. याशिवाय इतर सर्व संप्रदायांचे साधु, संतमहंत सहभागी झाले होते. सध्या ते पूर्ण स्वस्थ असून आध्यात्मिक प्रवचन करीत आहेत आणि शिक्षणसंस्था स्थापन करून त्याद्वारे बालवाडीपासून मेडिकल (आयुर्वेद) पर्यंत सर्व प्रकारचे शिक्षण प्रदान करीत आहेत.

## २५३. श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य



गुरू श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य,
साविरदेवर मठ (बिच्चाली),
मु.पो. मटमारी, ता. जि. रायचूरु (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमी कुडलसंगम (ता. औराद, जि. बीदर) गावच्या हिरेमठाचे वे. राचोटय्या व सौ. रत्नम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भात द्वितीय सुपुत्र म्हणून जन्मास आले. त्यांचे चंद्रशेखर असे नामकरण करण्यात आले. ते वीरगोत्रीय असून त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत तसेच हुब्बळ्ळीच्या मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात संस्कृतचे अध्ययन करून कलकत्त्याच्या 'व्याकरण-मध्यमा' परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

पुढे बिच्चाली मटमारी साविरदेवर मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती झाली. नंतर आपले गुरू साविरदेवर मठाचे श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्यांकडून प्रोत्साहित होऊन पुढील व्यासंगाकरिता ते वयाच्या २१ व्या वर्षी काशीक्षेत्री आले.

येथे श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १४.११.१९६८ रोजी प्रवेश घेतला. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या संस्कृतविद्या धर्मविज्ञान शाखेतील व्याकरण विभागात तीन वर्षेपर्यंत अभ्यास करून त्यांनी 'व्याकरणशास्त्री' पदवी मिळविली. नंतर वाराणसी संस्कृत विश्वविद्यालयाच्या आयुर्वेद महाविद्यालयात अभ्यास करून ते 'आयुर्वेदाचार्य' झाले. त्यानंतर त्यांनी बिच्चाली मटमारी साविरदेवर मठाचा पट्टाधिकार १९७२ मध्ये स्वीकारला. काही वर्षे मठाचे धार्मिक कार्यक्रम व्यवस्थित पार पाडले. पुढे भक्तांशी दुमत झाल्याने सध्या बिच्चालीचा शाखामठ गब्बूरुमध्ये राहून धार्मिक कार्य करीत आहेत.

## २५४. श्री वे.पं. शिवलिंग स्वामी

गुरू श्री सिद्धेश्वर, मु.पो. जऊळका,
ता. मालेगाव, जि. वाशीम (महाराष्ट्र)
चरभाष : ९४२१७४८८६३



महाराष्ट्रातील जऊळका (ता. मालेगाव, जि. वाशीम) या खेडेगावातील श्री. वे. लक्ष्मणय्या वाघमारे (जंगम) आणि सौ. मनकर्णाबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ३१.७.१९५५ रोजी श्री शिवलिंगस्वामींचा जन्म झाला. जऊळका गावामध्येच त्यांचे प्राथमिक शिक्षण मराठी सातवीपर्यंत झाले. नंतर बुलडाणा जिल्ह्यातील साखरखेर्डा गावच्या एस.ई.एस. हायस्कूलमध्ये एक वर्ष अभ्यास करून ते आठवी उत्तीर्ण झाले. साखरखेर्ड्याच्या पलसिद्ध संस्थानमठाचे मठाधिपती श्री ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजींच्या आशीर्वादाने, आजोबा श्री. वे. सदाशिवय्या वाघमारे आणि मातोश्री मनकर्णाबाईच्या अपेक्षेनुसार संस्कृताध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले.

तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९६८ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन 'वेदान्तशास्त्री' पदवीसाठी प्राप्त करण्याच्या उद्देशाने 'संस्कृत प्रथमा' वर्गात प्रवेश घेऊन अभ्यासाला सुरुवात केली. त्याच विद्यालयात निरंतर आठ वर्षेपर्यंत अध्ययन करून क्रमश: पूर्व मध्यमा, उत्तर मध्यमा या परीक्षांत उत्तीर्ण होऊन त्यांनी संस्कृत विश्वविद्यालयाची 'वेदान्तशास्त्री' ही पदवी मिळविली. त्यांना अंधांच्या ब्रेल लिपीचे देखील ज्ञान होते.

त्यानंतर मित्रवर्य हिरेजेवरगीचे श्री ष.ब्र. श्रीपती पंडिताराध्य शिवाचार्य यांच्या सल्ल्यानुसार त्यांनी काशी विद्यापीठात दर्शनशास्त्र विभागात एम्.ए.साठी प्रवेश घेतला. १९७९ मध्ये एम्.ए. पदवी प्राप्त करून घेतली. काशीत अध्ययन करीत असताना श्रीपीठातील विविध सेवाकार्य ते श्रद्धेने

करीत होते. याशिवाय दोन वर्षेपर्यंत काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यदर्शी म्हणून कार्य पाहिले.

काशीत अध्ययन करीत असताना १९७९ मध्ये त्यांच्या गुरुवर्यांनी साखरखेर्डा मठाचा शाखामठ असलेल्या यवतमाळ जिल्ह्यातील तळेगावच्या वीरशैव मठावर उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती करून उत्तराधिकार संस्कार केला. त्यामुळे काशीतील १० वर्षांच्या अध्ययनानंतर तळेगाव मठाचे उत्तराधिकारी म्हणून मठाची व्यवस्था पाहत त्या भागातील धार्मिक कार्यक्रमात ते सहभागी होत असत. तळेगावच्या मठात श्रीपलसिद्ध मूर्तींच्या स्थापनेसाठी त्यांनी श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींना बोलावून अभूतपूर्व असा कार्यक्रम करून कीर्ती मिळविली. पाच वर्षांनंतर तळेगाव मठातील धार्मिक कार्यक्रम करीत पुढे कु. सुलभा हिचेशी विवाह करून ते गृहस्थाश्रमी झाले. त्यांना एक मुलगा आणि एक मुलगी आहे. पौरोहित्य करीत त्यांनी सामाजिक प्रतिष्ठा मिळविली आहे. सध्या अकोला आणि वाशीम या भागांत पुरोहिताचे कार्य करीत त्यांनी जनमनात आपले स्थान निर्माण केले आहे.

## २५५. श्री वे. नीलकंठ शास्त्री चन्नवीरय्या केंडदमठ

मु. हळे शिडेनूरु, ता. ब्याडगी, जि. हावेरी (कर्नाटक)



हळे शिडेनूरुच्या केंडद मठाचे श्री. वे. चन्नवीरय्या आणि सौ. शांतम्मा या माहेश्वराच्या पवित्र गर्भी दि. ११.८.१९४५ यांचा जन्म झाला. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर वडिलांच्या प्रेरणेने १९५७ मध्ये शिक्षणाकरिता सालूरु हिरेमठाच्या वैदिक पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजींचे शिष्यत्व पत्करून वैदिक अध्ययन पूर्ण केले.

त्यानंतर श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने १९६८ मध्ये पुढील वैदिक तसेच संस्कृताध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन पीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९६८ मध्ये प्रवेश घेतला.

काशीक्षेत्रातील संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन साहित्याध्यायन केले. त्याचबरोबर श्रीपीठाचे माजी विद्यार्थी श्री पं. वेदाराध्यांकडून विशेष वैदिक अभ्यास केला. श्रीपीठात अभ्यास करीत असताना श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचे लिंगपूजा सेवक म्हणूनही सेवा केली. त्यांचा विशेष सेवाभाव पाहून महास्वामीजींनी त्यांची सेवकप्रमुख म्हणून नियुक्ती केली. १९६८ पासून १९८९ पर्यंत महास्वामीजींची सेवा करीत ते त्यांच्या कृपाशीर्वादास पात्र झाले. त्यांना दि. २४.१२.२००६ रोजी कर्नाटक राज्य वीरशैव अर्चक आणि पुरोहित संघाकडून 'पुरोहितरत्न' ही प्रशस्ती मिळाली. त्यांना चार भाषांचे ज्ञान असून कर्नाटक, महाराष्ट्र आणि आंध्र प्रदेशांत वैदिक कार्य केल्यामुळे ते प्रसिद्धीस आले आहेत.

२५६. **श्री. वे. पंडिताराध्य शर्मा**

वडील गुरुलिंगय्या चरंतीमठ,
मु. रेवडीहाळ, पो. कडीवाल,
ता. हुनगुंद, जि. बागलकोट
हल्ली मुक्काम वाराणसी (उत्तर प्रदेश)

हे वृषभगोत्रीय होत. त्यांनी स्वग्रामी शिक्षण पूर्ण केले. नंतर श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत, हुब्बळ्ळी मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात आणि बेंगळूरुच्या जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयात 'साहित्य मध्यमा' ही पदवी मिळविली.

नंतर श्रीशैलजगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रेरणेने उच्च संस्कृत व्यासंगाकरिता वयाच्या १९ व्या वर्षी काशीक्षेत्रास आले. येथे श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १५.७.१९६९ मध्ये प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात अभ्यास करून पुढे गृहस्थाश्रम स्वीकारला. सध्या काशीतच राहून शालूंचा व्यापार करीत आहेत.

## २५७. श्री १००८ रावल जगद्गुरू सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी

केदार पीठ (उत्तरांचल प्रदेश)



हे पूर्वाश्रमी बागलकोट जिल्ह्याच्या बिळगी तालुक्यातील गुळबाळी गावचे हिरेमठ होते. श्री. व. बसवलिंगय्या आणि आई भागीरथीबाई या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. १०.८.१९४५ रोजी यांचा जन्म झाला. हे वीरगोत्रीय असून त्यांनी बाल्यावस्थेत गृहत्याग करून सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेऊन वे.पं. गंगाधरशास्त्रीजींकडे संस्कृतचे अध्ययन केले.

नंतर केदारक्षेत्रास जाऊन १९६३ मध्ये तत्कालीन 'रावल' श्री विश्वनाथलिंग यांच्याकडून चेलासंस्कार घेतला. तेव्हा त्यांचे 'सिद्धेश्वरलिंग' असे नामकरण करण्यात आले. त्यांनी सहा महिन्यांपर्यंत केदारनाथाची पूजासेवा केली. पण स्वास्थ्य ठीक न राहिल्याने सोलापुरास परतले. श्री ष.ब्र. तपोरत्नं योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजींच्या आश्रयाखाली राहून त्यांचे स्वास्थ्य सुधारले. पुढे १९७० मध्ये अंबाजोगाईच्या शंभुलिंग मठाचे ते पट्टाध्यक्ष झाले. या दरम्यान बेंगळूरूच्या महांत मठात राहून होमिओपॅथीचा अभ्यास करून डॉक्टर उपाधी मिळविली. माजलगावचे श्री ष.ब्र. पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजींनी त्यांना पट्टाधिकार केला.

नंतर पुढील व्यासंगाकरिता ते दि. १९.७.१९७० रोजी काशीक्षेत्री आले. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची 'साहित्याचार्य' परीक्षा देऊन तिच्यात ते उत्तीर्ण झाले. पुढे केदारपीठाचे रावल जगद्गुरू शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य झाल्याने त्या स्थानाकरिता केदारनाथ मंदिर ट्रस्ट कमिटीच्या वतीने यांची निवड करण्यात आली. १९८३ च्या विजयादशमीच्या दिवशी टेहरी गढवाल महाराजांकडून तिलकोत्सव करून 'रावल' पदवी प्राप्त

झाली.

श्रीकाशीज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या विशेष प्रयत्नांचे फल म्हणून उखीमठात श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अमृतहस्ते दि. ७.६.१९८५ रोजी त्यांचा पीठारोहण कार्यक्रम वैभवाने पार पडला.

श्री १००८ जगद्गुरू रावल श्री सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी केदारपीठाचे जगद्गुरुत्व स्वीकारून बराच काळ धर्मप्रचाराचे कार्य केले. नंतर आपल्या परंपरेनुसार चेलासंस्कार करून शिराढोण संस्थान मठाचे भीमाशंकरलिंग शिवाचार्यांना पट्टाभिषेक केला. महाराष्ट्रात तुळजापूरच्या जवळ वैराग्यधाम नावाच्या आश्रमात तपोमग्न होऊन निवृत्त जीवन कंठून दि. १२.७.२०१० रोजी लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी वैराग्यधाम येथे केली आहे.

## २५८. श्री म.नि.प्र. चन्नवीर स्वामीजी

कल्याण मठ, मंगळवार पेठ, हुब्बळ्ळी,
जि. धारवाड (कर्नाटक)



श्री म.नि.प्र. चन्नवीर स्वामीजी पूर्वाश्रमीचे बीदर जिल्ह्यातील कूडलसंगम गावचे. तेथील हिरेमठाचे वे. राचय्या आणि सौ. रत्नम्मा या माहेश्वरांच्या पवित्र गर्भात १९५२ मध्ये जन्मास आले. पुढे १९६२ मध्ये यांना त्यांच्या आईवडिलांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात पाठवले. तेथे त्यांनी ८ वर्षेपर्यंत संस्कृत, योग तसेच शिवपूजाविधी विधानांचा अभ्यास केला.

पुढे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९७० मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. ब्रह्मविद्या महाविद्यालयात १० वर्षेपर्यंत अध्ययन करून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची 'वेदान्तशास्त्री' परीक्षा देऊन त्यात ते उत्तीर्ण झाले. ते उत्तम गायक व वाक्पटु आहेत. १९८० पर्यंत काशी येथील अध्ययन पूर्ण करून ते हुब्बळीस परतले. तेव्हा मंगळवार पेठेतील कल्याणमठाचे उत्तराधिकारी म्हणून हुब्बळ्ळीच्या मूरुसाविर मठाच्या श्रीजगद्गुरू गंगाधर महास्वामीजी आणि हानगल श्री म.नि.प्र. सदाशिव स्वामीजी यांनी १९८० मध्ये त्यांचा निराभारी पट्टाधिकार करविला.

सध्या श्री म.नि.प्र. चन्नवीर स्वामीजी कर्नाटकात प्रवचने करून धर्मजागृतीचे कार्य करीत आहेत.

## २५९. श्री ष.ब्र. डॉ. विश्वाराध्य शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ, मु.पो. मागणगेरी,
ता. जेवरगी, जि. कलबुर्गी (कर्नाटक)

मागणगेरी हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. आजवर १८ पट्टाध्यक्ष या मठावर होऊन गेले आहेत. १८ वे पट्टाध्यक्ष चन्नवृषभेंद्र शिवाचार्य स्वामीजी हे तपस्वी, सिद्धपुरुष होते. या मागणगेरी हिरेमठाच्या वे. गुरुबसय्या आणि सौ. सिद्धम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ७.१०.१९५१ रोजी श्री विश्वाराध्यांचा जन्म झाला. या मठाचे श्री ष.ब्र. चन्नवृषभेंद्र स्वामीजी मार्गशीर्ष मासात १९५९ मध्ये लिंगैक्य झाले. त्याच वेळी त्यांना त्या मठाचे उत्तराधिकारी नेमून पट्टाधिकार करण्यात आला. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. विश्वाराध्य शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

मागणगेरीत त्यांचे प्राथमिक शिक्षण व शहापुरात माध्यमिक शिक्षण पूर्ण झाले. नंतर सोलापुरात श्रीमद् वीरशैव गुरुकुल होटगी मठात पं. गंगाधरशास्त्रींचे शिष्यत्व पत्करून त्यांनी संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. नंतर बेंगळूरुच्या महांत मठात राहून संस्कृत साहित्य आणि पदवीपूर्व परीक्षा उत्तीर्ण केली. उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १४.७.१९७१ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात, महात्मा गांधी काशी विद्यापीठात आणि प्रयाग हिंदी विश्वविद्यालयात एकूण १० वर्षेपर्यंत अध्ययन करून वेदान्ताचार्य, एम.ए., साहित्यरत्न या परीक्षा देऊन त्यांत ते उत्तीर्ण झाले. काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यदर्शी म्हणून त्यांनी काम पाहिले. ते सुस्वभावी तसेच समाधानी वृत्तीचे असून आपल्या मठाच्या परंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम सुव्यवस्थितपणे पार पाडत आहेत.

## २६०. श्री. रेवणसिद्ध शर्मा हिरेमठ

राजश्री क्लिनिक, मु.पो.ता.जि. बीदर (कर्नाटक)
स्थिरभाष : (०८४८२) २४६०००, २४६०८६



हे बंगारकिणी (ता. अक्कलकोट, जि. सोलापूर) या गावचे आहेत. या गावचे श्री. वे. शरणय्या स्वामी हिरेमठ आणि सौ. बसम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९४८ रोजी जन्मले. पुढे यांनी स्वग्रामी अध्ययन करून १९६३ मध्ये सातवी इयत्तेत उत्तीर्ण झाले. त्यानंतर सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव वारद संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे संस्कृत अध्ययनासोबत अण्णप्पा काडादी हायस्कूलमध्ये अध्ययन पूर्ण करून १९७० मध्ये एस.एस.सी. परीक्षेत उत्तीर्ण झाले.

पुढे श्री. बाबासाहेब वारद यांच्या प्रेरणेमुळे पुढील संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९७१ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील श्री दक्षिणामूर्ती संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन साहित्यमध्यमेपर्यंत अध्ययन केले. नंतर श्रीकाशीजगद्गुरू यांचे आदेशानुसार गुरूंची पूजा व कार्यालयाचे हिशेब व व्यवहार पाहात होते.

पुढे काही वर्षांनंतर श्रीकाशीजगद्गुरूंनी श्री. वे. रेवणसिद्ध शर्मा यांना अलाहाबाद दारागंज येथील जंगमवाडी मठाचे व्यवस्थापक म्हणून नेमले. त्यावेळी अलाहाबाद जंगमवाडी मठाची देखभाल करणारे श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य कोरवार यांच्या आदेशानुसार मठाच्या धार्मिक कार्यक्रमाबरोबर तेथील हिंदी विश्वविद्यालयातून 'साहित्यरत्न', 'आयुर्वेदरत्न' या परीक्षा देऊन त्यांत ते उत्तीर्ण झाले.

त्यानंतर श्री. रेवणसिद्धेश्वर शर्मा यांनी दि. १.५.१९८० रोजी गृहस्थाश्रम स्वीकारला. मठाची सेवा करीत असतानाच त्यांना एक कन्या आणि एक

पुत्र अशी संतती झाली. पुढे १९८२ मध्ये प्रयागक्षेत्र सोडून ते बीदरला आले. तेथून जवळच असणाऱ्या नागूर गावात त्यांनी आयुर्वेद क्लिनिक उघडले. त्या माध्यमातून जनसेवा करीत सुखाने कालक्रमणा करीत आहेत.

२६१. **श्री. जे. लोकेश्वरप्पा बसप्पा चक्रसाली**

कुंभार गल्ली, मु.पो. न्यामती,
ता. होन्नाळ्ळी, जि. शिवमोग्गा (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८१८८ - २६५८९०



श्री. बसप्पा कुंभार आणि सौ. बसम्मा यांचे हे सुपुत्र. त्यांनी आपल्या गावीच म्युनिसिपल हायस्कूलमध्ये ८ वी पर्यंतचे शिक्षण घेतले. नंतर होन्नाळ्ळी गावच्या गुंडाभक्त (कुंभार गुंडय्याचे भक्त) के. जी. वीरभद्रप्पाकडून प्रोत्साहित होऊन वयाच्या २० व्या वर्षी ते काशीक्षेत्रास आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या अनुमतीने श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २.४.१९७१ रोजी प्रवेश घेतला. येथे ६ वर्षे संस्कृत साहित्याचा अभ्यास करून १९७७ मध्ये न्यामती गावी परतले. गृहस्थाश्रम स्वीकारून नामांकित कापड व्यापारी म्हणून लौकिक मिळवला.

## २६२. श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य स्वामीजी

दहिवडकर मठ, मु.पो.ता. बार्शी,

जि. सोलापूर (महाराष्ट्र)



हा मठ काशीपीठाचा शाखामठ असून शिष्यवर्गपरंपरेचा मठ आहे. श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य स्वामीजी पूर्वाश्रमीचे विजयपूर जिल्ह्यातील बसवन बागेवाडी तालुक्याच्या याळवार गावचे नंदिगोत्रीय श्री. वे. वीरसंगय्या गुरुमठ यांचे सुपुत्र होत. त्यांचा जन्म १९५४ मध्ये झाला. तेव्हा 'इंदुधर' असे त्यांचे नामकरण करण्यात आले. याळवारमध्ये त्यांचे प्राथमिक व सिंदगीत माध्यमिक शिक्षण पूर्ण झाले. संस्कृत शिक्षणासाठी ते बेंगळुरास गेले. तेथे महंतांच्या मठात वास्तव्य करून जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयातून काव्यपरीक्षा उत्तीर्ण झाले. त्यानंतर होटगी बृहन्मठाचे तपोरत्नं योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने काशीक्षेत्रास आले.

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १४.७.१९७१ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात वेदान्त विषयाचा अभ्यास करून शास्त्री आणि आचार्य या परीक्षांत उत्तीर्ण झाले. त्याच वेळी बार्शी दहिवडकर मठाचे पट्टाधिकारी श्री ष.ब्र. वरसिद्ध शिवाचार्य स्वामीजी १९७६ मध्ये लिंगैक्य झाले. त्यामुळे श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी दहिवडकर मठाचे उत्तराधिकारी म्हणून यांची निवड केली. दि. ११.३.१९७६ रोजी पट्टाधिकार करविला. स्वतः त्यांचे 'श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य' असे नामकरण केले. त्यांनी महाराष्ट्रात धर्मप्रचाराचे कार्य केले. पूर्वाश्रमीच्या याळवार येथील मठाचा जीर्णोद्धारही केला आणि आपल्या मठपरंपरेचा निर्वाह करीत श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अंतिम काळी विशेष सेवा करून त्यांच्या अनुग्रहास पात्र झाले. गुरुसिद्ध शिवाचार्य दि. १२.४.२०१५ रोजी लिंगैक्य झाले.

## २६३. विद्यामान्य शिवाभिनव



श्री ष.ब्र. जयशांतेश्वर शिवाचार्य स्वामीजी
संस्थान बृहन्मठ, मुक्काम जालहळ्ळी,
ता. देवदुर्ग, जि. रायचूरु (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८५३१-२६५२४१,
चरभाष : ९४४८८३९५३५

जालहळ्ळी गावचा संस्थान बृहन्मठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. या मठाचा इतिहास अत्यंत प्राचीन असून या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले. हल्लीचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. जयशांतेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमीचे विजयपूर जिल्ह्यातील सिंदगी तालुक्यातील कलकेरी येथील आहेत. कलकेरी हिरेमठाचे श्री. वे. शांतस्वामी आणि सौ. चन्नम्मा या माहेश्वर दंपतीचे ते द्वितीय सुपुत्र असून १९५६ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांचे विद्यानंद असे नामकरण करण्यात आले.

त्यांनी कलकेरी येथेच प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर वडिलांच्या मार्गदर्शनानुसार उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९७१ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी हिंदू विश्वविद्यालयात पदवीपूर्व शिक्षणास सुरुवात करून स्नातक तसेच स्नातकोत्तर पदवीपर्यंतचे शिक्षण घेतले. वाराणसी संस्कृत विश्वविद्यालयात शांकर वेदान्त विषय घेऊन 'शास्त्री' आणि 'आचार्य' या पदव्या मिळविल्या. १९७१ पासून १९८४ पर्यंत चौदा वर्षेपर्यंत काशी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात राहून दोन विश्वविद्यालयांच्या स्नातकोत्तर पदव्या मिळवून ते उच्चविद्याविभूषित झाले.

पुढे दि. १०.५.१९८४ रोजी त्यांनी श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात जालहळ्ळी बृहन्मठाचे तत्कालीन पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. जयशांतदेव शिवाचार्य महास्वामीजींकडून विधिवत् पट्टाधिकार स्वीकारला. तेव्हा त्यांचे 'विद्यामान्य शिवाभिनव शिवाचार्य

स्वामीजी’ असे नामकरण करण्यात आले. ते या मठपरंपरेतील ३६ वे पट्टाध्यक्ष होते.

त्यांना शिक्षणाविषयीची तळमळ होती. त्यांनी १९८७ मध्ये श्री जगदाराध्य जयशांतलिंगेश्वर शिक्षणसंस्थेची स्थापना केली. त्याच्या आधीन १९८८ मध्ये प्राथमिक शाळा, १९९१ मध्ये माध्यमिक शाळा, १९९९ मध्ये पदवीपूर्व महाविद्यालय आणि २००२ मध्ये पदवी महाविद्यालय जालहळ्ळीमध्ये स्थापून ग्रामीण भागातील मुलांसाठी शैक्षणिक सुविधा उपलब्ध करून दिल्या. एवढेच नव्हे तर तालुक्याच्या ठिकाणी देवदुर्गमध्ये २००२ मध्ये महिला पदवी महाविद्यालय, बी.एड्. महाविद्यालय स्थापून मागास समाजासाठी देवदुर्ग उच्च शिक्षण केंद्र करून दिले. याशिवाय कलकेरी गावच्या श्री संगमेश्वर विद्यावर्धक संस्थेचे अध्यक्ष म्हणून ते तेथील शिक्षणसंस्था सुव्यवस्थितरित्या चालवीत आहेत.

देवदुर्ग तालुक्यातील अणेय मल्लेश्वर क्षेत्रात त्यांनी आपल्या मठाचा एक शाखामठ स्थापिला आहे. पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात महारुद्रयाग करून त्या भागातील जनतेला धर्मसंस्कृतीची जाण करून दिली. याशिवाय २००७ मध्ये विजापुरात उक्कली रस्त्यावर एक शाखामठ देखील स्थापून पंचपीठाचार्यांना निमंत्रित केले होते. त्यावेळी धार्मिक कार्यक्रमाचे आयोजन केले होते. त्यावेळी लक्षदीपोत्सव, सामूहिक विवाह इ. जनहिताचे कार्य करून शिवाचार्यांमध्ये ते अग्रगण्य ठरले आहेत.

## २६४. ॲड्. उदयभान सिंह

डी ४७/८५, रामापूर,
वाराणसी २२१००१ (उत्तरप्रदेश)
चरभाष : ९४१५३५५८१३



ॲड्. उदयभान सिंह हे उत्तरप्रदेशातील प्रतापगढ जिल्ह्यातील मुस्तफाबाद गावचे असून त्या गावातील श्री. रामेश्वरसिंह ठाकूर आणि सौ. राजदेयिदेवी यांचे सुपुत्र होत. त्यांचा जन्म ३.७.१९५६ रोजी झाला. त्यांनी मुस्तफाबादमध्ये हिंदी माध्यमाच्या शाळेत ५ वी इयत्तेपर्यंतचे शिक्षण घेतले. त्यांचे वडील रामेश्वरसिंह काशी जंगमवाडी मठात महाद्वाराचे द्वारपाल म्हणून काम करीत होते. म्हणून त्यांनी चि. उदयभानला पुढील शिक्षणासाठी काशीस आणले.

तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या विशेष अनुमतीने रामेश्वरसिंहाने चिरंजीव उदयभानला १९७२ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश दिला. येथे उदयभानने प्राथमिक सहावीच्या वर्गात प्रवेश घेतला. १९७५ पर्यंत हायस्कूलची परीक्षा तसेच १९७७ मध्ये इंटरमिडीएट परीक्षा वाराणशीच्या आदर्श सेवा इंटरमिडिएट कॉलेजमधून दिली व त्यात ते उत्तीर्ण झाले.

पुढे काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या वाणिज्य महाविद्यालयात प्रवेश घेऊन १९८० मध्ये ते बी.कॉम. पदवीधर झाले. त्यानंतर भारतेंदु हरिश्चंद्र स्नातकोत्तर महाविद्यालयाच्या विधी विभागात अध्ययन करून १९८७ मध्ये त्यांनी एल्एल्.बी. पदवी मिळविली. १९७२ ते १९८९ पर्यंत काशी जंगमवाडी मठाच्या आश्रयास राहून त्यांनी आपले अध्ययन पूर्ण केले.

ते सध्या वकिली व्यवसाय करीत असून श्रीपीठाचे कायदोशीर सल्लागार म्हणून काम पाहात आहेत.

## २६५. श्री. वे. नागनाथ बाबुअय्या स्वामी

अर्चक, श्री मन्मथस्वामी देवस्थान
मुक्काम कपिलधार, जि. बीड (महाराष्ट्र)



महाराष्ट्रातील शिवकडा (ता. भूम, जि. उस्मानाबाद) गावच्या श्री. वे. बाबुअय्या स्वामी यांचे हे सुपुत्र आहेत. बार्शी येथील परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजींच्या मार्गदर्शनानुसार त्यांनी बार्शीत प्राथमिक पाचवीपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी धर्मप्रचारकार्यासाठी बार्शीत आले होते. तेव्हा परंडकर मठातील या बालकावर– नागनाथवर महास्वामीजींची दृष्टी पडली आणि या गरीब बालकास त्यांनी स्वतःसोबत १९७२ मध्ये काशीक्षेत्री विद्याभ्यासाकरिता आणले.

चि. नागनाथ स्वामीने श्रीकाशी जंगमवाडी मठाच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९७२ मध्ये प्रवेश घेतला. पुढे महास्वामीजींच्या मार्गदर्शनाखाली संस्कृतसोबत वैदिक शिक्षण प्राप्त केले. श्रीरुद्राभिषेक, गृहशांती, नवग्रहपूजा आणि विवाहविधी इ. वैदिक विधानांचा उत्तम अभ्यास केला.

नंतर महास्वामीजींचा आशीर्वाद घेऊन ते स्वग्रामी परतले. हल्ली ते कपिलधार येथे श्री संतशिरोमणी मन्मथस्वामींचे मुख्य पुजारी म्हणून काम पाहत आहेत.

## २६६. श्री ष.ब्र. उमेश्वर शिवाचार्य हिरेमठ

मु.पो. मुरगोड ता. सौंदत्ती,
जि. बेळगाव (कर्नाटक)



हे मुरगोड हिरेमठाच्या श्री. वे. शिवरुद्रय्या आणि सौ. वीरम्मा यांच्या पवित्र गर्भात दि. १७.७.१९४५ मध्ये जन्मास आले. यांचे नंदिगोत्र होते. बेंगळूरुच्या जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयात संस्कृतचे अध्ययन करून 'काव्य' आणि 'साहित्य' परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. पुढे मुरगोडचे वीरनगौड मल्लनगौड पाटील यांच्याकडून प्रेरणा घेऊन वयाच्या २७ व्या वर्षी संस्कृतच्या अध्ययनाकरिता काशीक्षेत्रास आले.

श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य भगवत्पादांच्या कृपाशीर्वादाने त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २७.९.१९७२ रोजी प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयातून साहित्य तसेच वेदान्तशास्त्राचा अभ्यास करून ते स्वग्रामी परतले. मठाच्या परंपरेनुसार पट्टाधिकार संस्कार ग्रहण केला. सध्या धार्मिक तसेच सामाजिक कार्यक्रम पार पाडत लोकांमध्ये धर्मजागृतीचे काम करीत आहेत. ते २९.४.२०१८ रोजी लिंगैक्य झाले. पुत्रवर्गमठ असल्यामुळे उत्तराधिकाऱ्याचा निर्णय न झाल्यामुळे हा मठ अद्याप रिक्त आहे.

## २६७. श्री ष.ब्र. उमेश्वर शिवाचार्य स्वामीजी

सांबय्यनवर मठ, मु.पो. हूली,
ता. सौंदत्ती, जि. बेळगाव (कर्नाटक)



बेळगाव जिल्ह्यातील सौंदत्ती तालुक्यातील हूली हे गाव इतिहासप्रसिद्ध असून याला 'पूवल्लि' असे म्हणत असत. येथे कार्तवीर्यार्जुन महाराजांची राजधानी होती, असे येथील स्थानिक पुराव्यानुसार आढळून आले आहे. या गावातील सांबय्यनवर मठ हा केदारपीठाचा शाखामठ आहे. या मठाचे मूळ संस्थापक श्री ष.ब्र. सांबय्या शिवाचार्य स्वामीजी होते. म्हणून या मठाला त्यांच्या नावाने ओळखले जाते. आजपर्यंत या मठावर १४ शिवाचार्य होऊन गेले आहेत. ते सारे शिवयोगसिद्ध होते.

१३ वे शिवाचार्य श्री ष.ब्र. बंगारप्पय्या शिवाचार्य स्वामीजी महादासोही होते. सर्वधर्मसमभावनेने ते सर्वांवर समान भावाने प्रेम करीत असत. ते अत्यंत जनप्रिय होते. त्यांना सारेजण 'बंगार चरमूर्ती' असे म्हणत. त्यांचे पट्टशिष्य श्री ष.ब्र. बाललीला संगमेश्वर शिवाचार्य स्वामीजी. बालपणापासून ते चमत्कार करीत होते. म्हणून त्यांना बाललीला संगमेश्वर शिवाचार्य स्वामीजी असे लोक म्हणू लागले. आजदेखील सर्व जातिधर्माचे लोक अत्यंत श्रद्धेने त्यांच्याविषयी आदरभाव बाळगून आहेत.

त्यांच्यानंतर श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य स्वामीजी पट्टाधिकारी झाले आहेत. हे शिवपूजानिष्ठ, समाजप्रेमी असून यांनी हूली मठाचा जीर्णोद्धार केला आहे. ग्रामीण जनतेच्या श्रद्धेस पात्र झाले आहेत. केदारपीठाचे श्रीजगद्गुरू शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीजगद्गुरू 'रावल' सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या पट्टाभिषेकाच्या वेळी तनमनधनाने सेवा समर्पिली आहे. त्यामुळे ते गुरुपीठाच्या कृपेस पात्र झाले आहेत.

श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य सध्या शंभरीच्या जवळपास आहेत. हे हस्तसामुद्रिक तज्ज्ञ आहेत. श्री उमेश्वर स्वामीजी हे हूली सांबय्यनवर मठाचे श्री. वे. सांबय्यनवरु आणि सौ. पार्वतम्मा या माहेश्वर दंपतीच्या

पुण्यगर्भी दि. २८.५.१९५५ रोजी हूली येथे जन्मास आले. त्यावेळी त्यांचे उमेश्वर असे नामकरण करण्यात आले. चि. उमेश्वर यांनी प्राथमिक शिक्षण हूली येथे आणि धारवाड येथे माध्यमिक शिक्षण घेतले.

पुढे गुरूंच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २२.६.१९७३ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील सेंट्रल हिंदू स्कूलमध्ये पदवीपूर्व परीक्षा दिली आणि काशी हिंदू विश्वविद्यालयातून ते बी.ए. उच्च श्रेणीत उत्तीर्ण झाले. त्यासोबत संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून 'उत्तर मध्यमा' परीक्षा देऊन साहित्य विषयात उत्तीर्ण झाले. याप्रमाणे १९७८ पर्यंत पाच वर्षे काशीक्षेत्री अध्ययन पूर्ण केले. येथील अध्ययन पूर्ण करून काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यदर्शी म्हणून कार्य केले.

त्यानंतर १९७८ मध्ये केदारजगद्गुरू रावल शांतलिंग शिवाचार्य महास्वामीजी आणि रंभापुरी श्रीजगद्गुरू वीररुद्रमुनी शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात हूली सांबय्यनवर मठावर त्यांचा पट्टाधिकार पूर्ण वैभवाने झाला. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. उमेश्वर शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. ते देखील पंचपीठाचार्यांवर श्रद्धा ठेवून त्यांना प्रतिवर्षी हूली आज्जाच्या यात्रा महोत्सवास बोलावून धार्मिक कार्यक्रम पार पाडत असतात. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या ४१ वर्षाच्या कार्यकाळात २० हून अधिक श्रावणमास अनुष्ठाने श्री सांबय्यनवर हूली मठात केली, हे या मठास अभिमानास्पद होय. महास्वामीजींचे १९८९ मधील श्रावणमासातील अंतिम अनुष्ठान हूली मठातच झाले, ही एक संस्मरणीय गोष्ट होय. उमेश्वर शिवाचार्यांनी १२ वर्षेपर्यंत पट्टाधिकार सांभाळला. नंतर तो त्यागून ते गृहस्थाश्रमी झाले. त्यांना कन्यारत्न प्राप्त झाले. तरी पुढील व्यवस्था होईपर्यंत त्यांनी मठाची परंपरा गुरुवर्गांच्या आज्ञेनुसार सांभाळली. दि. १७.२.२०१७ रोजी संगनबसव शिवाचार्य शतायुषी होऊन लिंगैक्य झाले.

## २६८. वे. शिवबसय्या चन्नय्या हिरेमठ

मु.पो. चिक्कहट्टिहोळे,
ता. खानापूर, जि. बेळगाव (कर्नाटक)
चरभाष : ९४४९६५६२२७. हल्ली मुक्काम धारवाड



हे वीरगोत्रीय होत. बेंगळुरूच्या जयचामराजेंद्र ओडेयर संस्कृत महाविद्यालयात काव्य द्वितीय वर्षाची परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर सुतगट्टी हिरेमठ पट्टाध्यक्षांच्या प्रोत्साहनाने वयाच्या १८ व्या वर्षी पुढील शिक्षणाकरिता काशीक्षेत्रास आले. श्रीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १७.७.१९७० रोजी प्रवेश घेतला. येथील सनातन धर्म इंटरकॉलेजात इंटर मिजिएट तसेच प्रयाग हिंदी विश्वविद्यालयाच्या साहित्य विशारद परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढे इंग्लिश बी.ए. अध्ययनाकरिता पुण्याच्या श्रीजगद्गुरू विश्वाराध्य विद्यार्थी निलयात दि. २२.४.१९७२ रोजी प्रवेश घेतला. तेथे बी.ए.पर्यंत अभ्यास केला. नंतर त्यांनी धारवाड येथे १९७२ ते ७७ पर्यंत उच्च अध्ययन करून एम.ए., एम.फिल्. आणि बी.एड्., १९८२ मध्ये एलएल.बी. पदवी प्राप्त केली. नंतर बेडकीहाळ, गोकाक आणि हुब्बळी येथील महाविद्यालयांत हिंदी व्याख्याता म्हणून ते रुजू झाले. त्यानंतर 'विश्वनाथ प्रसाद तिवारी की समकालीन कविताएँ' या विषयावर मैसूर विश्वविद्यालयातून २०१५ मध्ये पीएच.डी. पदवी त्यांना प्राप्त झाली. के.एल.ई. सोसायटीच्या एस्. निजलिंगप्पा महाविद्यालयात हिंदीचे विभागप्रमुख म्हणून निवृत्त झाले असून सध्या ते धारवाड येथे वास्तव्यास आहेत.

## २६९. खासदार श्री ष.ब्र. डॉ. जयसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी



संस्थान हिरेमठ, मु.पो. गौडगाव (बी.के.)
ता. अक्कलकोट, जि. सोलापूर (महाराष्ट्र)

गौडगाव हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील आहे. श्री ष.ब्र.सिद्धमल्लेश्वर शिवाचार्य स्वामीजी या मठाचे मूळ कर्तृपुरुष होत. ते अत्यंत तपस्वी होते. अक्कलकोट संस्थानच्या राजांची त्यांच्या ठायी अत्यंत श्रद्धा होती. त्यांनी मठाच्या पूजाव्यवस्थेसाठी जमीन इनाम दिली आहे. या मठाच्या परंपरेत अनेक शिवायार्य होऊन गेले आहेत. पुत्रवर्गपरंपरेचा मठ असल्याने त्यांच्या वंशात २०० वर्षांच्या कालावधीत वंशजांना एकच मुलगा होत गेला. म्हणून सुदीर्घ अवधीत मठाधिपतीच्या अभावामुळे हा मठ अनाथ झाला होता. पुढे या मठाच्या वे. गुरुबसय्या यांनी मठाचे मूळकर्तृ सिद्धमल्लेश्वरांना अनन्यभावाने नवस केल्यानंतर त्यांना दोन मुले झाली. त्यांच्यापैकी हल्लीचे मठाधिपती श्री ष.ब्र. डॉ. जयसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे कनिष्ठ पुत्र होत.

त्रिकालपूजानिष्ठ, सदाचारसंपन्न वे. गुरुबसय्या यांचे हे द्वितीय सुपुत्र. दि. ३.४.१९५६ रोजी आषाढ महिन्याच्या गुरुपौर्णिमेच्या दिवशी त्यांचा जन्म झाला. तेव्हा त्यांचे 'नूरंदेश्वर' असे नामकरण करण्यात आले होते. दुसरा मुलगा झाला म्हणून आनंदित झालेल्या वे. गुरुबसय्यांनी त्यांना मठाधिपती करण्याचा संकल्प केला.

चि. नूरंदेश्वरांनी आपल्या आजोळी म्हणजे सोलापूर जिल्ह्यातील वळसंग गावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर सोलापूर येथील होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात १९६९ मध्ये प्रवेश घेतला. सोलापूरच्या सिद्धेश्वर हायस्कूलमध्ये माध्यमिक शिक्षण आणि दयानंद महाविद्यालयात पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर आपल्या गावातील श्री. एस. एस. स्वामी आणि बी. के. भोसले यांच्या प्रोत्साहनाने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास

आले. श्रीकाशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २५.७.१९७४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

त्यांनी येथे संस्कृत अध्ययनाबरोबर काशी हिंदू विश्वविद्यालयातील कलासंकायात प्रवेश घेतला. १९८० मध्ये बी.ए. पदवी मिळविली. १९८२ मध्ये एम.ए. पदवी प्राप्त केली. नंतर दर्शन विभागातच 'काश्मीर शैव एवं वीरशैव दर्शन में मोक्ष का चिंतन' या विषयावर १९८२ मध्ये शोधकार्य आरंभिले.

या दरम्यान श्री. वे. गुरुबसय्या यांच्या इच्छेनुसार श्री नूरंदेश्वरदेवांचा पट्टाभिषेक करण्यात आला. श्रीजगद्गुरू पंचपीठाश्रीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात गुळदेगुड्ड अमरेश्वर मठाचे श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींच्या नेतृत्वाखाली दि. १३.३.१९८६ मध्ये गौडगाव हिरेमठात पट्टाभिषेक कार्यक्रम वैभवपूर्ण रितीने पार पडला. तेव्हा त्यांचे 'श्री ष.ब्र. जयसिद्धेश्वर शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. श्री ष.ब्र. जयसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजींनी आपले अध्ययन न थांबवता ते पुन्हा काशीक्षेत्रास आले आणि त्यांनी शोधकार्य आरंभिले. दोन वर्षेपर्यंत निरंतर अभ्यास करून त्यांनी डॉक्टरेट पदवी मिळविली. श्री ष.ब्र. डॉ. जयसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजींनी १९७४ ते १९८९ पर्यंत १५ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून अध्ययनासोबत काशी वीरशैव विद्वत्संघाचे पदाधिकारी म्हणूनही काम पाहिले.

याशिवाय श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या पीठारोहण कार्यक्रमानंतर श्रीपीठात चाललेल्या श्रीमहास्वामीजींच्या ४८ दिवसपर्यंतच्या मंडल अनुष्ठानात आस्थापूर्वक सेवा केली. काशीहून स्वग्रामी परतल्यानंतर १९९१ मध्ये श्रीगुरू सिद्धमल्लेश्वर कल्याणकेंद्र नावाची शिक्षणसंस्था स्थापन करून माध्यमिक विद्यालय सुरू केले. १९९१ मध्ये जगद्गुरू पंचाचार्य हायस्कूल, १९९३ मध्ये श्री राजीव गणेश कुलकर्णी वसतिगृह आणि २००३ मध्ये घोळसगाव येथे श्रीशंभुमहादेव विद्यामंदिर

नामक कन्नड आणि मराठी माध्यमाच्या प्रशाला स्थापून ग्रामीण भागातील विद्यार्थ्यांना शैक्षणिक सुविधा मिळवून दिल्या. अलीकडे बी.बी.ए. आणि बी.सी.एस. बायोटेक्नोलॉजी महाविद्यालय सोलापूर विश्वविद्यालयाशी संलग्न सुरू करण्यात आले. त्यासाठी आवश्यक असणाऱ्या इमारतीचे निर्माणकार्य पूर्ण झाले आहे.

विद्वान, शिक्षणप्रेमी, समाजहितचिंतक आणि वाक्पटु असे हे स्वामीजी कन्नड, हिंदी, मराठी या भाषांतून धर्मप्रबोधनाचे कार्य करीत असून त्यांनी सदैव जनजागृतीच्या कार्यक्रमात स्वत:स गुंतवून घेतले आहे. 'धर्मगंगोत्री' नावाचे मराठी त्रैमासिक काही काळ त्यांनी चालविले. सुमारे २०० वर्षांपासून चालत आलेली, मध्यंतरी खंडित झालेली गौडगाव हिरेमठाची पट्टाधिकारी परंपरा यांच्यामुळे पुन्हा उर्जितावस्थेला पोहोचली आहे. २०१९ मध्ये डॉ. जयसिद्धेश्वर स्वामीजी भारतीय जनता पक्षाच्या तिकिटावर सोलापूर मतदारसंघातून लोकसभेवर खासदार म्हणून निवडून आले आहेत.

---

परिचय : के. ए. देशेट्टी, मुख्याध्यापक,
जगद्गुरू पंचाचार्य हायस्कूल, गौडगाव.

## २७०. श्री १००८ जगद्गुरू 'रावल' भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी



केदारपीठ, मु.पो. उखीमठ, जि. रुद्रप्रयाग
(उत्तरांचल प्रदेश). चरभाष : ९०११९८८५९५१

वीरशैव पंचपीठांपैकी एक पीठ श्री हिमवत्केदार वैराग्यसिंहासनाचे ३२४ वे रावल जगद्गुरू श्री १००८ जगद्गुरू भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी हे होत.

ते पूर्वाश्रमी विजयपूर जिल्हा सिंदगी तालुक्याच्या हूविनहळ्ळी गावचे वे. राचोटय्या आणि सौ. संगनबसवम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी द्वितीय सुपुत्र म्हणून दि. १.६.१९५६ रोजी जन्मास आले. त्यांचे 'संगय्या' असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामीच पहिली ते चौथीपर्यंतचे प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे कोरळ्ळीच्या वरिष्ठ प्राथमिक शाळेत ५ वी इयत्ता उत्तीर्ण केली. त्यानंतर सोलापूरच्या अण्णप्पा काडादी माध्यमिक शाळेत ६ व्या वर्गापासून ११ व्या इयत्तेपर्यंत अभ्यास पूर्ण केला.

पुढे सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुल होटगी मठात तपोरत्नं श्री ष.ब्र. योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजींच्या अनुमतीने प्रवेश घेतला. तेथे वे.पं. गंगाधरशास्त्रीजींचे शिष्यत्व पत्करून संस्कृतचे अध्ययन पूर्ण केले. याच वेळी नांदेड जिल्ह्याच्या शिराढोण गावचे श्री ष.ब्र. दशमुख शिवाचार्य स्वामीजी आपल्या उत्तराधिकाऱ्याच्या शोधात होटगी मठात आले. तेथे असणाऱ्या सर्व बटूंमध्ये त्यांनी संगय्या यास निवडले. त्यानंतर दि. १.१२.१९७२ रोजी शिराढोणच्या काशीपीठाचा शाखामठ असलेल्या श्री भीमाशंकर संस्थान मठावर त्यांचा पट्टाधिकार करून त्यांचे 'श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले.

उच्च व्यासंगासाठी त्यांना भक्तांनी काशीक्षेत्रास पाठविले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९७४ मध्ये श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश

घेतला. येथील निर्मल संस्कृत महाविद्यालयात साहित्यशास्त्राचा अभ्यास करून पुढे संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात योगतंत्र विभागातून आचार्य पदवी मिळविली.

१९८४ मध्ये संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातील वेदान्त विभागातून त्याच वर्षी सुरू झालेल्या विशिष्टद्वैत वेदान्ताचार्य परीक्षेत ते प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. एकूण १२ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून त्यांनी विविध शास्त्रांत प्राविण्य मिळविले. या मठात अभ्यास करीत असताना काशी वीरशैव विद्वत्संघाचे सदस्य आणि पदाधिकारी म्हणून कार्य केले.

तपस्वी, संघटक, समाजाभिमुख चिंतक अशा श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या अध्ययनकालात काशीपीठाचे जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींना नांदेड येथे १९७८ मध्ये आमंत्रित करून आपले गुरू लिं. दशमुख शिवाचार्य स्वामीजींच्या समाधीवर लिंगस्थापना करून लक्षावधी भक्तांच्या उपस्थितीत महास्वामीजींचा अडुपालखी महोत्सव व अविस्मरणीय दीक्षासमारंभ पार पाडला.

इ.स. १९८२ मध्ये नांदेडला हुडको परिसरात भक्तांच्या सहकार्याने २० एकर जमीन खरेदी करून तेथे एक शिक्षणसंकुल सुरू केले. तेथे श्री हंपय्या स्वामी प्राथमिक शाळा, श्रीजगद्गुरू पंचाचार्य हायस्कूल आणि श्री संगमेश्वर गुरुकुल या तीन शिक्षणसंस्था सुरू करून विद्याप्रसाराच्या क्षेत्रात उल्लेखनीय कार्य केले. या परिसरात दशमुख आश्रमाची स्थापना श्रीमहास्वामीजींनी केली आहे. त्या आश्रमात १९९१ मध्ये विश्वशांती महायज्ञाचे आयोजनही त्यांनी केले होते. त्या समारंभात तत्कालीन पंचपीठांच्या जगद्गुरूंची अड्डपालखी शोभायात्रा काढून फार मोठ्या धर्मसभेचे आयोजन केले होते.

या संदर्भात लक्षदीपोत्सव, १०१ सामूहिक विवाह इ. सामाजिक तसेच धार्मिक कार्यक्रमांचे आयोजन करून एक लाखाहून अधिकांना पुरणपोळीचे जेवण देऊन कीर्ती संपादन केली. त्यांनी अनुष्ठाने करून भक्तांमध्ये धर्मजागृती केली. त्यांचे हे धार्मिक तसेच सामाजिक कार्य पाहून श्रीजगद्गुरू पंच

पीठाधीश्वरांनी १९९१ मध्ये झालेल्या विश्वशांती महायज्ञधर्म संमेलनात श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य स्वामीजींना 'शिवाचार्यरत्न' ही प्रशस्ती देऊन सन्मानित केले. १९९७ मध्ये शिराढोण गावात त्यांच्या पट्टाधिकाराचा रौप्यमहोत्सव जगद्गुरू पंचपीठाचार्यांच्या सान्निध्यात संपन्न झाला. तेव्हा केंद्रीय गृहमंत्री मा. शंकरराव चव्हाण यांनी उपस्थित राहून त्यांचा गौरव केला. याप्रमाणे १९७२ पासून २००० पर्यंत म्हणजे २८ वर्षे निरंतर महाराष्ट्रात धर्मजागृती करून ते ख्यातनाम झाले.

याप्रमाणे प्रख्यात झालेले श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य स्वामीजी केदार वैराग्यपीठाचे श्री १००८ जगद्गुरू सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांच्या कृपाकटाक्षास पात्र झाले. केदारजगद्गुरूंनी त्यांना पीठाच्या परंपरेनुसार चेलासंस्कार करून त्यांचे 'भीमाशंकरलिंग' असे नूतन नामकरण केले. दि. १३.१०.२००० या दिवशी शुक्रवारी कोजागिरी पोर्णिमेच्या दिवशी केदारपीठाच्या उखीमठात श्री १००८ जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू 'रावल' सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजी, श्री १००८ जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात व अनेक गुरू, चरमूर्ती आणि अपार भक्तसमूहाच्या उपस्थितीत केदारपीठाचा पट्टाधिकार महोत्सव अत्यंत वैभवाने पार पडला. त्यावेळी त्यांचे जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांनी 'हिमवत्केदार सिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू 'रावल' भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी' असे नूतन नामकरण केले.

याप्रमाणे केदारपीठाचे ३२४ वे 'रावल' जगद्गुरू भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी नांदेड नगरात दि. २५, २६ डिसेंबर २००० मध्ये महाराष्ट्र वीरशैव सभेने आयोजित केलेल्या द्वितीय अधिवेशनाची विशेष व्यवस्था करून ते अधिवेशन यशस्वी करण्यास आशीर्वाद दिले. या अधिवेशनास पंचपीठांचे जगद्गुरू आणि महाराष्ट्राचे मुख्यमंत्री मा. ना. विलासराव देशमुख उपस्थित होते.

श्रीकेदारजगद्‌गुरू 'रावल' भीमाशंकर शिवाचार्य महास्वामीजींनी पीठारोहण केल्यानंतर पीठाच्या जीर्णोद्धाराकडे लक्ष दिले. म्हणून केवळ पाच-सहा वर्षांत केदारपीठाच्या उखीमठाचा जीर्णोद्धार होऊन भव्य नूतन इमारत वैभवाने उभी राहिली आहे. श्रीमहासन्निधींनी देशाच्या विभिन्न प्रांतांतील भक्तांकडून कोट्यवधी रुपयांची देणगी गोळा करून केदारपीठ जीर्णोद्धार समितीच्या वतीने 'श्रीजगद्‌गुरू नीलकंठ भवन' निर्माण केले आणि दि. ६.६.२००६ रोजी पंचपीठाधीश्वरांच्या सान्निध्यात शेकडो शिवाचार्यांच्या उपस्थितीत केंद्रसरकारचे गृहमंत्री नामदार श्री शिवराज पाटील यांच्या करकमलांनी त्याचे उद्‌घाटन केले. केदारपीठाच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा हा कार्यक्रम होता.

अशा रीतीने अल्पावधीत केदारपीठाचा जीर्णोद्धार करण्याबरोबर उत्तरांचलमधील भक्तांच्या मनांत वीरशैवधर्मसंस्काराचे बीजारोपण केले आहे. आपले गुरू श्री १००८ जगद्‌गुरू सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजींचा योगक्षेम त्यांनी अत्यंत श्रद्धेने चालविला. केदारपीठाचे पूर्व आचार्य एकोरामाराध्य यांचे उद्‌गम स्थान असणाऱ्या आंध्राच्या काकिनाडू जिल्ह्याच्या श्री द्राक्षाराम क्षेत्रात केदारपीठाचे एक उपपीठ प्रतिष्ठापित करण्याचा प्रयत्न ते करीत आहेत.

उत्साही, तपस्वी, विद्वान असणारे श्री १००८ जगद्‌गुरू 'रावल' भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या कालावधीत अनेक महत्त्वपूर्ण कार्ये करण्याची योजना तयार करून ठेवली. अलीकडे राजधानी दिल्लीत श्री ज. पंचाचार्य चॅरिटेबल ट्रस्टची स्थापना केली असून त्याच्या आधीन दिल्लीत पंचाचार्य भवन निर्माण करण्याची बृहत् योजना आखली आहे.

---

संदर्भ : 'वैराग्यनिधी श्री रावल जगद्‌गुरू भीमाशंकरलिंग शिवाचार्यजी, लेखिका- गिरिजादेवी म. दुर्गदमठ, प्रकाशक- हिमवत्केदार वैराग्यसिंहासन, उखीमठ, २००५.

## २७१. डॉ. गंगाधर चन्नवीरय्या केंडदमठ

उपग्रंथपाल, काशी हिंदू विश्वविद्यालय, वाराणसी
मु. पो. सिडेनूरु ता. ब्याडगी जि. धारवाड



सिडेनूर केंडदमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. गृहस्थ परंपरेच्या या मठाच्या वंशात श्री. वे. वीरपरय्या केंडदमठ हे त्रिकाल लिंगपूजानिष्ठ होते. त्यांचे चिरंजीव श्री. वे. चन्नवीरय्या केंडदमठ हेदेखील त्रिकाल लिंगपूजानिष्ठ आहेत. ते श्रीकाशीजगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या आप्तांपैकी होत. त्यांनी या पीठाची सेवा केली आहे.

गुरुभक्तिसंपन्न, शिवपूजानिष्ठ असणारे श्री. वे. चन्नवीरय्या केंडदमठ आणि सौ. शांतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.४.१९५४ रोजी गंगाधर यांचा जन्म झाला. त्यांनी सिडेनूर, ब्याडगी आणि कदरमंडलगी या गावी प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण घेतले. त्यानंतर राणेबेन्नूर येथे पदवीपूर्ण शिक्षण पूर्ण केले. नंतर धारवाडला कर्नाटक कॉलेजात अध्ययन करून १९७४ मध्ये कर्नाटक विश्वविद्यालयाची बी.ए. पदवी प्राप्त केली.

पुढील अध्ययनाकरिता काशीस जावे अशी उत्कट इच्छा त्यांच्या मनात आली. तेव्हा त्यांचे वडील वे. चन्नवीर यांची अनुमती मिळवून ते काशीक्षेत्रास आले. तत्कालीन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामींजींच्या अनुमतीने त्यांनी १९७४ मध्ये श्रीजगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील सुप्रसिद्ध काशी हिंदू विश्वविद्यालयात बी.लिब. सायन्स कोर्ससाठी प्रवेश घेतला. वर्षभर खूप अभ्यास करून प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. पुढे १९७६ मध्ये त्यांना त्याच विश्वविद्यालयातील केंद्रीय ग्रंथालयात सहाय्यक ग्रंथपाल पदावर सेवेची संधी मिळाली.

अध्ययनात रस असल्याने तेवढ्यावरच नोकरी मिळाली म्हणून अभ्यास न थांबविता त्यांनी १९८१ मध्ये कर्नाटक विश्वविद्यालयाची राज्यशास्त्र

विषयातील एम.ए. पदवी मिळविली. त्यानंतर १९८६ मध्ये एम.लिब. सायन्स पदवी प्राप्त केली. त्यानंतर १९८८ मध्ये राज्यशास्त्र विषयात संशोधन करून कर्नाटक विश्वविद्यालयाची पीएच.डी. आणि २००४ मध्ये राजस्थानच्या कोटा नगरच्या वर्धमान महावीर मुक्त विद्यापीठाकडून ग्रंथालय आणि समाजविज्ञान विषयाची पीएच.डी. पदवी संपादन केली.

त्यांची बुद्धी तसेच परिश्रमशील वृत्ती पाहून काशीपीठाचे तेव्हाचे व्यवस्थापक गंगाधर शास्त्रीजींनी आपली सुपुत्री कु. सुशीला हिच्याशी १९७७ मध्ये यांचा विवाह लावून दिला. डॉ. गंगाधर केंडदमठ यांनी १९७७ पासून ३३ वर्षे नोकरी सांभाळून श्रीपीठाची सेवा केली.

त्यांनी या पीठाच्या जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानचे कार्यदर्शी म्हणून काम पाहिले आहे. शैवभारती शोधप्रतिष्ठानकडून प्रकाशित होणाऱ्या ग्रंथांच्या मुद्रणकार्याची जवाबदारी निष्ठेने पार पाडली. काशी हिंदू विश्वविद्यालयात केंद्रीय ग्रंथालयाचे डेपुटी लायब्ररीयन म्हणून काम पाहिले. या संघाच्या मासिकाच्या संपादक मंडळाचे ते सदस्यही होते.

त्यांनी ग्रंथलेखन केले असून ते प्रकाशित झाले आहेत. त्यांना राजशेखर नावाचा एक मुलगा आणि अंजली नावाची कन्या आहे. मुलाने एम.बी.ए. पूर्ण केले असून तो बेंगळूरु येथे सेवेत आहे. कन्येने हिंदी विषयात पीएच.डी. केली. तिचा विवाह झाला असून ती देखील बेंगळूरु येथेच राहायला आहे. आता ते सेवानिवृत्त होऊन धारवाडला राहतात.

२७२. **श्री. चंद्रशेखर स्वामी मंटेश्वर हिरेमठ**

मु.पो. केलूर, ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)

हे स्कंदगोत्रीय होत. यांनी हुनगुंद येथील व्ही. एम. (विजय महांतेश्वर) हायस्कूलमध्ये एस.एस.एल.सी. पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. पुढे आपल्या गावच्या एम.एम. नाडगौडर यांच्याकडून प्रेरित होऊन वयाच्या २५ व्या वर्षी काशीक्षेत्री आले.

येथील ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. २५.७.१९७४ रोजी प्रवेश घेतला. नंतर येथील संस्कृत महाविद्यालयात अभ्यास करून आपल्या संस्थानास परतले.

२७३. **श्री ष.ब्र. शिवमहांत शिवाचार्य स्वामीजी**
हिरेमठ, मु.पो. हूली, ता. सौंदत्ती,
जि. बेळगाव (कर्नाटक)
**श्री ष.ब्र. शिवसिद्धराम शिवाचार्य स्वामीजी**
मु.पो. सुळ्ळ, ता. हुब्बळी, जि.धारवाड (कर्नाटक)



इतिहासप्रसिद्ध हूली येथील हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरा असणारा मठ आहे. चर व पट्ट हे दोन्ही अधिकार या मठाला आहेत. या मठाचे मूळपुरुष श्री ष.ब्र. सिद्धचैतन्य शिवाचार्य हे शिवयोगधुरंधर, रससिद्ध सत्पुरुष होते. १५१ वर्षेपर्यंत ते अधिकारपदावर होते, असा इतिहास आहे. त्यांच्यानंतर ५२ स्थिर पट्टाधिकारी होऊन गेले आणि चरपटावर ४५ शिवाचार्य होऊन गेले.

या मठाचे चौथे पट्टाधिकारी श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य हे श्रेष्ठ पंडित होते. त्यांनीच ब्रह्मसूत्रावर नीलकंठ भाष्य लिहिले. हे आद्य शंकराचार्यांचे समकालीन होते. या मठाचे ४७ वे स्थिरपट्टाधिकारी श्री ष.ब्र. सिद्धबसव शिवाचार्य इ.स. १७३६ पासून १८३२ पर्यंत ९६ वर्षे धर्माधिकारी होते. ते दाढीवाले होते म्हणून लोक यांना 'दाढीवाले स्वामीजी' असे म्हणत. त्यांना सिद्धिदात्री देवीचा साक्षात्कार झाला होता. त्यांनी अनेक चमत्कार केले.

या मठाचे ४४ वे चरपट्टाधिकारी तर्कतीर्थ श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य हे तर्कशास्त्राचे प्रकाण्ड पंडित होते. काशीचे विद्वान असणारे यांनी 'शिवाद्वैतपरिभाषा', 'शिवानुभवदीपिका' इ. ग्रंथांची रचना केली आहे. त्यांचे ग्रंथ काशीच्या संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात पाठ्यपुस्तके म्हणून स्वीकृत केले आहेत.

यानंतर या मठाचे ४५ वे चरपट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. शिवमहांत शिवाचार्य स्वामीजी होत. ते पूर्वाश्रमी हूली हिरेमठाच्या वे.पं. सिद्धांती शिवशंकर शास्त्रीजी आणि नीलम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि.

१८.१०.१९५८ रोजी जन्मास आले. त्यांनी हूली येथे प्राथमिक शिक्षण तसेच शिरसंगी येथे माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले.

श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या संमतीनुसार त्यांनी दि. ६.७.१९७५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. इंटर परीक्षा उत्तीर्ण झाल्यानंतर काशी हिंदू विश्वविद्यालयातून दर्शनशास्त्रात बी.ए. ऑनर्स प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. त्यांनी विद्यार्थिदशेत काशी वीरशैव विद्वत्संघाचे कोषाध्यक्ष म्हणून सेवा केली. सतत ९ वर्षे काशीपीठात राहून स्वाध्यायाबरोबर मठाची व विद्वत्संघाची सेवा करून श्री जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्यांच्या कृपेस ते पात्र झाले. त्यांनी दि. ९.४.१९८४ रोजी श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात हूली हिरेमठाचा चरपट्टाधिकार स्वीकारला. सदाचारी, गुरुभक्तिसंपन्न, वीरशैव तत्त्वप्रचारक असे स्वामीजींनी आपल्या मठपरंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम पार पाडण्यासोबत श्रीमद् रंभापुरी जगद्गुरू प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजींचे आप्तसहाय्यक होऊन रंभापुरी पीठात सेवा केली.

दि. ८.९.२०१३ रोजी सुळ्ळ हिरेमठाचे श्री ष.ब्र. अभिनव सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी शिवैक्य झाल्यानंतर त्या गादीवर हूली मठाचे श्री ष.ब्र. शिवमहांत शिवाचार्य यांना पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. शिवसिद्धराम शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. सध्या सुळ्ळ (ता. हुब्बळ्ळी, जि. धारवाड) या गावातील हिरेमठाचे ते पट्टाध्यक्ष झाले असून ते हूली आणि सुळ्ळ या दोन्ही मठांच्या परंपरा यथावत् चालवीत आहेत.

## २७४. श्री ष.ब्र. डॉ. महेश्वर शिवाचार्य स्वामीजी



केळदी राजगुरू संस्थान हिरेमठ,
मु. बंदगद्दे, पो. केळदी, ता. सागर,
जि. शिवमोग्गा (कर्नाटक)
चरभाष : ९४४८१४५३२८

केळदी राजगुरू संस्थान हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून या मठाला देखील एक इतिहास आहे. या संस्थानमठावर तपस्वी व विद्वान शिवाचार्य होऊन गेले आहेत. या मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. डॉ. गुरुसिद्धदेव शिवाचार्य स्वामीजी फार मोठे संस्कृत विद्वान होते. श्री ष.ब्र. डॉ. गुरुसिद्धदेव शिवाचार्यांचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. डॉ. महेश्वर शिवाचार्य स्वामीजी होत.

हे पूर्वाश्रमीचे चालुक्याची राजधानी बदामीचे श्री. शिवप्पयन मठाचे वंशज आहेत. हा मठदेखील काशीपीठाचा शाखामठ होय. या शिवप्पयन मठाचे वे. चनबसय्या व सौ. रेवम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. २६.११.१९५४ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे महेश्वर असे नामकरण करण्यात आले.

त्यांनी बदामीत प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे संस्कृताध्ययनाकरिता त्यांनी जवळच्या शिवयोग मंदिरात प्रवेश घेतला. तेथे संस्कृत अध्ययनासोबत ते योगविद्या शिकले. त्यानंतर त्यांचे वडील आणि गावकऱ्यांच्या सल्यानुसार उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. काशीपीठधिपती श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जंगमवाडी मठाच्या श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात जून १९७५ मध्ये प्रवेश घेतला. त्यानंतर काशी हिंदू विश्वविद्यालयातून संस्कृतमध्ये एम.ए., संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शांकर वेदान्त आणि शक्तिविशिष्टाद्वैत विषयात 'आचार्य' पदवी मिळविली. अलाहाबाद विश्वविद्यालयातून 'साहित्यरत्न' पदवी संपादन केली. त्याचबरोबर योग, संगीत, इंग्लिश भाषेचा 'डिप्लोमा' कोर्स इ. पूर्ण केले.

पुढे संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात 'ब्रह्मसूत्र, श्रीकरभाष्य व शांकरभाष्य यांचा तुलनात्मक अभ्यास' या विषयावर शोधप्रबंध सादर करून १९८२ मध्ये पीएच.डी. पदवी प्राप्त केली. १९७५ पासून १९९२ पर्यंत १८ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून उच्च व्यासंग करून ते उच्चविद्याविभूषित झाले.

आपल्या अध्ययनाबरोबर १९८९ पासून १९९२ पर्यंत चार वर्षे काशीपीठाचे व्यवस्थापक म्हणून उत्तम सेवा करून श्रीविश्वाराध्यांच्या कृपेस ते पात्र झाले. १९९४ मध्ये श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींची अनुमती मिळवून त्यांनी दिल्लीच्या सुप्रसिद्ध आद्य कात्यायनी शक्तिपीठाचे संस्थापक पूज्य नागपाल बाबाजींच्या मार्गदर्शनाखाली दिल्लीच्या भक्तांना योग, नैतिक शिक्षण, धर्मोपदेश केला. याशिवाय त्या शक्तिपीठात स्थापन झालेल्या संस्कृत महाविद्यालयाचे ते प्राचार्य होते. पुढे २००० मध्ये बदामीच्या शिवप्पय्यन मठाचे पट्टाधिकारी झाले. त्यानंतर काही महिन्यांतच श्रीरंभापुरी जगद्गुरू वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात दि. १६.९.२००६ रोजी व्हनाळी हिरेकल्मठाच्या ओडेयर चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींकडून पट्टाधिकार संस्कार होऊन ते केळदी राजगुरू संस्थानमठाचे पट्टाधिकारी झाले.

हल्ली श्री ष.ब्र. डॉ. महेश्वर शिवाचार्य स्वामीजी केळदी राजगुरू संस्थान हिरेमठाचे धार्मिक कार्यक्रम करीत भक्तांच्या आदरास पात्र झाले आहेत.

## २७५. श्री. वे. रेवणसिद्धय्या अडवीर स्वामी हिरेमठ

मु.पो. गोरटा (बी.), ता. बसवकल्याण,
जि. बीदर (कर्नाटक)



बीदर जिल्ह्याच्या बसवकल्याण तालुक्यातील गोरटा हे गाव इतिहासप्रसिद्ध आहे. येथील संगीत रुद्रसंघ कर्नाटकातील अत्यंत प्रख्यात संघ आहे. या गावचे सर्व माहेश्वर रुद्रपूजानिष्ठ आहेत. या गावातील हिरेमठाच्या श्री. वे. अडवीर स्वामी आणि सौ. वनदेवी या त्रिकालपूजानिष्ठ दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.३.१९५५ रोजी श्री. रेवणसिद्ध यांचा जन्म झाला. ते गोरटा येथे प्राथमिक अभ्यास पूर्ण करून कलबुर्गीच्या श्री शरणबसवेश्वर कला महाविद्यालयातून पदवीपूर्व परीक्षा उत्तीर्ण झाले.

पुढे १९७७ मध्ये धारवाडच्या कर्नाटक कला महाविद्यालयातून ते तत्त्वज्ञानात बी.ए. झाले. नंतर मेहकर कट्टीमनी हिरेमठाच्या श्री ष.ब्र. राचोटी शिवाचार्यांच्या आज्ञेनुसार स्नातकोत्तर अभ्यासासाठी काशीस आले. जंगमवाडी मठातील श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात त्यांनी श्री १००८ ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९७७ मध्ये प्रवेश घेतला. नंतर तेथील सुप्रसिद्ध काशी हिंदू विश्वविद्यालयातील तत्त्वज्ञान विभागात प्रवेश घेऊन १९७९ मध्ये एम.ए. पदवी मिळविली. १९७९ पासून १९८७ पर्यंत 'दैवतविषयक एक विमर्शात्मक चिंतन आणि वीरशैव' या विषयावर संशोधन केले. याप्रमाणे चार वर्षे काशी जंगमवाडी मठात श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलाचे विद्यार्थी होऊन काशी वीरशैव विद्वत्संघाचे सक्रिय सदस्य म्हणून काम पाहिले. विद्यार्थिदशेत ते प्रतिदिवशी तीन वेळा रुद्राभिषेकपूर्वक लिंगपूजा करीत असत.

काशीहून कर्नाटकास परतल्यानंतर १९८२ पासून १९८५ पर्यंत त्यांनी कलबुर्गीच्या श्री शरणबसवेश्वर कला महाविद्यालयात तत्त्वज्ञानाचे अध्यापक म्हणून सेवा केली. हल्ली गोरटा गावच्या महादेव मंदिराच्या श्री ज. पंचाचार्य

संघाचे अध्यक्ष, तडेळा गावच्या विश्वशांती ट्रस्टचे सदस्य, लातूर जिल्ह्यातील चाकूरच्या विश्वशांतिधाम महादेव मंदिराच्या ट्रस्टचे अध्यक्ष या नात्याने ते प्रतिवर्षी विविध धार्मिक कार्यक्रम आयोजित करून जनतेचे धर्मप्रबोधन करीत असतात. ते उत्तम वक्ते, प्रसिद्ध लेखक असून विविध पत्रिकांतून आपले चिंतनपर लेख पाठवितात. आचारसंपन्न, गुरुभक्तिधुरंधर, आदर्श गृहस्थ म्हणून जीवन कंठीत आहेत.

२७६. **श्री म.नि.प्र. सिद्धराम स्वामीजी**

गुरू श्री म.नि.प्र. शिवबसव स्वामीजी,
रुद्राक्षी मठ, मु.पो. नागनूरु,
ता.जि. बेळगाव (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे बिळगी हिरेमठाचे पट्टाधिकारी श्री ष.ब्र. गुरुपाद शिवाचार्य स्वामीजींचे उत्तराधिकारी होत. त्यांचे नाव गुरुपाद देव. दि. १२.१२.१९५८ या दिवशी त्यांचा जन्म झाला. त्यांचे नंदिगोत्र असून त्यांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्रीकुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत त्यांनी संस्कृतचे अध्ययन केले व ते मैसूरच्या काव्यपरीक्षेत उत्तीर्ण झाले. नंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता वयाच्या १९ व्या वर्षी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १४.७.१९७७ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या हिंदी विभागातून ते एम्.ए. झाले. शिवाय धारवाडच्या कर्नाटक विश्वविद्यालयातून त्यांनी तत्त्वज्ञान या विषयात एम्.ए. केले. बेळगाव नागनूरु रुद्राक्षीमठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारून परंपरेनुसार धार्मिक तसेच शैक्षणिक कार्य व्यवस्थित पार पाडले. सध्या गदग येथील तोंटदार्य मठाचा निरंजन जगद्गुरू पट्टाधिकार स्वीकारून धार्मिक कार्य करीत आहेत.

## २७७. श्री ष.ब्र. मुक्तेश्वर शिवाचार्य स्वामीजी वेळापूरकर



मु.पो. वेळापूर, ता. माळशिरस,
जि. सोलापूर (महाराष्ट्र)

वेळापूर गावातील हा मठ रंभापुरी शाखेचा असून पुत्रवर्गपरंपरेचा आहे. या मठाचे वे. शंकरस्वामी पुराणिक आणि सौ. पार्वतीदेवी या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. २.७.१९५३ रोजी श्री मुक्तेश्वर यांचा जन्म झाला. त्यांचे सुधीर स्वामी असे नाव ठेवण्यात आले. या मठाचे पूर्वीचे गुरू श्री ष.ब्र. सदाशिव शिवाचार्य स्वामीजी आकस्मिकपणे लिंगैक्य झाल्याने त्यांच्या जागी वयाच्या तिसऱ्या वर्षीच सुधीर स्वामींना नियुक्त करण्यात आले. ते ५ वर्षांचे असताना त्यांच्या मातोश्री पार्वतीदेवी लिंगैक्य झाल्या.

श्री सुधीर स्वामींचे प्राथमिक शिक्षण बार्शीत पूर्ण झाल्यावर त्यांचे मामा विश्वनाथ दसंगे यांनी त्यांना संस्कृत अध्ययनाकरिता सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुलात घातले. तेथे दोन वर्ष अभ्यास करून पुढे बार्शीतील श्री वे. रेवणसिद्धशास्त्री चंद्रशेखरमठ यांच्या मार्गदर्शनाखाली वैदिक विद्येचे अध्ययन करीत त्यांनी माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर बुलडाणा जिल्ह्यातील साखरखेर्डा मठाचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी यांच्याकडे त्यांनी दोन वर्षेपर्यंत संस्कृत व्याकरणाचा अभ्यास केला. दि. १२.३.१९७६ पासून श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात बेळंकीच्या श्री ष.ब्र. नंजुंडाचार्यांच्या नेतृत्वाखाली श्री वे. सुधीर स्वामींना वेळापूर मठावर पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. मुक्तेश्वर शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. या कार्यक्रमात अनेक शिवाचार्य, शास्त्रीजी आणि महाराष्ट्र वीरशैव सभेचे अध्यक्ष श्री. नामदेवशेठ रुकारी हे उपस्थित होते.

नंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता त्यांनी काशीक्षेत्री येऊन श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९७८ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीतील मायानंद गिरी संस्कृत महाविद्यालयातून प्रथमा आणि मध्यमा या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री या वर्गात प्रवेश घेऊन पाच वर्षे अभ्यास केला आणि प्रथम श्रेणीत आचार्य परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यावेळी त्यांना संपूर्णानंद सुवर्णपदक, अन्नदाप्रसाद मुखर्जी सुवर्णपदक तसेच काशीपीठाचे विश्वाराध्य सुवर्णपदक प्राप्त झाले. दि. २८.१.१९८९ रोजी विश्वविद्यालयाच्या महोत्सवात त्यांना उत्तरप्रदेशचे तत्कालीन मुख्यमंत्री श्री. एन. डी. तिवारी यांच्या हस्ते आचार्य पदवी आणि सुवर्णपदक प्रदान करण्यात आले.

याप्रमाणे सतत अकरा वर्षे विश्वाराध्य गुरुकुलात राहून अध्ययन करीत असताना त्यांनी काशी वीरशैव विद्वत्संघाचे सदस्य म्हणून कार्य केले. वेळापूर, बार्शी, कुर्डुवाडी आणि टेंभुर्णी येथील मठांचा जीर्णोद्धार केला. शिवनामसप्ताह, परमरहस्य पारायण, शिवकीर्तन, श्रावणमास व नवरात्री अनुष्ठान या माध्यमातून ते महाराष्ट्रात धर्मजागृतीचे कार्य करीत आहेत. ते सरळ स्वभावाचे असून उत्तम वक्ते आहेत. जगद्गुरू पंचाचार्य समितीच्या पुणे जिल्ह्याचे अध्यक्ष म्हणून कार्य करीत आहेत.

## २७८. श्री ष.ब्र. गुरुमूर्ती रुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजी



**कोळेकर संस्थान मठ, निमसोड,**
**ता. खटाव, जि. सातारा (महाराष्ट्र)**

महाराष्ट्रातील कोळेकर संस्थानमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून शिष्यवर्ग परंपरेतील मठ आहे. या मठाची परंपरा अत्यंत प्राचीन असून कागदपत्रानुसार आतापर्यंत येथे २९ शिवाचार्य होऊन गेले आहेत. त्यामध्ये श्री पशुपती देव, टेंभुर्णी; श्री गीर्वाणअप्पा, टेंभुर्णी; श्री रुद्रपशुपतीअप्पा, मनौळी; श्री प्रभुअप्पा, कोळे; श्री रुद्रपशुपती, निमसोड आणि श्री निर्वाणरुद्रपशुपती कोळे या शिवाचार्यांनी जिवंत समाधी घेतली आहे. या मठाचे मूळपुरुष श्री सायगाव उपासकरण लिंगबडदेवरू हे असून त्यांनी देखील जिवंत समाधी घेतली आहे. शके १७५३ (इ.स.१८३१) व्ययनाम संवत्सरात लिहून ठेवलेल्या वंशावळीनुसार ही माहिती उपलब्ध झाली आहे.

प्राचीन परंपरा असणाऱ्या या मठाचे ३० वे अधिपती श्री ष.ब्र. गुरुमूर्ती रुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमी निमसोड गावचे श्री. सिद्धराम शेटे आणि सौ. लक्ष्मीबाई या शिवभक्त दंपतीच्या पवित्र गर्भात दि. ६.२.१९६१ रोजी जन्मले. त्यांचे त्यावेळी राजाराम असे नाव ठेवण्यात आले होते. त्यांचे प्राथमिक शिक्षण निमसोड येथेच पूर्ण झाले.

कोळेकर मठाचे २९ वे मठाधिपती श्री ष.ब्र. निर्वाणरुद्रपशुपती शिवाचार्य स्वामीजी दि. १२.५.१९७२ रोजी लिंगैक्य झाले. त्या रिक्त जागेवर भक्तांनी चि. राजाराम शेटे यांची उत्तराधिकारी म्हणून निवड केली. पुढे मठपरंपरेनुसार दि. ५.५.१९७३ रोजी श्री ष.ब्र. गुरुसिद्धमल्लय्या शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ, सांगोला यांच्याकडून राजाराम यांना जंगमदीक्षा देण्यात आली. दि. ७.५.१९७३ रोजी सांगोला हिरेमठाच्या स्वामीजींकडूनच त्यांना विधिपूर्वक पट्टाभिषेक करण्यात आला. या कार्यक्रमास शाखामठांचे

सर्व शिष्य व गावकरी उपस्थित होते.

पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता कोळेकर महाराज काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९७८ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे पाच वर्षे अध्ययन करून संस्कृत विषय मुख्य ठेवून भारतीय हरिश्चंद्र स्नातकोत्तर महाविद्यालयातून त्यांनी बी.ए. ही पदवी आणि महात्मा गांधी काशी विश्वविद्यालयातून एम्.ए. पदवी संपादन केली. काशीतील अध्ययन पूर्ण करून कोळेकर महाराज हल्ली मठाच्या परंपरेनुसार श्रावणमास अनुष्ठान, शिवनामसप्ताह, परमरहस्य पारायण, शिखरशिंगणापूर पदयात्रा आणि महाशिवरात्रीला श्रीजगद्गुरू विश्वाराध्य जयंती महोत्सव इत्यादी कार्यक्रम वैभवाने पार पाडत असतात. भक्तवत्सल अशा महाराजांनी मठाच्या शिष्यांना विधिवत् दीक्षासंस्कार देऊन व्यसनापासून दूर करून त्यांच्या मनात धर्मनिष्ठा जागविली आहे. शिष्यवर्गाशी निरंतर संबंध ठेवणारे हे शिवाचार्य महाराष्ट्रातील एक आदर्श शिवाचार्य होत. कोळेकर मठाला ३६० शाखामठ होते. परंतु सध्या फक्त ४० शाखामठ अस्तित्वात असून त्यातील अनेक मठांचा जीर्णोद्धार श्री कोळेकर महाराज करीत आहेत. याप्रमाणे काशीपीठाच्या शाखामठाचे हे धर्मपरायण शिवाचार्य काशीजगद्गुरू महास्वामीजींच्या विशेष कृपाशीर्वादास पात्र झाले आहेत. सध्या गुरुमूर्ती रुद्रपशुपती शिवाचार्य महाराजांनी प्रकृती अस्वास्थ्यामुळे केमवाडी (ता. तुळजापूर, जि. उस्मानाबाद) येथील जनमेजय किरण नकाते या बटूला उत्तराधिकारी नेमून दि. १६.५.२०१२ रोजी विधिपूर्वक पट्टाभिषेक केला. त्यांचे श्री ष.ब्र. गुरुमूर्ती निर्वाण रुद्रपती शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. ते सध्या ५ व्या इयत्तेत शिकत असून महाराजांच्या मार्गदर्शनाखाली धार्मिक कार्यक्रमात भाग घेत आहेत.

२७९. **श्री डी. शंकरय्या**

मु.पो. लक्तवरम्, ता. गुत्ती,

जि. अनंतपूर (आंध्र प्रदेश)



हे वीरगोत्रीय होत. स्वग्रामी स्वामी करिबसअप्पा प्रशालेत ते बारावी उत्तीर्ण झाले. पुढे श्री स्वामी शंकरानंद गिरी यांच्या प्रेरणेने उच्च व्यासंगाकरिता वयाच्या २० व्या वर्षी काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १८.१२.१९७८ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. प्रारंभिक संस्कृत परीक्षेत उत्तीर्ण होऊन संपूर्णानंद विश्वविद्यालयातून त्यांनी वेदान्त विषयात शास्त्री व आचार्य या पदव्या मिळविल्या. त्यासोबत म. गांधी काशी विद्यापीठातूत बी.ए., एम्.ए. तसेच एम्.फिल्. या पदव्या संपादन केल्या. याप्रमाणे गुरुकुलात राहून ते पदवीधर झाले. काशीहून परतून त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला आणि हैदराबाद येथे प्राध्यापक होऊन शिक्षणक्षेत्रात ते स्पृहणीय कार्य करीत आहेत.

## २८०. श्री श्रो.ब्र. अभिनव शिवपुत्र स्वामीजी

षण्मुखारूढ मठ, विजयपूर (कर्नाटक)

शांताश्रम, हुब्बळी



विजयपूरचा षण्मुखारूढ मठ हा श्री सिद्धारूढ परंपरेतील मठ असून इंडी येथे जन्मलेले श्री षण्मुखारूढ स्वामीजी यांनी १८७५ मध्ये या मठाची स्थापना केली. या मठावर सेडद श्री सिद्धराम स्वामीजींच्या नंतर हुब्बळी शांताश्रमाचे श्री शिवपुत्र स्वामीजी अधिकारी झाले. हुब्बळीचा शांताश्रमदेखील सिद्धारूढ परंपरेतील मठ होय. श्री शिवपुत्र स्वामीजींनी १९२५ मध्ये या आश्रमाची स्थापना केली. हल्ली या दोन्ही मठांचे अधिपती श्री श्रो.ब्र. अभिनव शिवपुत्र स्वामीजी हे आहेत.

हे पूर्वाश्रमी बळ्ळारी जिल्ह्यातील कोट्टुरू गावचे श्री. कोट्रबसय्या आणि सौ. गौरम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९५६ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे शिव असे नाव ठेवण्यात आले. कोट्टुरूमध्ये ४ थी इयत्तेपर्यंत त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. पुढील शिक्षणासाठी हुब्बळीच्या शांताश्रमात येऊन तेथे शिवपुत्र स्वामीजींचे शिष्यत्व पत्करले आणि पाचव्या इयत्तेपासून एस.एस.एल.सी. पर्यंतचे शिक्षण न्यू इंग्लीश स्कूलमध्ये पूर्ण केले. शालेय शिक्षणासोबत श्री शिवपुत्र स्वामीजींकडून संस्कृत तसेच निजगुण शिवयोगींच्या षट्शास्त्रांचे अध्ययन केले. पुढे १९७८ मध्ये हुब्बळीच्या शांताश्रमाचा अधिकार स्वीकारला. त्यानंतर शिवपुत्र स्वामीजींच्या आदेशानुसार ते उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९७८ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन दोन वर्षे साहित्य, व्याकरण, न्याय आणि वेदान्त या शास्त्रांचा अभ्यास केला. तसेच काशी वीरशैव विद्वत्संघाचे सक्रीय सदस्य होऊन पदाधिकारी म्हणून सेवा केली.

श्री शिवपुत्र स्वामीजींचे स्वास्थ्य बिघडल्यामुळे त्यांनी अध्ययन अर्धवट सोडले व १९८१ मध्ये ते हुब्बळीस परतले. त्यानंतर विजयपूरच्या भक्तांच्या इच्छेनुसार १९८३ मध्ये श्री शिवपुत्र स्वामीजींच्या नेतृत्वाखाली षण्मुखारूढ मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. या पट्टाभिषेकामध्ये विद्यमान श्रीकाशीजगद्गुरू हे पूर्वाश्रमी गुळेद्गुड्डच्या अमरेश्वर मठाचे पट्टाधिकारी असताना त्यांनी त्या समारंभाचे संपूर्ण नेतृत्व केले होते. त्यांच्या मार्गदर्शनाखाली हा पट्टाभिषेक अत्यंत वैभवाने संपन्न झाला. त्यावेळी त्यांना अभिनव शिवपुत्र स्वामीजी असे नाव देण्यात आले. श्री शिवपुत्र स्वामीजींचा प्रिय 'शिवु'– अभिनव शिवपुत्र स्वामीजी गेली ३५ वर्षांपासून हुब्बळीचा शांताश्रम आणि विजयपूरचा षण्मुखारूढ या दोन्ही मठांचा अधिकार स्वीकारून धार्मिक, आध्यात्मिक कार्यक्रमांसोबत शैक्षणिक क्षेत्रातही कार्य करीत आहेत. त्यांनी हुब्बळीच्या शांताश्रमात प्राथमिक आणि माध्यमिक शाळा काढून वसतिगृहाची सोयदेखील केली आहे. ते विजापुरात प्राथमिक, माध्यमिक आणि डी.एड्. कॉलेज चालवीत आहेत. सरळ व विनोदी स्वभाव असलेले अभिनव शिवपुत्र स्वामी सर्वांच्या प्रेमास व आदरास पात्र झाले असून दोन्ही मठांच्या परंपरेनुसार धार्मिक कार्य उत्तम रित्या पार पाडत असताना एका कार अपघातामध्ये पाठीच्या मणक्याला दुखापत झाल्यामुळे ते पायाने अधू झाले, तरीही त्यांचे मनोबल कमी झाले नसून व्हील चेअरच्या सहाय्याने सर्व धार्मिक कार्यक्रमात भाग घेतात. सध्या जास्त फिरणे अशक्य होत असल्यामुळे राजूर (ता. यलबुर्गा, जि. कोप्पळ) येथीले माहेश्वर दंपती वे. शरणय्या व सौ. पारम्मा यांचे सुपुत्र श्री कुमार देव यांचा उत्तराधिकारी म्हणून स्वीकार केला आहे. श्री कुमार देव यांनी शिवयोग मंदिरामध्ये प्राथमिक संस्कृताध्ययन करून बेळगावच्या राणी चन्नम्मा विश्वविद्यालयातून इंग्लीश पदवी प्राप्त केली आहे. दि. ७.११.२०१९ ला हुबळी शांताश्रमाच्या अणि विजयपूरचा षण्मुखारूढ मठाच्या गादीवर त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक संपन्न झाला. या समारंभाला श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य

महास्वामीजी आणि श्रीशैलजगद्गुरू १००८ डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांचे सान्निध्य लाभले होते. तेव्हा त्यांचे 'श्री श्रो ब्र. अभिनव सिद्धारूढ स्वामी' असे नामकरण करण्यात आले. सध्या अभिनव सिद्धारूढ स्वामीजी निष्ठेने गुरूची सेवा करीत दोन्ही मठांचे धार्मिक आणि आध्यात्मिक कार्यक्रम सांभाळत आहेत.



**२८१. श्री ष.ब्र. डॉ. नंदिकेश्वर शिवाचार्य स्वामीजी**

श्रीगुरू बुद्धिस्वामी मठसंस्थान, लासीन
मु. पूर्णा, ता.जि. परभणी (महाराष्ट्र)
चरभाष : ९४२१३८३९०३

पूर्णा गावचा श्रीगुरू बुद्धिस्वामी मठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून शिष्यवर्गपरंपरेचा मठ आहे. या मठावर बरेच शिवाचार्य होऊन गेले आहेत. महाराष्ट्रातील विविध जिल्ह्यांतील गावांत या मठाचे ३६४ शाखामठ आहेत, असे म्हणतात. त्या सर्व मठांमध्ये पूर्णा येथील हा मठ प्रमुख होय. श्री ष.ब्र. डॉ. नंदिकेश्वर स्वामीजी या मठाचे विद्यमान पट्टाध्यक्ष आहेत. सामनगाव (ता.जि. लातूर) येथील श्री वे. शिवय्या स्वामी आणि सौ. पार्वतीदेवी या माहेश्वरांच्या पवित्र गर्भी दि. ३१.१२.१९६३ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे विद्यानंद असे नामकरण करण्यात आले. त्यांचे प्राथमिक शिक्षण गावातच पूर्ण झाले. नंतर बर्दापूर (ता. अंबाजोगाई, ता.जि. बीड) येथील श्रीरेणुक हायस्कूलमध्ये त्यांनी माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी ११.६.१९७८ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीतील निर्मल संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन त्यांनी पाच वर्षे अध्ययन करून 'साहित्याचार्य' ही पदवी संपादन केली. नंतर आग्रा विश्वविद्यालयातून

बहि:स्थ विद्यार्थी म्हणून हिंदी विषयात ते एम्.ए. झाले. केंद्रीय हिंदी संस्थान, खंदारी, आग्रा या संस्थेतून बी.एड्. समकक्ष अशी पारंगत ही पदवी संपादन केली.

त्याप्रमाणे नाशिक येथील यशवंतराव चव्हाण मुक्त विद्यापीठातून त्यांनी पीएच.डी. ही उपाधी प्राप्त केली. १९७८ ते १९८८ पर्यंत दहा वर्षेपर्यंत काशी जंगमवाडी मठात राहून डॉ. नंदिकेश्वर शिवाचार्य स्वामीजींनी या पदव्या संपादन केल्या. उच्चविद्याविभूषित असे हे स्वामीजी पूर्णा येथील मठाचे धार्मिक, सामाजिक आणि शैक्षणिक कार्य पार पाडीत आहेत.

## २८२. श्री. राजशेखर गंगाधर केंडदमठ



मु.पो. सिडेनूर, ता. ब्याडगी, जि. धारवाड (कर्नाटक)
हल्ली वास्तव्य बेंगळूरू. चरभाष : ९८४५८११५३४

श्री. राजशेखर केंडदमठ हे सिडेनूरच्या डॉ. गंगाधर केंडदमठ आणि सौ. सुशीला या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २५.९.१९७८ रोजी काशी जंगमवाडी मठात जन्मास आले. त्यांनी काशीत प्राथमिक शिक्षण घेतले. केंद्रीय विद्यालयातून माध्यमिक शिक्षण पूर्ण करून नंतर काशी विश्वविद्यालयातून अर्थशास्त्र या विषयात २००१ मध्ये बी.ए. ही पदवी मिळवली. पुढील शिक्षण घेण्यासाठी ते बेंगळूरुला आले. तेथील विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन २००३ मध्ये एम.बी.ए. ही पदवी मिळविली. त्यावेळी त्यांना बेंगळूरुच्या इन्फोसिस कंपनीत नोकरी मिळाली. तेथे एक वर्ष नोकरी करून हरियाणातील वेगवेगळ्या कंपन्यांत त्यांनी तीन वर्षे काम केले. सध्या बेंगळूरुच्या ओराकल या कंपनीत ते काम करीत आहेत. काशी जंगमवाडी मठात राहून व श्री जगद्गुरू विश्वाराध्यांच्या छत्रछायेखाली वाढून आपले जीवन सार्थक करून घेतलेला हा विद्यार्थी पीठाच्या अभिमानाचा विषय होय.

## २८३. श्री ष.ब्र. शिवसिद्ध सोमेश्वर शिवाचार्य स्वामीजी



मुक्तिमठ, मु.पो. भूतरामनहट्टी,
ता.जि. बेळगाव (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमीचे जेवरगी रोड हिरेमठाच्या श्री वे. शिवबसय्या यांचे सुपुत्र होत. कन्नड प्राथमिक ४ थी पर्यंतचे शिक्षण त्यांनी स्वतःच्या गावी पूर्ण केले. नंतर औराद मठाच्या श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने वयाच्या १० वर्षी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १.८.१९७९ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे एक वर्षपर्यंत श्रीकाशीमहास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात त्यांनी अमरकोश, शब्दरूपावली इत्यादी ग्रंथांचा काही काळ अभ्यास केला. नंतर बीदर जिल्ह्यातील भालकी हिरेमठाच्या श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य स्वामीजींच्या सान्निध्यात धार्मिक विधिविधानांचा अभ्यास केला. भारतातील विविध पुण्यक्षेत्री त्यांनी पायी यात्रा केल्या. नंतर बेळगाव जिल्ह्यात भूतरामनहट्टी या गावाच्या जवळ मुक्तिमठाची स्थापना केली. पंचपीठाधीश्वरांना निमंत्रित करून त्यांच्या अमृतहस्ते मूल पंचाचार्यांच्या मूर्तींची आपल्या मठात स्थापना केली.

याशिवाय मठात १२ ज्योर्तिलिंगे स्थापून मुक्तिमठाचा परिसर अत्यंत पवित्र करून टाकला. मुक्तिमठ हे जणू पुण्यक्षेत्रच झाले आहे. या ठिकाणी स्वामीजींनी २००३-२००४ मध्ये एक वर्षपर्यंत तळघरात राहून अन्नपाणी न घेता शिवयोगानुष्ठान केले आहे. प्रत्येक वर्षी पर्वकाळाच्या निमित्ताने पाच दिवस फार मोठ्या प्रमाणावर कार्यक्रमाचे आयोजन करून धार्मिक, सांस्कृतिक आणि सामाजिक या क्षेत्रांत ते जनजागृतीचे कार्य करीत आहेत.

२८४. **श्री ष.ब्र. डॉ. महादेव शिवाचार्य स्वामीजी**



बृहन्मठ मु.पो. बबलेश्वर,
ता.जि. विजयपूर (कर्नाटक)
चरभाष : ९४४८८१६८३८

बबलेश्वरचा बृहन्मठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून शिष्यवर्ग परंपरा असलेला मठ आहे. या मठाला १४० एकर इनामी जमीन असून परंपरागत शिष्यवर्गदेखील आहे. या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. प्रथम शांतवीर शिवाचार्य स्वामीजी हे असून या मठावर आजपर्यंत ६ पट्टाध्यक्ष होऊन गेले आहेत. मूळपुरुषानंतर पट्टाधिकारी झालेले श्री ष.ब्र. प्रथम गुरुपादेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे शिवपूजानिष्ठ, चमत्कार करणारे सत्पुरुष होते. आजचा बबलेश्वर बृहन्मठ त्यांनीच निर्माण केला. त्यांच्या काळात विजयपूर परिसरात मोठा दुष्काळ पडला. त्यावेळी श्रीगुरुपाद शिवाचार्यांनी 'आपला मठ भक्तासाठी, मठाचे सर्व काही भक्तांसाठी' असा विचार करून मठाच्या कोठारातील जवधान्य मुक्तहस्ताने दान केले. मठाची भांडीकुंडी, धन-सोने देऊन सगळा मठ रिकामा केला. याप्रमाणे तीन वेळा सर्वस्व दान केल्याचे फळ म्हणून लोकांनी त्यांना 'भक्तांचे भाग्यनिधी' असे नाव दिले. वेळेवर पाऊस न आल्यामुळे शेती सुकून गेली. रयत कंगाल झाली. त्यावेळी त्यांनी आपल्या तपःशक्तीने निसर्गास आवाहन करून पाऊस पाडला.

ते नैष्ठिक ब्रह्मचारी होते. मैसूरच्या महाराजांवर आलेली विपत्ती त्यांनी दूर केल्यामुळे राजाने छत्र, चामर, चांदीचा दंड आणि पांढरा घोडा देऊन त्यांचा सन्मान केला. ते स्वतः संन्यासी होते, तरी १०१ बिल्ववृक्ष लावून त्यांनी प्रत्येक झाडाखाली भक्तांकडून जंगम दंपतींची पादपूजा करवली. त्या पूजेच्या वेळी शिवपार्वतींना आवाहन करून वृद्धजंगम दंपतीच्या रूपात त्यांनी भक्तांना दर्शन घडविले, अशी त्यांची महिमा सांगितली जाते. शेवटी श्रीगुरुपाद शिवाचार्यांनी वयाच्या ९४ व्या वर्षी मठातच

जिवंत समाधी घेतली. त्यांच्या स्मृत्यर्थ आजदेखील मठात श्रावण महिन्याच्या शेवटी महागणाराधना होत असते.

श्रीगुरुपाद शिवाचार्यांनंतर ६ वे पट्टाध्यक्ष म्हणून श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्य आले. ते अत्यंत भक्तवत्सल व संस्कृत विद्वान होते. त्यांनी मठातच संस्कृत पाठशाळा उघडली. ते स्वतःच शिकवीत असत. बंथनाळचे श्री म.नि.प्र. संगनबसव स्वामीजी यांच्याकडूनच ते संस्कृत शिकले. शिक्षणप्रेमी असल्यामुळे त्यांनी आपल्या गावात 'ग्रामांतर विद्यावर्धक संघ' स्थापन करून माध्यमिक शाळेसाठी मठाची १८ एकर जमीन दान दिली. बदामीजवळच्या श्रीमद् वीरशैव शिवयोगी मंदिरास आपल्या भक्तांकडून तसेच अनेक गावांतील लोकांकडून निधी जमा करून दिल्यामुळे ते हानगल कुमारस्वामीजींच्या कृपेस पात्र झाले. 'विजयपूर लिंगायत विद्यावर्धक संघा'च्या विकासकार्यात त्यांचे फार मोठे योगदान होते. विजापुरात १९५४ मध्ये झालेल्या ७७० अमर गणाधीश्वर महामंटपपूजेचे ते अध्यक्ष होते. बंथनाळ महास्वामीजींना त्यांनी सहकार्य केले. याशिवाय वचनपितामह श्री फ.गु. हळकट्टींना त्यांच्या कुटुंबाच्या निर्वाहासाठी तसेच वचनसाहित्याच्या प्रकाशनासाठी त्यांनी आर्थिक सहाय्य केले. त्यांनी वेळोवेळी शिवयोग तपोनुष्ठान केल्यामुळे जवळच्या हरळेश्वर क्षेत्रास प्रसिद्धी मिळाली. दि. १०.११.१९७९ रोजी ते लिंगैक्य झाले.

अशा मातृहृदयी श्री ष.ब्र. शांतवीर स्वामीजींचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्य स्वामीजी होत. बबलेश्वरच्या शरण श्री. मुत्तुराज संकन्नवर व सौ. नीलांबिका या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ११.७.१९४८ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे अरविंद असे नामकरण करण्यात आले. बबलेश्वर आणि बदामी येथे आपले प्राथमिक शिक्षण पूर्ण करून १९६० मध्ये ते मुलकी परीक्षा उत्तीर्ण झाले. विजयपूरच्या श्री सिद्धेश्वर प्रशालेतून १९६५ मध्ये एस.एस.एच.सी. परीक्षा प्रथम श्रेणीत उत्तीर्ण झाले. पुढे के.सी.पी. सायन्स कॉलेजमध्ये भौतिकशास्त्र व गणित हे विषय घेऊन १९७० मध्ये ते बी.एस्सी. झाले. बबलेश्वर बृहन्मठाचे तत्कालीन शिवाचार्य श्री ष.ब्र.

शांतवीर शिवाचार्य स्वामीजींनी श्री अरविंद यांची मठाचा उत्तराधिकारी म्हणून निवड केली. आहेरी जंबगीच्या श्री ष.ब्र. पर्वतेश्वर शिवाचार्यांकडून त्यांना वीरमाहेश्वर जंगमदीक्षा देऊन दि. २९.७.१९७४ रोजी पट्टाधिकार देण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. या पट्टाधिकार कार्यक्रमात बटूवर पूर्वाश्रमात आध्यात्मिक संस्कार करणारे वेदान्तकेसरी श्री मल्लिकार्जुन स्वामीजी आणि त्यांचे शिष्य श्री सिद्धेश्वर स्वामीजी या दोघांनी उपस्थित राहून महाजपयज्ञ केला.

श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्यांनी ६ वर्षेपर्यंत गुरूंच्या सान्निध्यात राहून त्यांची सेवा केली. गुरुवर्य लिंगैक्य झाल्यानंतर दुसऱ्या वर्षी श्री. व्ही. एम. पाटील आणि श्री. राचप्पा मंगळवेढे यांच्या प्रोत्साहनाने ते वयाच्या ३२ व्या वर्षी उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी २०.८.१९८० रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. १९८५ मध्ये म. गांधी काशी विद्यापीठातून संस्कृत एम.ए. आणि १९८६ मध्ये संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य या पदव्या त्यांनी प्रथम श्रेणीत प्राप्त केल्या. नंतर काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागातील डॉ. सुधांशू शेखरशास्त्रींच्या मार्गदर्शनाखाली 'शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त : एक समीक्षात्मक अनुशीलन' या विषयावर १९८७ पासून १९९४ पर्यंत अध्ययन करून शोधप्रबंध सादर करून १९९४ मध्ये त्यांनी शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तचक्रवर्ती (पीएच.डी.) ही पदवी प्राप्त केली.

१४ वर्षे काशीपीठात राहून त्यांनी अध्ययन केले. या काळात काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यवाह होऊन संघाच्या अभिवृद्धीसाठी परिश्रम घेतले. ते तत्त्वचिंतक, वक्ते, उत्तम लेखक असून आपल्या मठपरंपरेप्रमाणे सर्व धार्मिक कार्यक्रम अव्याहतपणे करीत आहेत. विजयपूर जिल्ह्यातील दुष्काळ दूर करण्यासाठी 'लिफ्ट एरिगेशन' या योजनेच्या अंतर्गत जिल्ह्यातील तळी भरण्यासाठी त्यांनी चळवळ करून सत्याग्रह केला आणि शासनाकडून

त्यासाठी मदत मिळवण्यात त्यांना यश आले. २०१८ साली कर्नाटकमध्ये वीरशैव लिंगायत प्रचंड वाद असताना त्यांनी विजयपूर जिल्ह्याचे नेतृत्व करून सर्व निरंजन आणि पट्टाधिकारी यांना एकत्र आणले आणि तत्कालीन काँग्रेस सरकारचे धर्म विभागणीचे दुरुद्देश हाणून पाडण्यात ते सफल झाले. श्री ष.ब्र. डॉ. महादेव शिवाचार्य स्वामीजींनी वृद्धावस्थेमुळे चिक्ककोड (ता. इलकल, जि. बागलकोट, कर्नाटक) येथीले श्री. शिवानंद व सौ. कस्तुरबाई बंडरगल्ल यांचे सुपुत्र चि. गुरुबसव यांचा दि. १६.८.२०१७ रोजी विधिवत् उत्तराधिकारी म्हणून स्वीकार केला आहे. त्या बटूचे श्री गुरुपाद देव असे नामकरण केले असून ते वीरशैव शिवयोग मंदिरात राहून धार्मिक व संस्कृत शिक्षणाबरोबर पी.यू.सी. द्वितीय वर्षात अध्ययन करीत आहेत.

२८५. **श्री ष.ब्र. गुरुसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ**



(श्रीगुरू चन्नबसव शिवाचार्य स्वामीजी)
मु.पो. शिरकोळ, ता. नवलगुंद,
जि. धारवाड (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमी रंभापुरी पीठाचा शाखामठ असणाऱ्या शिरकोळ हिरेमठाच्या श्री वे. शिवपुत्रय्या आणि सौ. अंदानम्मा यांच्या पुण्यगर्भी १९५६ मध्ये जन्मास आले. त्यांनी आपले गुरू श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य स्वामीजींच्या मार्गदर्शनानुसार स्वग्रामीच प्राथमिक आणि हुब्बळीत माध्यमिक व पदवीपूर्व शिक्षण घेतले. १९७५ मध्ये संस्कृतच्या अध्ययनाकरिता ते शिवयोग मंदिरात गेले. तेथे ६ वर्षे अध्ययन करून १९८१ मध्ये उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांग वेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन शक्तिविशिष्टाद्वैताचा अभ्यास केला. संपूर्णानंद विश्वविद्यालयातून शास्त्री परीक्षेत उत्तीर्ण झाले. अध्ययन पूर्ण झाल्यावर स्वग्रामी परतून २४.४.१९९६ रोजी शिरकोळ हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सुस्वभावी, कार्यकुशल, परिश्रम व उत्तम वक्ते असणारे हे स्वामीजी मठाची परंपरा व्यवस्थित पार पाडीत आहेत.

## २८६. श्री वे. चन्नवीर स्वामी हिरेमठ

मु.पो. कुम्मुरू, ता. ब्याडगी, जि. हावेरी (कर्नाटक)

हे नंदिगोत्रीय असून त्यांनी शिवयोग मंदिराच्या कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत अभ्यास केला. मैसूरची संस्कृत काव्यपरीक्षा तसेच एस.एस.एल.सी. परीक्षा देऊन ते त्यात उत्तीर्ण झाले. वडिलांच्या प्रेरणेने वयाच्या २२ व्या वर्षी उच्च अभ्यासासाठी काशीक्षेत्री येऊन त्यांनी श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १.६.१९८१ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात साहित्यशास्त्री परीक्षेचा अभ्यास करून ते कर्नाटकात परतले. गृहस्थाश्रम स्वीकारून संस्कृत प्राध्यापक म्हणून त्यांनी काही काळ कार्य केले. पुढे आकस्मिकपणे प्रकृती अस्वास्थ्यामुळे लिंगैक्य झाले.

२८७. **श्री वे. बंडय्या स्वामी ऊर्फ चिदानंद हिरेमठ**

मु.पो. खसगी, ता. उमरगा,

जि. उस्मानाबाद (महाराष्ट्र)



खसगी हिरेमठाच्या श्री. ओम शिवय्या आणि सौ. भागीरथी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९७० मध्ये यांचा जन्म झाला. ते वीरगोत्रीय असून त्यांनी श्रीसिद्धेश्वर विद्यालयात मराठी ५ वीपर्यंत शिक्षण घेतले. पुढे आईवडिलांच्या प्रेरणेने ते वयाच्या ११ व्या वर्षी काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १७.६.१९८१ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर आदर्श सांग वेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात अभ्यास करून १९९४ मध्ये म. गांधी काशी विद्यापीठातून ते एम.ए. झाले. त्याच वर्षी संपूर्णानंद विश्वविद्यालयातून 'शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य' आणि १९९८ मध्ये 'साहित्याचार्य' या परीक्षा उत्तीर्ण झाले. त्यांनी बरीच वर्षे काशी जंगमवाडी मठाच्या शिवशक्ती कंम्प्यूटर प्रोसेस आणि काशी ग्राफिक्स यांमध्ये संगणकीय लेखक म्हणून सेवा केली. हल्ली गृहस्थाश्रमी होऊन त्यांनी बराच काळ काशीत वास्तव्य केले. सध्या ते सारवाड (जि. विजयपूर) येथे वास्तव्यास असून बबलेश्वर बृहन्मठामध्ये संस्कृतचे प्राध्यापक म्हणून काम करतात.

## २८८. श्री म.नि.प्र. कुमारस्वामीजी



विरक्त मठ (हावेरी मठ),
मु.पो.ता. हुक्केरी, जि. बेळगाव (कर्नाटक)

पूर्वाश्रमी मादनहिप्परगी (ता. आळंद, जि. कलबुर्गी) या गावातील श्री वे. गुरुपादय्या मठ आणि सौ. तारादेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ५.५.१९५६ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे ओंकार असे नाव ठेवण्यात आले. त्यांनी मादनहिप्परगीत प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे हुक्केरी मठाध्यक्ष श्री म.नि.प्र. शिवलिंग स्वामीजींच्या आज्ञेनुसार त्यांनी १९७० मध्ये संस्कृतच्या अध्ययनाकरिता श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्रवेश घेऊन तेथे श्री म.नि.प्र. सदाशिव स्वामीजींच्या मार्गदर्शनाखाली संस्कृत आणि योग यांचे शिक्षण घेतले.

दि. ३.४.१९७८ रोजी त्यांना हुक्केरी विरक्त मठाचे उत्तराधिकारी म्हणून नेमण्यात आले. त्यानंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १०.८.१९८१ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त हा विषय घेऊन श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी, अमरेश्वर मठ, गुळेद्गुड्ड यांचे शिष्यत्व पत्करून ६ वर्षे अध्ययन केले. शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री आणि आचार्य परीक्षा उत्तम श्रेणीत उत्तीर्ण झाले.

पुढे १९६७ मध्ये हावेरीच्या हुक्केरी मठाध्यक्ष श्री म.नि.प्र. शिवलिंगस्वामीजींकडून चिन्मयदीक्षा घेऊन हुक्केरी विरक्त मठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारला. मठपरंपरेनुसार धार्मिक, शैक्षणिक तसेच सामाजिक कार्य, सामूहिक विवाह आदी करीत शिवानुभव संगोष्ठीचे आयोजन करून त्यांनी लोकांमध्ये धार्मिक जागृती केली. दि. १०.१०.२००७ रोजी आकस्मिकपणे ते लिंगैक्य झाले.

## २८९. श्री. विश्वाराध्य शास्त्री

मु.पो. हुलसूर, ता. भालकी, जि. बीदर (कर्नाटक)



श्री विश्वेश्वर हे पीठाचे अर्चक श्री महालिंगशास्त्री आणि सौ. निर्मलादेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २०.९.१९८१ रोजी काशी जंगमवाडी मठात जन्मले. हे महालिंगशास्त्रींचे प्रथम सुपुत्र होत. यांचा जन्मच जंगमवाडी मठात झाल्यामुळे ते श्रीजगद्गुरू विश्वाराध्यांच्या कृपाछत्राखाली वाढले. काशीच्या हिंदी माध्यमाच्या शाळेत यांनी दहावीपर्यंतचे शिक्षण घेतले. पुढे भालकी येथील महाविद्यालयातून बी.एस्सी. पदवी मिळवून बेंगळूरु येथून एम.बी.ए. ही पदवी मिळविली. सध्या बेंगळूरु येथे एका प्रसिद्ध कंपनीत हे काम करीत आहेत. हे सात्त्विक स्वभावाचे असून श्री जगद्गुरूंच्या कृपाशीर्वादाने त्यांनी आपल्या जीवनाला आकार दिला. ते उच्चविद्याविभूषित झाले याचा पीठाला अभिमान आहे. त्यांनी गृहस्थाश्रम स्वीकारला असून त्यांनी बेंगळूरुमध्ये काही काळ नोकरी केली. नंतर काही अपरिहार्य कारणंमुळे भालकी येथे वास्तव्याला असून धार्मिक सामग्रीचा व्यापार करीत आहेत.

## २९०. श्री ष.ब्र. वीररुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी

वीरशैव संस्थान मठ, मु.पो. पांढुर्णा,

जि. छिंदवाडा (मध्यप्रदेश)



हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून शिष्यवर्ग परंपरा असलेला मठ आहे. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. या मठात गावचा सार्वजनिक गणपती स्थापून ११ दिवस गावातील सर्व समाजातील लोक एकत्र येऊन धार्मिक व सांस्कृतिक कार्यक्रम साजरा करतात. हे या मठाचे एक वैशिष्ट्य होय. या रूढीमुळे गावकरी या मठाला 'गणपती मठ' असे म्हणतात. या मठाला ४० एकर जमीन असून त्यात संत्र्यांची झाडे लावलेली आहेत.

श्री ष.ब्र. वीररुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी या मठाचे विद्यमान पट्टाध्यक्ष आहेत. ते पूर्वाश्रमीचे विजयपूर जिल्ह्यातील बसवनबागेवाडी तालुक्यातील मुत्तगी गावच्या हिरेमठाचे होत. हा मठ रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेचा मठ आहे. या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी हे होते. या मठावर १२ शिवाचार्य होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. वीररुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी मठाच्या पुत्रवर्गी परंपरेतील उत्तराधिकारी म्हणून नियुक्त झाले.

मुत्तगी या गावातील हिरेमठाचे श्री वे. रेवणसिद्धय्या आणि सौ. सुगलाबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९६४ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यावेळी त्यांचे पंडिताराध्य असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे भक्तांच्या अपेक्षेप्रमाणे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १२.११.१९८२ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयात अध्ययन करून कन्नड विषयात बी.ए. (ऑनर्स)

आणि एम्.ए. या पदव्या संपादन केल्या. त्याबरोबरच संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुग्रहाने व त्यांच्या दिव्य सान्निध्यात पांढुर्णा येथील वीरशैव संस्थानमठाचा पट्टाधिकार त्यांनी स्वीकारला. सध्या ते मठाच्या परंपरेनुसार सर्व कार्यक्रम पार पाडीत असून पूर्वीच्या मुत्तगी मठाचे धार्मिक कार्यदेखील करीत असतात. काशीला अध्ययन करीत असताना वीरशैव विद्वत्संघाचे कार्यदर्शी म्हणून त्यांनी काम केले आहे. सदाचारी, पंचपीठांचे अभिमानी व धैर्यशील असणारे हे शिवाचार्य मध्यप्रदेशात वीरशैव धर्मतत्त्वांचा प्रचार करीत आहेत, ही बाब काशीपीठास अत्यंत अभिमानास्पद आहे.

## २९१. श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी



महांतेश्वर मठ, मु.पो. कवळास, ता. जुक्कल,
जि. निजामाबाद (आंध्र प्रदेश).
चरभाष : ९९४८०३३९७५

आंध्र प्रदेशातील निजामाबाद जिल्ह्यातील कवळासचा श्रीमहांतेश्वर मठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ आहे. या मठावर श्री ष.ब्र. शिवयोगी महांतचार्य शिवाचार्य, श्री ष.ब्र. गुरुबसप्पा शिवाचार्य आणि श्री ष.ब्र. महांतप्पा शिवाचार्य हे पट्टाधिकारी होऊन गेले आहेत. हल्लीचे मठाधिपती श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य हे होत. हे पूर्वाश्रमी देवाडा गावचे हिरेमठ श्री वे. बसवलिंगय्या आणि सौ. चंपम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १७.८.१९५८ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांनी जन्मग्रामीच तेलुगू भाषेतून ५ वीपर्यंतचे प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर पुलकल या गावी एस.एस.एल.सी. परीक्षा देऊन त्यात ते उत्तीर्ण झाले.

त्यानंतर कवळास महांतेश्वर मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. त्यांनी संस्कृत व धार्मिक अभ्यासासाठी बागलकोट जिल्ह्यातील श्री शिवयोग मंदिरात १९७५ मध्ये प्रवेश घेतला. तेथे १९८२ पर्यंत ७ वर्षे अध्ययन केले. नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९८२ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीतील मायानंदगिरी संस्कृत पाठशाळेत अभ्यास करून १९८४ मध्ये संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शास्त्री ही पदवी मिळविली. जंगमवाडी मठात २ वर्षे अभ्यास करीत असताना काशी वीरशैव विद्वत्संघाचे सक्रिय सदस्य म्हणून त्यांनी कार्य केले. दि. ५.२.१९८४ रोजी त्यांनी कवळास महांतेश्वर मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. हल्ली आंध्र प्रदेश, कर्नाटक व महाराष्ट्र या प्रांतांत ते धर्मप्रचार करीत जनजागृती करीत आहेत. कन्नड, तेलुगू आणि मराठी या भाषांत अस्खलितपणे व्याख्यान देणारे हे प्रभावी शिवाचार्य आहेत.

## २९२. श्री वृषभेषण भट्टारक भट्टाचार्य स्वामीजी



श्री मोक्षमंदिर जैनमठ,
मु.पो.लक्कवळ्ळी, ता. सोरभ,
जि. शिवमोग्गा (कर्नाटक)
चरभाष : ९४४९२७३७१४

हे पूर्वाश्रमीचे हावेरी जिल्ह्यातील शिग्गाव तालुक्यातील यत्तीनहळ्ळी गावचे होत. या गावातील श्रीयुत बसवंतप्पा आणि सौ. सावित्राबाई अंगडी यांचे हे सुपुत्र असून त्यांचा जन्म २४.४.१९६१ रोजी झाला. त्यांचे जिनेंद्र असे नामकरण करण्यात आले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. ते १२ वर्षांचे असल्यापासूनच त्यांचा धर्माकडे अधिक कल होता. १९७० मध्ये श्री बसवानंद स्वामीजींकडून त्यांनी ब्रह्मचारी दीक्षा घेतली. पुढे १९७२ मध्ये लिंगदीक्षा देखील घेतली. १९८३ मध्ये काशी जंगमवाडी मठात येऊन तेथे एक वर्ष वास्तव्य करून त्यांनी संस्कृत भाषेबरोबरच अन्य शास्त्रांचाही अभ्यास केला. १९८३ मध्ये संन्यासदीक्षा घेऊन त्यांनी १९८४ मध्ये लक्कवळी गावी श्री मोक्षमंदिर आणि जैनमठाची स्थापना केली.

१६-१७ फेब्रुवारी २००० मध्ये नांदणी मठात पंचकल्याण कार्यक्रम चालू असताना स्वस्ति श्री जिनसेन भट्टारक भट्टाचार्य महास्वामीजींकडून त्यांनी जैनदीक्षा घेतली. त्यांना योगसाधनेची आवड असून त्यांनी मंत्र, लय, हठ आणि राज या योगांत नैपुण्य मिळविले आहे. योग व अभ्यासासोबत माध्यमिक शाळा, वसतिगृह आणि संगीत शाळा सुरू करून ते शैक्षणिक व सामाजिक कार्य करीत आहेत.

## २९३. श्री ष.ब्र. शंभुलिंग देव शिवाचार्य स्वामीजी



सिंदगी मठ, होतनहळ्ळी,
ता. शिग्गाव, जि. हावेरी (कर्नाटक)
चरभाष : ९७४२०३५९४६

सिंदगी हिरेमठाचे श्री. शिवय्या आणि सौ. शांतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २०.७.१९६० रोजी यांचा जन्म झाला. ते सिंदगीचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य यांचे पौत्र होत. त्यांनी सिंदगीत प्राथमिक शिक्षण पूर्ण करून विजापुरात माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे सिंदगीच्या पट्टाध्यक्षांच्या आदेशानुसार १९७२ मध्ये हावेरीस जाऊन वैदिक व ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. त्यानंतर १९७८ पासून १९८३ पर्यंत गदग येथील पाठशाळेत संस्कृतचे अध्ययन केले. पुढे ते पुराणप्रवचन करू लागले. नंतर मळ्ळी हिरेमठाच्या श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या मार्गदर्शनानुसार उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९८४ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांग वेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त हा विषय घेऊन संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या परीक्षा देऊन त्यांनी शास्त्री व आचार्य या पदव्या मिळवल्या.

सहृदयी, विनयसंपन्न व सेवाभावी असे हे स्वामीजी त्यांचे विद्यागुरू श्री ष.ब्र. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी, अमरेश्वर मठ, गुळेद्गुड्ड यांची निष्ठापूर्वक सेवा करून त्यांच्या प्रेमास पात्र झाले. गुढी पाडव्याच्या मुहूर्तावर दि. २६.३.२००१ सोमवारी गोग्गीहळ्ळी हिरेमठाचे श्री ष.ब्र. निजगुण शिवाचार्य स्वामीजींच्या अमृतहस्ते होतनहळ्ळी (ता. शिग्गाव, जि. हावेरी) येथील सिंदगी मठावर त्यांचा पट्टाभिषेक झाला. ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य असे त्यांचे नामकरण करण्यात आले. सध्या ते कर्नाटकात पुराणप्रवचने करीत धार्मिक कार्यक्रमात भाग घेत असतात.

## २९४. श्री म.नि.प्र. डॉ. चन्नबसव स्वामीजी ऊर्फ अभिनव कुमारस्वामीजी



ओलेमठ, जमखंडी आणि कल्मठ, ता. सौदंत्ती,
जि. बेळगाव (कर्नाटक). चरभाष : ९४४८६३६७८४

जमखंडी ओलेमठाचे श्री म.नि.प्र. डॉ. चन्नबसव स्वामीजी हे पूर्वाश्रमीचे जमखंडी तालुक्यातील बिदरी गावच्या श्री वे. बसवलिंगय्या व सौ. गंगम्मा यांचे सुपुत्र होत. त्यांचा जन्म १८.७.१९६२ रोजी झाला. त्यांनी बिदरी गावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. १९७८ मध्ये श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्रवेश घेऊन तेथे १९८० पर्यंत संस्कृत व योगविद्येचा अभ्यास केला. नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीक्षेत्री येऊन तेथील जयदेववाडी मठात १९८४ पर्यंत वास्तव्य करून इंटर परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

त्यानंतर श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९८४ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कला विभागात प्रवेश घेऊन १९८६ मध्ये बी.ए. (ऑनर्स) ही पदवी प्राप्त केली. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागाकडून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री आणि आचार्य या पदव्या मिळविल्या. १९८४ ते १९९२ पर्यंत ८ वर्षे काशी जंगमवाडी मठात राहून ते उच्चविद्याविभूषित झाले.

नंतर तिरुपती संस्कृत विश्वविद्यालयातून शांकर वेदान्त या विषयात आचार्य पदवी मिळवली. त्यानंतर हंपी येथील कन्नड विश्वविद्यालयात शोधप्रबंध सादर करून पीएच.डी. पदवी संपादन केली. याप्रमाणे संस्कृत भाषा व शास्त्रांचा अभ्यास केलेल्या या स्वामीजींनी १०.२.१९९७ रोजी जमखंडीच्या ओलेमठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारला. त्याबरोबर सौंदत्ती कल्मठाचा निरंजन पट्टाधिकारदेखील स्वीकारला. हल्ली सर्वत्र पुराणप्रवचने करीत ते धर्मजागृती करीत असतात. बिदरी, जमखंडी आणि हुलगुरू या गावांत विविध शैक्षणिक उपक्रम राबवून त्यांनी शैक्षणिक क्षेत्रात मोलाचे योगदान दिले आहे.

२९५. **श्री सुनीलकुमार उदयभान सिंह**
डी.४७/८५, रामापूर, वाराणसी (उत्तरप्रदेश)



हे ॲड्. उदयभान सिंह यांचे सुपुत्र होत. यांचे वडील उदयभान सिंह यांनी काशी जंगमवाडी मठात आश्रय घेतला होता. त्यांचे सुपुत्र सुनीलकुमार यांचा जन्म १०.९.१९८४ रोजी मठातच झाला. यांनी काशीमध्ये प्राथमिक शिक्षण घेऊन २००० मध्ये ते दिल्लीच्या सी.बी.एस.सी. बोर्डाची दहावीची परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे २००२ मध्ये त्याच बोर्डातून १२ वी परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर पूर्वांचल विश्वविद्यालयाच्या महाविद्यालयात अध्ययन करून बी.ए. झाले. काशीच्या महात्मा गांधी विद्यापीठातून एलएल.बी. परीक्षा उत्तीर्ण केली. ते सध्या सरकारी वकील या पदावर वाराणसी येथे काम करीत असून वडील आणि ते जंगमवाडी मठाचे कायदेशीर सल्लागार आहेत.

२९६. **डॉ. मल्लिकार्जुन शिवप्पा तर्लघट्ट**
सप्तापूर, पहिला क्रॉस, धारवाड (कर्नाटक)
चरभाष : ९४४८७९२३१७



हे वीरगोत्रीय होत. धारवाडच्या संगीत महाविद्यालयात सतारवादनात हे बी.म्युझिक उत्तीर्ण झाले. नंतर प्रसिद्ध सितारवादक आपले वडील श्री शिवप्पन यांच्याकडून प्रेरणा घेऊन पुढील संगीत अध्ययनाकरिता वयाच्या पंचविसाव्या वर्षी काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १२.९.१९८४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काशी विश्वहिंदूविद्यालयाच्या संगीत महाविद्यालयात अभ्यास करून सितारवाद्यात एम.म्युझिक ही परीक्षा देऊन

१९८६ मध्ये उत्तीर्ण झाले.

नंतर महास्वामीजींचा आशीर्वाद घेऊन कर्नाटकात परतले. १९८७ मध्ये कर्नाटक विश्वविद्यालयाच्या संगीत महाविद्यालयात प्राध्यापक म्हणून त्यांची नियुक्ती झाली. याच विषयात संशोधन करून २००४ मध्ये त्यांनी पीएच.डी. पदवी मिळवली. सध्या ते धारवाडच्या संगीत महाविद्यालयात प्राध्यापक असून देश-विदेशांत संगीताचे कार्यक्रम करीत असतात.

२९७. **श्री चिक्कचिदानंद स्वामी**
शिवयोगाश्रम, मु.पो. हदली,
ता. नरगुंद, जि. धारवाड (कर्नाटक)



पूर्वाश्रमीचे चिक्ककब्बीगेरे (ता.जि. चित्रदुर्ग) या गावातील शिवभक्त दंपतीच्या उदरी दि. १६.६.१९६२ रोजी यांचा जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण व चित्रदुर्ग येथे माध्यमिक शिक्षण घेतले. चित्रदुर्ग जिल्ह्यातील अनेगोडीच्या जी. चन्नप्पा ज्युनिअर कॉलेजमध्ये पदवीपूर्व परीक्षा उत्तीर्ण केली. त्यानंतर संन्यासाश्रम स्वीकारून वयाच्या २४ व्या वर्षी संस्कृताध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १३.७.१९८५ या दिवशी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात २ वर्षे अभ्यास करून १९८७ मध्ये तिरुपतीला परत गेले. हल्ली हदली येथील शिवयोगाश्रमात त्यांचे वास्तव्य असून ते प्रवचनाच्या माध्यमातून आध्यात्मिक जागृती करीत आहेत. हदलीचा शिवयोगाश्रम हा सनातन वीरशैवधर्माची परंपरा चालविणारा आश्रम आहे. श्री चिक्कचिदानंद स्वामीजी सदाचारी गुरू, लिंगजंगमप्रेमी व आध्यात्मिक प्रवृत्तीचे आहेत. काशीपीठात केवळ २ वर्षे वास्तव्य करून त्यांनी अध्ययन केले, परंतु त्यांच्या मनात काशीपीठाविषयी अपार श्रद्धा आहे.

२९८.	**श्री ष.ब्र. सुज्ञानदेव शिवाचार्य स्वामीजी हिंरेमठ**

मु.पो. बन्निकोप्प, ता. शिरहट्टी, जि. गदग (कर्नाटक)

ऊर्फ **श्री ष.ब्र. मुम्मडी चंद्रशेखर शिवाचार्य**

जपदकट्टी मठ, मैसूरु . चरभाष : ९४४८७७३२२०



हे नंदिगोत्रीय असून हुयिलगोळ गावचे हिरेमठ वे. विरूपाक्षय्या आणि सौ. फकिरम्मा यांचे सुपुत्र होत. दि. २०.५.१९६८ रोजी बन्निकोप्प येथे त्यांचा जन्म झाला. जन्मगावीच प्राथमिक तसेच होन्नाळी हिरेकल्मठाच्या श्री जडेय शंकर माध्यमिक शाळेत त्यांनी माध्यमिक शिक्षण घेतले. बन्निकोपचे वैद्य डॉ. एस. एफ. हिरेमठ यांनी १९८१ मध्ये त्यांना दत्तक घेतले. पुढे १९८५ मध्ये बन्निकोप्प आणि बेळट्टी हिरेमठाच्या चिक्कमणूरच्या श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजींच्या अध्यक्षतेखाली त्यांना बन्निकोप्प आणि बेळ्ळट्टी हिरेमठाचा उत्तराधिकारी म्हणून निवडण्यात आले. नंतर उच्च व्यासंगाकरिता डॉ. एस. एफ. हिरेमठ यांच्या प्रेरणेने ते काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १४.७.१९८५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील सनातन धर्म इंटर कॉलेजात १९८७ मध्ये इंटरमिडिएट व बी.ए. परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्यासोबत संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून १९९० मध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री, १९९३ मध्ये वेदान्ताचार्य या परीक्षा देऊन उच्च श्रेणीत उत्तीर्ण झाले. अलाहाबाद विश्वविद्यालयातून १९९१ मध्ये आयुर्वेदरत्न या परीक्षेत उत्तीर्ण होऊन डॉक्टरेट झाले. महास्वामीजींच्या आशीर्वादाने १९९५ मध्ये आपल्या गावी परतले. त्याच वर्षी २१ मे रोजी उज्जयिनी जगद्गुरू श्री सिद्धेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या आज्ञेनुसार मैसूर अरमने जपदकट्टी मठाचा स्थिर पट्टाधिकार स्वीकारला. तेव्हापासून ते मठाचा जीर्णोद्धार व धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक कार्य करीत आहेत. ते १९९८ मध्ये मैसूर विश्वविद्यालयातून एम.ए. आणि २००० मध्ये हस्तप्रती डिप्लोमा परीक्षा उत्तीर्ण झाले. ते हल्ली बन्निकोप्प आणि मैसूर या मठांची धार्मिक कार्ये पार पाडीत आहेत.

## २९९. वडेयर श्री ष.ब्र. डॉ.चन्नमल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी



(श्री ष.ब्र. सिद्धपाद शिवाचार्य स्वामीजी,
हिरेमठ कामिनाळू) हिरेकल्मठ,
मु.पो.ता. होन्नाळी, जि. दावणगेरे (कर्नाटक)
चरभाष : ९९१६३२२२४७

कामिनाळू हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा पुत्रवर्गपरंपरा असलेला शाखामठ आहे. या मठाच्या परंपरेत अनेक शिवाचार्य होऊन गेले. विद्यमान पट्टाधिकारी श्री सिद्धपाद शिवाचार्य हे पूर्वाश्रमीचे गुळ्यम (ता. आलूरु, जि. कर्नूल) या गावच्या श्री. वे. वीरबसय्या व सौ. पार्वतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २२.४.१९६४ रोजी जन्मले. त्यांचे सिद्धय्या असे नाव ठेवण्यात आले. गुळ्यम गावात त्यांनी तेलुगू तिसऱ्या इयत्तेपर्यंत शिक्षण घेतले. त्यावेळी कामनाळू हिरेमठाचे पट्टाधिकारी श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी वृद्धापकालामुळे १९७६ मध्ये लिंगैक्य झाले. ही गुरुगादी रिक्त राहू नये या उद्देशाने उज्जयिनी जगद्गुरू श्री सिद्धेश्वर राजयोगींद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात श्री ष.ब्र. शिवप्रकाश शिवाचार्य स्वामीजींच्या हस्ते चि. सिद्धय्यांना कामनाळू मठाचा पट्टाधिकार करण्यात आला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. सिद्धपाद शिवाचार्य स्वामीजी असे नामकरण करण्यात आले.

पुढे कामिनाळू मठाचे शिष्य चिक्कप्पा टी रेड्डी सिद्धमल्लनगौड आणि होडलगुंदी श्री सिद्धमल्लनगौड यांच्या प्रेरणेने ते संस्कृत तसेच धार्मिक विषयाच्या अध्ययनासाठी २२.७.१९७७ रोजी होन्नाळी हिरेमठात आले. तेथील श्री चन्नमल्लिकार्जुन संस्कृत वैदिक पाठशाळेत संस्कृतचे अध्ययन करीत एस.एस.एल.सी. परीक्षा देखील उत्तीर्ण झाले. त्यानंतर श्रीशैलजगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी व होन्नाळीचे श्री ष.ब्र. ओडेयर चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी यांच्या प्रेरणेने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता

काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने २२.७.१९८५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांग वेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात दोन वर्षे अध्ययन करून ते उत्तर मध्यमा परीक्षेत उत्तीर्ण झाले.

त्यानंतर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त या विषयाचा पाच वर्षे निरंतर अभ्यास केला आणि शास्त्री व आचार्य या पदव्या संपादन केल्या. अध्ययनकाळात त्यांनी श्रीकाशीमहास्वामीजींच्या पत्रव्यवहारात अत्यंत आस्थेने सेवा केली. काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यदर्शी म्हणूनही त्यांनी चांगली कामगिरी केली. त्यानंतर ते होन्नाळी हिरेमठात श्री ष.ब्र. ओडेयर चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींचे स्वीय सहाय्यक म्हणून त्यांच्या चन्नचेतन मुद्रणालयाची व्यवस्था सांभाळीत आहेत. होन्नाळी मठाकडून प्रकाशित होणाऱ्या 'धर्मसुधा' मासिकाच्या मुद्रणाची जबाबदारी घेतली. नंतर होन्नाळी हिरेकल्मठाचे वडियर चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींन प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे सिद्धपाद शिवाचार्यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून ठरविले. त्यांच्या इच्छेप्रमाणे दि. ७.६.२०१५ रोजी १००८ श्रीकाशीजगद्गुरू श्री डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी, १००८ श्रीशैल डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी आणि श्री १००८ उज्जयिनी जगद्गुरू सिद्धलिंगराज देशिकेंद्र शिवाचार्य जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात सिद्धपाद शिवाचार्य यांना होन्नाळी हिरेकल्मठाच्या गादीवर विधिवत् पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. वडेयर चन्नमल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामी असे नूतन नामकरण करण्यात आले. पुढे ३.१०.२०१५ रोजी वडियर चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजी लिंगैक्य झाले. सध्या नूतन पट्टाध्यक्ष वडियर श्री ष.ब्र. डॉ. चन्नमल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी मठ परंपरेचे सर्व धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक सर्व कार्ये व्यवस्थित पार पाडत आहेत.

## ३००. श्री ष.ब्र. सुशांत शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. आलूर, ता. उमरगा,
जि. उस्मानाबाद (महाराष्ट्र)



हे सुरकोड हिरेमठाच्या श्री. वे. गंगाधरय्यांचे सुपुत्र होत. हे वीरगोत्री असून त्यांनी होन्नाळी हिरेकल्मठाच्या श्री चन्नमल्लिकार्जुन संस्कृत वैदिक पाठशाळेत संस्कृत अध्ययन करताना एस.एस.सी. परीक्षा देखील उत्तीर्ण केली. पुढे यलबुर्गा हिरेमठाचे श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्यांकडून प्रेरणा घेऊन पुढील संस्कृतच्या अभ्यासासाठी वयाच्या २० व्या वर्षी ते काशीक्षेत्री आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने २२.७.१९८५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालय तसेच संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालय येथे अभ्यास करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात त्यांनी आलूर हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सध्या या पीठाच्या धार्मिक परंपरेनुसार ते कार्य पार पाडत आहेत.

## ३०१. श्री ष.ब्र. जडेसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. दोड्डवाड, ता. बैलहोंगल,
जि. बेळगाव (कर्नाटक)



हे वीरगोत्रीय असून पूर्वाश्रमीचे दोड्डवाड हिरेमठाच्या वे. बसय्यांचे हे सुपुत्र होत. हा पुत्रवर्ग परंपरेतील मठ आहे. परंपरेप्रमाणे ते या मठाचे उत्तराधिकारी झाले. श्री उमेश्वर देवांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेतून प्रथमा परीक्षा उत्तीर्ण केली. नंतर गावातील सद्भक्तांच्या प्रोत्साहनाने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता वयाच्या १९ व्या वर्षी ते काशीक्षेत्री आले.

श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २२.८.१९८५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात अध्ययन करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी त्यांनी मिळवली. दोड्डवाड हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला, त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. जडेसिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी असे नामकरण करण्यात आले. त्या मठाच्या परंपरेनुसार धार्मिक विधिविधान ते पार पाडीत आहेत.

## ३०२. श्री म.नि.प्र. डॉ. कोट्टुरेश्वर स्वामीजी

कल्मठ, मु.पो. ता. गंगावती,
जि. रायचूरु (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमी कुटकनकेरी (ता. बदामी, जि. बागलकोट) या गावचे होत. या गावातील होळे हुच्चेश्वर मठाच्या श्री वे. वीरय्या व सौ. गुरुलिंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९६२ रोजी यांचा जन्म झाला. त्यांनी आपल्या गावीच प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. कोटीकल कमतगी होळेहुच्चेश्वर मठाचे १२ वे हुच्चेश्वर स्वामीजींच्या सल्ल्यानुसार गंगावती कल्मठाचे श्री म.नि.प्र. चन्नबसव स्वामीजींनी १९७५ मध्ये त्यांना आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले. गंगावती कल्मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री म.नि.प्र. कोट्टूरू स्वामीजी असून या मठाला ५०० वर्षांची परंपरा आहे. मस्की, मेदिकनहाळ तलेखान, हांचिनाळ, बेलुरू आणि चिक्ककोडगली येथे या मठाचे शाखामठ आहेत. या मठावर होऊन गेलेल्या श्री म.नि.प्र. चन्नबसव शिवयोगी स्वामीजींच्या चमत्काराच्या कथा सांगितल्या जातात. त्यांच्यानंतरचे मठाधिपती श्री म.नि.प्र. चन्नबसव स्वामीजींनी आपल्या मूळ गुरूंच्या नावाने श्री कोट्टुरेश्वर विद्यावर्धक संघ १९६५ मध्ये स्थापन करून त्याच्यामार्फत अनेक शिक्षणसंस्था चालविल्या. त्यांनी श्री म.नि.प्र. कोट्टुरेश्वर स्वामीजींना आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केले. यांनी कोप्पळच्या गविमठाच्या पाठशाळेत व हुब्बळीच्या गंगाधर संस्कृत पाठशाळेत संस्कृतचे अध्ययन केले व त्यासोबत कर्नाटक विश्वविद्यालयातून संस्कृत बी.ए. व एम्.ए. या पदव्या संपादन केल्या.

उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी ३१.१.१९८६ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात दोन वर्षे अभ्यास करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही

पदवी प्राप्त केली. त्यानंतर धारवाडच्या कर्नाटक विश्वविद्यालयात डॉ. मल्लिकार्जुन परेड्डी यांच्या मार्गदर्शनाखाली संस्कृत बसवपुराणावर शोधप्रबंध सादर करून पीएच.डी. पदवी मिळवली. हल्ली आपल्या मठपरंपरेनुसार धार्मिक व शैक्षणिक कार्य करीत त्यांनी समाजकार्यात स्वत:ला गुंतवून घेतले आहे.

---

परिचयलेखन : श्रीमती एस. जी. मठ, एम.ए., पीएच्.डी.,
प्राध्यापक, कोट्टुरेश्वर पदवीपूर्व कॉलेज, गंगावती

## ३०३. श्री. राजशेखर हिरेमठ

मु.पो. इब्राहिमपूर, ता.जि. विजयपूर (कर्नाटक)



केदारपीठाच्या नित्यानंद पुजाऱ्याचे हे सुपुत्र असून नंदिगोत्रीय आहेत. उखीमठ तसेच गुप्तकाशीच्या दरम्यान असणाऱ्या उत्तराखंड विद्यापीठातून ते दहावी परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर वडिलांच्या प्रेरणेने वयाच्या २१ व्या वर्षी पुढील अभ्यासासाठी काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १८.७.१९८६ रोजी श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे संस्कृतबरोबर आधुनिक शिक्षण घेतले. ते हल्ली आपल्या गावी विजयपुरात वास्तव्य करून आहेत.

### ३०४. श्री. रेणुकाराध्य मल्लाराध्य शास्त्री

मु. तुबुगेरे, ता. दोड्डबळ्ळापूर,
जि. तुमकुरू (कर्नाटक)



श्री रेणुकाराध्य हे मूलतः दोड्डबळ्ळापूर तालुक्यातील तुबुगेरे या गावचे होत. यांचे वडील श्री टी. जी. मल्लाराध्य शास्त्री हे काशीपीठात जगद्गुरू विश्वाराध्याचे प्रमुख पुजारी होते. रेणुकाराध्यांचा जन्म काशी जंगमवाडी मठात दि. १९.६.१९८६ रोजी झाला. यांच्या आईचे नाव बसम्मा होते. श्री. रेणुकाराध्य हे श्रीजगद्गुरू विश्वाराध्यांच्या छत्रछायेखाली वाढले. त्यांनी प्राथमिक शिक्षण हिंदी माध्यमातून घेतले आणि नंतर सुप्रसिद्ध बंगाली टोला इंटर कॉलेजात पदवीपूर्व शिक्षण पूर्ण केले. आधुनिक विद्यांचा अभ्यास करीत असताना त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात संस्कृत तसेच वैदिक विद्येचा अभ्यास केला. नंतर पदवी तसेच पदव्युत्तर शिक्षणासाठी तुमकूरच्या सिद्धगंगा महाविद्यालयात प्रवेश घेऊन ते बी.कॉम. परीक्षेत उत्तीर्ण झाले. सध्या त्याच कॉलेजात एम.बी.ए. करून सध्या तुमकूर येथे नोकरी करीत आहेत. काशीक्षेत्री जन्म घेऊन श्री जगद्गुरू विश्वाराध्य छत्रछायेत वाढलेले ते काशीपीठाच्या अभिमानाचा विषय झाले आहेत.

## ३०५. श्री. शशिधरलिंग हिरेमठ

अर्चक (पुजारी), केदारनाथ

मु.पो.ता. उखीमठ, जि. रुद्रप्रयाग (उत्तरांचल)



हे मूळचे विजयपूरच्या इब्राहिमपूर येथील हिरेमठ वंशातील असून केदारच्या वे. नित्यानंदलिंग (संगन बसय्या) आणि सौ. नागरत्ना या माहेश्वर दंपतीच्या पवित्र उदरी दि. १०.२.१९६७ रोजी इब्राहिमपूरला जन्माला आले. त्यांचे वडील नित्यानंदलिंग हे केदारनाथाचे पुजारी असल्याने त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण उखीमठ येथे झाले. पुढे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९८६ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील गोरखपूर विश्वविद्यालयातून ते बी.ए. झाले. त्यासोबत साहित्य या विषयातील पूर्वमध्यमा, कन्नड डिप्लोमा आणि योग डिप्लोमा या परीक्षांत देखील ते उत्तीर्ण झाले. नंतर त्यांचे वडील लिंगैक्य झाल्यानंतर श्री १००८ जगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजींकडून त्यांनी चेलादीक्षा स्वीकारली. शशिधरलिंग हे अभिधान धारण करून ते केदारनाथचे पुजारी म्हणून कार्यरत आहेत. हल्ली केदारनाथ, गुप्तकाशी, मध्यमहेश्वर आणि उखीमठ येथे क्रमशः अर्चकवृत्ती पार पाडीत आहेत. प्राचीन काळापासून चालत आलेल्या दक्षिण भारतातील जंगमांचा पूजेचा हक्क सुरक्षित राखून त्यांनी वीरशैवांची धर्मध्वजा फडकत ठेवली आहे.

## ३०६. श्री रेवणसिद्धय्या ओडेयर



अमोधी मठ,
मु. बेनकनहळ्ळी, पो. हिरेनर्ती,
ता. कुंदकोळ, जि. धारवाड (कर्नाटक)

हे वीरगोत्रीय असून धनगर समाजाचे होत. हावेरीच्या कुमारेश्वर पाठशाळेत संस्कृत तसेच वैदिक शिक्षण घेऊन ते दहावी परीक्षेत उत्तीर्ण झाले. पुढे कुंदगोळ पंचग्रह हिरेमठाच्या श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्यांच्या प्रोत्साहनाने वयाच्या २३ व्या वर्षी ते काशीक्षेत्री आले. श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २४.१२.१९८७ रोजी प्रवेश घेतला. पुढे काही वर्षे संस्कृताध्ययन करून स्वग्रामी परत गेले.

## ३०७. श्री ष.ब्र. गुरुलिंगजंगम शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ, मु.पो. सालूरु, ता. शिकारीपूर,
जि. शिवमोग्गा (कर्नाटक)

सालूरुचा हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून या मठाला ५०० वर्षांची भव्य परंपरा आहे. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले. श्री ष.ब्र. शीलवंत सिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी या मठाचे मूळपुरुष असून त्यांच्यानंतर श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य, श्री ष.ब्र. गुरुसिद्धेश्वर शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य आणि श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य हे स्वामीजी होऊन गेले आहेत. त्यांच्यानंतर आलेले श्री चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी या मठाच्या परंपरेत अत्यंत प्रख्यात झाले. वैदिक आणि ज्योतिषशास्त्रात ते पारंगत होते. सालूरु हिरेमठात वैदिक व ज्योतिष पाठशाळा

सुरू करून ते स्वतः विद्यार्थ्यांना शिकवीत असत. त्यांच्यानंतर त्यांचे पट्टशिष्य श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य यांनी या मठाचा अधिकार स्वीकारला. त्यांनी देखील आपल्या गुरूप्रमाणेच वैदिकशिरोमणी होऊन मठात अनेक विद्यार्थ्यांच्या निवासाची व प्रसादाची व्यवस्था करून विद्यादान केले. शेकडो मठाधिपती व शास्त्रीजी या मठाच्या पाठशाळेतून तयार होऊन बाहेर पडले आहेत.

श्री ष.ब्र. लिं. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजींचे उत्तराधिकारी सालूरु हिरेमठाचे ष.ब्र. गुरुलिंग जंगम शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमीचे असुंडी (ता. राणेबेन्नूरु, जि. हावेरी) या गावच्या हिरेमठाचे वे. जगदेवय्या व सौ. गंगम्मा या माहेश्वर दंपतीचे सुपुत्र असून दि. ८.६.१९७१ रोजी असुंडी येथे त्यांचा जन्म झाला. त्यांचे वीरय्या असे नामकरण करण्यात आले. शिग्गाव तालुक्यातील चंदापूर गावात आणि असुंडी येथे त्यांनी आपले प्राथमिक शिक्षण घेतले. दि. १०.४.१९८५ रोजी सालूरु हिरेमठाच्या वैदिक पाठशाळेत प्रवेश घेऊन श्री ष.ब्र. पंचाक्षर स्वामीजींचे शिष्यत्व पत्करून त्यांनी वेद व ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. नंतर आपल्या गुरुवर्यांच्या आज्ञेनुसार संस्कृताध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९८७ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. वैदिक विद्येत पारंगत असल्यामुळे त्यांना महास्वामीजींनी आपल्या शिवपूजा सेवेत घेतले. त्यांनी काशीत संस्कृताध्ययन देखील केले. पुढे १९८९ मध्ये श्री जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य झाल्यामुळे त्यांच्यानंतर झालेले पीठाचार्य श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींची सेवा करीत त्यांनी आपले शिक्षण पुढे चालू ठेवले. याप्रमाणे दोन्ही महास्वामीजींची सेवा करून त्यांनी चार वर्षे संस्कृतचे अध्ययन केले. महास्वामीजींच्या प्रवासात त्यांची सेवा करीत महास्वामीजींकडून संस्कृत सुभाषितांचा व्यवस्थित अभ्यास केला.

पुढे सालूरु हिरेमठाचे श्री ष.ब्र. पंचाक्षर शिवाचार्य स्वामीजी आकस्मिक

लिंगैक्य झाल्यामुळे त्यांच्या अंतिम इच्छेनुसार दि. ७.७.१९९२ रोजी श्री ज. पंचाचार्यांच्या दिव्य सान्निध्यात त्यांचा सालूरु हिरेमठावर पट्टाभिषेक करण्यात आला. त्यांनी मठाच्या परंपरेनुसार वैदिक पाठशाळा पुढे चालू ठेवली. एवढेच नव्हे तर उन्हाळ्याच्या सुट्टीत विशेष वैदिक शिबिरे आयोजित करून सर्व लोकांना वेदांचे अध्ययन सुलभपणे करता यावे अशी व्यवस्था केली. कर्नाटक तसेच महाराष्ट्र इ. प्रांतांत अनेक शिवाचार्यांनी आयोजित केलेल्या रुद्रयागांत व अन्य पूजाविधानांत पौरोहित्य करून ते प्रख्यात झाले आहेत. अत्यंत प्राचीन परंपरा असणाऱ्या सालूरु हिरेमठाचा जीर्णोद्धार करण्याचा संकल्प करून त्यांनी मठाच्या परिसरात नवीन श्री सिद्धेश्वर मंदिर, श्री चौडेश्वरी देवालय, श्री गणपती मंदिर निर्माण करून त्यांमध्ये शास्त्रोक्त पद्धतीने मूर्तींची प्राणप्रतिष्ठा केली. नूतन अन्नछत्राची व्यवस्था केली असून विद्यार्थ्यांसाठी उत्तम प्रसादाची व्यवस्था केली आहे. दि. २.५.२००७ रोजी नव्याने निर्माण केलेल्या हिरेमठाची वास्तुशांती आणि विद्यमान श्रीकाशीजगद्गुरूंच्या षष्ठ्यब्दीच्या निमित्ताने त्यांचा विविध प्रकारे तुलाभार करून भकतसमूहाच्या उपस्थितीत श्रीकाशीमहास्वामीजींच्या अमृतहस्ते त्या वास्तूचे उद्घाटन केले. परिश्रमी व कर्तव्यदक्ष असे श्री ष.ब्र. गुरुलिंगजंगम शिवाचार्य स्वामीजी यांनी संस्कृतचे अध्ययन थोडे केले असले तरी वैदिक विद्येत पारंगत असल्यामुळे ते सर्वांच्या गौरवास पात्र झाले आहेत. काशीपीठाच्या दोन्ही जगद्गुरूंचा कृपाशीर्वाद त्यांच्या मठाच्या विकासाला कारणीभूत आहे असा कृतज्ञभाव मनात बाळगून ते धार्मिक कार्यक्रम निरंतर पार पाडीत आहेत.

## ३०८. श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी



कब्बिणकंथी मठ, मु.पो. रट्टीहळ्ळी,
ता. हिरेकेरूरु, जि. हावेरी (कर्नाटक)
चरभाष : ९५३८३०९४८५

नंदिगोत्रीय असलेल्या रट्टीहळ्ळी येथील कब्बिणकंथी मठाचे श्री वे. चंद्रशेखरय्या आणि सौ. पुट्टम्मा या दंपतीच्या पुण्यगर्भी दि. १०.१.१९६३ रोजी यांचा जन्म झाला. स्वग्रामीच प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण करून त्यांनी कर्नाटक विश्वविद्यालयातून स्नातक पदवी संपादन केली. नंतर मैसूर विश्वविद्यालयातून एम.ए. ही पदवी सुवर्णपदकासह प्राप्त केली. दि. २४.६.१९८८ रोजी कब्बिणकंथी मठाचा पट्टाधिकार त्यांनी स्वीकारला. पुढे उच्च संस्कृताध्ययनासाठी दि. २.८.१९८८ रोजी ते काशीक्षेत्री आले आणि श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामी यांच्या आज्ञेने त्यांनी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन त्यांनी व्याकरण, साहित्य इत्यादी विषयांचा अभ्यास करून संस्कृत भाषाज्ञान प्राप्त केले. डिसेंबर १९८९ नंतर ते स्वग्रामी परतले.

रट्टीहळ्ळी कब्बिणकंथी मठ हा उज्जयिनीपीठाचा शाखामठ असून १३ व्या शतकापासून त्या मठाची परंपरा चालत आलेली आहे, असे दाखले मठात उपलब्ध आहेत. प्राचीन काळी भीषण दुष्काळ पडला असताना या मठाचे मूळ कर्तृपुरुष श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्यांनी तापलेली पोलादी कंथा (कंथा = संन्याशाचे वस्त्र) अंगात घालून 'पाऊस पडून ही कंथा थंड होऊ दे' असा संकल्प केला आणि त्यावेळी पाऊस पडला, अशी कथा सांगितली जाते. तेव्हापासून या मठाला कब्बिणकंथी मठ असे नाव पडले. हा पुत्रवर्गपरंपरेचा मठ असून या मठाला इनामी जमिनी आहेत.

३०९. **श्रीमद् उज्जयिनी जगद्गुरू मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी**

उज्जयिनी पीठ, मु.पो. उज्जयिनी,
ता. कुडलूगी, जि. बळ्ळारी (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमी आंध्र प्रदेशातील डी. हिरेहाळ (ता. रामदुर्ग, जि. अनंतपूर) या गावातील मळेमठाचे श्री वे. सिद्धय्या स्वामी आणि सौ. चन्नबसम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९६७ मध्ये जन्मले. त्यांचे बसवराज असे नामकरण करण्यात आले. हे नंदिगोत्रीय होत. हिरेहाळू आणि सिरिगेरी बृहन्मठाचे श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या पुत्रवर्ग परंपरेतील मठासाठी बटू म्हणून चि. बसवराज यांची निवड केली. १९७९ मध्ये बळ्ळारी येथे पंचपीठाधीश्वरांच्या अभूतपूर्व अड्डपालखी महोत्सवाचे व धार्मिक सभेचे आयोजन करण्यात आले होते. त्या धर्मसभेतच चि. बसवराज यांना हिरेहाळू–सिरिगेरी बृहन्मठाचे उत्तराधिकारी म्हणून घोषित करण्यात आले.

त्यानंतर दि. २६.६.१९८० रोजी श्री १००८ जगद्गुरू श्री सिद्धेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, उज्जयिनी पीठ यांच्या दिव्य सान्निध्यात श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजींनी चि. बसवराज यांना पट्टाधिकार देऊन त्यांचे 'श्री ष.ब्र. मरुळसिद्ध शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण केले. नंतर त्यांनी सिद्धगंगा क्षेत्रातील श्री सिद्धेश्वर पाठशाळेत मध्यमा परीक्षा उत्तीर्ण केली. त्यासोबतच बी.ए. ही पदवी संपादन केली. पुढे सिरिगेरीचे श्री सी. एम. रेवणसिद्धय्या आणि श्री बी. दोड्डगौड यांच्या व अनेक भक्तांच्या अपेक्षेनुसार ते उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने २०.११.१९८८ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात ७ वर्षे अभ्यास करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त या विषयातील शास्त्री व आचार्य या पदव्या

संपादन केल्या.

१९९५ मध्ये दावणगेरे शहरात लिंगैक्य श्री जगद्‌गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजींचा नववा पुण्याराधना कार्यक्रम पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात आयोजित करण्यात आला होता. त्यावेळी उज्जयिनी जगद्‌गुरू श्री सिद्धेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजींनी सिरिगेरीच्या ष.ब्र. मरुळसिद्ध शिवाचार्य स्वामीजींना आपल्या पीठाचे उत्तराधिकारी म्हणून घोषित केले. त्या घोषणेनुसार दि. ५.११.१९९५ रोजी श्रीमद् रंभापुरी, श्रीमद् उज्जयिनी, श्री हिमवत् केदार आणि श्रीशैल आणि श्रीकाशी या जगद्‌गुरूंच्या दिव्य सान्निध्यात उज्जयिनी पीठात त्यांचा पट्टाभिषेक महोत्सव अत्यंत वैभवाने पार पडला. कर्नाटकाचे तत्कालीन मुख्यमंत्री एच.डी. देवेगौडा यांच्यासह अनेक मंत्री त्या समारंभात सहभागी झाले होते. देशातील शिवाचार्य आणि हजारो भक्त त्यावेळी उपस्थित होते. तेव्हा त्यांचे 'श्री १००८ जगद्‌गुरू मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले.

उज्जयिनी पीठाचा जीर्णोद्धार, मध्यप्रदेशात उज्जयिनी पीठाची पुन:प्रतिष्ठापना, ज्ञानगुरू विद्यापीठाच्या शाळा व कॉलेजच्या सुधारणा, कोट्टूरु येथे आय.पी.आय. कॉलेज, मैसूर येथे गुरुकुल व कल्याणमंटप, चित्रदुर्गात कल्याणमंटप व वसतिगृह, हरपनहळ्ळी येथे महिला महाविद्यालय व बी.बी.एम. कॉलेज, कुब्याळ येथे डी.एड्. कॉलेज इत्यादी शिक्षणसंस्था स्थापून त्यांनी शैक्षणिक क्षेत्रात भरीव कार्य केले आहे. पू. महास्वामीजी प्रकृतीच्या अस्वास्थ्यामुळे मुदेनूर हिरेमठाचे (ता. राणेबेन्नूरु, जि. हावेरी) श्री ष.ब्र. महांत राजेंद्र शिवाचार्य यांना आपले उत्तराधिकारी नेमून तसे इच्छापत्र लिहून दि. १७.१०.२०११ या दिवशी ते पीठात लिंगैक्य झाले. त्यावेळी श्रीकाशी व श्रीशैल जगद्‌गुरूंनी त्यांचे इच्छापत्र घोषित करून अंत्यविधी पार पाडला. दि. ३.११.२०११ रोजी रंभापुरी जगद्‌गुरू श्री १००८ प्रसन्नरेणुक वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी, शैलजगद्‌गुरू श्री १००८ डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी व

श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात मुदेनूर मठाचे श्री ष.ब्र. महांत राजेंद्र शिवाचार्य यांचा विधिवत् पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री १००८ जगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. सध्या नूतन जगद्गुरू पीठपरंपरेचे सर्व व्यवहार पार पाडीत आहेत. असे कर्तृत्व गाजविणाऱ्या श्रीउज्जयिनी जगद्गुरूंना घडविण्याचे श्रेय काशीपीठास द्यावे लागते.

## ३१०. श्री.ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी



डोणूरचा कोटिमठ, मु.पो. कोट्टूरु,
ता. कूडलूगी जि. बळ्ळारी (कर्नाटक)
चरभाष : ९४४८१७३३५२

श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमीचे डोणूर (ता. बसवन बागेवाडी, जि. विजयपूर) या गावच्या हिरेमठाचे श्री वे. अल्लमप्रभय्या व सौ. चन्नम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २०.५.१९६४ रोजी जन्मास आले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण आणि चिम्मलगीत माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर उच्च व्यासंगाकरिता ते बेंगळूरुला आले. तेथील श्री महांत मठात राहून पदवीपूर्व, पदवी व पदव्युत्तर या पदव्या बेंगळूरु विश्वविद्यालयाकडून प्राप्त केल्या. पुढे १९८८-८९ मध्ये काशीच्या संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाचे बहि:स्थ विद्यार्थी म्हणून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताच्या आचार्य परीक्षेत प्रथम वर्षात ते उत्तीर्ण झाले. परीक्षार्थी म्हणून काशीला आले असताना त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाच्या आश्रयास राहून अध्ययन केले.

स्वामीजींनी डोणूर, मूळ्ळळ्ळी, यंभतनाळ, मसबिनाळ आणि कोट्टूरु या सर्व मठांचा पट्टाधिकार १९७८ मध्ये स्वीकारला. त्यांनी कोट्टूरूमध्ये १९९१-९२ मध्ये जीवनदर्शन विद्यासंस्थेची स्थापना करून त्याद्वारे नर्सरीपासून हायस्कूलपर्यंत शिक्षणाची सोय केली. याशिवाय वर्षातून एकदा सामूहिक विवाह, मोफत आरोग्यतपासणी, नेत्रतपासणी, नेत्रचिकित्सा इत्यादी कार्यक्रम आयोजित करून ते जनकल्याणाचे कार्य करीत असतात.

३११. **श्री. डी. चंद्रमौळी धूपम्**
मु. लत्तवरम्, पो.ता. उरवकोंड,
जि. अनंतपूर (आंध्र प्रदेश)



हे वीरगोत्रीय असून त्यांनी श्रीशैलक्षेत्राच्या वीरशैवागम पाठशाळेत अर्चक प्रवेश परीक्षा उत्तीर्ण केली. नंतर डॉ. धूपम् शंकरय्या यांच्या प्रेरणेने ते संस्कृत व्यासंगाकरिता वयाच्या १४ व्या वर्षी काशीक्षेत्रात आले. येथील श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १२.१०.१९८९ रोजी प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात संस्कृतचे अध्ययन करून ते आपल्या गावी परत गेले.

## ३१२. श्री म.नि.प्र. महांत स्वामीजी

निर्वाणेश्वर विरक्त मठ,
मु.पो. उगरगोळ, ता. सौंदत्ती,
जि. बेळगाव (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमीचे बैलवाड (ता. बैलहोंगल, जि. बेळगाव) या गावचे होत. या गावातील वीरगोत्रीय वे. गदगय्या आणि सौ. शिवबसम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. दि. १.६.१९६९ रोजी यांचा जन्म झाला. त्यांनी स्वग्रामी ७ वी पर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. दि. ६.७.१९८२ रोजी संस्कृत अध्ययनाकरिता ते शिवयोग मंदिरात गेले. तेथील कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत प्रारंभिक संस्कृत अध्ययन पूर्ण केले. पुढे बैलवाडच्या दोड्डमने शिवगौड आणि दानप्पा तुबची यांच्या प्रोत्साहनामुळे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २२.८.१९८९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त हा विषय घेऊन संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शास्त्री ही पदवी मिळवली. येथे वीरशैव विद्वत्संघाच्या सर्व कार्यक्रमांत सक्रिय होऊन भाग घेतला. ते यापूर्वीच तोरगल पट्टाध्यक्ष तसेच सौदंत्ती स्वादीमठाच्या स्वामीजींच्या प्रेरणेने बेळगाव जिल्ह्यातील सौदंत्ती तालुक्यातील उगरगोळ गावच्या श्री निर्वाणेश्वर विरक्त मठाचे उत्तराधिकारी म्हणून निवडले गेले होते. हल्ली या मठाचा निरंजन पट्टाधिकार स्वीकारून ते धार्मिक व सामाजिक कार्यक्रम करीत समाजजागृती करीत आहेत.

## ३१३. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी



श्रीशैलपीठ, मु. श्रीशैल, जि. कर्नूल (आंध्र प्रदेश)
चरभाष : ७८९९८१००८

हिप्परगी हिरेमठाच्या वे. मडिवाळय्या आणि सौ. शारदा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २८.१.१९७१ रोजी सिद्धराम यांचा जन्म झाला. हिप्परगी हिरेमठ हा श्रीशैल पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. श्री सिद्धराम देवांनी हिप्परगी तसेच इलकल या गावी प्राथमिक व वैदिक शिक्षण घेतले. १९८७ मध्ये श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत संस्कृतचे अध्ययन करताना माध्यमिक शिक्षणदेखील पूर्ण केले. त्यानंतर कन्नोळी मल्लप्पा यांच्या प्रोत्साहनाने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. दि. १३.१०.१९८९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

नंतर येथील आदर्श सांगवेद संस्कृत ब्रह्मविद्या महाविद्यालयात उत्तर मध्यमा परीक्षा उत्तीर्ण करून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात वेदान्त विभागात ५ वर्षे अध्ययन केले. शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तातील शास्त्री व आचार्य परीक्षांत प्रथम श्रेणीत उत्तीर्ण होऊन सुवर्णपदके प्राप्त केली. १९९८ मध्ये काशी हिंदू विश्वविद्यालयातून कन्नडमधील एम्.ए. पदवी मिळविली. त्यानंतर तेथील संस्कृत विद्या धर्मविज्ञान संकायातील वेदान्त विभागात डॉ. सुधांशुशेखर शास्त्रीजींच्या मार्गदर्शनाखाली 'श्रीमद् भगवद्गीता आणि श्रीसिद्धान्तशिखामणी : एक तौलनिक अभ्यास' हा शोधप्रबंध सादर करून २००२ मध्ये पीएच.डी. ही पदवी संपादन केली. दि. १२.२.२००३ रोजी पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात होटगी बृहन्मठाचे श्री ष.ब्र. तपोरत्नं योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजींच्या अमृतहस्ते हिप्परगी हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. दि. २१.१२.२००४ रोजी यड्रूरच्या काडसिद्धेश्वर संस्थानमठाची जबाबदारी स्वीकारली. त्या मठाचा आणि मठाच्या आधीन असणाऱ्या श्री

विरूपाक्षेश्वर (वीरभद्र) देवालयाचा जीर्णोद्धार करण्याची योजना आखून ३ वर्षेपर्यंत परिश्रम केले. महास्वामीजींचे सौजन्य व भक्तांप्रती त्यांची सहृदयता पाहून देवस्थानच्या विश्वस्तांनी व भक्तांनी महास्वामीजींवर सर्व जबाबदारी सोपवून न्यायालयात असलेले सर्व दावे काढून घेतले. या कामात डॉ. प्रभाकर कोरे, श्री. महांतेश कौटगीमठ आणि श्री. प्रकाश हुक्केरी यांचे सहकार्य उल्लेखनीय होते. दि. १८.२.२००८ रोजी पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात श्री काडसिद्धेश्वर मठावर त्यांचा पट्टाधिकार वैभवाने पार पडला. या कार्यक्रमाच्या निमित्ताने दि. १.११.२००७ पासून १०१ दिवस श्री विरूपाक्ष लिंगास कोटी बिल्वार्चन करण्यात आले. या कार्यक्रमासाठी लक्षावधी भक्त यडूर येथे येऊन गेले. यडूरच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा हा कार्यक्रम होता.

काशीतील अध्ययनकाळात काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यदर्शी म्हणून त्यांनी कार्य पार पाडले. ते उत्तम वक्ते असून चिंतनशील लेखक आहेत. ते श्रीसिद्धान्तशिखामणीवर नित्य प्रवचने करीत असतात. अनेक चर्चासत्रांत भाग घेऊन त्यांनी अभ्यासपूर्ण शोधनिबंध सादर करून त्यावरील प्रश्नांना समर्पक उत्तरे दिली आहेत.

श्रीशैल सूर्यसिंहासनाचे श्री १००८ जगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींनी प्रकृती अस्वास्थ्यामुळे श्री ष.ब्र. सिद्धराम देवांना आपला उत्तराधिकारी म्हणून निवडले. ८ फेब्रुवारी २०१० रोजी सोमवारी, माघ मास, कृष्णपक्ष दशमी, विक्रम संवत् २०६६ सकाळी श्रीकाशी-ज्ञानसिंहासनाधीश्वर डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीसद्धर्म सिंहासनाधीश्वर राजदेशिकेंद्र मरुळाराध्य शिवाचार्य महास्वामीजी, श्रीसूर्यसिंहासनाधीश्वर उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात आणि अनेक शिवाचार्यांच्या व आंध्र, कर्नाटक, महाराष्ट्र, तमिळनाडू या प्रांतांतील हजारो भक्तांच्या उपस्थितीत त्यांचा पट्टाभिषेक पार पडला. कर्नाटकाचे तत्कालीन मुख्यमंत्री श्री. बी. एस. येडियुरप्पा या कार्यक्रमास आवर्जून उपस्थित होते. या वेळी नूतन महास्वामीजींचे

'श्री १००८ जगद्गुरू श्रीशैलसूर्यसिंहासनाधीश्वर डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. भक्तवत्सल, अभ्यासू, विद्वान अशा व्यक्तीची जगद्गुरुपदी निवड करण्यात आल्याने सर्वांना आनंद झाला. गेल्या ९ वर्षांपासून श्रीशैल जगद्गुरू महास्वामीजी कर्नाटक, आंध्र, तेलंगणा, महाराष्ट्र, तमिळनाडू, केरळ आदी प्रांतांमध्ये धर्मप्रचार करून भरपूर धर्मजागृती करीत आहेत.

## ३१४. श्री ष.ब्र. डॉ. शिवानंद शिवाचार्य



एम.ए., पीएच्.डी., एल्एल्.बी.
हिरेमठ, चिक्कपेटे, मु.पो.ता.जि. तुमकूरु (कर्नाटक)
चरभाष : ९४४८६६१३७६

पूर्वाश्रमीचे विजयपूर येथील श्री वे. निजगुणय्या मठ आणि सौ. शांताबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २९.३.१९६१ रोजी यांचा जन्म झाला. प्राथमिक ते स्नातक पदवीपर्यंतचे त्यांचे शिक्षण विजयपुरात झाले. या काळात ते वेदान्तकेसरी श्री मल्लिकार्जुन स्वामीजींच्या विशेष अनुग्रहास पात्र झाले. त्यांना अध्यात्ममार्गाची ओढ लागली. पुढे कर्नाटक विश्वविद्यालयातून संस्कृतमध्ये प्रथम श्रेणीत एम्.ए. पदवी संपादन करून त्यांनी सुवर्णपदक मिळविले. पुढे त्याच विद्यापीठातून 'कुमारदासांचे जानकीहरण महाकाव्य : एक साहित्यिक अध्ययन' या विषयावर डॉ. मल्लिकार्जुन परेड्डी यांच्या मार्गदर्शनाखाली इंग्रजीत शोधप्रबंध सादर करून पीएच्.डी. पदवी प्राप्त केली.

पुढे उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २८.९.१९८९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत या विषयातील आचार्य पदवी मिळविली. त्यासोबत काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या विधी महाविद्यालयातून एल्एल्.बी. या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. येथे अध्ययन करीत असताना १९९० मध्ये काशी वीरशैव विद्वत्संघाचे कार्यवाह म्हणून त्यांनी कार्य पाहिले. त्याशिवाय माजी विद्यार्थ्यांची माहिती संकलित करण्याचे कामदेखील त्यांनी केले.

पुढे गुळेद्गुड्ड अमरेश्वर मठाचे पट्टाध्यक्ष होऊन त्यांनी धार्मिक कार्यक्रमात स्वतःला गुंतवून घेतले. श्री. एन. आर. जगदीशाराध्य आणि तुमकूरुच्या भक्तांच्या आग्रहानुसार दि. ५.५.१९९८ रोजी जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात श्रीशैलपीठाचा शाखामठ असलेल्या तुमकूरु हिरेमठावर

अत्यंत वैभवाने त्यांचा पट्टाभिषेक समारंभ पार पडला. हिरेमठ विद्यासंस्थेची स्थापना करून ते शैक्षणिक कार्य करीत आहेत. महिलांसाठी वेदशिबिरांचे आयोजन करून ते त्यांना वेदविदुषी करीत आहेत. आपल्या भागातील वृद्ध व्यक्तींना ते तीर्थक्षेत्रांची यात्रा करवून आणतात. शतायुषी कवि–कलाकारांचा व समाजधुरीणांचा सत्कार करून सन्मान करतात. १९९७, १९९९, २००० आणि २००६ या साली त्यांनी न्यूयॉर्क, कॅनडा, अमेरिका, इंग्लंड आदी पाश्चिमात्त्य देशांचा दौरा करून वीरशैवधर्माचा प्रचार केला. ते उत्तम वक्ते, चिंतनशील लेखक असून त्यांनी जगद्गुरू पंचपीठाधीश्वर, रंभापुरी पीठदर्शन, श्रीशैलपीठदर्शन, विद्वत्‌विभूती वीरभद्र जगद्गुरू, वीरशैवरे नीवु हिंदुगळ्ळलवे ?, अदे हाडु, नम्म गणपती हि गो, काशीयल्लोंदू जंगमकाशी, विचारवृष्टी असे अनेक ग्रंथ लिहिले आहेत. 'शिवदुंदुभी' या मासिकाचे ते सन्माननीय संपादक असून त्यात ते नियमित लेखन करीत असतात. युवक–युवतींसाठी सुसंस्कार कार्यक्रमांचे आयोजन करीत असतात. याप्रमाणे श्री ष.ब्र. डॉ. शिवानंद शिवाचार्य स्वामीजी हे लहानपणापासून उत्तम संस्कारात वाढून विद्वान, समीक्षक, वक्ता, लेखक, संपादक, संघटक, समाजसुधारक असे बहुमुखी व्यक्तिमत्त्व झाले, याचा काशीपीठास सार्थ अभिमान आहे.

## ३१५. श्री म.नि.प्र. राचोटी स्वामीजी

हुनसीकोळ्ळ मठ, मु. यमकनमरडी,
ता. हुक्केरी, जि. बेळगाव (कर्नाटक)



यमकनमरडी हुनसीकोळ्ळ मठाचा जीर्णोद्धार श्री म.नि.प्र. लिं. गुरुसिद्ध स्वामीजींनी केला असून हा प्रसिद्ध मठ होय. या मठपरंपरेतील सर्व स्वामींमध्ये श्री म.नि.प्र. गुरुसिद्ध स्वामीजी हे ध्रुवनक्षत्रासारखे तेजस्वीपणे उठून दिसतात. त्यांच्यानंतर या मठावर मठाधिपती म्हणून श्री म.नि.प्र. राचोटी स्वामीजी आले.

राचोटी स्वामीजी हे पूर्वाश्रमी वक्कुंद (ता. बैलहोंगल, जि. बेळगाव) या गावच्या प्याटी मठाचे श्री. वे. शिवानंदय्या आणि सौ. शांतादेवी या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ६.६१९६७ रोजी जन्मास आले. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून धारवाड येथे माध्यमिक शिक्षण घेतले. पुढे संस्कृत व धार्मिक विषयांच्या अध्ययनाकरिता ते शिवयोग मंदिरात आले. तेथे १९८४ मध्ये प्रवेश घेऊन १९८८ पर्यंत ४ वर्षे त्यांनी संस्कृत व योगाचा अभ्यास पूर्ण केला. पुढे भक्तांच्या सहकार्याने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने १९८९ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात ५ वर्षे अध्ययन करून त्यांनी शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी मिळवली. काशी हिंदू विश्वविद्यालयातून कन्नडमधील एम.ए. ही पदवी मिळवली. ते हल्ली मठपरंपरेनुसार धार्मिक, शैक्षणिक, सामाजिक कार्य पार पाडीत आहेत.

## ३१६. श्री प्रभुलिंगदेव बुद्नेश्वर मठ

मु.पो. अण्णिगेरी, ता. नवलगुंद,
जि. धारवाड (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमी अण्णिगेरी बुद्नेश्वर मठाचे श्री. वे. बुद्धेश्वर स्वामी आणि सौ. अन्नदानम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९७१ मध्ये जन्मले. यांनी अण्णिगेरीत आपले प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. हे वीरगोत्रीय असून त्यांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरातील श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत मैसूरची साहित्य परीक्षा उत्तीर्ण केली. नंतर सेल्लोडच्या एस. लिंगप्पांच्या प्रोत्साहनाने उच्च व्यासंगाकरिता ते वयाच्या १९ व्या वर्षी काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. १२.१२.१९८९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात संस्कृताध्ययन करून शक्तिविशिष्टाद्वैत परीक्षेत उत्तीर्ण होऊन ते आपल्या गावी परतले.

३१७. **श्री श्रो.ब्र. शिवानंद स्वामीजी**

श्रीजडेसिद्धेश्वर शिवयोगीश्वर शांताश्रम,
विनोबा नगर, दावणगेरे, ५७७००६ (कर्नाटक)
चरभाष : ९८८०१६१५१३



श्री शिवानंद स्वामीजी हे मूळचे सोलापूर जिल्ह्यातील औराद या गावचे. त्यांनी औराद येथेच प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे वैराग्यवृत्तीमुळे घर सोडून ते दावणगेरेच्या शांताश्रमास आले. तेथे वेदान्ताचा अभ्यास करून श्री श्रो.ब्र. शांतानंद स्वामीजींकडून त्यांनी संन्यासाश्रम स्वीकारला. १९८५ मध्ये पुढील व्यासंगाकरिता त्यांनी मैसूरच्या श्री शिवरात्रीश्वर गुरुकुलात प्रवेश घेतला. तेथील महाराजा संस्कृत महाविद्यालयात वीरशैव आगम प्रवर आणि संस्कृत काव्य या परीक्षांत उत्तीर्ण झाले. नंतर उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. १३.१२.१९८९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातील वेदान्त विभागात पाच वर्षे अध्ययन करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी प्राप्त केली.

काशीतील अध्ययनकाळात श्रावण महिन्यात व नवरात्री पर्वात श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुष्ठानांत सहभागी होऊन, निष्ठापूर्वक सेवा करून ते महास्वामीजींच्या कृपाशीर्वादास पात्र झाले. अलाहाबाद, नागपूर, नाशिक, मुंबई, पुणे, दिल्ली आणि बेंगळूरु या शहरांत महास्वामीजींचे विशेष कार्यक्रम असताना ते वैदिक विधिविधान पूर्ण करीत असत. यांच्या सेवेमुळे संतुष्ट होऊन महास्वामीजींनी मंत्रोपदेश करून त्यांना आशीर्वाद दिला. ते उत्तम वक्ते व लेखक आहेत. त्यांनी शांती, ज्ञान आणि तापदिंद तम्पीगे (तापातून संतोषाकडे) हे ग्रंथ लिहून लोकप्रियता मिळवली आहे. ते हल्ली दावणगेरे येथील जडेसिद्ध शिवयोगींच्या शांताश्रमात अधिकारी असून त्यांनी आश्रमाचा जीर्णोद्धार केला आहे.

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अमृतहस्ते नूतन शांताश्रमाचे उद्घाटन झाले. त्यावेळी मोठ्या प्रमाणात धार्मिक कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता. श्री शिवानंद स्वामीजी सध्या दावणगेरेच्या शांताश्रमात वास्तव्यास असून आश्रमाचे सर्व धार्मिक विधी पार पाडत आहेत.

## ३१८. श्री म.नि.प्र. काशीनाथ स्वामीजी

मुरघा मठ, गुळेद्गुड्ड,
ता. बदामी, जि. बागलकोट (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमी पडसावळगी (ता. आळंद, जि. कलबुर्गी) या गावच्या हिरेमठाचे श्री वे. प्रभय्या आणि सौ. देवम्मा यांच्या पुण्यगर्भी दि. १५.७.१९७१ रोजी जन्मले. ते नंदिगोत्रीय असून त्यांनी आपल्या गावीच प्राथमिक शिक्षण घेतले. १९८४ मध्ये संस्कृत अध्ययनासाठी ते श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात आले. तेथे श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत वे.पं. इटगी चन्नबसवशास्त्री आणि केळदी राजगुरू श्री ष.ब्र. डॉ. गुरुसिद्धदेव शिवाचार्य स्वामीजींचे शिष्यत्व पत्करून पाच वर्षे अभ्यास केला आणि संस्कृत साहित्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. १९९० मध्ये गुळेद्गुड्डच्या मुरघा मठाच्या श्री म.नि.प्र. नीलकंठ स्वामीजींचे उत्तराधिकारी झाले. त्यानंतर गुरुवर्यांच्या प्रेरणेने आणि गुळेद्गुड्डचे सद्भक्त श्री. पी. एस. हंगरगी आणि श्री. जी. बी. सत्तेगिरी या दोघांच्या प्रोत्साहनाने उच्च व्यासंगाकरिता ते काशी जंगमवाडी मठात आले. येथे श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १२.९.१९९० रोजी प्रवेश घेतला.

काशीतील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन त्यांनी शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा अभ्यास केला आणि संपूर्णानंद विश्वविद्यालयाची आचार्य पदवी मिळविली. पुढे दि. ९.११.२००० रोजी गुळेद्गुड्डच्या मुरघा मठाचा निरंजन चर-पट्टाधिकार स्वीकारला. हे मुरघा मठाचे पंधरावे मठाधिपती होत. सध्या ते मठाचा जीर्णोद्धार करून वसतिगृहाची आणि प्रसादाची व्यवस्था करीत आहेत. याशिवाय मठाच्या धार्मिक परंपरेनुसार धार्मिक विधी पार पाडून नावारूपास आले आहेत.

## ३१९. श्री ष.ब्र. शांतवीरलिंग शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ संस्थान, मु.पो.ता. औसा,
जि. लातूर (महाराष्ट्र)
चरभाष : ९४०५७३५९०८, ७९३०१५२३००

औसा येथील हिरेमठ संस्थान हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून या मठाची परंपरा सुमारे ९०० वर्षे प्राचीन असल्याचे पुरावे मठात उपलब्ध आहेत. तेव्हापासून आजपर्यंत ही गुरुपरंपरा अव्याहतपणे चालत आली आहे. या मठावर अनेक तपस्वी आणि विद्वान शिवाचार्य होऊन गेले आहेत. १२० गावांत यांचा शिष्यवर्ग आहे. या मठाचे पट्टाधिकारी श्री ष. ब्र. १०८ निरंजन शिवाचार्य स्वामीजी हे ११० वर्षे आयुर्मानाचे होते. वृद्धापकाळी देखील ते दररोज प्रवचन करून भक्तांना सन्मार्गाचा उपदेश करीत. ते ज्योतिषशास्त्रात विद्वान असून भक्तांना लौकिक कार्यासाठी मुहूर्तदेखील सांगत असत. २००७ मध्ये ते लिंगैक्य झाले.

त्यांचे सध्याचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. शांतवीरलिंग शिवाचार्य स्वामीजी हे औसा हिरेमठ संस्थानचे श्री. वे. गंगाधर हिरेमठ आणि सौ. सुशीलादेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १९७४ मध्ये जन्मले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षणासोबत आपल्या गुरुवर्यांकडून धार्मिक, वैदिक व ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. संस्कृतबरोबरच कन्नड भाषेचा अभ्यास करण्यासाठी त्यांनी होन्नाळी हिरेकल्मठात आणि बेंगळूरुच्या महांतमठात काही वर्षे वास्तव्य करून अध्ययन केले.

उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते १९९० मध्ये काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने तेथील ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश मिळविला. १९९५ पर्यंत काशीक्षेत्रात राहून त्यांनी संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात प्रवेश घेऊन अभ्यास केला. शक्तिविशिष्टाद्वैत हा विषय घेऊन त्यांनी वीरशैव धर्मदर्शनाचे ज्ञान प्राप्त केले. नंतर श्री १००८ जगद्गुरू रावल सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य भगवत्पादांकडून केदारपीठाचा चेलासंस्कार घेतला. त्यावेळी

'शांतवीरलिंग' असे त्यांचे नामकरण करण्यात आले. ९ वर्षेपर्यंत केदारनाथ, मध्यमहेश्वर, गुप्तकाशी आणि उखीमठ येथे मुख्य पुजारी म्हणून सेवा करून ते श्रीकेदार जगद्गुरूंच्या कृपाशीर्वादास पात्र झाले. हल्ली औसा हिरेमठ संस्थानचे सर्व धार्मिक कार्यक्रम ते अव्याहतपणे पार पाडीत आहेत.

त्यांच्या मार्गदर्शनाखाली लातूर जिल्हा वीरशैव समाज अनेक धार्मिक कार्यक्रमांचे निरंतर आयोजन करीत असतो. २००२ मध्ये श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींचे श्रावणमास अनुष्ठान अत्यंत वैभवाने पार पडले. २२ ते २४ नोव्हेंबर २००८ या काळात लातूर शहरात या श्रीकाशीजगद्गुरूंचा षष्ठ्यब्दी महोत्सव श्री ष.ब्र. शांतवीरलिंग शिवाचार्यांच्या मार्गदर्शनाखाली व श्री. मल्लिकार्जुनअप्पा जवळे यांच्या अध्यक्षतेखाली अत्यंत वैभवाने पार पडला. हा कार्यक्रम लातूरच्या इतिहासात सुवर्णाक्षरांनी लिहून ठेवण्यासारखा झाला. श्री शांतवीरलिंग शिवाचार्य सदैव कोणत्या ना कोणत्या धार्मिक कार्यक्रमात गुंतलेले असतात व समाजाभिमुख होऊन कार्य करीत असतात.

सध्या ते केंद्रीय ग्राहक संरक्षण अन्न व सार्वजनिक वितरण मंत्रालय भारत सरकारच्या आधीन असलेल्या आसाम, नागालँड, मणिपूर, मिझोराम, त्रिपुरा, अरुणाचल आणि सिक्कीम या ७ राज्यांच्या वेअरहाऊसिंग कॉर्पोरेशनचे डायरेक्टर आहेत. हे भारत सरकारचे वेअर हाऊसिंग कॉर्पोरेशनचे डायरेक्टरचे कार्य करीत असल्यामुळे त्यांनी त्यांचे ज्येष्ठ बंधू चंद्रशेखर गंगाधर हिरेमठ यांचे सुपुत्र चि. उमेश यांना आपले उत्तराधिकारी स्वीकारून दि. ९.८.२०१८ रोजी श्रीकाशीजगद्गुरू श्री १००८ डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी आणि उज्जयिनी जगद्गुरू श्री १००८ सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात विधिवत् पट्टाभिषेक केला. नूतन पट्टाधिकाऱ्यांचे श्री ष.ब्र. गुरू निरंजन शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. श्रीगुरू निरंजन शिवाचार्य १२ वर्षांचे असून शाळेच्या शिक्षणाबरोबर लातूर येथील काशीपीठाच्या श्री जगद्गुरू पंचाचार्य वेद संस्कृत पाठशाळेत धार्मिक अध्ययन करीत आहेत.

## ३२०. श्री ष. ब्र. शिवानंद शिवाचार्य स्वामीजी

वाळवेकर हिरेमठ,

मु.पो.ता. वाळवा, जि. सांगली (महाराष्ट्र)



हे नंदिगोत्रीय असून वाळव्याच्या काशीनाथ स्वामींचे सुपुत्र होत. दि. २३.७.१९७० रोजी त्यांचा जन्म झाला. स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून त्यांनी वडगावच्या परंडकर मठाच्या संस्कृत पाठशाळेत संस्कृत तसेच ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला.

नंतर परंडकर स्वामीजींच्या प्रेरणेने पुढील विद्याभ्यासासाठी वयाच्या २० व्या वर्षी ते काशी जंगमवाडी मठात आले. येथील श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात १५.२.१९९१ रोजी त्यांनी प्रवेश घेतला. त्यानंतर आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालय आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालय येथे अध्ययन करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री ही पदवी १९९६ मध्ये संपादन केली.

नंतर २०.२.१९९७ रोजी ते वाळवा हिरेमठाचे पट्टाधिकारी झाले. त्यावेळी 'श्री ष.ब्र. शिवानंद शिवाचार्य स्वामी' असे त्यांचे नामकरण करण्यात आले. सध्या ते मठाची परंपरा जोपासत सर्व धार्मिक कार्यक्रम पार पाडीत असतात.

## ३२१. श्री ष. ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य स्वामीजी

गुरू पंचाक्षर शिवाचार्य, दमय्या स्वामी मठसंस्थान,
मु.पो.ता. बाळापूर, जि. अकोला (महाराष्ट्र)



हे पूर्वाश्रमीचे बीदर जिल्ह्यातील भालकी तालुक्यातील चाळकापूर चिक्कमठाचे वे. संगय्या यांचे सुपुत्र होत. हे वीरगोत्रीय असून त्यांनी सोलापूर येथे होटगी मठाच्या श्रीमद् वीरशैव गुरुकुल पाठशाळेत प्रारंभिक संस्कृताध्ययन केले. तिरुपतीच्या केंद्रीय संस्कृत विद्यापीठात अद्वैत वेदान्तशास्त्री या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

त्यानंतर बाळापूर येथील दमय्या स्वामी मठसंस्थानचे पट्टाध्यक्ष झाले. तेथील श्री. प्रभाकरअप्पा यमलकर यांच्या प्रोत्साहनामुळे वयाच्या २७ व्या वर्षी उच्च अध्ययनाकरिता काशी जंगमवाडी मठात आले. श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात दि. ८.८.१९९१ रोजी प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात अध्ययन करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. ते साहित्य आणि तत्त्वज्ञान या विषयांत एम.ए. झाले. काशी हिंदू विश्वविद्यालयाचे सुवर्णपदक प्राप्त केले.

त्यानंतर काशी हिंदू विश्वविद्यालयातील संस्कृत विद्या धर्मविज्ञान शाखेत डॉ. सुधांशुशेखर शास्त्रीजींच्या मार्गदर्शनाखाली शोधकार्य करून डॉक्टरेट पदवी मिळविली. सध्या आपल्या बाळापूर मठाच्या परंपरेतील धार्मिक कार्यक्रम सांभाळत ते बीड जिल्ह्यातील कपिलधार क्षेत्राजवळील मांजरसुबा गावात 'मन्मथस्वामी धाम' नावाचा नवीन मठ स्थापून त्या परिसरातील भक्तांना मार्गदर्शन करीत आहेत.

## ३२२. श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी



मडिवाळेश्वर मठ, मु.पो. कडकोळ,
ता. जेवरगी, जि. कलबुर्गी (कर्नाटक)
चरभाष : ९८८०१६९६७१

जेवरगी तालुक्यातील कडकोळ गावचा मडिवाळेश्वर मठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. श्रेष्ठ दार्शनिक व थोर पुरुष श्री मडिवाळेश्वर हे आपल्या दार्शनिक योग्यतेमुळे संपूर्ण कर्नाटकात प्रसिद्ध झाले आहेत. अशी भव्य परंपरा असणाऱ्या मठाचे श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी हे पट्टाधिकारी आहेत. जेवरगी तालुक्यातील तेलगबाळ गावच्या हिरेमठाच्या श्री वे. शिवलिंगय्या व सौ. मडिवाळम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १२.८.१९६९ मध्ये त्यांचा जन्म झाला. जन्मगावी कडकोळ येथे प्राथमिक अध्ययन पूर्ण करून त्यांनी अरळगुंडी येथे माध्यमिक शिक्षण व सिंदगीच्या एच.जे. महाविद्यालयात पदवीपूर्व शिक्षण घेतले.

१९९० मध्ये कडकोळ मडिवाळेश्वर मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. त्यानंतर भक्तांच्या प्रोत्साहनामुळे उच्च शिक्षणाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ३०.९.१९९१ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन त्यांनी साहित्य व व्याकरणाचा अभ्यास केला. काशीत अध्ययन पूर्ण करीत असताना त्यांनी काशी वीरशैव संघाचे सक्रिय सदस्य म्हणून कार्य केले.

काशी येथील अध्ययन पूर्ण करून कडकोळला परतल्यानंतर दि. ४.६.१९९७ रोजी रंभापुरी व उज्जयिनी जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात चिनमगेरीच्या श्री महांतेश्वर मठाचा श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य स्वामी यांच्याकडून मडिवाळेश्वर मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सध्या ते आपल्या मडिवाळेश्वर मठाचा जीर्णोद्धार, श्री मडिवाळेश्वरांचे साहित्यप्रकाशन आणि नित्य दासोह हे कार्य करीत मठाची परंपरा समर्थपणे चालवीत आहेत.

## ३२३. श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी



कल्याण हिरेमठ, मु.पो. गिरिसागर,
ता. बिळगी, जि. बागलकोट (कर्नाटक)
चरभाष : ९४४८३९२११२, ९६३२२८४९६१

दि. १.६.१९६९ रोजी श्री वे. मृत्युंजय आणि सौ. अन्नपूर्णादेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी यांचा जन्म झाला. त्यांनी गिरिसागर येथे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर पदवीपर्यंतचे शिक्षण हुबळी येथील मूरुसाविर मठात राहून पूर्ण केले. त्यानंतर उज्जयिनी पीठाचा शाखामठ असलेल्या पुत्रवर्गपरंपरेतील गिरिसागराच्या कल्याण हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती करण्यात आली. त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९९१ मध्ये जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश केला.

आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त हा विषय घेऊन शास्त्री पदवीचा त्यांनी अभ्यास केला. १९९४ पर्यंत अध्ययन करून त्यांनी या विषयात शास्त्री व आचार्य या पदव्या मिळविल्या. पुढे १९९४ मध्ये जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात एका भव्य धार्मिक समारंभात मठाची अधिकारसूत्रे हाती घेतली. ते विद्वान, वाक्पटू व समाजाभिमुख असून त्यांनी धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक या क्षेत्रांत एक तप म्हणजे १२ वर्षे कार्य केले.

यांच्या १२ वर्षांच्या कार्याच्या सफलतेचे प्रतीक म्हणून २४ व २५ एप्रिल २००६ रोजी श्री जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांचा अड्डपालखी महोत्सव, शिवाचार्य मंटपपूजा इत्यादी विविध धार्मिक कार्यक्रम उत्साहात पार पडले. हे स्वामीजी अत्यंत लोकप्रिय होऊन मठपरंपरेनुसार कार्य करीत आहेत.

## ३२४. श्री ष.ब्र. अभिनव सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी



पंचग्रह हिरेमठ, मु.पो. सुळ्ळ,
ता. हुबळी, जि. धारवाड (कर्नाटक)

सुळ्ळ पंचग्रह हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा इतिहासप्रसिद्ध शाखामठ असून या परंपरेत अनेक शिवाचार्य होऊन गेले. सर्वांचे 'सिद्धराम शिवाचार्य स्वामीजी' असेच नामकरण करण्यात येते. विद्यमान मठाधिपती श्री ष.ब्र. अभिनव सिद्धराम शिवाचार्यांचा पूर्वाश्रमी सौ. शांतम्मा आणि श्री वे. गंगाधरय्या या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १८.३.१९६५ रोजी जन्म झाला. त्यांनी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण विजापुरात घेतले. तसेच तेथील एस.एस. कॉलेजात पदवीपूर्व शिक्षण घेतले. आपले गुरुवर्य श्री ष.ब्र. चिदानंद शिवाचार्य ऊर्फ सिद्धराम शिवाचार्य यांच्या नेतृत्वाखाली दि. २.५.१९९५ रोजी सुळ्ळ पंचग्रह हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. नंतर गुरुवर्यांच्या मार्गदर्शनाने ते उच्च शिक्षणाकरिता काशीक्षेत्रास आले.

श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १९९२ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. नंतर तेथील सुप्रसिद्ध आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेतला. तेथे शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त हा विषय घेऊन संपूर्णानंद संस्कृत विश्व-विद्यालयात शास्त्री परीक्षेत ते उच्च श्रेणीत उत्तीर्ण झाले. १९९२ ते १९९६ पर्यंत श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात अध्ययन करून संस्कृत भाषेत आणि शास्त्रांत प्राविण्य मिळविले. सुळ्ळ येथे वास्तव्य करून मठपरंपरेनुसार धार्मिक विधी पार पाडीत, गावागावांत धर्मजागृती करीत असताना प्रकृती अस्वास्थ्यामुळे २०१४ मध्ये ते लिंगैक्य झाले.

दि. ८.९.२०१३ रोजी त्यांच्या गादीवर हूली हिरेमठाचे श्री ष.ब्र. शिवमहांत शिवाचार्य यांना विधिपूर्वक पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. शिवसिद्धराम शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. सध्या ते सुळ्ळ व हूली या मठांच्या परंपरा सांभाळीत आहेत.

## ३२५. श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्य स्वामीजी

संस्थान हिरेमठ, मु.पो. बेळ्ळंकी, ता. मिरज,
जि. सांगली (महाराष्ट्र). चरभाष : ९४२२४०८२१४



बेळ्ळंकी हिरेमठाचे श्री. वे. रेवणय्या आणि सौ. पार्वती या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १.६.१९५८ मध्ये यांचा जन्म झाला. बेळ्ळंकी हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा मठ आहे. या मठाला ९१ एकर इनामी जमीन असून आजपर्यंत ११ शिवाचार्य येथे होऊन गेले आहेत. विद्यमान शिवाचार्य हे १२ वे शिवाचार्य होत. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण बेळ्ळंकीत झाले. पुढे मिरज महाविद्यालयातून त्यांनी शिवाजी विद्यापीठाची बी.कॉम. ही पदवी मिळवली. बेळ्ळंकी हिरेमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. नंजुडाराध्य शिवाचार्य स्वामीजींनी त्यांचा आपले उत्तराधिकारी म्हणून स्वीकार केला आणि त्यांना उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास पाठविले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १७.८.१९९३ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त विभागात ६ वर्षे सतत अभ्यास करून शास्त्री व आचार्य या पदव्या संपादन केल्या. सध्या त्यांचे वास्तव्य बेळ्ळंकीत असून महाराष्ट्रात आणि कर्नाटकात संचार करून ते धर्मप्रचाराचे कार्य करीत आहेत. चैत्र महिन्यात प्रतिवर्षी शिखरशिंगणापूरला ते दिंडी पदयात्रा भक्तांसह करीत असतात. दि. ९.४.२००६ रोजी शिंगणापुरातील त्यांच्या नूतन मठाचे उद्घाटन श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अमृतहस्ते झाले.

## ३२६. श्री ष.ब्र. डॉ. शिवयोगी शिवाचार्य हिरेमठ

मु. म्हैसाळ, ता. शिरोळ, जि. कोल्हापूर (महाराष्ट्र)



म्हैसाळ हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून आजपर्यंत या मठावर ११ शिवाचार्य होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. शिवयोगी शिवाचार्य हे या मठाचे १२ वे पट्टाध्यक्ष होत. कोल्हापूर जिल्ह्यातील शिरोळ गावच्या हिरेमठाचे श्री. वे. विश्वनाथ आणि सौ. विमल यांच्या पवित्र गर्भी दि. १२.८.१९६२ रोजी यांचा जन्म झाला. शिरोळ आणि म्हैसाळ येथे त्यांनी प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेतले. दि. ११.३.१९७५ रोजी या मठाचे श्री ष.ब्र. करिबसवेश्वर शिवाचार्य स्वामीजींनी त्यांना आपला उत्तराधिकारी नेमले. त्यानंतर त्यांनी बेंगळूरुच्या जगद्गुरू रेणुकाचार्य महाविद्यालयात पदवीपूर्व शिक्षण आणि श्री जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयात संस्कृत व वैदिक शिक्षण महंतच्या मठात राहून घेतले.

नंतर सोलापूरच्या श्रीमद् वीरशैव होटगी मठ गुरुकुलात १९८३ मध्ये प्रवेश घेऊन तेथील संगमेश्वर महाविद्यालयातून १९८७ मध्ये बी.ए. पदवी प्राप्त केली. वालचंद महाविद्यालयातून १९८८-८९ मध्ये एम्.ए. पदवी मिळविली. १९९० मध्ये तिरुपतीच्या राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठात प्रवेश घेऊन १९९१ मध्ये प्राक्शास्त्री परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. नंतर संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९९३ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील महात्मा गांधी काशी विद्यापीठातून दर्शनशास्त्रामधील एम.ए. पदवी १९९४ मध्ये संपादन केली. नंतर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तात प्रथम श्रेणीत आचार्य पदवी १९९७ साली प्राप्त केली. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या प्राच्य विद्या धर्मविज्ञान विभागात 'लिंगधारणचंद्रिका का एक समीक्षात्मक अध्ययन'

या विषयावर १९९७ ते २००२ पर्यंत अभ्यास केला व शोधप्रबंध सादर करून २००२ मध्ये पीएच्.डी. पदवी संपादन केली.

दि. १३.५.२००१ रोजी श्रीउज्जयिनी व श्रीकाशी जगद्गुरूंच्या सान्निध्यात म्हैसाळ हिरेमठावर त्यांना पट्टाभिषेक करण्यात आला. १९९३ ते २००२ पर्यंत १० वर्षे ते काशी जंगमवाडी मठात राहून उच्चविद्याविभूषित झाले आहेत. सध्या कर्नाटकात व महाराष्ट्रात ते धर्मजागृतीचे कार्य करीत आहेत. पदयात्रा, धर्मग्रंथांचे पारायण, शिवदीक्षा समारंभ आणि अनेक गावांतील देवालयांचा जीर्णोद्धार इत्यादी कार्य ते सदैव करीत असतात.

२०१९ च्या जून-जुलैमध्ये महापूर आला त्यावेळी त्यांनी दि. २७.७.२०१९ ते ५.८.२०१९ पर्यंत परिसरातील जनावरांच्या चाऱ्याची, राहण्याची आणि पूरग्रस्तांच्या भोजनाची व निवासाची व्यवस्था केली.

### ३२७. श्री ष.ब्र. शिवशंकर शिवाचार्य स्वामीजी

गुरू गंगाधर मठसंस्थान, मु.पो. नेरपिंगळाई,
ता. मोर्शी, जि. अमरावती (महाराष्ट्र)



नेरपिंगळाईचा श्रीगुरू गंगाधर मठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून शिष्यवर्ग परंपरेतील आहे. इ.स. ९६३ पासून म्हणजे दहाव्या शतकापासून या मठाची परंपरा अव्याहत चालत आलेली आहे. या मठात सार्वजनिक गणेशोत्सव करण्याची परंपरा असून या गावात फक्त या मठातच गणपती स्थापन केला जातो. संपूर्ण गाव एकत्र येऊन हा उत्सव पार पाडतो. या मठावर बरेच शिवाचार्य होऊन गेले असून श्री ष.ब्र. शिवशंकर शिवाचार्य हे विद्यमान पट्टाधिकारी आहेत. सोलापूर जिल्ह्यातील अक्कलकोट येथील श्री. वे. सिद्धय्या स्वामी आणि सौ. सुभद्राबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९६९ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे भीमाशंकर

असे नाव ठेवण्यात आले. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण अक्कलकोट येथे झाले. तेथील कुंभारगल्लीतील हिरेजेवरगी हिरेमठाचे बालतपस्वी श्री ष.ब्र. गुरुशांत शिवाचार्य स्वामीजींच्या संस्कारात ते वाढले. यांनी त्यांच्याकडूनच संस्कृत आणि धार्मिक शिक्षण प्राप्त केले.

त्यानंतर त्यांनी श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींच्या सान्निध्यात राहून १२ वर्षे त्यांची सेवा करून त्यांचा कृपाशीर्वाद प्राप्त केला. श्रीशैल जगद्गुरू १००८ श्री उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने संस्कृताध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९९३ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. श्रीमहास्वामीजींच्या शिवपूजेत त्यांनी सेवा समर्पित केली. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात संस्कृताध्ययनाचा प्रारंभ केला. अध्ययन करीत असतानाच नेरपिंगळाईच्या भक्तांनी तेथे येऊन श्रीकाशीजगद्गुरूंची अनुमती घेऊन त्यांना आपल्या गावचे मठाधिपती म्हणून दि. १७.५.१९९५ रोजी निवडले. नंतर दि. २३.५.१९९६ रोजी श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी साखरखेर्डेकरांकडून त्यांना विधिवत् पट्टाधिकार देण्यात आला.

१९९३ ते १९९६ अशी तीन वर्षे काशीपीठातील श्री ज.वि. गुरुकुलात त्यांनी संस्कृत साहित्याचा अभ्यास केला. कन्नड आणि मराठी भाषांत लोकांना वीरशैव तत्त्वज्ञान समजावून सांगण्याची कला त्यांच्याठायी आहे. २३ वर्षांपासून नेरपिंगळाईच्या मठाची सर्व धार्मिक परंपरा हे व्यवस्थित पार पाडतात. गणेशोत्सवाच्या निमित्ताने ग्रामीण भागात राष्ट्रीय एकात्मतेचा संदेश दिला जातो. त्यामुळे ष.ब्र. शिवशंकर शिवाचार्य स्वामीजी सर्व समाजाच्या आदरास पात्र झाले आहेत.

## ३२८. श्री ष.ब्र. मळेयोगीश्वर शिवाचार्य स्वामीजी



मानिहळ्ळी पूरवर्ग मठ, मु. मानिहळ्ळी,
पो. हिरेहडगली, ता. हूविन हडगली,
जि. बळ्ळारी (कर्नाटक). चरभाष : ९४४९१३५६९१

मानिहळ्ळी पूरवर्ग मठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून तेथे अनेक विद्वान आणि तपस्वी शिवाचार्य होऊन गेले आहेत. विद्यमान श्री ष.ब्र. मळेयोगीश्वर शिवाचार्य हे पूर्वाश्रमी मानिहळ्ळी पूरवर्ग मठाचे श्री. वे. परमेश्वरय्या आणि सौ. पार्वतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी १६.२.१९७३ रोजी जालवाडगी (ता. मुंडरगी, जि. गदग) या गावी जन्मले. त्यांचे प्राथमिक तसेच माध्यमिक शिक्षण जालवाडगी, बागेवाडी आणि मुंडरगी या गावांत पूर्ण झाले. त्यानंतर होन्नाळी हिरेकल्मठात वास्तव्य करून त्यांनी पदवीपूर्व शिक्षण घेताना वेद, संस्कृत व ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. हुब्बळीच्या काडसिद्धेश्वर महाविद्यालयात पदवी शिक्षण घेतले. त्यानंतर १९८८ मध्ये मानिहळ्ळी पुरवर्ग मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची निवड करण्यात आली.

संस्कृताध्ययनाकरिता मठाच्या शिष्यांच्या सहकार्याने ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी १९९३ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीत वर्षभर संस्कृत साहित्याचा अभ्यास करून ते आपल्या गावी परतले. उज्जयिनी जगद्गुरू श्री १००८ मरुळसिद्ध राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात दि. २८.४.१९९९ रोजी त्यांनी मानिहळ्ळी मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सांप्रत ते आपल्या मठाच्या परंपरेनुसार मौन अनुष्ठान, धर्मजागृती इत्यादींचे आयोजन करीत शाखामठांचा जीर्णोद्धार, मासिक चिंतनगोष्टी, सामूहिक विवाह इत्यादी उपक्रम राबवीत आहेत.

---

परिचय : प्रा. एम. पी. एम. शांतवीरय्या, एस.यू.जे.एम. कॉलेज, हरपनहळ्ळी.

## ३२९. श्री ष.ब्र. मृत्युंजय शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ

मु.पो. दोरनहळ्ळी, ता. शाहपूर,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)



हे वीरगोत्रीय आहेत. यांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत अभ्यास करून ते संस्कृत साहित्याच्या परीक्षेत उत्तीर्ण झाले. पडसावळगीच्या श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या आणि श्री. मल्लिनाथ नागुरे व श्री. सदाशिव पाटील यांच्या प्रोत्साहनाने उच्च व्यासंगाकरिता ते वयाच्या २२ व्या वर्षी काशी जंगमवाडी मठात आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २८.१०.१९९४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात अभ्यास करून त्यांनी संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री ही पदवी प्राप्त केली. सध्या ते दोरनहळ्ळीचे पट्टाध्यक्ष असून मठपरंपरेनुसार धार्मिक कार्य करीत आहेत.

## ३३०. श्री. विश्वेश्वर देव मुद्दय्या स्वामी हिरेमठ

मु.पो. तुरुविहाळ, ता. सिंधनूरु,
जि. रायचूरु (कर्नाटक)



हे वीरगोत्रीय असून व्याकरणाळ हिरेमठाचे वे. मुदय्यांचे सुपुत्र होत. त्यांना तुरुविहार शंकरलिंग स्वामी मठाचे उत्तराधिकारी निवडण्यात आले. ते बदामीच्या श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिराच्या श्री कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत संस्कृत साहित्याची परीक्षा उत्तीर्ण झाले. नंतर केळदी राजगुरू संस्थानमठाचे श्री ष.ब्र. डॉ. गुरुसिद्धदेव शिवाचार्य स्वामीजी आणि गावातील श्री. बसवनगौड सावकार या दोघांच्या प्रेरणेने आणि सहकार्याने उच्च व्यासंगाकरिता वयाच्या १९ व्या वर्षी ते काशी जंगमवाडी मठात आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २३.११.१९९४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात अभ्यास करून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी त्यांनी प्राप्त केली. तसेच काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कला संकायातील कन्नड विभागातून ते कन्नडमध्ये एम्.ए. झाले. नंतर स्वग्रामी परतून मठाच्या परंपरेनुसार धार्मिक कार्य करीत आकस्मिकपणे कैलासवासी झाले.

### ३३१. श्री ष.ब्र. डॉ. शिवकुमार शिवाचार्य स्वामीजी



चरंती मठ, मु.पो. केरूरु,
ता. बदामी, जि. बागलकोट (कर्नाटक)
चरभाष : ९४४८५५९९८५

केरूरुचा चरंती मठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. या मठाचे मूळ वंशज शिवमोग्गा जिल्ह्यातील तोगरसी गावचे होते, असे कागदपत्रांवरून समजते. हजारो वर्षांपूर्वी या वंशजांनी देशाचा संचार करीत तत्कालीन विजयपूर जिल्ह्याच्या चित्तरगी केलूरु सुळीकेरे व केरूरु या गावांत मठांची स्थापना केली. या मठांना पट्ट आणि चर असे दोन्ही अधिकार होते. केरूरुचा मठ चराधिकार असल्याने या मठास चरंतीमठ असे नाव पडले. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले. त्यामध्ये श्री ष.ब्र. गदगेय शिवाचार्य, श्री ष.ब्र. मंठेश्वर शिवाचार्य, श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य यांचाच इतिहास उपलब्ध आहे. त्यांच्यानंतर आलेले श्री ष.ब्र. डॉ. शिवकुमार शिवाचार्य हे केरूरु चरंतीमठाचे वे. राचय्या आणि सौ. शांतम्मा यांचे पाचवे सुपुत्र होत. दि. ६.१.१९६६ रोजी त्यांचा जन्म झाला. केरूरु येथे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेऊन ते सिंधनूरु येथून पदवीपूर्व परीक्षा उत्तीर्ण झाले. पुढे केरूरुच्या चरंतीमठाचे उत्तराधिकारी झाले. त्यांनी श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्राथमिक संस्कृतचे अध्ययन केले.

त्यानंतर बेंगळूरुच्या महांतमठात राहून त्यांनी ८ वर्षे अभ्यास केला. तेथे कन्नड एम्.ए. तसेच संस्कृत साहित्य या पदव्या मिळवल्या. १९९४ मध्ये चरंतीमठाचा पट्टाधिकार स्वीकारून उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कन्नड विभागात 'वचनसाहित्य आणि उपनिषदे : तुलनात्मक अध्ययन' या विषयावर प्रा. डॉ. व्ही. शिवानंद यांच्या मार्गदर्शनाखाली संशोधन केले. मार्गदर्शकाचे अकाली निधन झाल्यामुळे

धारवाडच्या कर्नाटक विश्वविद्यालयाच्या कन्नड विभागात त्याच विषयावर प्रबंध सादर करून त्यांनी दि. १९.१.२००४ रोजी डॉक्टरेट पदवी प्राप्त केली. त्यांच्या प्रबंधास उत्कृष्ट प्रबंध म्हणून राज्यपाल श्री. टी. एन. चतुर्वेदी यांच्याकडून दि. १७.१.२००५ रोजी सुवर्णपदक प्राप्त झाले. या प्रबंधाला मैसूरच्या सुत्तूरु मठाकडून २००४ चा शिवरात्रीश्वर प्रशस्ती पुरस्कार देऊन गौरविण्यात आले. उत्तम वक्ते असा त्यांचा लौकिक आहे. देशात ठिकठिकाणी वीरशैव सिद्धान्तावर त्यांची प्रवचने होत असतात. केरूरु येथे संस्कृत व आंग्ल भाषेच्या शिक्षणाची सोय एका शिक्षणसंस्थेची स्थापना करून त्यांनी उपलब्ध करून दिली आहे. या शिवाय कोण्णूरच्या विरक्त मठाची जबाबदारी स्वीकारून त्या मठाचेही कार्य ते यथोचितपणे पार पाडीत आहेत. ते वक्ते, चिंतक, समत्ववादी व ज्योतिषी असून त्यांना समाजात मोठा सन्मान आहे.

## ३३२. श्री श्रो. ब्र. स्वरूपानंद स्वामीजी

सद्गुरू सिद्धारूढ मठ, ओंकाराश्रम,
मु.पो.ता. इंडी, जि. विजयपूर (कर्नाटक)



हे चिक्करुगी (ता. सिंदगी, जि. विजयपूर) या गावच्या श्री. ईश्वरप्पा आणि सौ. गौरम्मा या शिवभक्त दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २०.७.१९६५ रोजी जन्मले. त्यांनी जन्मगावीच प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. दि. ३.१.१९७ रोजी विरक्त भावनेने त्यांनी गृहत्याग केला. संचार करीत असताना सिंदगी येथे बीदरच्या चिदंबराश्रमाचे श्री श्रो.ब्र. शिवकुमार स्वामीजींशी त्यांची भेट झाली. त्यांच्यासोबत ते बीदरला गेले. चार–पाच वर्षे चिदंबराश्रमात राहून अध्यात्माचा अभ्यास केला. पुढे गोनळ्ळीचे सद्भक्त आणि बैलहोंगल तालुक्यातील रुद्रप्पा शरण यांच्या प्रेरणेने व आर्थिक सहाय्याने संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. ८.८.१९९४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथे संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी मिळविली. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कन्नड विभागातून एम्.ए. ही पदवी संपादन केली. काशी जंगमवाडी मठाच्या शैवभारती शोधप्रतिष्ठानमध्ये पं. व्रजवल्लभ द्विवेदी यांच्या मार्गदर्शनाखाली 'शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त आणि शांकर वेदान्त : तुलनात्मक अध्ययन' या विषयावर शोधप्रबंध लिहून तो दिल्लीच्या राष्ट्रीय संस्कृत संस्थान येथे सादर करून डॉक्टरेट पदवी प्राप्त केली. २०१८ मध्ये इंडी येथे निर्माण केलेल्या ॐकार आश्रमाच्या उद्घाटनाच्या वेळी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांना निमंत्रित करून नवीन वास्तूमध्ये महास्वामीजींची पादपूजा करून आशीर्वाद घेतला. सहृदयी, विद्याविनयसंपन्न व वाक्पटू असे स्वरूपानंदजी निरंतर अध्यात्मविद्येच्या प्रचारात गुंतले आहेत.

## ३३३. श्री ष.ब्र. अभिनव सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी

बृहन्मठ (गुरुमठ), मु.पो. चिप्पलकट्टी,
ता. रामदुर्ग, जि. बेळगाव (कर्नाटक)



हे नंदिगोत्रीय असून श्री वे. गुरुसिद्धलिंग स्वामी व सौ. नीलम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. २०.७.१९७२ रोजी जन्मले. जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून ते मुरगोड महांत स्वामीजींच्या पाठशाळेत वर्षभर राहून धार्मिक विधींचा अभ्यास करून हुलकुंदच्या श्री रामेश्वर प्राथमिक शाळेतून दहावी परीक्षा उत्तीर्ण झाले. हावेरीच्या सिंदगी पट्टाध्यक्षांच्या श्री कुमारेश्वर धार्मिक पाठशाळेत मैसूर बोर्डाच्या प्रथमा, काव्य व ज्योतिष यांचा अभ्यास केला. नंतर गदगच्या तोंटदार्य मठात राहून जगद्गुरू तोंटदार्य कॉलेजातून पदवीपूर्व परीक्षेत उत्तीर्ण झाले. येथेच बसवेश्वर संस्कृत महाविद्यालयातून साहित्य परीक्षेत १९९२ मध्ये उत्तीर्ण झाले. नंतर गुळेदगुड्ड मरडी मठाचे श्री ष.ब्र. काडसिद्धेश्वर शिवाचार्य, चिप्पलकट्टीचे श्री. एस.बी. कळ्ळी आणि श्री. दुंडप्पा गौरीगुडी यांच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने वयाच्या २२ व्या वर्षी ते उच्च व्यासंगाकरिता काशी जंगमवाडी मठात आले. श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. २२.१०.१९९४ रोजी प्रवेश घेतला.

आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात अध्ययन करून १९९८ मध्ये शक्तिविशिष्टाद्वैत शास्त्री आणि २००० मध्ये वेदान्ताचार्य या पदव्या मिळविल्या. तसेच काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या कन्नड विभागात अभ्यास करून २००० मध्ये ते एम्.ए. झाले. दि. २१.४.२००३ रोजी पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात त्यांनी चिप्पलकट्टी बृहन्मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सध्या मठाच्या परंपरेप्रमाणे ते धार्मिक कार्य पार पाडत आहेत. त्यासोबत संपूर्णानंद संस्कृत विश्व-विद्यालयातील वेदान्त विभागात प्रा. श्री. सुधाकर मिश्र यांच्या मार्गदर्शनाखाली 'वीरशैव दर्शने ब्रह्मतत्त्व विमर्श:' या विषयावर पीएच.डी.करिता रजिस्ट्रेशन केले. परंतु काही कारणामुळे त्यांना संशोधन पूर्ण करता आले नाही.

## ३३४. श्री ष. ब्र. नूरंदेश्वर शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ

मु.पो. कक्कळमेली,
ता. सिंदगी, जि. विजयपूर (कर्नाटक)



हे नंदिगोत्रीय असून पूर्वाश्रमी कक्कळमेली हिरेमठाचे श्री. वे. मरुळय्या आणि सौ. बसम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.७.१९७४ रोजी जन्मले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून होन्नाळी हिरेमठाच्या जडेय शंकर स्वामी शाळेत माध्यमिक शिक्षण घेतले. त्याबरोबर संस्कृतच्या काव्यपरीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर गुरुवर्य श्री ष.ब्र. चन्नमल्लिकार्जुन स्वामीजी आणि मागनगेरीचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. डॉ. विश्वाराध्य शिवाचार्य यांच्या प्रोत्साहनाने, कक्कळमेलीचे श्री. सिद्धलिंगप्पा हळेप्पनवर यांच्या आर्थिक सहाय्याने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २३.११.१९९४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात ८ वर्षे अभ्यास करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तीतील शास्त्री व आचार्य परीक्षा ते उत्तम श्रेणीत उत्तीर्ण झाले.

नंतर कक्कळमेली हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. तसेच मठपरंपरेनुसार ते धार्मिक आणि सामाजिक कार्यक्रम निरंतर पार पाडीत आपल्या मठात विद्यार्थ्यांच्या निवासाची व्यवस्था करून त्यांना ज्योतिषशास्त्र शिकवीत होते. कक्कळमेली हिरेमठावर आजपर्यंत ११ पट्टाधिकारी होऊन गेले असून या मठाला ४५ एकर इनामी जमीन आहे. काही कारणामुळे ते आकस्मिकपणे शिवैक्य झाले. सध्या ही गादी रिक्त आहे.

३३५. **श्री. कळकनगौड बसवनगौड गौडर**



मु.पो. गेदगेरी,
ता. यलबुर्गा, जि. कोप्पळ (कर्नाटक)
चरभाष : ९४५११९७६४३

बालपणापासून हे संगीतप्रेमी असून त्यांनी गदगच्या वीरेश्वर पुण्याश्रम पंचाक्षरी गवई संगीत महाविद्यालयातून पिटीलमधील बी.म्युझिक परीक्षा उत्तीर्ण केली. पुढील संगीत शिक्षणासाठी ते काशीक्षेत्री आले. जंगमवाडी मठाच्या जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १९.१०.१९९५ रोजी त्यांनी प्रवेश घेतला. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या संगीत महाविद्यालयात पिटील वाद्य विषयात एम.म्युझिक परीक्षा उत्तीर्ण झाले. हल्ली त्याच विषयात संशोधनकार्य करीत आहेत. संगीताबरोबरच त्यांना योगसाधनेत रस असून त्यांनी काशी हिंदू विश्वविद्यालयातून योगामधील पदविका आणि कन्नडमधील एम.ए. ही पदवी प्राप्त केली. तसेच महात्मा गांधी काशी विद्यापीठातून पी.जी. डिप्लोमा इन नॅचरोपॅथी सायन्स अँड योग ही स्नातकोत्तर उपाधीदेखील प्राप्त केली आहे.

काशीपीठात दि. १४.८.२००७ पासून २९.११.२००७ पर्यंत १०८ दिवस पार पडलेल्या श्री जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या षष्ठ्यब्दी शिवयोग शिबिराचे ते प्रमुख होते. यात्रिकांकडून आसन, प्राणायाम, ध्यान इत्यादी क्रिया त्यांनी करवून घेतल्या. त्यांच्या या सेवेमुळे संतुष्ट होऊन श्रीकाशीमहास्वामीजींनी प्रशस्ती देऊन त्यांचा गौरव केला.

सध्या ते काशी म. गांधी विद्यापीठात कन्नडचे प्राध्यापक म्हणून कार्यरत आहेत. तसेच श्रीकाशीपीठाच्या विश्वेश्वर गंज येथील हनुमान मंदिरात निवास करून मंदिराचे पूजापाठ व्यवस्था करतात. हे गृहस्थाश्रमी असून त्यांना एक मुलगा, एक मुलगी अशी दोन अपत्ये असून ते काशीतच वास्तव्याला आहेत.

३३६. **श्री वे. काशीलिंग वि. मठ**



मु.पो. आळूरु,
ता. इंडी, जि. विजयपूर (कर्नाटक)
चरभाष : ९८४४०८०६११

श्रीकाशीलिंग मठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. आळूरुच्या श्री. विरूपाक्षय्या मठ आणि सौ. शिवलिंगम्मा या माहेश्वर दंपतीच्या उदरी दि. ५.४.१९७३ रोजी यांचा जन्म झाला. लच्चाण येथे त्यांनी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर गदग येथे पदवीपूर्व शिक्षण घेतले. उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १९.१०.१९९५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या संगीत विभागातून संगीत पदविका आणि कला महाविद्यालयातून कन्नडमधील एम्.ए. ही पदवी प्राप्त केली. त्यानंतर छत्तीसगडच्या इंदिरा कला व संगीत विश्वविद्यालयातून संगीतातील स्नातकोत्तर पदवी प्राप्त केली. सितारवादनात प्राविण्य मिळविले. बेंगळूरुच्या क्विन्स कॉलेजमध्ये काही दिवस सेवा करून हल्ली बागलकोटच्या श्री बसवेश्वर कला महाविद्यालयात संगीत प्राध्यापक म्हणून सेवा करीत आहेत. काशी वीरशैव विद्वत्संघाचे ते सक्रिय सदस्य होते.

## ३३७. श्री ष.ब्र. ज्ञानसिद्ध ओंकार शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ कडबगाव, हाली वस्ती, जंगमवाडी,
ता. उदगीर, जि. लातूर (महाराष्ट्र)
चरभाष : ९४२२६१२४१४

श्री. वे. सिद्धय्या हिरेमठ हे कडबगावचे श्री. वे. शिवरुद्रय्या हिरेमठ आणि सौ. बंगारम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २२.१.१९७७ रोजी जन्मले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक व करजगी येथे माध्यमिक शिक्षण घेतले. अक्कलकोट येथे पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर आईवडिलांच्या इच्छेनुसार गुरुसेवा व धार्मिक अध्ययन करण्यासाठी त्यांनी दि. २२.४.१९९५ रोजी काशी जंगमवाडी मठातील गुरुकुलात प्रवेश घेतला. श्रीकाशीमहास्वामीजी डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या पूजेत सेवा करीत धार्मिक व संस्कृत अध्ययन केले. १९९९ ते २००० पर्यंत २ वर्षे प्रयागक्षेत्रातील जंगमवाडी मठात व्यवस्थापक म्हणून कार्य केले.

२००० ते २००२ पर्यंत श्रीशैलक्षेत्रातील वीरशैव गुरुकुलात वैदिक विद्येचा अभ्यास करून ते वेदाचार्य झाले. नंतर महाराष्ट्रातील लातूरच्या चौदाघर मठात श्री जगद्गुरू पंचाचार्य वैदिक पाठशाळेचे प्राचार्य म्हणून त्यांनी विद्यार्थ्यांना वेदविद्या शिकविली. ते लातूरमधील महिलांना देखील वेदविद्येचे पाठ देतात. आतापर्यंत ५०० पेक्षा अधिक महिलांनी श्रीरुद्र आदी वैदिक मंत्रांचे शिक्षण घेतले असून त्या सार्वजनिक समारंभात सहभागी होतात. लातूरच्या विविध भागांत अनेक रुद्र महिला संघ स्थापन झाले असून संपूर्ण शहरात एक धार्मिक वातावरण निर्माण झाले आहे. वेदाचार्य श्री सिद्धय्या स्वामींचे हे कार्य प्रशंसनीय असून सध्या उदगीरजवळ जंगमवाडी या गावात एक वेदपाठशाळा स्थापन करून त्या भागातील माहेश्वर बटूंना ते वेदविद्या शिकवीत आहेत. तेथेच त्यांचा दि. ३.२.२०१२ रोजी पट्टाभिषेक झाला असून त्यांचे नूतन नामकरण 'श्री ष.ब्र. ज्ञानसिद्ध ओंकार शिवाचार्य' असे करण्यात आले आहे.

३३८. **श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजी**



संस्थान मठ, रविवार पेठ,
मु.पो.ता. अंबाजोगाई, जि. बीड (महाराष्ट्र)
चरभाष : ९४२२७४३१८८

हे चिंचणसूर (ता. आळंद, जि. कलबुर्गी) या गावच्या श्री वे. मरुळसिद्धय्या कल्लय्या हिरेमठ यांचे सुपुत्र होत. त्यांचा जन्म दि. १७.८.१९६७ रोजी बुधवारी झाला. ते मूळचे उज्जयिनीपीठाचे शाखानुवर्ती होत. चिंचणसूर येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण करून १९८६ मध्ये ते हुब्बळीस गेले. तेथील मूरुसाविर मठात राहून काडसिद्धेश्वर महाविद्यालयातून त्यांनी बी.ए. ही पदवी मिळविली. त्याबरोबरच संस्कृत साहित्य परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर महाराष्ट्रातील अंबेजोगाई येथील रंभापुरी पीठाच्या शाखा असलेल्या श्री शंभुलिंग संस्थानमठाचा दि. २.५.१९९५ रोजी त्यांनी पट्टाधिकार स्वीकारला. उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने मध्ये त्यांनी १९९६ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा ३ वर्षे अभ्यास करून संपूर्णानंद विश्वविद्यालयाची शास्त्री पदवी मिळविली. २००० मध्ये अंबेजोगाई येथे ते परतले. तेथे मठाच्या परंपरेनुसार श्रावणमास अनुष्ठान, परमरहस्य पारायण, सप्ताह, सामूहिक दीक्षा, प्रवचन इत्यादी करीत महाराष्ट्रात धर्मकार्य करीत आहेत. दि. २८.१२.२००७ रोजी पंचपीठांच्या जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात महाराष्ट्राचे तत्कालीन मुख्यमंत्री विलासराव देशमुख यांच्या उपस्थितीत त्यांच्या पट्टाभिषेकाचा द्वादश वार्षिक महोत्सव वैभवाने पार पडला.

## ३३९. श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्य स्वामीजी



शंकरलिंगेश्वर संस्थान बृहन्मठ,
मु.पो. उडचण, ता. अफझलपूर,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमी विजयपूरच्या गंगली हिरेमठाचे श्री. वे. शिवमूर्तय्या आणि सौ. गौरम्मा यांच्या उदरी दि. २६.३.१९७८ रोजी जन्मले. शिवपूजी देवरू असे त्यांचे नाव ठेवले गेले. त्यांनी विजापुरात आपले प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे संस्कृतच्या अध्ययनासाठी त्यांनी हुब्बळी मूरूसाविर मठाच्या श्रीगुरू सिद्धेश्वर संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन १९९३ पासून १९९६ पर्यंत अध्ययन केले. नंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. १.७.१९९६ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त या विषयाचा अभ्यास करून २००३ मध्ये संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शास्त्री ही पदवी प्राप्त केली. हल्ली ते उज्जयिनी पीठाचा शाखामठ असलेल्या उडचणच्या शंकरलिंगेश्वर संस्थान बृहन्मठाचा पट्टाधिकार स्वीकारून परंपरेनुसार धार्मिक कार्यक्रम पार पाडीत आहेत.

३४०. **श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी**



बिल्वाश्रम हिरेमठ,
मु. बिलकेरुरू, ता.जि. बागलकोट (कर्नाटक)
चरभाष : ९४४८०२१४७४, ९९१६२२३४१७

बिलकेरुरूचा बिल्वाश्रम हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. या परंपरेतील श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजींचा बिलकेरुरूच्या श्री. वे. करवीरय्या आणि सौ. शांतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९७५ रोजी जन्म झाला. त्यांनी सोलापूरला होटगी बृहन्मठ येथे प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर होन्नाळीतील हिरेकल्मठात प्रवेश घेऊन माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. हुब्बळीच्या मूरुसाविर मठात राहून पदवीपूर्व शिक्षण घेतले. त्यासोबत संस्कृतचाही अभ्यास केला. मठाच्या भक्तांच्या सहकार्याने उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने १९९६ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन ४ वर्षे अध्ययन करून त्यांनी संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची वेदान्तशास्त्री ही पदवी संपादन केली. दि. २६.१.१९९९ मध्ये जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात बिलकेरुरू बिल्वाश्रम मठाचा पट्टाधिकार स्वीकारला.

श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्यांनी पट्टाधिकार झाल्यानंतर आपल्या मूळ मठाच्या शाखामठांचे नायिनेगिली, बेन्नूरु, तिम्मापूर, अडिहाळ, कुंटोजी, तंगडगी व हुनकुंटी या गावातील मठांचा जीर्णोद्धार केला आहे. त्याशिवाय बिलकेरुरूच्या मूळ मठाचा संपूर्ण जीर्णोद्धार करून नवनिर्माण केले. दि. १६ आणि १७ मे २०१९ रोजी आपले गुरू लिं. रुद्रमुनी शिवाचार्यांच्या जन्मशताब्दी महोत्सवाच्या निमित्ताने समाधीची प्रतिष्ठापना, नूतन मठाचे उद्घाटन आणि सामूहिक विवाह समारंभ या निमित्ताने जगद्गुरू पंचाचार्यांचा

अड्डपालखी महोत्सव अत्यंत वैभवाने संपन्न झाला. लाखो भक्तगण या समारंभात सहभागी होऊन जगद्‌गुरू पंचाचार्यांच्या कृपाशीर्वादाने पुनीत झाले. मठाधिपती श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी लहान वयामध्ये अनेक धार्मिक कार्यक्रम करीत भक्तांच्या गौरवास पात्र झालेले आहेत. सर्वच मठांत ते धार्मिक कार्यक्रम घेत मठाची परंपरा समर्थपणे चालवीत आहेत.

### ३४१. श्री ष.ब्र. शितिकंठेश्वर शिवाचार्य स्वामीजी

पंचग्रह हिरेमठ,

मु.पो. कुंदगोळ, ता.जि. धारवाड (कर्नाटक)



कुंदगोळचा पंचग्रह हिरेमठ हा काशीपीठाचा इतिहासप्रसिद्ध शाखामठ आहे. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. या शतकातील या मठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी हे फार प्रसिद्ध होते. पुराणप्रवचनात ते अत्यंत प्रवीण असल्यामुळे त्यांना पंचपीठाचार्यांकडून 'प्रवचनाचार्य' व 'पुराणप्रवचन कंठीरव' अशा पदव्या प्राप्त झाल्या.

या मठाचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. शितिकंठेश्वर शिवाचार्य हे पूर्वाश्रमी हूलीच्या श्री. वे. गंगय्या व सौ. विजयम्मा या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ८.७.१९८० रोजी जन्मले. प्रवीणकुमार असे त्यांचे नामकरण करण्यात आले. कुंदगोळ येथे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण तसेच धारवाड येथे त्यांनी पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर लिंगैक्य सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या अंतिम इच्छेनुसार दि. १६.७.१९९७ रोजी श्रीकाशीजगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीरंभापुरी जगद्‌गुरू वीरसोमेश्वर प्रसन्नरेणुक शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात कुंदगोळ हिरेमठावर त्यांचा पट्टाधिकार कार्यक्रम वैभवाने पार पडला. भक्तांच्या अपेक्षेनुसार उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात १९९७ मध्ये प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन संस्कृत साहित्याचा अभ्यास केला. त्यासोबत शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त या विषयाचाही अभ्यास केला. शिवाय ज्योतिष व वास्तुशास्त्र यांतही ते पारंगत झाले. ३-४ वर्षे काशीत राहून ते स्वग्रामी परतले. हल्ली कुंदगोळ हिरेमठाचे परंपरेनुसार ते कार्यक्रम पार पाडीत असतात. शिवाय ज्योतिष तसेच वास्तुशास्त्रानुसार भक्तांना योग्य मार्गदर्शन करीत असतात.

**३४२. श्री चन्नमल्ल स्वामी गुरुबसवेश्वर मठ,**

मक्तमपूर, मु.पो.ता.जि. कलबुर्गी (कर्नाटक)

चरभाष : ९४४८२०९९९५



कुकनूरु (ता. जेवरगी, जि. कलबुर्गी) येथील हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. या मठाचे वे. बनय्या स्वामी आणि सौ. शारदाबाई यांच्या पुण्यगर्भी दि. १.१०.१९७८ रोजी चन्नमल्ल स्वामी यांचा जन्म झाला. जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेऊन त्यांनी धार्मिक व संस्कृत अध्ययनाकरिता श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्रवेश घेतला. तेथील शिक्षण पूर्ण करून हुब्बळी मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात ते अभ्यासात मग्न झाले. त्याचवेळी मूरुसाविर मठाचे श्री म.नि.प्र. गंगाधर राजयोगींद्र महास्वामीजींनी त्यांना गुलबर्ग्यांच्या श्रीगुरू बसवेश्वर बृहन्मठावर दि. १.१.१९९६ रोजी मठाधिपती म्हणून घेण्याचा निर्णय घेतला.

नंतर संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. २१.९.१९९७ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा अभ्यास करून ते संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या शास्त्री परीक्षेत उत्तीर्ण झाले. हल्ली कलबुर्गीच्या धार्मिक, सामाजिक व शैक्षणिक कार्यात ते मग्न असून त्यांनी आपल्या पूर्वाश्रमीच्या पुत्रवर्ग परंपरेच्या कुकनूरु हिरेमठाचा जीर्णोद्धार केला आहे.

३४३. **श्री ष.ब्र. सदानंद शिवाचार्य चरमूर्तेश्वरमठ**



मु.पो. गुरगुंटा, ता. लिंगसूगुरू,
जि. रायचूरु (कर्नाटक)
चरभाष : ९९४५८२१३६३

हे वृषभगोत्रीय असून पूर्वाश्रमी श्री वे. अदय्या आणि सौ. सिद्धलिंगम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. १.४.१९७८ रोजी जन्मले. जन्मगावी त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर शिवयोग मंदिर आणि वीरापूर येथे संस्कृत साहित्य व ज्योतिषशास्त्र यांचा अभ्यास केला. पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. दि. १.१०.१९९७ रोजी वयाच्या २० व्या वर्षी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात त्यांनी प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात अभ्यास करून त्यांनी संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तातील शास्त्री ही पदवी प्राप्त केली. सध्या गुरगुंटच्या पुत्रवर्ग परंपरेच्या चरमूर्तेश्वरमठाचे ते पट्टाधिकारी असून त्या भागात धार्मिक कार्यक्रम व्यवस्थितपणे पार पाडीत आहेत. यंत्र-मंत्रसिद्ध असणारे हे स्वामीजी असून दुष्ट शक्तीने पीडित असलेल्या भक्तांना पीडेपासून मुक्त करतात.

## ३४४. श्री ष.ब्र. नंदिकेश्वर शिवाचार्य स्वामीजी

संस्थान मठ,

मु.पो.ता. सोनपेठ, जि. परभणी (महाराष्ट्र)



हे वीरगोत्रीय असून पूर्वाश्रमीचे विजयपूर जिल्ह्यातील सिंदगी तालुक्याच्या कोरवार हिरेमठाचे श्री.वे. गुरुस्वामी यांचे सुपुत्र होत. यांचे नाव बसवलिंग देव असे होते. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. होन्नाळीच्या हिरेकल्मठात आणि हुब्बळीच्या मूरुसाविर मठात प्राथमिक संस्कृताध्ययन पूर्ण केले. संस्कृत साहित्य परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. दि. १.१०.१९९७ रोजी येथील श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात वयाच्या २१ व्या वर्षी प्रवेश घेतला. येथील ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात शास्त्री वर्गात प्रवेश घेतला. पुढे संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त शास्त्री ही उपाधी प्राप्त केली.

सांप्रत महाराष्ट्राच्या उज्जयिनी शाखामठ असणाऱ्या सोनपेठ संस्थानमठास २००० मध्ये पट्टाध्यक्ष होऊन या भागात सदैव धार्मिक कार्यक्रम करीत धर्मजागरणाचे कार्य करीत असतात. दि. १० व ११ डिसेंबर २००५ रोजी पट्टाभिषेकाचा ५ व्या वर्धापन महोत्सवाच्या निमित्ताने त्यांनी पंचपीठाधिपती जगद्गुरूंच्या अड्डपालखी महोत्सवाचे आयोजन करून मोठ्या प्रमाणावर धार्मिक समारंभाचे आयोजन केले होते. या कार्यक्रमामुळे त्यांना विशेष प्रसिद्धी मिळाली. नंदिकेश्वर मठास आजपर्यंत १३ शिवाचार्य होऊन गेले आहेत. सध्याचे श्री ष.ब्र. नंदिकेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे १४ वे शिवाचार्य होत.

श्री ष.ब्र. नंदिकेश्वर शिवाचार्य महाराज प्रत्येक श्रावण मासामध्ये एकेक ज्योतिर्लिंगक्षेत्री अनुष्ठान करून त्यांनी १२ ज्योतिर्लिंगे पूर्ण केली आहेत. प्रत्येक नवरात्रीमध्ये आपल्या मठात ते अनुष्ठान करतात आणि

आपल्या गुरूंची पुण्यतिथी आणि आपल्या वर्धापनाच्या निमित्ताने दरवर्षी मठामध्ये सप्ताह कार्यक्रम करतात. त्यावेळी मठाचे सर्व भक्त उपस्थित होऊन परमरहस्य पारायणात सहभागी होतात. प्रत्येक वर्षी मे महिन्यात वैदिक शिबिर चालवून अनेक माहेश्वर बटूंना धार्मिक प्रशिक्षण देतात. २ वर्षांपूर्वी परळी येथे काशी जगद्गुरू महास्वामीजींच्या तपोनुष्ठानाचे नेतृत्व करून अत्यंत वैभवाने पार पाडला. असे पंचाचार्यांवर नितांत श्रद्धा ठेवणारे हे शिवाचार्य सर्व पीठाचार्यांच्या कृपेस पात्र झाले आहेत.

## ३४५. वीरमहांत शिवाचार्य स्वामीजी हिरेमठ

मु.पो. देवरहिप्परगी, ता. सिंदगी,
जि. विजयपूर (कर्नाटक)



देवरहिप्परगीचे श्री. वे. प्रभय्या आणि सौ. सुग्गलादेवी या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १७.१२.१९६८ रोजी यांचा जन्म झाला. हे त्यांचे ज्येष्ठ पुत्र होत. मडिवाळेश्वर देवरू असे त्यांचे नाव ठेवले गेले. देवरहिप्परगीचा मठ उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्ग परंपरेतील मठ आहे. श्री मडिवाळेश्वर यांना बालपणीच या मठाचे उत्तराधिकारी म्हणून नेमले गेले. त्यांचे प्राथमिक शिक्षण हिप्परगी व संस्कृत, योग, वेदान्ताध्ययन इत्यादी शिक्षण त्यांनी दि. ८.६.१९९२ पासून शिवयोग मंदिरात घेतले. पुढे दि. १०.६.१९९३ पासून हुब्बळीच्या मूरुसाविर मठाच्या श्री गंगाधर संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन १९९६ पर्यंत संस्कृतचे अध्ययन केले. उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने १९९७ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत या विषयाचे अध्ययन करून शास्त्री व आचार्य या पदव्या प्राप्त केल्या. अध्ययनकाळात काशी वीरशैव विद्वत्संघाचे ते सक्रिय सदस्य होते. सर्वांसोबत स्नेहभावाने वागून त्यांनी विद्वत्ता प्राप्त केली. २००२ मध्ये श्री उज्जयिनी आणि श्रीकाशी या जगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात त्यांनी पुत्रवर्ग मठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सुशील व वाक्पटू असणारे हे स्वामीजी मठपरंपरेनुसार धार्मिक कार्य पार पाडीत आहेत.

३४६. **श्री ष.ब्र. मरुळसिद्ध शिवाचार्य स्वामीजी**

शिवाय नमः मठसंस्थान, मु.पो. कारंजा (लाड), जि. वाशीम (महाराष्ट्र)



महाराष्ट्राच्या विदर्भातील कारंजा लाड (जि. वाशीम) येथील शिवाय नमः मठसंस्थान हा अत्यंत प्राचीन परंपरा असलेला मठ आहे. उज्जयनीपीठाचा हा शाखामठ असून इ. स. १७९० मध्ये श्री ष.ब्र. शांतलिंग शिवाचार्य स्वामीजींनी या मठाची स्थापना केली. विदर्भ व मराठवाड्यात वीरशैवधर्माचा प्रसार करून त्यांनी जनतेत जागृती केली आणि १८५० मध्ये ते लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी अमरावतीच्या शाखामठात आहे. त्यांच्यानंतर त्यांचे उत्तराधिकारी श्री ष.ब्र. शिवलिंग स्वामीजी यांनी मठाधिपती होऊन कार्य केले. ते कर्नाटकातील भालकी भागातले होते. अत्यंत विरक्त वृत्तीचे असल्याने ते आपले पूर्वीचे नाव सांगत नसत. त्यांनी आपल्या काळात श्री बसवलिंग स्वामी यांना उत्तराधिकारी नेमून ते लिंगैक्य झाले. त्यांची क्रियासमाधी अमरावती येथील शाखामठात आहे.

श्री ष.ब्र. बसवलिंग शिवाचार्य स्वामीजींनी सिद्धी प्राप्त केली होती. ते नेहमी शिवपंचाक्षरी मंत्राचा जप करीत असत. म्हणून लोक त्यांना 'शिवाय नमः महाराज' असे म्हणू लागले. त्यामुळे या मठाचे नाव पुढे 'शिवाय नमः मठ' असे पडले. १७९० मध्ये या मठाची स्थापना झाली तेव्हा त्याला जंगम मठ (जंगमाची धुनी) असे म्हणत होते. श्री ष.ब्र. शिवाय नमः महाराजांना संस्कृत, कन्नड आणि मराठी या भाषा अवगत होत्या. विदर्भ भागात वीरशैवधर्माचा प्रचार करण्याबरोबर नागपूर, अमरावती, पांढुर्णा, हिंगोली आणि कोठारी येथे विशाल शिवनाम सप्ताह घेऊन त्यांनी शिवभक्ती वृद्धिंगत केली. १८९० मध्ये कारंजा मठात शिवनाम सप्ताह करून त्यांनी शिवलिंग स्थापन केले होते. ते रसायनशास्त्रात तज्ज्ञ असून त्यांनी तांब्यापासून सुवर्ण तयार केले होते असे सांगतात. त्यांनी वीरशैवधर्माचा प्रचार करून

१९२३ मध्ये ब्रिटीश कलेक्टरची विशेष अनुमती घेऊन जिवंत समाधी घेतली. आज कारंजा येथे त्यांच्या जिवंत समाधीची पूजा होत असते. यांचे प्राचीन भावचित्र आणि त्यांनी रचलेले अभंग मठात उपलब्ध आहेत.

त्यांच्यानंतर त्यांचे शिष्य श्री ष.ब्र. गुरुलिंग शिवाचार्य स्वामीजी यांनी १९२३ पासून १९७६ पर्यंत मठाधिपती म्हणून कार्य पाहिले. दि. २०.४.१९७६ रोजी ते लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर श्री ष.ब्र. मरुळसिद्ध शिवाचार्य स्वामीजी हे मठाधिपती झाले. महाराष्ट्रातील अमरावतीजवळच्या अंजनगाव बारी या गावातील श्री. वे. गणपतीअय्या तीर्थंकर व सौ. सुभद्राबाई या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १२.९.१९५० रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे दिगंबर असे नामकरण करण्यात आले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून नागपूर येथे दहावी, वर्धा येथे बी.ए. आणि अमरावती येथे एम्.ए. या पदव्या प्राप्त केल्या. नंतर कारंजा येथील शिवाय नमः मठसंस्थानचे उत्तराधिकारी म्हणून १९९२ मध्ये श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य साखरखेर्डेकर यांच्याकडून संस्कार ग्रहण केला. त्यानंतर १९९६ मध्ये श्रीमत्काशी ज्ञानसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात साखरखेर्ड्याचे श्री ष.ब्र. सिद्धेश्वर शिवाचार्य स्वामीजी यांच्या नेतृत्वाखाली त्यांचा पट्टाधिकार समारंभ पार पडला. त्या कार्यक्रमात हजारो लोक सहभागी झाले होते.

पुढे उच्च व्यासंगाकरिता त्यांनी श्रीकाशीजगद्गुरूंच्या अनुमतीने १९९७ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा २ वर्षे अभ्यास करून वेदान्ताचार्य ही पदवी संपादन केली. उच्चविद्याविभूषित, वाक्पटू व तपस्वी अशा या स्वामीजींनी महाराष्ट्राच्या विविध भागांत वीरशैवधर्माचा प्रचार करीत पंचाक्षरी मंत्राचा बारा कोटी जप लिहून पूर्ण केला. २००८ मध्ये मोठ्या प्रमाणावर कार्यक्रम आयोजित केला होता. या भागातील मठाधिपतींपैकी काशीपीठाचा अभिमान बाळगणारे हे स्वामीजी होत.

## ३४७. श्री ष.ब्र. विश्वाराध्य शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु.पो. जक्कली,

ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)



जक्कली हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील मठ आहे. श्री विश्वाराध्य स्वामीजी हे पूर्वाश्रमी जक्कली हिरेमठाचे वे. शरणबसय्या आणि सौ. शांतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ४.४.१९७४ रोजी जन्मास आले. त्यांचे गुरुबसय्या असे नामकरण केले गेले. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. ते २ वर्षाचे असतानाच १९७६ मध्ये श्री १००८ जगद्‌गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात जक्कली हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांचे नाव घोषित करण्यात आले. १९८२ मध्ये श्री १००८ जगद्‌गुरू वीरगंगाधर शिवाचार्य महास्वामीजींच्या सान्निध्यात अब्बिगेरीचे श्री ष.ब्र. सोमशेखर शिवाचार्य स्वामीजींकडून त्यांना जक्कली हिरेमठावर पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्याचे 'ष.ब्र. गुरुबसव शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. १९९० मध्ये जक्कली येथे जगद्‌गुरू पंचाचार्य पीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात त्यांचे 'श्री ष.ब्र. विश्वाराध्य शिवाचार्य स्वामीजी' असे नूतन नामकरण करण्यात आले.

त्यानंतर त्यांना धार्मिक शिक्षणाकरिता होन्नाळीच्या हिरेकल्मठात पाठवण्यात आले. उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्‌गुरू चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात त्यांनी १९९८ मध्ये प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा ५ वर्षे अभ्यास करून त्यांनी वेदान्ताचार्य ही पदवी प्राप्त केली. हल्ली कर्नाटकात ते धर्मप्रसाराचे कार्य करीत आहेत.

## ३४८. श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ, मु.पो. नरेगल,
ता. रोण, जि. गदग (कर्नाटक)
चरभाष : ९४४८९१५६६७

नरेगल हिरेमठ हा उज्जयिनीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील मठ आहे. या मठात उज्जयिनी पीठाच्या मळेमल्लेश्वरांनी तपश्चर्या केली असे सांगितले जाते. त्यामुळे त्या मठाला मळेमल्लेश्वर हिरेमठ असे नाव पडले. या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले असून मध्यंतरी ४० वर्षे या मठावर पट्टाध्यक्षच नव्हते. गावातील समस्त सद्भक्तांनी १९८७ मध्ये श्री मल्लिकार्जुन स्वामीजींना मठाचा उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले. श्री मल्लिकार्जुन स्वामीजींचा जन्म नरेगलच्या श्री मळेमलेश्वर हिरेमठाचे श्री. वे. सदाशिवय्या आणि सौ. विशालाक्षम्मा यांच्या पुण्यगर्भी दि. २०.६.१९७४ रोजी झाला. जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून त्यांनी संस्कृतच्या अध्ययनासाठी होन्नाळीच्या हिरेमठात प्रवेश घेतला. तेथील अध्ययन पूर्ण करून मैसूरच्या जपदकट्टे मठात आणि जे.एस.एस. गुरुकुलात राहून मैसूर महाराजा संस्कृत महाविद्यालयातून साहित्य या विषयातील विद्वत्मध्यमा या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले.

पुढे उच्च व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास येऊन काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. १७.९.१९९८ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात ५ वर्षे अभ्यास करून त्यांनी शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तात शास्त्री व आचार्य या पदव्या मिळविल्या. ते उत्तम वक्ते असून श्रीसिद्धान्तशिखामणी व भगवद्गीता यांवर उत्तम प्रवचन करतात. त्यांनी स्वत:ला धर्मजागृतीच्या कार्यात गुंतवून घेतले आहे.

सध्या सौंदत्तीच्यो मूलीमठाचे गादीवर सुद्धा त्यांचा पट्टाभिषेक झाला असून नरेगल आणि सौंदत्ती दोन्ही मठांची धार्मिक परंपरा सांभाळीत आहेत.

३४९. **श्री. म.नि.प्र. कुमार विरूपाक्षेश्वर स्वामीजी (बसवराज देव)**



विरक्त मठ, मु.पो.उप्पीन बेटगेरी,
ता.जि. धारवाड (कर्नाटक)
(मु.पो. नळदुर्ग, ता.तुळजापूर, जि. उस्मानाबाद, महाराष्ट्र)

श्री कुमार विरूपाक्ष स्वामीजींचा जन्मे पूर्वाश्रमी नळदुर्गचे (ता. तुळजापूर जि. उस्मानाबाद) राजगुरू शिवलिंगेश्वर हिरेमठाचे श्री. वे.मू. मडिवाळय्या व सौ. शांतम्मा यांच्या पुण्यगर्भी २२.३.१९७४ रोजी मादनहिप्परगी गावी झाला. त्यांचे बसवराज देव असे नामकरण झाले. नळदुर्गचा हिरेमठ रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. नळदुर्ग हे इतिहासप्रसिद्ध गाव आहे. नळचक्रवर्ती महाराजांनी येथे एक किल्ला बांधल्यामुळे त्या गावचे नाव नळदुर्ग असे पडले. या मठाचे मूळ शिवलिंगेश्वर शिवाचार्य महाराज त्या नळमहाराजांचे कुलगुरू होते असा इतिहास आहे. म्हणून या मठाला राजगुरू शिवलिंगेश्वर हिरेमठ असे म्हणतात. या मठाची परंपरा हजारो वर्षे प्राचीन आहे.

चि. बसवराज यांनी आपले प्राथमिक अध्ययन नळदुर्ग येथे पूर्ण केले. नळदुर्ग राजगुरू शिवलिंगेश्वर हिरेमठाचे श्री ष.ब्र. नागेंद्र शिवाचार्य महाराजांनी चि. बसवराज यांचा आपल्या गादीवर त्यांचा वयाच्या १२ व्या वर्षी पट्टाभिषेक केला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. बसवराज शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. नंतर त्यांनी हावेरी हुक्केरी मठाचे श्री म.नि.प्र. शिवलिंग स्वामीजी यांच्या आदेशानुसार धार्मिक अध्ययनासाठी हावेरी येथील सिंदगी मठाच्या पाठशाळेत २ वर्षे अध्ययन केले. शिवयोग मंदिरामध्ये ३ वर्षे पूजापाठ आणि योगाभ्यास केला. मैसूरच्या सुत्तूर मठामध्ये ३ वर्षे राहून थोडे संस्कृत आणि धार्मिक अध्ययन केले. हुब्बळी मूरुसाविर मठात ३ वर्षे अध्ययन केले.

त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी काशीत आले. येथे ज. महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १७.९.१९९८ रोजी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलामध्ये प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये पूर्व मध्यमा, उत्तरमध्यमा पूर्ण करून गावी परतले. त्यावेळी धारवाड जिल्हा उप्पीनबेटगेरी येथे मूरुसाविर विरक्त गादीवर त्यांचा २०१४ मध्ये निरंजन पट्टाधिकार झाला. ते विद्वान, श्रेष्ठ प्रवचनकार असल्यामुळे त्यांची विद्वत्ता पाहून चिकलपरवी (ता. मानवी, जि. रायचूरु) येथील श्री रुद्रमुनीश्वर या विरक्त मठाच्या गादीवर २०१४ मध्ये पुन्हा निरंजन पट्टाधिकार झाला. सध्या श्री म.नि.प्र. कुमार विरूपाक्ष स्वामीजी नळदुर्ग, उप्पीनबेटगेरी आणि चिकलपरवी या तिन्ही मठांचे सर्व धार्मिक कार्यक्रम पार पाडतात. बसवपुराणाच्या प्रवचनामध्ये हे अत्यंत प्रसिद्ध असून तीन मासपर्यंत अखंड प्रवचन करतात. काशीपीठ गुरुकुलाच्या विद्यार्थ्याने पट्टाधिकारी मठ आणि विरक्त मठ दोन्ही सांभाळून जगाला समन्वय दृष्टीची ओळख करून दिली आहे.

३५०. **श्री विश्वमहान्त देवरू दुरदुंडीश्वरमठ**



मु.पो. दुरदुंडी, ता. गोकाक,
जि. बेळगाव (कर्नाटक)
चरभाष : ९४४८९९५३०४

दुरदुंडीच्या हिरेमठाच्या श्री. वे. निंगय्या आणि सौ. तंगेम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.७.१९७८ रोजी यांचा जन्म झाला. ते वीरगोत्रीय असून त्यांनी जन्मगावीच प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर अरभावी स्वामीजींच्या प्रेरणेने संस्कृत अध्ययनाकरिता १९९१ मध्ये श्रीमद् वीरशैव गुरुकुल शिवयोग मंदिरात प्रवेश घेतला. तेथे ६ वर्षे संस्कृताभ्यास व योगाभ्यास केला. त्यासोबत धार्मिक आचारविचार देखील शिकले. नंतर डॉ. महेश गटरड्याल (पॅरिस, फ्रान्स) यांच्या प्रेरणेने पुढील संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. २३.६.१९९९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काशी हिंदू विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन संस्कृतविद्या धर्मविज्ञान शाखेतील धर्मागम विभागात डॉ. कमलेश्वर झा यांचे शिष्यत्व पत्करून वीरशैवागमांचा अभ्यास केला. २००४ मध्ये या विषयातील शास्त्री व २००६ मध्ये आचार्य या पदव्या प्राप्त केल्या. पुढे शिवागम आणि शिवशरण या विषयांत संशोधनकार्य करीत आहेत. ते अध्ययनशील, वाक्पटू व सदाचारी असून समाजाच्या उन्नतीसाठी व धर्मजागृतीसाठी कार्य करीत होते. काही अपरिहार्य कारणांमुळे ते सोडून ते गावी परतले.

## ३५१. श्री महांत देव

हालय्या स्वामी कोन्नुरू हिरेमठ,
मु.पो. रायर हेब्बळी,
ता.जि. धारवाड (कर्नाटक)



हे स्कंदगोत्रीय असून यांनी जन्मग्रामीच प्राथमिक शिक्षण घेतले. गावातील सद्भक्तांच्या सहकार्याने ते संस्कृत अध्ययनाकरिता बेंगळूरुला आले. तेथील भारतीय संस्कृती विद्यापीठात प्रवेश घेऊन साहित्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. पुढे उच्च संस्कृत अध्ययनाकरिता काशीला येऊन वयाच्या २७ व्या वर्षी त्यांनी दि. २५.५.१९९९ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात अध्ययन करून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री ही पदवी २००२ मध्ये मिळविली. पुढे वेदान्तविभागात प्रवेश घेऊन २००४ मध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी प्राप्त केली. सध्या कर्नाटकात ठिकठिकाणी धार्मिक समारंभाचे आयोजन करून ते धर्मजागृतीचे कार्य करीत आहेत. ते विद्वान व वाक्पटू असून समाजात आदरणीय ठरले आहेत.

सध्या बेरगंडी बृहन्मठाचे (ता. चिक्कमगळूरु) पट्टाधिकारी झाले असून त्या मठपरंपरेचे सर्व कार्यक्रम विधिवत् पार पाडीत आहेत.

### ३५२. श्री. दिनेश पांडुरंग रसाळ

मु. श्रीक्षेत्र जेऊर, ता. पुरंदर,
जि. पुणे (महाराष्ट्र)
चरभाष : ८९५६३५२७२८



हे श्रीक्षेत्र जेऊर गावचे असून इंचगेरी रसाळ संप्रदायाच्या परंपरेतील होत. कर्नाटकातील श्री सद्‌गुरू भाऊसाहेब महाराज उमदीकर यांचे शिष्य श्री गुरुदेव रानडे, श्री सिद्धरामेश्वर महाराज यांचे आशीर्वाद प्राप्त करून श्री शंकर महाराजांनी महाराष्ट्रात रसाळ परंपरा सुरू केली. शंकर महाराजांनी महाराष्ट्रात कीर्तन–प्रवचन आणि भजनाच्या माध्यमातून लोकांचे प्रबोधन केले. या रसाळ कुटुंबातील श्री पांडुरंग रसाळ महाराज संप्रदायाचा वारसा समर्थपणे पुढे चालवीत आहेत. यांचे चिरंजीव दिनेश हे होत. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण करून ते संस्कृतच्या अभ्यासाकरिता ते काशीला आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्‌गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने १९९९ मध्ये त्यांनी श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे एक वर्ष अध्ययन केले. नंतर श्री जगद्‌गुरूंच्या मार्गदर्शनाखाली दिल्लीच्या संत नागपाल बाबा संस्कृत महाविद्यालयात वर्षभर अध्ययन केले. संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता तिरुपती येथील राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठात ६ वर्षे अभ्यास करून प्रथम श्रेणीत वेदान्ताचार्य ही पदवी संपादन केली. त्यांना एक रौप्यपदक व चार सुवर्णपदके प्राप्त झाली. प्रतिभासंपन्न अशा श्री. दिनेश यांनी जगन्नाथपुरी येथील संस्कृत भाषणस्पर्धेत रौप्यपदक मिळविले. अनेक पुरस्कार मिळवलेले दिनेश हे रसाळ संप्रदायाची परंपरा समर्थपणे पुढे चालवीत आहेत.

सध्या ते पुणे विद्यापीठात संस्कृत प्राध्यापक म्हणून कार्यरत असून रसाळ संप्रदायाचे कार्य पाहतात.

## ३५३. श्री ष.ब्र. अभिनव रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ, मु. यंकंची, ता. सिंदगी,
जि. विजयपूर (कर्नाटक)



यंकंची हिरेमठ हा श्री रंभापुरीपीठाची शाखा असून या मठाच्या उपशाखा मंगळूरु आणि कुंटोजी येथे आहेत. हा मठ पुत्रवर्गपरंपरेतील असून या मठाचे मूळ कर्तृ पुरुष श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी होत. त्यांनी आपल्या जीवितकालात कृष्णानदीपासून भीमानदीपर्यंतच्या भूप्रदेशात संचार करून अपार संपत्ती आणि शिष्यवर्ग मिळविला. श्री ष.ब्र. अभिनव रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी हे या भव्य परंपरेतील विद्यमान पट्टाध्यक्ष होत. पूर्वाश्रमी कुंटोजी हिरेमठाचे श्री. गुरुलिंगय्या आणि सौ. चन्नम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. २.८.१९७८ रोजी इंडी तालुक्यातील रोडगी या गावी त्यांचा जन्म झाला. जन्मगावीच प्राथमिक शिक्षण घेऊन त्यांनी उडचण येथे माध्यमिक शिक्षण आणि दावणगेरे जिल्ह्यातील होन्नाळीच्या हिरेकल्मठात राहून पदवीपूर्व शिक्षण घेतले. त्यासोबत संस्कृतचा देखील अभ्यास केला.

त्यानंतर पुढील शिक्षणासाठी ते मैसूरला गेले. तेथे जपदकट्टी मठात राहून मैसूर महाराज महाविद्यालयातून बी.ए. पदवी मिळविली. त्याबरोबर वेद व संस्कृत यांचे अध्ययनही केले. पुढे गावातील लोकांच्या इच्छेनुसार उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने २००० मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातील वेदान्त विभागात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा अभ्यास करून त्यांनी उत्तम श्रेणीत वेदान्ताचार्य ही पदवी संपादन केली. अध्ययनकाळात ते काशी वीरशैव विद्वत्संघाचे सक्रिय सदस्य होते. ६ वर्षे ग्रंथपाल म्हणून काम करून ते काशीमहास्वामीजींच्या कृपेस पात्र झाले. पुढे दि. ९.५.२००६ रोजी श्री रंभापुरी आणि श्रीकाशी महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात त्यांनी यंकंची हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. सध्या ते मठाच्या परंपरेनुसार धार्मिक विधी करीत धर्मप्रसार करीत आहेत.

## ३५४. श्री ष.ब्र. सुगुरेश्वर शिवाचार्य स्वामीजी



हिरेमठ, मु.पो.ता. शहापूर,
जि. कलबुर्गी ५८५२२३ (कर्नाटक)
चरभाष : ८०९५३५३४७४

शहापूर (जि. कलबुर्गी) येथील कुंभार गल्लीतील हिरेमठ हा ५०० वर्षांपेक्षा अधिक प्राचीन मठ असून या मठावर आजपर्यंत ९ शिवाचार्य होऊन गेले आहेत. या मठाचे मूळ कर्तृ पुरुष श्री ष.ब्र. मुप्पीनार्य शिवाचार्यानंतर सातवे श्री म.फ.च. विरूपाक्षेश्वर शिवाचार्य हे महातपस्वी व भक्तानुरागी स्वामीजी होते. आयुर्वेद, ज्योतिष व रमलविद्या यांत ते पारंगत होते. संपूर्ण कर्नाटकात व आंध्र प्रदेशात त्यांचा प्रभाव होता, हे मठातील हस्तलिखित ताडपत्रांतील माहितीवरून लक्षात येते.

शहापूर हिरेमठाच्या गुरुपरंपरेत नववे पट्टाध्यक्ष होऊन गेलेले श्री ष.ब्र. लिं. इम्मडी विरूपाक्षेश्वर शिवाचार्य स्वामीजींचे उत्तराधिकारी श्री सुगुरेश्वर देवरू हे होत. हा मठ उज्जयिनी पीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेतील होय. श्री. वे. हंपय्या स्वामी आणि सौ. मुनीयम्मा या दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ९.२.१९७८ रोजी श्री सुगुरेश्वर यांचा जन्म झाला. त्यांनी शहापुरात प्राथमिक शिक्षण घेऊन दावणगेरे जिल्ह्यातील होन्नाळी हिरेकल्मठात राहून माध्यमिक तसेच पदवीपर्यंतचे शिक्षण पूर्ण केले. पुढे मैसूरच्या जपदकट्टी मठाच्या श्री जगद्गुरू मरुळाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन ते मैसूर विश्वविद्यालयातून कन्नड विषयात एम्.ए. झाले.

नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने २००१ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे ४ वर्षे अध्ययन करून इ.स. २००५ मध्ये संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी प्राप्त केली. स्वग्रामी गेल्यावर मठाची परंपरा सांभाळून धार्मिक कार्यक्रम करीत मठाच्या जीर्णोद्धाराचे

कार्य हाती घेऊन ते दहा वर्षांत पूर्ण केले. पुढे त्या मठाचे उद्घाटन आणि स्वतःच्या पट्टाभिषेकाच्या निमित्ताने दि. १८.११.२०१५ रोजी जगद्गुरू पंचाचार्यांचा भव्य अड्डपालखी महोत्सव कार्यक्रम करून दि. १९.११.२०१५ रोजी त्या गादीवर पट्टाभिषेक करून घेतला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. सुगुरेश्वर शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. सध्या श्री सुगुरेश्वर शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या मठाची धार्मिक परंपरा सांभाळीत विविध ठिकाणी पुराणप्रवचने, सभा संचालन करीत कर्नाटकामध्ये प्रसिद्धी मिळविली आहे.

**३५५. श्री ष.ब्र. अभिनव सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी**



शिलामठ, मु.पो. तावरेकेरे, ता. चन्नगिरी,
जि. दावणगेरी (कर्नाटक)
चरभाष : ९९०२५०६७५७

श्री ष.ब्र. अभिनव सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींचे पूर्वाश्रमीचे नाव वेदमूर्ती देव होते. गोंडेदहळ्ळी (ता. तरिकेरे, जि. चिक्कमगळूरु) या गावचे श्री. मरिदेव हालय्या आणि सौ. चन्नम्मा या माहेश्वर दंपतीचे ते द्वितीय सुपुत्र असून दि. २७.७.१९७७ रोजी त्यांचा जन्म झाला. ते वीरगोत्रीय होत. स्वतःच्या गावी त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. त्याचवेळी तावरेकेरे शिलामठाचे श्री ष.ब्र. रेणुक शिवाचार्य स्वामीजींनी आपल्या मठाचा उत्तराधिकारी म्हणून त्यांची निवड केली आणि संस्कृतच्या अध्ययनाकरिता बेंगळूरुच्या महांतमठात त्यांना पाठविले. तेथे १९९२ ते १९९९ पर्यंत अध्ययन करून त्यांनी वेदाध्ययनाबरोबर शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताची विद्वत् मध्यमा परीक्षा दिली आणि त्याचवेळी बी.ए. ही पदवी मिळविली. नंतर उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. ४.१२.२००१ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश

घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात अध्ययन करून २००५ मध्ये त्यांनी शास्त्री आणि नंतर आचार्य या पदव्या प्राप्त केल्या. २००४–२००५ या वर्षी काशी वीरशैव विद्वत् संघाचे कार्यदर्शी म्हणून त्यांनी उत्तम कार्य केले. दि. ११.११.२००५ रोजी श्रीजगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात तावरेकेरे शिलामठाचा पट्टाधिकार त्यांनी स्वीकारला. या मठाच्या परंपरेनुसार ते धर्मप्रसाराचे कार्य करीत आहेत.

३५६. **श्री ष.ब्र. चन्नवीर शिवाचार्य स्वामीजी**
**कोरगल्ल मठ (सोमवारपेटे मठ)**
**मु.पो.ता.जि. रायचूरु (कर्नाटक)**



हे वीरगोत्रीय असून त्यांनी धारवाड येथील मुरुघा मठात राहून कर्नाटक विश्वविद्यालयाची एम्.ए. (कन्नड) ही पदवी प्राप्त केली. पुढे रायचूरु येथील सोमवारपेटे हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती झाली. उच्च संस्कृत व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास येऊन त्यांनी दि. ३०.४.२००१ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी मिळविली. त्यानंतर रायचूरुच्या सोमवारपेटे हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. या मठाचे परंपरागत कार्य करून २००६ मध्ये त्यांनी या पदाचा त्याग केला.

### ३५७. श्रो.ब्र. शिवपुत्र स्वामी

चिदंबराश्रम, सिद्धारूढ मठ,
मु.पो.ता.जि. बीदर (कर्नाटक)



यांनी तिरूपती येथील राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठातून वेदान्तामधील शास्त्री ही पदवी मिळविली. नंतर शिवकुमार स्वामीजींच्या प्रेरणेने संस्कृतच्या उच्च व्यासंगाकरिता ते काशीक्षेत्रास आले. दि. १५.७.२००१ रोजी वयाच्या २५ व्या वर्षी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शांकर वेदान्त हा विषय घेऊन त्यांनी आचार्य पदवी मिळविली. सध्या त्याच विद्यापीठात 'अद्वैत वेदान्त, शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तयो : तुलनात्मक अध्ययन' या विषयावर शोधप्रबंध लिहून तो विद्यापीठास सादर केला आहे. सध्या ते बीदरच्या श्री श्रो.ब्र. शिवकुमार स्वामीजींच्या चिदंबराश्रमात वास्तव्यास असून स्वामीजींच्या मार्गदर्शनाखाली ठिकठिकाणी प्रवचने करीत असतात.

३५८. **श्री ष.ब्र. दिगंबर शिवाचार्य स्वामीजी**

**श्री. युवराज धारलिंग जंगम**

थोरला मठसंस्थान, मु.पो.ता. वसमत,

जि. नांदेड (महाराष्ट्र)



वसमत येथील थोरला मठ संस्थान हा उज्जयिनी पीठाचा इतिहासप्रसिद्ध शाखामठ असून या मठावर अनेक शिवाचार्य होऊन गेले आहेत. श्री ष.ब्र. सांब शिवाचार्य स्वामीजींनी चि. युवराज या बटूस त्यांनी आपला उत्तराधिकारी म्हणून नियुक्त केले आणि २०१० साली वसमत थोरला मठाच्या गादीवर त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक केला.

श्री वे. युवराज हे कोरेगाव (ता. वाळवा, जि. सांगली) या गावचे श्री. वे. धारलिंग जंगम यांचे सुपुत्र असून त्यांचा जन्म दि. ११.५.१९८६ रोजी झाला. त्यांनी कोरेगाव येथे प्राथमिक शिक्षण घेऊन नंतर नूल (ता. गडहिंग्लज, जि. कोल्हापूर) या गावातील श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्यांच्या आश्रयास राहून प्राथमिक तसेच वैदिक शिक्षण घेतले. नंतर ह.भ.प. कृष्णानंद शास्त्रीजींच्या मार्गदर्शनाखाली उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. ४.६.२००२ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील विशुद्धानंद संस्कृत महाविद्यालयात पूर्वमध्यमेचा अभ्यास सुरू करून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन २०१० मध्ये शास्त्री पदवी प्राप्त केली आणि उत्तरमध्यमाचा अभ्यास केला.

२०१० साली वसमत थोरला मठाच्या गादीवर श्री ष.ब्र. सांब शिवाचार्यांच्या गुरुत्वाखाली त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. दिगंबर शिवाचार्य असे नामकरण करण्यात आले. पट्टाभिषेक झाल्यानंतर काशीला येऊन त्यांनी शक्तिविशिष्टाद्वैताचा अभ्यास करून २०११ मध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य पदवी मिळविली. सध्या गुरूची सेवा करीत धार्मिक कार्यक्रम सांभाळीत आहेत. ते उत्तम वाक्पटू आणि कीर्तनप्रवचनकार असून महाराष्ट्रात ख्यातनाम झाले आहेत.

## ३५९. श्री. नागभूषण देव मल्लय्या हिरेमठ

मु.पो. बेलूरू, ता.जि. कोप्पळ (कर्नाटक)



हे नंदिगोत्रीय असून त्यांनी प्राथमिक शिक्षण स्वग्रामी पूर्ण केले. नंतर बेंगळूरुच्या जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयात साहित्य हा विषय घेऊन त्या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढील संस्कृत व्यासंगाकरिता उज्जयिनी जगद्गुरू मरुळसिद्ध शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रेरणेने काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने २००३ मध्ये त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात शास्त्री पदवीच्या प्रथम वर्षात प्रवेश घेऊन वर्षभर अभ्यास करून आपल्या गावी परतले.

३६०. **श्री. ब्रह्मचारी उपेंद्रजी**

द्वारा- श्री. सत्यनारायण महापात्र
मु.पो. वेलपडा पटणा, व्हाया- गणीया,
जि. नयागड (ओडिसा)



ओडिसा येथील हे ब्राह्मण गृहस्थ. त्यांनी प्रसिद्ध उत्कल विद्यापीठातून बी.कॉम. पदवी मिळविली. हरियाणा रेवरी सोनीपत स्थित पाणिनी संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन संपूर्ण वेदांग शास्त्र, प्राचीन उपांग शास्त्र तसेच अन्य धर्मशास्त्रांचा अभ्यास केला. नंतर उच्च संस्कृत व्यासंगाकरिता काशीक्षेत्रास येऊन येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात प्रवेश घेतला. पूर्वमीमांसा शाबरभाष्य, तंत्रवार्तिक, ब्रह्मसूत्र, शांकरभाष्य इत्यादी ग्रंथांचा अभ्यास केला. तर्कसंग्रह आदी अन्य शास्त्रांचा पूर्ण अभ्यास करण्याची इच्छा असल्यामुळे २००३ मध्ये त्यांनी जंगमवाडी मठात येऊन श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींना श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश देण्याची प्रार्थना केली. उदारमतवादी जगद्गुरू महास्वामीजींनी त्यांची ज्ञानपिपासा पाहून त्यांना गुरुकुलात प्रवेश दिला. श्री. ब्रह्मचारी उपेंद्रजींनी २-३ वर्षे जंगमवाडी मठात राहून ज्ञानार्जन केले आणि नंतर ते स्वग्रामी परत गेले.

## ३६१. डॉ. श्री चंद्रमोहन देव षडक्षरय्या स्वामी



हालस्वामी विरक्त मठ,
मु.पो.ता. चन्नगिरी जि. दावणगेरे (कर्नाटक)
चरभाष : ९८३९०७४४६६

हे भृंगीगोत्रीय असून शिवमोग्गाचे श्री. षडक्षरय्या व सौ. जयश्री यांचे ज्येष्ठ सुपुत्र होत. त्यांचा जन्म शिवमोग्गा येथे दि. ४.१.१९८२ रोजी झाला. त्यांनी शिवमोग्गा येथे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. तेथील बेक्कीन कल्मठ येथे प्राथमिक संस्कृत अध्ययन केले.

संस्कृत अध्ययनाकरिता त्यांनी श्रीक्षेत्र एडेयूरच्या श्री बाळेहुन्नरू मठाच्या आश्रयास राहून श्रीसिद्धलिंगेश्वर संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेतला. तेथे संस्कृत प्रवेश या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर माध्यमिक शिक्षण घेऊन शिवमोग्गा शासकीय महाविद्यालयातून पदवीपूर्व परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर आपले दीक्षागुरू श्री ष.ब्र. रेणुक शिवाचार्य स्वामीजी शिलामठ, तावरेकेरे यांच्या प्रेरणेने, आपले हितचिंतक चन्नगिरीचे श्री. जवळी मंजण्णा व श्री. उमेश यांच्या आर्थिक सहकार्याने आणि श्री म.नि.प्र. जयदेव स्वामीजी हालस्वामी विरक्त मठ, चन्नगेरी यांच्या कृपाशीर्वादाने उच्च संस्कृत व्यासंगाकरिता ते दि. १६.६.२००३ रोजी काशीक्षेत्री आले. श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात पूर्वमध्यमा प्रथम वर्गाचे विद्यार्थी झाले. अल्पकाळात त्यांनी २००७ मध्ये शास्त्री ही पदवी प्राप्त केली. नंतर काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या धर्मागम विभागात २००९ मध्ये वीरशैवागम आचार्य वर्गात अध्ययन करून आचार्य पदवी प्राप्त केली. त्यानंतर शिवमोग्गा येथील कुवेंपु विश्वविद्यालयामध्ये सर्वदर्शनसंग्रह ग्रंथ अभ्यासून शैव दर्शनांचा तौलनिक अध्ययन करून २०१५ मध्ये पीएच्.डी. पदवी प्राप्त मिळविली. सध्या गुरूंच्या मार्गदर्शनाखाली धर्मप्रचार कार्य करीत आहेत.

३६२. **श्री ष.ब्र. अमृतेश्वर शिवाचार्य स्वामीजी**



अमृतेश्वर संस्थानमठ,
मु.पो. जिंतूर, ता.जि. परभणी (महाराष्ट्र)
चरभाष : ९९२१०७१११३

हे नंदिगोत्रीय असून त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण घेतले. नंतर मैसूरच्या श्रीशंकरविलास संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन काव्यपरीक्षेत उत्तीर्ण झाले. त्याबरोबर पीयुसी दुसऱ्या वर्षाची परीक्षा उत्तीर्ण झाले. आपले दीक्षागुरू श्री ष.ब्र. तपोरत्नं योगिराजेंद्र शिवाचार्य स्वामीजींच्या प्रेरणेने आणि औसा हिरेमठाचे श्री ष.ब्र. शांतवीरलिंग शिवाचार्यांच्या प्रोत्साहनाने उच्च संस्कृत अध्ययनाकरिता ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. ११.८.२००३ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात उत्तरमध्यमा परीक्षेचा अभ्यास करून सध्या काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या धर्मागम विभागात वीरशैवागम शास्त्री पदवी प्राप्त केली. दि. २३.४.२००७ रोजी श्री हिमवत्केदार जगद्गुरू श्री सिद्धेश्वरलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात त्यांचा जिंतूर मठावर पट्टाधिकार करण्यात आला. ते अभ्यासाबरोबर मठाची धार्मिक व्यवस्था देखील पाहात असतात.

याशिवाय महाराष्ट्रात आणि कर्नाटकात पुराण-प्रवचन-कीर्तनाद्वारे ते उत्तम धर्मप्रचाराचे कार्य करीत आहेत. महाराष्ट्रात जगद्गुरू आले असताना त्यांच्या कार्यक्रमात सहभागी होतात. सर्व पीठाचार्यांच्या कृपेस ते पात्र झाले आहेत.

### ३६३. डॉ. एम्. सिद्धेश्वर स्वामी



गुरू श्री अवधूतगिरी महाराज,
श्री दत्तगिरी महाराज आश्रम, मु.पो. बद्रिपूर,
ता. जहिराबाद, जि. मेडक (आंध्र प्रदेश)

हे वृषभगोत्रीय असून त्यांनी खुद्दारी या आपल्या गावी प्राथमिक व माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर तिरुपतीच्या राष्ट्रीय संस्कृत विद्यापीठात प्रवेश घेतला. तेथे काही वर्षे राहून अध्ययन करून ते बी.ए., शास्त्री, न्यायाचार्य, देवालय संस्कृती पदविका, योग पी.जी. डिप्लोमा इत्यादी परीक्षा देऊन त्यांत उत्तीर्ण झाले. विविध पदव्यांनी विभूषित होऊन त्यांची ज्ञानपिपासा शमली नाही. पुढील उन्नत व्यासंगाकरिता आपल्या गुरुकुलाचे अवधूतगिरी महाराजांची सदिच्छा आणि श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींची प्रेरणा यांमुळे ते काशीक्षेत्री आले. जंगमवाडी मठाच्या श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात दि. १२.१०.२००३ रोजी वयाच्या २८ व्या वर्षी त्यांनी प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शांकरवेदान्त हा विषय घेऊन त्यांनी आचार्य पदवी मिळविली. याशिवाय काशी हिंदू विश्वविद्यालयात पी.जी. डिप्लोमा इन आगमतंत्राचे अध्ययन पूर्ण केले. त्यांनी अद्वैत वेदान्ताचार्य व पी.जी. डिप्लोमा या पदव्या प्राप्त केल्या असून त्यानंतर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात वेदान्त आणि योगशास्त्र या विषयावर पीएच्.डी. संपादन केली. काशीतील अध्ययन पूर्ण करून आपल्या गुरुपरंपरेनुसार धार्मिक व सामाजिक कार्य करीत आहेत.

## ३६४. श्री. रेवणसिद्ध परमेश्वर मुंडकर

श्रीगुरू अपरंपार मठ,
मु.पो. शेंबोली, ता. मुतखेड, जि. नांदेड (महाराष्ट्र)



यांनी स्वग्राम शेंबोली येथे प्राथमिक शिक्षण व मुतखेड येथे माध्यमिक शिक्षण घेतले. आपले गुरुवर्य श्री अपरंपार स्वामीजींच्या सदिच्छेनुसार व हेडगापूर हिरेमठाच्या श्री ष.ब्र. शिवलिंग शिवाचार्यांच्या प्रेरणेनुसार ते पुढील विद्याध्ययनासाठी काशीक्षेत्रास आले. दि. २८.१०.२००३ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात उत्तर मध्यमा वर्गात प्रवेश घेऊन अध्ययन केले. शेंबोलीचा श्री अपरंपार मठ हा श्रीरंभापुरी पीठाचा शाखामठ असून विद्यमान मठाधिपती श्री अपरंपार स्वामीजी हे तपस्वी व कर्मयोगी आहेत. धर्मानुष्ठानासोबत ते शेतीला देखील महत्त्व देतात. भक्तांकडून देणगी न घेता शेतीच्या उत्पन्नातून त्यांनी आपल्या प्राचीन मठाचा जीर्णोद्धार केला आहे. श्री रेवणसिद्ध स्वामी सध्या शेंबोली अपरंपार मठाचे मठाधिपती होऊन मठाची परंपरा सांभाळत आहेत.

## ३६५. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी



केळदी राजगुरू महामहत्तीन भुवनगिरी दुर्ग संस्थानमठ, मु.पो. कवलेदुर्ग, ता. तीर्थहळ्ळी, जि. शिवमोग्गा (कर्नाटक)

चरभाष : ९४४८२५५९६१

श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी हे पूर्वाश्रमी रड्डेरहट्टी (ता. अथणी, जि. बेळगाव) या गावचे श्री. वे. मल्लय्या स्वामी आणि सौ. गौरम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. १.६.१९५९ रोजी जन्मले. त्यांनी रड्डेरहट्टी येथे प्राथमिक शिक्षण घेतले. सत्ती येथे माध्यमिक आणि इलकल येथे पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर बेंगळूरुच्या महांत मठात राहून शासकीय महाविद्यालयात शिक्षण घेतले आणि बेंगळूरु विश्वविद्यालयातून संस्कृतमधील एम्.ए. ही पदवी प्राप्त केली. याशिवाय बेंगळूरुच्या जयचामराजेंद्र शासकीय संस्कृत महाविद्यालयातून वीरशैव वेदमूल या परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. सिद्धगंगा येथील श्रीसिद्धलिंगेश्वर संस्कृत महाविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तातील उत्तमा परीक्षा उच्च श्रेणीत उत्तीर्ण झाले.

त्यांनी दि. ४.२.१९९६ रोजी कवलेदुर्ग संस्थानमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. मलेवाडमधील घरोघरी 'श्रीसिद्धान्तशिखामणी'वर प्रवचने करीत त्यांनी धर्मप्रचार केला, हे त्यांचे वैशिष्ट्य होय. त्यांनी काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने २००४ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागात बहिस्थ परीक्षार्थी म्हणून २ वर्षे अभ्यास केला आणि शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य ही पदवी संपादन केली. ते उत्तम वाक्पटू, समाजचिंतक व धैर्यशील असून आपल्या रसाळ वाणीमुळे मलेनाड परिसरात प्रसिद्ध झाले आहेत.

हे बेंगळूरु संस्कृत विश्वविद्यालयाचे सिनेट सदस्य आहेत.

## ३६६. श्री ब्रह्मचारी जगदीश



गुरू श्री श्रो.ब्र. शंभुलिंग स्वामीजी,
मु.पो. बेळगली, ता. मुधोळ,
जि. बागलकोट (कर्नाटक)

यांनी बेळगली येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. शेजारच्या हुन्नूरु येथील भुवनेश्वरी संस्कृत पाठशाळेतून ते काव्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. रामपूर येथील श्री नीलकंठेश्वर संस्कृत पाठशाळेतून साहित्य परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्यांना अध्यात्म आणि योगसाधनेसाठी गुरुवर्य योगिराज सदाशिव महाराजांकडून प्रेरणा मिळाली. त्यामुळे ते अध्यात्म व योगाचे माहेर असणाऱ्या हिमालयाच्या कुशीतील हृषिकेश येथे आले. तेथे ऋषिमुनींच्या सत्संगात साधना केली. परंतु ती अर्धवट सोडून त्यांना काशीक्षेत्री यावे लागले. दि. २५.८.२००४ रोजी वयाच्या २४ व्या वर्षी श्री विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन त्यांनी येथील साधुवेला संस्कृत महाविद्यालयात शास्त्री पदवीच्या प्रथम वर्षाचे अध्ययन पूर्ण केले. यापुढे अध्ययन करून संस्कृतमध्ये पांडित्य संपादन करून स्वग्रामी परतले.

३६७. **श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजी**



गुरू ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी,
हिरेमठ, मु.पो. मळ्ळी, ता. जेवरगी,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)
चरभाष : ९९०११००४६३

मळ्ळी हिरेमठ हा रंभापुरी पीठाचा शाखामठ आहे. या मठाचे विद्यमान मठाधिपती श्री रुद्रमुनी देव यांनी आपल्या गावी प्राथमिक शिक्षण घेतले. पुढील शिक्षणाकरिता ते होन्नाळी हिरेकल्मठात गेले. तेथील मठाधीश श्री ष.ब्र. ओडेयर शिवाचार्य स्वामीजींच्या अनुमतीने तेथील गुरुकुलात प्रवेश घेतला. चन्नप्पा स्वामी विद्यापीठाशी संलग्न असलेल्या श्री चन्नमल्लिकार्जुन संस्कृत विद्यालयात त्यांनी संस्कृत साहित्याचे अध्ययन केले. अंतिम वर्षातील परीक्षेत उत्तीर्ण झाले. त्याच्यासोबत पदवीपूर्व दुसऱ्या वर्गाची परीक्षा देऊन त्यात उत्तीर्ण झाले. नंतर उच्च व्यासंगाकरिता मळ्ळी हिरेमठाच्या सद्भक्तांच्या सहकार्याने आणि मागनगिरी मठाच्या श्री ष.ब्र. डॉ. विश्वाराध्य शिवाचार्य यांच्या प्रेरणेने काशीक्षेत्रास आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. ९.८.२००४ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन शास्त्री पदवीच्या प्रथम वर्षाचा ते अभ्यास करू लागले. सर्व भक्तांच्या अपेक्षेनुसार दि. १८.४.२००८ रोजी श्री रंभापुरी जगद्गुरू वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात त्यांचा पट्टाभिषेक वैभवाने पार पडला. ते सुशील व विद्याप्रेमी असून सध्या ते आपल्या मठाचे धार्मिक कार्यक्रम पाहात आहेत.

## ३६८. श्री. वे. सिद्धलिंगेश्वर महादेवय्या सालीमठ

मु. हिरेवड्डट्टे, ता. मुंडरगी, जि. गदग (कर्नाटक)



हिरेवड्डट्टीच्या श्री. वे. महादेवय्या आणि सौ. शारदादेवी या माहेश्वरांच्या पवित्र गर्भी दि. २३.३.१९८२ रोजी यांचा गदग येथे जन्म झाला. त्यांनी हिरेवड्डट्टीत प्राथमिक, त्यानंतर माध्यमिक आणि पदवीपूर्व शिक्षण गदग येथे घेतले. संस्कृत व वैदिक विद्याभ्यासाकरिता त्यांनी गदगच्या श्री जगद्गुरू विश्वाराध्य जनकल्याण प्रतिष्ठानची शाखा असलेल्या श्री ज. पंचाचार्य संस्कृत–वेद–आगम–योग पाठशाळेत २००१ मध्ये प्रवेश घेतला. तेथे फकीर स्वामी यांचे शिष्यत्व पत्करून वैदिक विद्येचा आणि त्याबरोबर ज्योतिषशास्त्राचा २ वर्षे अभ्यास केला. पुढे उच्च व्यासंगाकरिता २००५ मध्ये ते काशीक्षेत्री आले. काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

त्यानंतर ५–६ वर्षे पीठामध्ये अर्चक म्हणून काम केले. तसेच दक्षिणामूर्ती मठ आणि गोविंदमठ येथील गुरुकुलात तर्क आणि व्याकरण या शास्त्रांचा अभ्यास केला. नंतर संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या प्राचीन व्याकरणशास्त्र विभागामध्ये प्रवेश घेऊन २००९ मध्ये व्याकरणशास्त्री ही उपाधी प्राप्त केली. नंतर २०१३ मध्ये दर्शन आचार्य पदवी मिळविली. २०१४ मध्ये बनारस हिंदू विश्वविद्यालयाच्या दर्शन विभागात प्रवेश घेऊन २०१५ मध्ये काश्मीर शैवदर्शनात आचार्य उपाधी प्राप्त केली. ते योगप्रिय असून अनेक त्यांनी योग डिप्लोमा कोर्सेस केले आहे. सध्या कर्नाटक संस्कृत विश्वविद्यालय बेंगळूरु येथे 'अनुभवसूत्र आणि प्रत्यभिज्ञा दर्शनात जीवशिवैक्य समीक्षा' या विषयावर पीएच्.डी. साठी प्रबंधलेखन करीत आहेत. डॉ. शरत्चंद्र स्वामी हे मुख्य मार्गदर्शक असून काशीचे डॉ. भक्तिपुत्र

रोहतम हे सहमार्गदर्शक आहेत. २०१५ ला त्यांचे संशोधनकार्य प्रारंभ झाले असून ते संशोधनकार्यात व्यस्त आहेत. त्यांना प्राचीन लिपीची जिज्ञासा असून त्यांनी ब्राह्मी, शारदा आणि तांकरी लिपीचे ज्ञान प्राप्त करून घेतले आहे. पांडू लिपीची आवड असल्यामुळे प्राचीन ताडपत्र ग्रंथांचे वाचनात अभिरुची आहे. सध्या ते काशी जंगमवाडी मठात अध्ययन करीत आहेत.

सध्या येथील संस्कृत महाविद्यालयात व्याकरण व तर्कशास्त्राचा अभ्यास करीत आहेत. त्याबरोबरच येथे येणाऱ्या यात्रेकरूंच्या पूजापाठाची ते व्यवस्था करतात.

### ३६९. श्री म.नि.प्र. डॉ. अल्लमप्रभु स्वामीजी

(श्री सावळगीश्वर देव) रुद्राक्षी मठ,
मु.पो.नागनूरु, ता.जि. बेळगाव (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमामध्ये वीरगोत्रीय तुबची हिरेमठाचे श्री.वे.मू. बसय्या व सौ. विजयालक्ष्मी यांच्या पुण्यगर्भी दि. २.१०.१९८७ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक अध्ययन जन्मग्रामी झाले. त्यावेळी त्यांना तुबची येथील शिवलिंगेश्वर विरक्त मठावर उत्तराधिकारी म्हणून नेमण्यात आले. त्यानंतर संस्कृताध्ययनासाठी श्रीमद् वीरशैव शिवयोगमंदिर येथील कुमारेश्वर संस्कृत पाठशाळेत त्यांनी प्रवेश घेतला. तेथे काव्यपरीक्षा तसेच दहावी परीक्षेत सुद्धा उत्तीर्ण झाले. त्यानंतर आपल्या गुरूच्या प्रेरणेने आणि मठाचे सद्‌भक्त ए.बी. पाटील यांच्या प्रोत्साहनाने उच्च शिक्षणासाठी काशीत आले. तेथे ज. डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने वयाच्या १८ व्या वर्षी दि. २७.७.२००५ रोजी श्री जगद्‌गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामधून उत्तर मध्यमा परीक्षेत उत्तीर्ण झाले.

त्यानंतर धारवाडला जाऊन तेथे तत्त्वज्ञान विभागामध्ये एम.ए. पदवी २०१३ मध्ये प्राप्त केली. त्यावेळी त्यांना ३ सुवर्णपदके मिळाली. त्यानंतर बेळगाव येथील राणी चन्नम्मा विश्वविद्यालयामध्ये एस.एम. गंगाधरय्या (प्राध्यापक आणि डीन, कन्नड विभाग) यांच्या मार्गदर्शनाखाली 'महात्मा बसवेश्वर आणि पाश्चात्त्य तत्त्वज्ञानी मार्टिन ल्युथर यांच्या विचारांचे तौलनिक अध्ययन' या विषयावर प्रबंध लिहून २०१९ मध्ये पीएच्.डी पदवी मिळाली. त्यांचे सर्व कार्य पाहून त्यांना नागनूरु रुद्राक्षी मठावर दि. ११.११.२०१९ रोजी त्यांचा निरंजन पट्टाधिकार करण्यात आला. सध्या ते नागनूरु रुद्राक्षी मठाची धार्मिक आणि शैक्षणिक जबाबदारी पार पाडत असून त्यासोबत आपल्या शिवलिंगेश्वर मठाचे योगक्षेमसुद्धा पाहत आहेत.

**३७०. श्री म.नि.प्र. वीरंतेश्वर स्वामीजी**

वीरंतेश्वर विरक्त मठ, मु.पो. केसरजवळगा,
ता. उमरगा, जि. उस्मानाबाद (महाराष्ट्र)
चरभाष : ९९२१७५९८८



हे नंदिगोत्रीय होत. केसरजवळगा येथील वे. बंडय्या स्वामी व सौ. सुरेखा या दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ३०.४.१९८३ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे वीरंतेश्वर असे नामकरण करण्यात आले. त्यांनी प्राथमिक शिक्षण केसरजवळगा येथे घेतले. नंतर १९९६ मध्ये बदामी तालुक्यातील श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात प्रवेश घेऊन तेथील कुमारेश्वर संस्कृत विद्यालयातून काव्य परीक्षेत व त्यासोबत दहावी परीक्षेतही उत्तीर्ण झाले. त्यांनी संस्कृत साहित्याचे पूर्ण वाचन केले. नंतर गुरुवर्य श्री म.नि.प्र. जडेबसवलिंगेश्वर स्वामीजींच्या प्रेरणेने तसेच पडसावळी हिरेमठाच्या श्री ष.ब्र. शंभुलिंग शिवाचार्य स्वामीजींच्या प्रोत्साहनाने ते काशीक्षेत्रास आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने वयाच्या २१ व्या वर्षी दि. ३.८.२००५ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या संस्कृत महाविद्यालयात अध्ययन करून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शांकर वेदान्ताचार्य २००९ मध्ये व शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य २०१३ मध्ये झाले. त्यांनी काशीमध्ये १७ वर्षे राहून अध्ययन केले. काशीमध्ये प्रतिदिन न चुकता पहाटे ४ वाजता गंगेचे स्नान करून व विश्वनाथाचे दर्शन घेऊन ते प्रात:काळी अध्ययन करीत असत. हा नियम त्यांनी कधीच मोडला नाही. पुन्हा गावी परतल्यानंतर दि. १०.४.२०१७ रोजी केसरजवळगा विरक्त मठाच्या गादीवर त्यांचा निरंजन पट्टाधिकार झाला. त्यावेळी त्यांचे श्री म.नि.प्र. वीरंतेश्वर स्वामी असे नामकरण करण्यात आले. पट्टाभिषेकाच्या दिवशी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचा भव्य अड्डपालखी महोत्सव करून त्यांनी महास्वामीजींकडून आशीर्वाद घेतला. सध्या आपल्या गुरूच्या मार्गदर्शनाखाली धार्मिक कार्यक्रम पार पाडीत आहेत.

## ३७१. श्री ष.ब्र. शिवयोगी शिवाचार्य स्वामीजी

गच्चिनमठ, मु.पो. मद्दरकी, ता. जेवरगी,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)



श्री ष.ब्र. शिवयोगी स्वामीजी हे मूलत: लखमापूर (ता. हानगल, जि. हावेरी) येथील हिरेमठाचे वंशज असून या मठाचे वे.मू. सिद्धय्या यांचे चिरंजीव होत. हा मठ काशीपीठाचा शाखामठ आहे. त्यांचे शिवयोगिदेव असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. संस्कृत शिक्षणासाठी रंभापुरी पीठाच्या गुरुकुलात चार वर्षे अध्ययन करून वेद आणि आगमांच्या प्रवेश परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. नंतर मैसूर येथील जपदकट्टी मठाच्या संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन साहित्यपरीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी काशीक्षेत्री येऊन वयाच्या २३ व्या वर्षी काशीपीठाधिपती श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या अनुमतीने दि. २०.१०.२००५ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्री ही उपाधी त्यांनी प्राप्त केली. श्रीकाशीजगद्गुरू महास्वामीजींच्या कृपाशीर्वादाने मद्दरकी गच्चिनमठाचे दि. २१.५.२०१३ रोजी पट्टाध्यक्षस्थान स्वीकारले. काशीहून परतल्यानंतर राणेबेन्नूरु गावामध्ये दि. २३.११.२०१३ रोजी शनिमंदिराची स्थापना करून त्याला 'कर्नाटकातील शनिर्शिंगणापूर' अशी प्रतिष्ठा मिळवून दिली. सध्या राणेबेन्नूरु आणि मद्दरकी या गावांतील धार्मिक कार्यक्रम सांभाळत आहेत.

## ३७२. श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य स्वामीजी

परंडकर मठ, मु.पो.ता. बार्शी,
जि. सोलापूर (महाराष्ट्र)



पूर्वाश्रमी पाटण (जि. सातारा) येथील वे.मू. चन्नवीर जंगम आणि सौ. सिंधुताई जंगम या माहेश्वर दंपतीच्या गर्भी दि. ४.११.१९७७ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे अजित असे नामकरण करण्यात आले. चि. अजितकुमारने पाटण येथे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. १९९८ साली बार्शी परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य यांच्या मार्गदर्शनाने पुणे येथे जाऊन ज्योतिष आणि वेदांचा अभ्यास केला. श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य महाराजांनी दि. २२.२.१९९८ रोजी आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांचा स्वीकार केला. दि. ३०.५.२००५ या दिवशी जगद्गुरू पंचाचार्यांच्या दिव्य सान्निध्यात श्री ष.ब्र. डॉ. शिवलिंग शिवाचार्य महाराज, वीरमठ, अहमदपूर यांच्या दैवतसाक्षीने श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य महाराजांनी आपल्या अमृतहस्ते त्यांना पट्टाभिषेक केला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. राचलिंग शिवाचार्य स्वामीजी' असे नूतन नामकरण करण्यात आले.

गुरुमहाराजांच्या मार्गदर्शनाखाली त्यांनी २ वर्षे धर्मप्रचारकार्य केले. त्यानंतर रेवणसिद्ध शिवाचार्यांच्या आदेशानुसार उच्च संस्कृत अध्ययनासाठी त्यांनी दि. १४.८.२००७ रोजी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन ६ वर्षे अध्ययन करून २०१३ मध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य उपाधी प्राप्त केली. सध्या बार्शी येथे परंडकर मठाचे सर्व धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

३७३.    **श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्य स्वामीजी**

मु.पो. वाई, ता. वाळवा,
जि. सातारा (महाराष्ट्र)
चरभाष : ९९२१४१००८



पूर्वाश्रमात यडे मच्छिंद्रा (ता. वाळवा, जि. सांगली) येथील श्री. वे.मू. कृष्णजंगम आणि सौ. शोभा यांच्या पवित्र गर्भी यांचा दि. ४.२.१९८६ रोजी जन्म झाला. त्यांचे सतीश असे नामकरण करण्यात आले. त्यांनी कोतोली (ता. वाळवा, जि. कोल्हापूर) येथे नेहरू विद्यामंदिरात मराठी प्राथमिक आणि माध्यमिक अध्ययन केले. नंतर वाई येथील श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य आणि धारेश्वरचे श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य यांच्या मार्गदर्शनाखाली वैदिक विद्येचा अभ्यास केला. वाईचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजींनी सतीश जंगम यांचा ऑक्टोबर २००६ मध्ये आपल्या मठाचे उत्तराधिकारी म्हणून स्वीकार केला. दि. ८.४.२००५ रोजी वाईचे सिद्धलिंग शिवाचार्य शिवैक्य झाले. त्यानंतर धारेश्वरच्या श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजींनी संपूर्ण जबाबदारी घेऊन दि. २२.२.२००७ रोजी श्री सतीश जंगम यांचा वाईच्या गादीवर पट्टाभिषेक केला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. महादेव शिवाचार्य स्वामीजी' असे नामकरण करण्यात आले. पुढे धारेश्वर महाराजांच्या मार्गदर्शनाने उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीस आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १४.८.२००७ रोजी त्यांनी श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील सुप्रसिद्ध आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन व्याकरण व साहित्याचा अभ्यास केला आणि संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाची शक्तिविशिष्टाद्वैत शास्त्री पदवी प्राप्त केली. २०१२ मध्ये आचार्य प्रथम वर्ष करून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्याचे प्रथम वर्ष पूर्ण केले. अपरिहार्य कारणामुळे शिक्षण सोडून २०१३ मध्ये

वाईला परतले. सध्या महाराष्ट्रात उत्तम कीर्तन–प्रवचन करीत आहेत. त्यांचा कंठ मधुर असल्यामुळे गाण्याने आणि कीर्तनाने लोकांवर त्यांचा भरपूर प्रभाव पडत आहे.



### ३७४. श्री ष.ब्र. राघवांक मल्लिकार्जुन पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी

राघवांक स्वामी मठ, मु.पो. कुरुगोडु,
ता.जि. बळ्ळारी (कर्नाटक)

पूर्वाश्रमात कुरुगोडू गावचे वे.मू. त्रिगुणस्वामी आणि सौ. देवीरम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. १२.२.१९८७ या दिवशी यांचा जन्म झाला. त्यांचे संतोषकुमार असे नामकरण करण्यात आले. त्यांनी आपल्या गावी प्राथमिक, माध्यमिक आणि पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर कुरुगोडू राघवांक मठाचे श्री राघवांक पंडिताराध्य यांच्या इच्छेप्रमाणे २००३ मध्ये उत्तराधिकारी म्हणून त्यांची नेमणूक झाली. नंतर तुमकूरु येथील सिद्धगंगा मठाच्या श्री सिद्धलिंगेश्वर वेद संस्कृत महाविद्यालयात त्यांनी प्रारंभिक वेद आणि संस्कृतचे अध्ययन केले. त्यानंतर श्रीशैलजगद्गुरूंच्या दिव्य सान्निध्यात दि. २५.१.२००७ रोजी कुरुगोडू मठाच्या गादीवर त्यांचा पट्टाभिषेक झाला. त्यानंतर श्रीशैलजगद्गुरूंच्या आदेशानुसार उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामींच्या अनुमतीने दि. १.१०.२००७ रोजी ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये काही वर्षे अध्ययन करून ते गावी परत गेले.

## ३७५. श्री वे. मल्लिकार्जुन बसय्या हिरेमठ

मु. होसूरु, पो. कणवी, ता.जि. गदग (कर्नाटक)



होसूरु गावचे श्री. वे.मू. बसय्या हिरेमठ आणि सौ. अन्नपूर्णदेवी यांच्या पवित्र गर्भी दि. २२.७.१९८१ रोजी यांचा जन्म झाला. हे वीरगोत्रीय असून त्यांनी स्वग्रामी प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. गदग येथील क्रांतिवीर संगोळी रायण्णा महाविद्यालयात पदवीपूर्व शिक्षण घेतले. त्यानंतर संस्कृत आणि वेद यांच्या अध्ययनासाठी गदग येथील श्री ज. पंचाचार्य वेदागम पाठशाळेत दि. १०.६.२००१ रोजी प्रवेश घेतला. तेथील पंडित फकीर स्वामी यांच्याकडून २००४ पर्यंत वेदविद्या प्राप्त केली. २००५ मध्ये मध्यप्रदेशील जबलपूर गावातील ज. विश्वाराध्य मंदिराचे प्रधान अर्चक म्हणून कार्य केले. त्यानंतर उच्च संस्कृत आणि ज्योतिष अध्ययनासाठी ते काशीस आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामींच्या अनुमतीने त्यांनी दि. २०.१२.२००७ रोजी ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील मृत्यंजय मठाच्या ज्योतिष पाठशाळेत पं. जयनारायण पांडे यांच्याकडे ज्योतिषशास्त्राचे अध्ययन केले. सध्या आपल्या गावी वैदिक कार्य करीत लोकांना ज्योतिष्य सांगत असतात. ते गृहस्थाश्रमी झाले असून त्यांना दोन कन्यारत्ने झाली आहेत.

## ३७६. श्री विश्वनाथ निरंजनलिंग पुजारी

(हिरेमठ चपळगाव)

उखीमठ, (उत्तरांचल प्रदेश)



श्री विश्वनाथ यांचा श्री. निरंजलिंग हिरेमठ चपळगाव व सौ. चेतादेवी यांच्या पुण्यगर्भी १९६७ मध्ये उखीमठ येथे जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण उखीमठामध्ये पूर्ण झाले. नंतर ते माध्यमिक अणि उच्च संस्कृत शिक्षणासाठी काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १.७.१९८२ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यांनी सनातन धर्म इंटरकॉलेजमध्ये दहावी आणि बारावी पूर्ण केली. नंतर लालबहादूर शास्त्री काशी विद्यापीठातून बी.ए., बी.एड्. आणि एम्.ए. (अर्थशास्त्र) या पदव्या मिळविल्या. संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य झाले. श्री विश्वनाथ यांनी १९८२ पासून १९९४ पर्यंत बारा वर्षे श्री विश्वाराध्य गुरुकुलात राहून अध्ययन केले. सध्या आंध्रप्रदेशातील चित्तूर जिल्ह्यात मदनपल्ली गावातील ऋषिवल्ली स्कूलमध्ये सिनिअर प्राध्यापक म्हणून २५ वर्षांपासून कार्य करीत आहेत.

## ३७७. श्री शंकर निरंजनलिंग पुजारी

(हिरेमठ चपळगाव),

उखीमठ (उत्तरांचल प्रदेश)



श्री शंकर हे चपळगाव हिरेमठाचे श्री. निरंजनलिंग पुजारी व सौ. चेतादेवी यांच्या पुण्यगर्भी १९७४ मध्ये जन्माला आले. प्राथमिक अध्ययन उखीमठामध्ये करून आपले मोठे बंधू श्री. विश्वनाथबरोबर संस्कृत शिक्षणासाठी काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १.७.१९८६ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संस्कृत पाठशाळेत संस्कृतचा आणि थोडा वेदांचा अभ्यास केला. नंतर वडिलांच्या आदेशानुसार परत उखीमठात गेले. सध्या उखीमठामध्ये सेवक म्हणून कार्य करीत आहेत.

## ३७८. श्री ष.ब्र. बालयोगी सिद्धराम शिवाचार्य स्वामी

संस्थान हिरेमठ, रौडकुंदी, ता. सिंदनूर,
जि. रायचूरु (कर्नाटक)



रौडकुंदी गावचा हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ आहे. त्या गादीचे मूळ कर्तृ पुरुष श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य होते. ते अत्यंत तपस्वी असल्यामुळे त्यांच्या गादीवर आलेल्या सर्वांचे 'सिद्धराम' असेच नामकरण करण्यात आले. बालयोगी सिद्धराम शिवाचार्यांचा जन्म रौडकुंदी हिरेमठाचे श्री. वे.मू. वीरभद्रय्या व सौ. शिवगंगम्मा यांच्या पवित्र गर्भी दि. ११.७.१९६६ रोजी झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. त्यावेळी त्या गादीवरचे श्री ष.ब्र. सिद्धराम शिवाचार्य ऊर्फ प्रभानंद शास्त्री लिंगैक्य झाल्यामुळे त्या गादीवर १९७५ मध्ये बालयोगी सिद्धराम शिवाचार्य नऊ वर्षांचे असताना त्यांना उत्तराधिकारी म्हणून नेमले गेले. नंतर त्यांनी हुब्बळी येथील सिद्धारूढ मठात राहून माध्यमिक आणि पदवीपर्यंत शिक्षण घेतले. तुमकूर येथील सिद्धगंगा संस्कृत महाविद्यालयात प्राथमिक संस्कृतचा अभ्यास केला. दि. ३.९.१९८६ रोजी त्यांचा पट्टाभिषेक झाला.

त्यानंतर उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. ५.१२.१९८९ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलामध्ये प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये दोन वर्षे अभ्यास करून ते गावी परतले. तेथे मठाचे धार्मिक कार्यक्रम करीत असताना दि. १६.१.२००३ रोजी आकस्मिक लिंगैक्य झाले. आता त्या गादीवर श्री ष.ब्र. मरिसिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी असून ते धार्मिक कार्यक्रम पार पाडत आहेत.

## ३७९. श्री. विश्वेश्वर महालिंगय्या शास्त्री

मु.पो. हुनसूरु, ता. बसवकल्याण,
जि. बीदर (कर्नाटक)



श्री विश्वेश्वर हे हुनसूरूचे श्री. महालिंगय्या शास्त्री व सौ. निर्मलादेवी यांच्या पुण्यगर्भी दि. २.७.१९९० रोजी जंगमवाडी मठात जन्माला आले. त्यांनी वाराणशीमध्ये प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. दि. १.७.१९९८ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन संस्कृत आणि थोडे वेदविद्येचे अध्ययन केले. येथील पदवीपूर्व महाविद्यालयामध्ये १२ वर्षेपर्यंत अध्ययन केले. नंतर कलकत्त्याला गेले. तेथील वर्धमान विश्वविद्यालयाच्या इन्स्टिट्यूट ऑफ टेक्नॉलॉजी कॉलेजमध्ये इलेक्ट्रॉनिक्स विषय घेऊन २०१३ मध्ये बी.ई. उत्तीर्ण झाले. दिल्लीमध्ये २-३ वर्षे नोकरी केली. नंतर २०१६ मध्ये एम.एस. करण्यासाठी अमेरिका येथील कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीमध्ये दोन वर्षे राहून २०१८ मध्ये एम.एस. पूर्ण केले. सध्या तेथेच कार्यरत आहेत.

## ३८०. श्री ष.ब्र. शिवकुमार शिवाचार्य स्वामीजी

हिरेमठ कमतगी, मु.पो. कमतगी,
ता. हुनगुंद, जि. बागलकोट (कर्नाटक)



कमतगी हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ आहे. हा पुत्रवर्गी मठ असून या मठावर आतापर्यंत आठ शिवाचार्य होऊन गेले आहेत. सध्याचे नववे पट्टाध्यक्ष शिवकुमार शिवाचार्य यांचा पूर्वाश्रमी कमतगी हिरेमठाचे श्री वे.मू. पडदय्या व सौ. रुद्रम्मा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ६.६.१९८१ रोजी नागूर गावी जन्म झाला. त्यांचे प्राथमिक व माध्यमिक शिक्षण जन्मगावी नागूर येथे झाले. त्यांची कमतगी हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून नेमणूक झाली.

नंतर त्यांनी रंभापुरी पीठाच्या वेदागम पाठशाळेत तसेच गदगच्या श्री जगद्गुरू पंचाचार्य वेदागम पाठशाळेत संस्कृतचा आणि वेदांचा अभ्यास केला. काही दिवस सोलापूरच्या होटगी मठात राहून श्री ष.ब्र. तपोरत्नं योगिराजेंद्र शिवाचार्य महाराजांच्या सान्निध्यात राहून ते इष्टलिंग पूजाविधी शिकले. दि. ५.६.२००३ रोजी जगद्गुरू पंचपीठाधीश्वरांच्या दिव्य सान्निध्यात अत्यंत वैभवाने त्यांचा पट्टाभिषेक पार पडला.

त्यानंतर संस्कृत शिक्षणासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १०.७.२००७ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील श्री आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये एक वर्ष संस्कृत शिकले. नंतर मठाची जबाबदारी जास्त झाल्यामुळे शिक्षण सोडून गावी परतले. सध्या कमतगी हिरेमठाचे सर्व धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## ३८१. श्री ष.ब्र. प्रभुदेव शिवाचार्य स्वामी

गुरू ष.ब्र. कांतेश्वर शिवाचार्य स्वामी,
माढेकर मठ, मु.पो. माढा, जि. सोलापूर



माढेकर मठ हा श्रीशैलपीठाचा शाखामठ असून शिष्यवर्ग परंपरेचा आहे. या गादीवर अनेक शिवाचार्य होऊन गेले. या मठाचे श्री ष.ब्र. कांतेश्वर शिवाचार्य शिवैक्य झाल्यानंतर हा मठ अनेक वर्षे अनाथ झाला होता. माढा मठाच्या शिष्यांनी श्रीशैलजगद्गुरू उमापती पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजींना मठाला नूतन उत्तराधिकारी देण्यासाठी विनंती केली. श्रीशैल-जगद्गुरू महास्वामीजींनी ही जबाबदारी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींना पत्र लिहून त्यांच्यावर सोपविली. श्रीकाशीजगद्गुरू महास्वामीजींनी त्या गादीवर महाराष्ट्रातील योग्य बटू शोधण्यासाठी बार्शी परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य यांना आदेश दिला. त्याप्रमाणे रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजींनी सावरगाव काटी (ता. तुळजापूर, जि. उस्मानाबाद ) या गावचे श्री. वे.मू. नागनाथ स्वामी व सौ. नूतन स्वामी यांचे सुपुत्र विश्वनाथ स्वामी या बटूला मठाचा उत्तराधिकारी नेमले.

श्री विश्वनाथ स्वामी यांचा दि. १८.११.१९७९ रोजी मोहोळ येथे जन्म झाला. त्यांनी जन्मगावी सहावीपर्यंत अभ्यास केला. ज्योतिषशास्त्राचा सुद्धा थोडा अभ्यास केला. नंतर श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य परंडकर महाराजांच्या नेतृत्वाखाली दि. २.३.२००६ रोजी माढ्याच्या गादीवर विश्वनाथ स्वामींचा विधिवत् पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्याचे 'श्री ष.ब्र. प्रभुदेव शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. श्री ष.ब्र. कांतेश्वर शिवाचार्य लिंगैक्य झाल्यानंतर सध्याचे श्री ष.ब्र. प्रभुदेव शिवाचार्य यांनी त्या गादीची संपूर्ण जबाबदारी स्वीकारली आहे. नंतर परंडकर महाराजांच्या मार्गदर्शनाने संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या ३अनुमतीने १०.७.२००७ रोजी

श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये प्रवेश घेऊन दोन वर्षे संस्कृत शिक्षण घेतले. माढेकर मठाचे काही न्यायालयीन वाद असल्यामुळे ते अभ्यास सोडून त्याच्या व्यवस्थेसाठी गावी परत गेले. तेथे गेल्यानंतर योग्य कायदेतज्ज्ञांच्या सल्ल्यामुळे इतरांच्या स्वाधीन झालेल्या मठाचाआणि शेताचा कब्जा घेऊन माढा मठाचा जीर्णोद्धार केला. शेतीत सुधारणा केली.

ते अनुष्ठानप्रेमी आणि हठयोगी असल्यामुळे नवरात्रीमध्ये आपल्या पोटावर घटस्थापना करून नऊ दिवस निराहार अनुष्ठान करण्यात त्यांची प्रसिद्धी आहे. २०१० मध्ये काशी महास्वामीजींकडून मिळालेल्या एक हजार 'श्रीसिद्धान्तशिखामणितत्त्वामृत' या ग्रंथाची गावोगावी दिंडी काढून त्यांनी खूप मोठे धर्मप्रचारकार्य केले. २०१९ मध्ये परमरहस्य ग्रंथाच्या लक्षावधी प्रती मुद्रित करून श्रीशैल आणि उज्जयिनी जगद्गुरूंच्या सान्निध्यात माढा येथे लक्ष परमरहस्य पारायण करून खूप मोठी धर्मजागृती केली आहे. सध्या निरंतर पदयात्रा, पारायण, कीर्तन, सर्वत्र करीत महाराष्ट्रातील माहेश्वर बटूंना शिवसंप्रदाय कीर्तनाचे प्रशिक्षण देत आहेत.

## ३८२. श्री ष.ब्र. विजयमहंतेश्वर शिवाचार्य स्वामीजी



चरमूर्ती मठ, मु. हाविनहाळ,
ता. चडचण, जि. विजयपूर (कर्नाटक)

चिट्टा (जि. बीदर) येथील श्री. वे.मू. मल्लय्या आणि सौ. सुशीलम्मा या हिरेमठ दांपत्यांच्या पवित्र गर्भी दि. ४.१०.१९८४ रोजी चिट्टा येथे यांचा जन्म झाला. त्यांचे विजयमहंत असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी प्राथमिक अध्ययन करून बीदर येथे माध्यमिक आणि पदवीपूर्व शिक्षण घेतले. बेंगळूरु येथील महांत मठामध्ये आश्रय घेऊन तेथील जयचामराजेंद्र संस्कृत महाविद्यालयात साहित्य विद्वत् ही उपाधी प्राप्त केली. नंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी मेहकर मठाचे श्री ष.ब्र. राजेश्वर शिवाचार्य यांच्या मार्गदर्शनाने ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २.७.२००९ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयामध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तातील शास्त्री आणि आचार्य या पदव्या प्राप्त केल्या. त्यानंतर दि. १२.२.२०१४ रोजी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीशैलजगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात रंभापुरीचा शाखामठ असलेल्या हाविनहाळच्या चरमूर्ती मठावर त्यांचा विधिवत् पट्टाधिकार पार पडला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. विजयमहंतेश्वर शिवाचार्य स्वामीजी' असे नूतन नामकरण करण्यात आले. तेव्हापासून ते आपल्या मठाचे धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## ३८३. श्री पं. अभिजित नंदकिशोर जोशी

मु.पो.ता. पांढुर्णा,
जि. छिंदवाडा (मध्यप्रदेश)



चि. अभिजित पांढुर्णा येथील श्री. नंदकिशोर जोशी व सौ. अरुणा या ब्राह्मण दंपतीच्या पुण्यगर्भी द्वितीय पुत्ररूपाने दि. ४.९.१९८७ रोजी पांढुर्णा येथे जन्मास आले. त्यांनी पांढुर्णा येथे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर नागपूर येथील भोसला वेदशास्त्र संस्कृत महाविद्यालयात वे.मू. गोविंदभारती यांच्याकडे शुक्ल यजुर्वेद संहितेचे अध्ययन केले. त्यानंतर पांढुर्णा वीरशैव लिंगायत मठसंस्थानचे श्री ष.ब्र. वीररुद्रमुनी शिवाचार्य यांच्या प्रेरणेने उच्च संस्कृत अध्ययनासाठी काशीस येऊन श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १६.९.२००९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयातून शास्त्री उपाधी प्राप्त केली. तीन वर्षे काशीत अध्ययन करून गावी परतल्यानंतर तेथील शासकीय हायस्कूलमध्ये ते अध्यापक म्हणून काम करीत आहेत.

## ३८४. श्री ष.ब्र. अभिनव मुरघेंद्र शिवाचार्य स्वामी



संस्थान हिरेमठ, मु.पो. शिरषाड,
ता. इंडी, जि. विजयपूर (कर्नाटक).
चरभाष ९६११५६४०९९

हे शिरषाड हिरेमठाचे श्री. विरूपाक्षय्या व सौ. शैलजा यांच्या पवित्र गर्भी तृतीय पुत्र म्हणून जन्माला आले. शिरषाड हिरेमठ हा पुत्रवर्गीय मठ असल्यामुळे चि. मुरघेंद्र यांना या गादीवर उत्तराधिकारी म्हणून नेमण्यात आले. त्यांनी रंभापुरी पीठात माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. मैसूर येथील जपदकट्टी मठाच्या गुरुकुलामध्ये प्रवेश घेऊन त्यांनी पदवीपूर्व अध्ययन केले. नंतर उच्च संस्कृत शिक्षणासाठी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १.५.२०१० रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

काशी येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये प्रवेश घेऊन संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्तशास्त्राचे अध्ययन केले. नंतर दि. ९.२.२०१४ ला शिरषाड संस्थान हिरेमठाच्या गादीवर त्यांचा श्री रंभापुरी जगद्गुरू वीरसोमेश्वर राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी आणि केदार जगद्गुरू रावल भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांच्या दिव्य सान्निध्यात विधिवत् पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. अभिनव मुरघेंद्र शिवाचार्य स्वामी' असे नामकरण करण्यात आले. सध्या ते आपल्या गावी राहून मठाचे धार्मिक, सांस्कृतिक आणि शैक्षणिक कार्य पार पाडीत आहेत.

## ३८५. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य

हिरेमठ, मु.पो. कोण्णूरु,

ता. नरगुंद, जि. गदग (कर्नाटक)



कोण्णूरु हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. या गादीवर आतापर्यंत १० शिवाचार्य होऊन गेले असून दहावे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. मुरुघेंद्र शिवाचार्य स्वामीजी अत्यंत तपस्वी व भक्तवत्सल होते. ते १९८९ मध्ये लिंगैक्य झाले. त्यांच्यानंतर ११ वे पट्टाधिकारी म्हणून श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य यांचा पट्टाभिषेक झाला. पूर्वाश्रमामध्ये मूळवाड (जि. विजयपूर) येथील हिरेमठाचे श्री वे.मू. बसलिंगय्या व सौ. गिरिजा यांच्या पुण्यगर्भी दि. २०.३.१९८९ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांचे विरूपाक्षय्या असे नामकरण करण्यात आले. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. मुद्देबिहाळ येथे दहावी उत्तीर्ण झाले. त्यानंतर पदवीपूर्व शिक्षण हुब्बळीच्या मूरुसाविर मठामध्ये राहून पूर्ण केले. १९९९ ते २००३ मध्ये शिवयोग मंदिरामध्ये संस्कृत शिक्षणाबरोबर आचारविचारांचे अध्ययन केले. पांढुर्णा येथील श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य यांच्या प्रेरणेने ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ३१.१२.२०१० रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामधून ते उत्तर मध्यमा उत्तीर्ण झाले असून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयामध्ये अद्वैत वेदान्त घेऊन अध्ययन करीत आहेत. दि. २९.११.२०१७ रोजी कोण्णूरु हिरेमठावर त्यांचा श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात जालहळ्ळी बृहन्मठाचे श्री ष.ब्र. जयशांतलिंग शिवाचार्य महाराजांच्या गुरुत्वाखाली पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामी असे नामकरण करण्यात आले. सध्या काशी येथील पुढील अध्ययनाबरोबर आपल्या मठाचे सर्व धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## ३८६. श्री ष.ब्र. महादय्या रविशंकर शिवाचार्य स्वामीजी



वीरशैव मठसंस्थान, मु.पो. रायपाटण,
ता. राजापूर, जि. रत्नागिरी (महाराष्ट्र)

श्री ष.ब्र. महादय्या रविशंकर शिवाचार्य स्वामीजी यांचा जन्म पूर्वाश्रमी मल्लारपेठ या गावचे श्री. अशोक स्वामी व सौ. सुरेखा या माहेश्वरांच्या पुण्यगर्भी दि. २५.३.१९८९ दिवशी खराड या गावी झाला. त्यांनी मल्लारपेठ येथे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. त्यानंतर धारेश्वरच्या श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्यांच्या सान्निध्यात राहून पूजाविधीचे प्रशिक्षण घेतले. धारेश्वर महाराजांच्या उपस्थितीत रायपाटण येथील रेवणसिद्ध वीरशैव मठसंस्थानच्या गादीवर दि. १७.२.२०११ रोजी त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे मठपरंपरेनुसार 'श्री ष.ब्र. महादय्या रविशंकर शिवाचार्य स्वामी' असे नामकरण करण्यात आले. या समारंभात वाळव्याचे शिवाचार्य उपस्थित होते. नंतर उच्च संस्कृताध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने १ जुलै २०१२ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयातून पूर्वमध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. सध्या ते मठात राहून मठाचे सर्व धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## ३८७. वे.मू. विशाल रामलिंग पुराणिक



मु.पो. वेळापूर, ता. माळशिरस,
जि. सोलापूर (महाराष्ट्र)

विशाल पुराणिक यांचा जन्म वेळापूरच्या वे.मू. रामलिंग पुराणिक व सौ. रजनीताई यांच्या पवित्र उदरी दि. ७.८.१९९० रोजी वेळापूर येथे झाला. त्यांनी आपल्या गावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. धोर्डा (ता. सिंदखेड राजा, जि. बुलडाणा) येथील एस.टी.एस. महाविद्यालयामधून ते बारावी झाले. त्यानंतर वेळापूरचे श्री ष.ब्र. मुक्तेश्वर शिवाचार्य यांच्या प्रेरणेने संस्कृत शिक्षणासाठी काशीस आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ५.७.२०१२ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये पूर्व मध्यमा वर्गामध्ये प्रवेश घेतला. दोन वर्षे शिक्षण पूर्ण करून गावी परत गेले. सध्या गृहस्थाश्रम स्वीकारून बार्शीच्या वेळापूरकर मठात ते पूजापाठाची सेवा करतात.

## ३८८. वे.मू. प्रदीप मनोहर जंगम

मु.पो. धारेश्वर, ता. पाटण,
जि. सातारा (महाराष्ट्र)



हे धारेश्वरचे मनोहर जंगम यांचे पुत्र असून त्यांनी प्राथमिक अध्ययन धारेश्वरमध्ये केले. सातारा येथील महाराजा सयाजीराव विद्यालयातून ते बारावी उत्तीर्ण झाले. त्यानंतर आपले गुरू श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य, आदिमठ संस्थान, धारेश्वर यांच्या प्रेरणेने संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. ५.७.२०१२ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. तेथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये पूर्व मध्यमा वर्गात प्रवेश घेऊन दोन वर्षात पूर्व मध्यमा उत्तीर्ण झाले. सध्या परत गावी गेलेले आहेत.

## ३८९. श्री नागराज देव महादेवय्या

मु.पो. दोड्डुबेळवंगल, ता. दोड्डु बळ्ळापूर
जि. बेंगळूरु ग्रामांतर (कर्नाटक)



मदनकट्टी ग्रामवासी वीरगोत्रीय श्री वे.मू. महादेवय्या व सौ. प्रेमा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. ७.४.१९८८ रोजी श्री नागराज देव यांचा जन्म झाला. जन्मगाव मदनकट्टी येथे त्यांचे प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले. एन. रामपूर येथे माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे २००६ मध्ये श्री म.नि.प्र. बसवराज स्वामी मु. खानीमठ (पो. द्वड्डुबेळवंगला, ता. द्वड्डुबळ्ळापूर, जि. बेंगळूरु ग्रामांतर) येथे फिरंगीश्वर संस्कृत वेदागम पाठशाळेत वेदांचे अध्ययन केले. तसेच बेंगळूरु संस्कृत विश्वविद्यालयाची साहित्य उपाधी, तसेच बी.कॉम. ही उपाधी सुद्धा मिळवली.

त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १५.७.२०१२ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयामध्ये प्राचीन न्याय-वैशेषिक विभागात प्रवेश घेऊन शास्त्री आणि आचार्य या उपाधी प्राप्त केल्या. आचार्य परीक्षेमध्ये त्यांना सुवर्णपदक मिळाले आहे. पुढे संशोधन करण्याची त्यांची इच्छा आहे.

## ३९०. श्री वे.मू. मरुळसिद्धय्या शंकरय्या हिरेमठ

मु.पो. हिरेपडसलगी,

ता. जमखंडी, जि. बागलकोट (कर्नाटक)



हिरेपडसलगीचे श्री वे.मू. शंकरय्या आणि सौ. चंगळव्वा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी श्री मरुळसिद्धय्या यांचा जन्म दि. १.६.१९९८ रोजी जमखंडी येथे झाला. त्यांचे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण जमखंडी येथे झाले. त्यानंतर गदग येथील श्री जगद्गुरू पंचाचार्य वेदागम संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन त्यांनी वेदविद्येचे अध्ययन केले. तसेच तेथील तोंटदार्य संस्कृत पाठशाळेत अध्ययन करून काव्य आणि साहित्य या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. रंभापुरी पीठामध्ये श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य हलगुरू यांच्याकडे त्यांनी ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. नंतर उच्च संस्कृताध्ययनासाठी बबलेश्वर बृहन्मठाचे डॉ. महादेव शिवाचार्यांच्या आदेशाने ते काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि.१७.७.२०१२ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये साहित्य हा विषय घेऊन शास्त्री आणि आचार्य पदवी प्राप्त केली. सध्या स्वग्रामी हिरेपडसलगी हिरेमठाचे धार्मिक कार्य पार पाडत आहेत.

## ३९१. श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य स्वामीजी

गुरुशांतेश्वर हिरेमठ, मु.पो. मादनहिप्परगी,
ता. आळंद, जि. कलबुर्गी (कर्नाटक)



हे मादनहिप्परगीचे श्री. वे.मू. विश्वनाथ व सौ. बसम्मा हिरेमठ यांच्या पवित्र गर्भी द्वितीय पुत्ररूपाने दि. ५.११.१९९१ रोजी जन्माला आले. त्यांचे श्रीकंठदेव असे नामकरण करण्यात आले. त्यांनी स्वग्रामी श्री शिवलिंगेश्वर शिक्षणसंस्थेमध्ये प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर कर्नाटकातील हावेरी येथील सिंदगी शांतवीर पट्टाध्यक्षांनी स्थापन केलेल्या श्री गुरुकुमारेश्वर धार्मिक पाठशाळेत वेद, ज्योतिष आणि संस्कृत या विषयांचे अध्ययन केले. वीरशैव शिवयोग मंदिरात एक वर्ष राहून वीरशैव धर्माचे आचारविचार जाणून घेतले. त्यानंतर कर्नाटकात लक्ष्मेश्वर-जवळ असलेल्या बालेहोसूर गावचे श्री म.नि.प्र. दिंगालेश्वर स्वामींजवळ राहून ते प्रवचनविद्या शिकले. नंतर दि. ८.८.२०१२ रोजी श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींची अनुमती घेऊन श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात ६ वर्षे अध्ययन करून साहित्य विषय घेऊन पदवी प्राप्त केली. त्यानंतर गावी परत गेले.

दि. १२.३.२०१८ मध्ये श्री रंभापुरी जगद्गुरू डॉ. वीरसोमेश्वर शिवाचार्य महास्वामीजींच्या दिव्य सान्निध्यात त्यांनी मादनहिप्परगीच्या श्रीगुरुशांतेश्वर हिरेमठाचा पट्टाधिकार स्वीकारला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. शांतवीर शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. सध्या आपल्या गावी राहून त्या भागातील अनेक धार्मिक कार्यक्रमांत सहभागी होऊन ते धर्मजागृती करीत आहेत.

## ३९२. श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामीजी



औंधकर मठ संस्थान,
मु.पो.ता. बार्शी, जि. सोलापूर (महाराष्ट्र)

बार्शीचा औंधकर मठ हा काशीपीठाचा शाखामठ असून पुत्रवर्गपरंपरेचा आहे. या मठातील श्री वे.मू. महेंद्र निंबर्गीकर व सौ. मीना निंबर्गीकर यांना दि. ६.१२.१९९४ रोजी द्वितीय पुत्र झाला. त्याचे मिथिल असे नामकरण करण्यात आले. त्यांनी आपले प्राथमिक शिक्षण बार्शी येथे पूर्ण केले. नंतर २८.६.२००७ मध्ये मायणी गावी श्री ष.ब्र. प्रभुलिंग शिवाचार्य महाराजांनी चि. मिथिल यांचा औंधकर गादीवर पट्टाभिषेक केला. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींनी कार्यक्रमाचे सान्निध्य स्वीकारले होते. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य स्वामी' असे नामकरण करण्यात आले. पट्टाभिषेकानंतर उच्च संस्कृत शिक्षणासाठी आपले गुरू श्री ष.ब्र. प्रभुलिंग शिवाचार्य स्वामीजी यांच्या प्रेरणेने ते दि. ११.११.२०१२ रोजी काशीस आले. काशी येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महा-विद्यालयामध्ये प्रवेश घेऊन उत्तर मध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. सध्या येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयामध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताच्या शास्त्रीवर्गामध्ये अध्ययन करीत आहेत. अध्ययनाबरोबरच आपल्या मंठाची सर्व धार्मिक परंपरा उत्तम पद्धतीने सांभाळीत आहेत. ते गंभीर स्वभावाचे असून धर्म आणि तत्त्वज्ञान हे विषय लोकांना खूप सुंदर रीतीने समजावून देतात.

## ३९३. श्री ष.ब्र. गुरुपादेश्वर शिवाचार्य स्वामीजी

मु.पो. गिरगाव,
ता. वसमत, जि. हिंगोली (महाराष्ट्र)



श्री गुरुपादेश्वर शिवाचार्य हे पूर्वाश्रमामध्ये नरखेड (ता. मोहोळ, जि. सोलापूर) येथील गौरीशंकर स्वामी व सौ. महानंदाबाई यांच्या पुण्यगर्भी दि. ८.१.१९९२ रोजी ज्येष्ठ सुपुत्ररूपाने नरखेड येथे जन्मास आले. त्यांनी आपले प्राथमिक अध्ययन आणि माध्यमिक अध्ययन नरखेडमध्ये पूर्ण केले. नंतर संस्कृत अध्ययनासाठी चारठाण्याचे पं. शिवाप्पा खके गुरुजी यांच्याजवळ दोन वर्षे राहून त्यांनी अध्ययन केले.

दि. २३.२.२०१३ रोजी गिरगावच्या गादीवर त्यांचा पट्टाभिषेक झाला. त्यावेळी अहमदपूरचे ष.ब्र. डॉ. शिवलिंग शिवाचार्य स्वामी आणि साखरखेर्डा मठाचे श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य स्वामीजी यांच्या उपस्थितीत गिरगाव मठसंस्थानचे श्री गुरुपादय्या स्वामी यांनी आपल्या गुरुत्वाखाली त्यांना पट्टाभिषेक केला. त्यावेळी त्यांचे गिरगाव मठ संस्थानच्या परंपरेप्रमाणे 'श्री ष.ब्र. गुरुपादेश्वर शिवाचार्य स्वामी' असे नामकरण करण्यात आले. त्यानंतर पं. शिवाप्पा खके गुरुजींच्या सल्ल्याप्रमाणे संस्कृत अध्ययनासाठी ते काशीला आले. येथे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १५.४.२०१३ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये प्रवेश घेऊन पूर्व मध्यमा, उत्तर मध्यमा तसेच शास्त्री उपाधी प्राप्त करून सध्या संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य प्रथम वर्षी बहि:स्थ विद्यार्थी म्हणून अध्ययन करीत आहेत.

### ३९४. श्री ष.ब्र. शंकरलिंग शिवाचार्य स्वामीजी

मु.पो. शिरूर अनंतपाळ,
जि. लातूर (महाराष्ट्र)



शिरूर अनंतपाळचे श्री. महालिंग स्वामी व सौ. सुलोचनाबाई यांच्या पवित्र गर्भी दि. २५.४.१९७१ मध्ये शिरूर अनंतपाळ येथे यांचा जन्म झाला. त्यांनी आपले प्राथमिक शिक्षण जन्मगावी पूर्ण केले. औरंगाबाद येथे माध्यमिक शिक्षण घेतले. त्यानंतर चारठाणा येथील पं. शिवाप्पा खके गुरुजींकडे वेद आणि संस्कृतचे अध्ययन केले.

शिरूर अनंतपाळ येथील गुरुस्थलमठाच्या गादीवर दि. २६.६.२०१० रोजी बार्शी परंडकर मठाचे श्री ष.ब्र. रेवणसिद्ध शिवाचार्य स्वामीजींच्या सान्निध्यात त्यांचा पट्टाभिषेक झाला. पं. शिवाप्पा खके यांच्या सल्ल्याप्रमाणे उच्च संस्कृत अध्ययनासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. १५.४.२०१३ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये प्रवेश घेऊन पूर्व मध्यमा, उत्तरमध्यमा आणि शास्त्री या परीक्षांत ते उत्तीर्ण झाले.

सध्या पुढील परीक्षेसाठी बहि:स्थ विद्यार्थी म्हणून अध्ययन करीत आपल्या मठाचे धार्मिक व्यवहार करीत आहेत.

## ३९५. श्री प्रभुराजेंद्र देव चन्नबसव स्वामी

मडिवाळेश्वर कल्मठ,
मु.पो. गरग, ता. जि. धारवाड (कर्नाटक)



हे गरग गावचे श्री. वे.मू. चन्नबसव स्वामीजींचे सुपुत्र होत. त्यांनी जन्मगाव गरग येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर संस्कृत शिक्षणासाठी मैसूरला आले. मैसूर येथील शंकर विलास पाठशाळेमध्ये प्रवेश घेतला. तेथे संस्कृत विश्वविद्यालयाच्या काव्यपरीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर मडिवाळेश्वर कल्मठाच्या भक्तांच्या अपेक्षेप्रमाणे संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. त्यांनी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १९.६.२०१३ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये उत्तरमध्यमापर्यंत अभ्यास करून सध्या गावी परत गेले आहेत.

## ३९६. श्री सोमनाथ संग्राम स्वामी मठपती



श्रीपलसिद्ध संस्थान मठ,
मु.पो. साखरखेर्डा, ता. सिंदखेड राजा,
जि. बुलडाणा (महाराष्ट्र)

श्री सोमनाथ स्वामी मठपती यांचा साखरखेर्डा मठाचे सेवक म्हणून दीक्षासंस्कार झाला आहे. ते वाजी (ता.जि. नांदेड) या गावचे श्री वे.मू. संग्रामस्वामी मठपती व सौ. विजयमाला यांचे सुपुत्र असून दि. २८.७.१९९३ रोजी त्यांचा जन्म झाला. जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेऊन ते साखरखेर्डा मठात आले. श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य महाराजांच्या आश्रयाखाली राहून ते बी.कॉम. झाले. त्यावेळी महाराजांच्या अपेक्षेप्रमाणे पं. शिवाप्पा खके यांच्याकडून संस्कृत व्याकरणाचा अभ्यास केला. साखरखेर्डेकर महाराजसुद्धा त्यांना संस्कृत प्रशिक्षण देत होते.

नंतर उच्च संस्कृत शिक्षणासाठी साखरखेर्डेकर महाराजांच्या आदेशानुसार २०१३ मध्ये ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १०.७.२०१३ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये पूर्व मध्यमा, उत्तर मध्यमा पूर्ण करून व्याकरण विषय घेऊन शास्त्री पदवी प्राप्त केली. साखरखेर्ड्यामध्ये श्री ष.ब्र. सिद्धलिंग शिवाचार्य महाराजांची सेवा आणि मठाची धार्मिक परंपरा सांभाळीत पुढील शिक्षण ते काशीमध्ये घेत आहेत.

## ३९७. श्री नीलकंठ वीरभद्र स्वामी मठपती



श्रीपलसिद्ध संस्थान मठ,
मु.पो. साखरखेर्डा, ता. सिंदखेड राजा,
जि. बुलडाणा (महाराष्ट्र)

श्री वे.मू. नीलकंठ मठपती यांनी साखरखेर्डा पलसिद्ध मठसंस्थानचे सेवक म्हणून श्री ष.ब्र. सिद्धलिंग महाराजांकडून दीक्षासंस्कार घेतला आहे. पूर्वाश्रमी मानवत (ता.जि. परभणी) गावचे श्री वे. वीरभद्र मठपती व सौ. गिरिजा या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. १३.५.१९८३ मध्ये त्यांचा जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले आणि साखरखेर्डा येथे पुढील अभ्यास करून दहावी परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. साखरखेर्डेकर महाराजांकडे तसेच पं. शिवाप्पा खके यांच्याकडे त्यांनी संस्कृत व्याकरणाचा अभ्यास केला.

साखरखेर्डेकर महाराजांच्या प्रेरणेने उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १०.७.२०१३ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये व्याकरण हा विषय घेऊन पूर्व मध्यमा, उत्तर मध्यमा पूर्ण करून सध्या संपूर्णानंद विश्वविद्यालयाच्या शास्त्री द्वितीय वर्षामध्ये अध्ययन करीत आहेत. श्री नीलकंठ मठपती हे साखरखेर्डा मठाच्या धार्मिक परंपरेची व्यवस्था पाहत महाराजांची सेवा करीत पुढील अभ्यास काशीमध्ये करीत आहेत.

## ३९८. श्री प्रभुराज देव

नालवातवाड वीरेश्वर शरणमठ,
सोलापूर (महाराष्ट्र)



प्रभुराज देव हे सोलापूरचे श्री. मल्लिकार्जुन निलंगे आणि सौ. लक्ष्मी निलंगे यांच्या पवित्र गर्भी ज्येष्ठ पुत्ररूपाने जन्माला आले. त्यांनी सोलापुरात प्राथमिक अध्ययन पूर्ण करून नंतर श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरात पाच वर्षे राहून धर्म, अध्यात्म, आचारविचारांचा अभ्यास केला. त्यांनी काही वर्षे लक्ष्मेश्वरजवळच्या बालेहोसूरचे श्री म.नि.प्र. दिंगालेश्वर स्वामीजींकडे प्रवचन–अध्ययन केले आणि त्यांच्याच प्रेरणेने ते काशीला आले.

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २२.७.२०१३ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील श्री आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात पूर्वमध्यमापर्यंत संस्कृताध्ययन केले. जंगमवाडी मठातील वैदिक गुरुकुलात पं. मल्लिकार्जुन शास्त्री आणि पं. सुधीर शास्त्रींकडे वैदिक अध्ययन केले.

सध्या सोलापूर येथील नालवतवाड वीरेश्वर शरणमठाचे उत्तराधिकारी झाले असून त्या मठाच्या परंपरेनुसार सर्व प्रकारचे धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## ३९९. श्री ष.ब्र. शांतमल्लिकार्जुन पंडिताराध्य शिवाचार्य स्वामीजी



शांतशिवयोगाश्रम मठ, मु.पो. हेडगीमुद्रा,
ता.जि. यादगिरी (कर्नाटक)

बम्मशेट्टीहळ्ळी गावचे श्री. इरण्णा व सौ. लक्ष्मी यांच्या पवित्र गर्भी २१.५.१९९० मध्ये यांचा जन्म झाला. त्यावेळी त्यांचे बसवराज असे नामकरण करण्यात आले. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. रंभापुरी पीठामध्ये वैदिक अध्ययनाबरोबर माध्यमिक शिक्षण घेतले. त्यानंतर मैसूर येथील सुत्तूरु मठामध्ये प्रवेश घेऊन तेथे पदवीपूर्व शिक्षण घेतले.

नंतर ९.८.२०१३ रोजी उच्च शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश मिळविला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात दर्शन विभागात प्रवेश घेऊन दर्शनशास्त्री परीक्षेत उत्तीर्ण झाले.

हेडगीमुद्रा (ता.जि. यादगिरी) येथील शांतशिवयोगीश्वर मठावर दि. १९.२.२०१७ दिवशी त्यांचा विधिवत् पट्टाभिषेक झाला. त्या पट्टाभिषेकाला उज्जयिनी, श्रीशैल आणि काशी जगद्गुरूंचे सान्निध्य लाभले होते. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. शांतमल्लिकार्जुन पंडिताराध्य शिवाचार्य' असे नूतन नामकरण करण्यात आले. सध्या ते हेडगीमुद्रा गावी आपल्या मठाचे धार्मिक विधिविधान करीत धर्मप्रचार करीत आहेत. हे उत्तम वक्ते असून ज. पंचाचार्यांच्या कृपेस पात्र झालेले आहेत.

## ४००. श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य स्वामीजी



कमलस्वामी दहिवडकर बृहन्मठ,
३२/७६ हळद गल्ली, मु.पो.ता. बार्शी,
जि. सोलापूर (महाराष्ट्र)

श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य स्वामीजी हे तेलंगणातील बोधन गावचे होत. तेथील श्री वे.मू. बसवेश्वर स्वामी व सौ. सरस्वती यांचे ते तृतीय पुत्र असून त्यांचा दि. २४.१.१९९४ रोजी निजामाबाद येथे जन्म झाला. त्यांचे मणिकंठ असे नाव ठेवले गेले. त्यांचे प्राथमिक शिक्षण मूळ गावी बोधन येथील सरकारी शाळेत झाले. नंतर वेदाध्ययनासाठी त्यांनी श्रीशैलक्षेत्रातील वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेतला. तेथे श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य स्वामीजींचे शिष्यत्व पत्करून सहा वर्षे वेदाध्ययन केले.

नंतर श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या आदेशानुसार उच्च संस्कृत शिक्षणासाठी त्यांनी दि. १९.९.२०१३ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथे श्री गादीस्वामींची अर्चनसेवा करीत तेथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये पूर्व मध्यमा आणि उत्तर मध्यमा या दोन्ही परीक्षांत ते उत्तीर्ण झाले. सध्या ते काशी येथील संपूर्णानंद विश्वविद्यालयामध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त शास्त्री द्वितीय वर्षात अध्ययन करीत आहेत.

या दरम्यान बार्शी दहिवडकर मठाचे श्री ष.ब्र. विश्वेश्वर शिवाचार्य स्वामीजी दि. १५.७.२०१७ रोजी लिंगैक्य झाले. रिक्त झालेल्या त्या गादीवर बोधनचे श्री मणिकंठ यांना दि. ६.१२.२०१७ रोजी पट्टाभिषेक करण्यात आला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य स्वामी' असे नूतन नामकरण करण्यात आले. या पट्टाभिषेक समारंभात श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी, उज्जयिनीजगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी आणि श्रीशैलजगद्गुरू डॉ. चन्नसिद्धराम पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी यांचे सान्निध्य लाभले

होते. या समारंभामध्ये बार्शी येथील माढेकर, औंधकर, परंडकर, माणूरकर तसेच वाईकर, कोळेकर आणि महाराष्ट्रातील अनेक शिवाचार्य गण उपस्थित होते.

श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य स्वामीजी मूळत: तेलंगणा प्रांताचे असले तरी गेल्या दोन वर्षांमध्ये ते मराठी भाषा शिकले. ते सर्वत्र धर्मप्रचारकार्यात सहभागी होतात. त्यांना कन्नड, तेलुगू, मराठी, हिंदी आणि संस्कृत या भाषा येत असल्यामुळे सर्वप्रांतीय कार्यक्रमांमध्ये ते हिरिरीने भाग घेतात. काही महिन्यांपूर्वी केरळमध्ये जाऊन तेथील जंगमांना ते वीरशैव पूजाविधी शिकवून आले. मुंबई–अंबरनाथ येथील वीरशैव माहेश्वर मंडळामध्ये त्यांनी शंभरपेक्षा अधिक माहेश्वरांना स्वरयुक्त वेदपठणाचे प्रशिक्षण दिले आहे.

२०१९ मध्ये पिंपरी चिंचवड परिसरात श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या श्रावणमास तपोऽनुष्ठानात महिनाभर सहभाग घेऊन वेदपठण आणि महामंत्र जपयज्ञाचे नेतृत्व समर्थपणे सांभाळून महास्वामींच्या कृपेस ते पात्र झाले. त्यांच्यासोबत औंधकर मठाचे श्री ष.ब्र. गंगाधर शिवाचार्य महाराजांनी सुद्धा जगद्गुरूंची सेवा करून आशीर्वाद प्राप्त केले. श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य यांचे धर्मप्रचाराबरोबर काशीतील अध्ययनही सुरू आहे.

## ४०१. श्री ष.ब्र. विश्वेश्वर शिवाचार्य स्वामीजी

दहिवडकर मठ,
मु.पो.ता.बार्शी, जि. सोलापूर (महाराष्ट्र)



श्री विश्वेश्वर शिवाचार्य स्वामीजी हे स्कंदगोत्रीय असून याळवाळ (जि. विजयपूर) गुरुमठ घराण्याचे होत. पूर्वाश्रमी याळवाळ गुरुमठाचे श्री वे.मू. गुरुस्वामी व सौ. जयश्री या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. २७.४.१९९५ मध्ये जमखंडी येथे त्यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक अध्ययन जमखंडीमध्ये इंग्लीश माध्यमाच्या शाळेत झाले. पुढे बागलकोट येथील मद्देनहळ्ळी सी.बी.एस.सी. शाळेतून ते दहावी उत्तीर्ण झाले.

नंतर दहिवडकर मठाचे श्री ष.ब्र. गुरुसिद्ध शिवाचार्य महाराजांच्या आदेशानुसार संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि.२५.१२.२०१३ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे संस्कृतबरोबर योगप्रशिक्षणसुद्धा घेतले. पुढे दहिवडकर मठाचे गुरुसिद्ध शिवाचार्य महाराजांनी त्यांना आपले उत्तराधिकारी नेमले. दि. ५.४.२०१४ रोजी दहिवडकर गादीवर श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या सान्निध्यात त्यांचा पट्टाभिषेक केला. त्यावेळी त्याचे 'श्री ष.ब्र. विश्वेश्वर शिवाचार्य स्वामी' असे नामकरण करण्यात आले.

पुन्हा काशीला येऊन त्यांनी तीन वर्षे संस्कृतचे अध्ययन केले. हे अंर्तमुखी व्यक्तिमत्त्वाचे असून ध्यानधारणेमध्ये रुची असणारे होते. लहान वयामध्ये सुद्धा अत्यंत निःस्पृह होते.

दि. १५.७.२०१७ रोजी याळवाळ मध्ये असताना ते आकस्मिकपणे लिंगैक्य झाले. याळवाळ भक्तांच्या अपेक्षेप्रमाणे त्यांची क्रियासमाधी याळवाळमध्ये केली आहे. श्री विश्वेश्वर शिवाचार्य महाराजांच्या क्रियासमाधीला श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी

स्वत: उपस्थित होते. कर्नाटक–महाराष्ट्रांतील अनेक शिवाचार्यांनी समाधीच्या वेळी उपस्थित राहून त्यांना श्रद्धांजली समर्पित केली.

सध्या त्या दहिवडकर गादीवर श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य यांचा दि. ६.१२.२०१७ रोजी पट्टाभिषेक झाला असून सध्या दहिवडकर मठाचे सर्व धार्मिक कार्यक्रम श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य पार पाडत आहेत.

## ४०२. श्री अमित शिवानंद हिरेमठ

मु. दुधनी, ता. अक्कलकोट,
जि. सोलापूर (महाराष्ट्र)



चि. अमित हे दुधनी हिरेमठाचे श्री शिवानंद आणि सौ. पार्वती हिरेमठ यांचे द्वितीय पुत्र असून त्यांचा जन्म १३.१२.२००१ रोजी झाला. जन्मगावी दुधनी येथे त्यांचे प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले. त्यानंतर संस्कृत अध्ययनासाठी आपले कुलगुरू दुधनी हिरेमठाचे गुरुशांत लिंगेश्वर शिवाचार्य महाराजांच्या प्रेरणेने ते काशीला आले.

येथे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १५.५.२०१४ मध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील काशी हिंदू विश्वविद्यालयाची शाखा असलेल्या रणवीर संस्कृत महाविद्यालयात प्रवेश घेऊन तीन वर्षे अध्ययन करून संस्कृत माध्यमातून दहावीची परीक्षा देऊन उत्तीर्ण झाले. मठातील वैदिक गुरुकुलामध्ये पं. सुधीर शास्त्री यांच्याकडे वेदाध्ययन केले. सध्या दुधनीला जाऊन तेथे पुढील शिक्षण घेत आहेत.

## ४०३. श्री मळेश्वर देव (शशांक देव )

पट्टद गदगय्या स्वामी हिरेमठ,
मु.पो.ता.जि. धारवाड (कर्नाटक)



धारवाडचा हिरेमठ हा उज्जयिनी पीठाचा शाखामठ आहे. या मठाचे श्री. वे. पट्टद गदगय्या आणि सौ. राजेश्वरी यांच्या पुण्यगर्भी दि. २.१०.१९९४ रोजी शशांक यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण धारवाडमध्ये झाले. नंतर त्यांनी मैसूरच्या सुत्तूरु मठात राहून माध्यमिक आणि पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर शशांक देव यांची हिरेमठाचे उत्तराधिकारी म्हणून नेमणूक झाली. त्यावेळी त्यांचे 'मळेश्वरदेव' असे नामकरण करण्यात आले.

वडील पट्टद गदगय्या यांच्या प्रेरणेने ते उच्च संस्कृत अध्ययनासाठी काशीला आले. त्यावेळी सौंदत्ती मूली मठाचे श्री मल्लिकार्जुन शिवाचार्य यांनी सुद्धा शिफारस करून महास्वामीजींना पत्र दिले होते. श्री मळेश्वर देव यांनी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १४.७.२०१४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात यांनी प्रवेश घेतला. येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात शक्ति-विशिष्टाद्वैत शास्त्री पदवी प्राप्त करून सध्या शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचार्य प्रथम वर्षामध्ये अध्ययन करीत आहेत.

४०४. **श्री म.नि.प्र. चन्नबसव स्वामीजी**

देगुल मठ, मु.पो.ता. कनकपूर,

जि. रामनगर (कर्नाटक)



हे पूर्वाश्रमामध्ये मरळय्यनतोप्पलु, ता. हुनसूर गावचे श्री कुमारस्वामी व सौ. लीलावती या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी दि. १३.३.१९९४ मध्ये ज्येष्ठ पुत्ररूपाने जन्माला आले. त्यावेळी त्यांचे कीर्तिकुमार असे नामकरण करण्यात आले. त्यांनी प्राथमिक शिक्षण आपल्या जन्मगावी घेतले. त्यानंतर बालजीवनात त्यांची आध्यात्मिक प्रगती पाहून उक्किनकंथे मारहळ्ळी शाखामठाचे पूज्य श्री तोंटदार्य महास्वामीजी यांनी उक्किनकंथे मठावर दि. २४.३.२००३ मध्ये उत्तराधिकारी म्हणून त्यांची नेमणूक केली. नंतर त्यांनी मैसूरच्या सुत्तूरु मठात राहून बी.ए. पदवी मिळविली. तसेच महाराजा सरकारी संस्कृत कॉलेजमध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त घेऊन विद्वत् मध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. त्यानंतर आलमट्टी पुरवर हिरेमठाचे श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य महाराज यांच्या प्रेरणेने उच्च शिक्षणासाठी ते काशीस आले.

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २२.८.२०१४ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी हिंदूविश्वविद्यालयाच्या धर्मागम विभागामध्ये आगमशास्त्र आणि योगशास्त्र यांचा अभ्यास केला. त्यानंतर कनकपूरचे देगुलमठाचे उत्तराधिकारी म्हणून त्यांची नियुक्ती झाली. दि. १७.११.२०१८ रोजी सुत्तूरु मठाचे श्री शिवरात्री देशिकेंद्र स्वामीजी आणि सिद्धगंगा मठाचे श्री सिद्धलिंग स्वामीजी यांच्या सान्निध्यात तसेच देगुल मठाचे श्री मुम्मडी निर्वाण महास्वामीजींच्या नेतृत्वाखाली त्यांचा निरंजन चरपट्टाधिकार संपन्न झाला. त्यावेळी त्यांचे 'श्री म.नि.प्र. चन्नबसव स्वामी' असे नामकरण करण्यात आले. सध्या ते कनकपूर येथे राहून देगुल मठाचे सर्व धार्मिक विधिविधान पार पाडत आहेत.

## ४०५. श्री सुधीर सिद्धेश्वर मठपती

हुच्चेश्वर मठ, कुमठा नाका,
सोलापूर (महाराष्ट्र)



चि. सुधीर सोलापूरचे श्री. सिद्धेश्वर मठपती व सौ. सुमनबाई मठपती यांच्या पवित्र गर्भी १०.६.१९९६ मध्ये प्रथम पुत्ररूपाने जन्माला आले. सोलापूरच्या सरकारी विद्यालयात त्यांनी सातवीपर्यंत अध्ययन केले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रेरणेने श्रीशैलक्षेत्रातील वीरशैव गुरुकुलामध्ये प्रवेश घेऊन पं. मल्लिकार्जुन शास्त्रींकडे त्यांनी सहा वर्षे वेदांचे अध्ययन केले.

नंतर श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने संस्कृत अध्ययनासाठी दि. १४.११.२०१४ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील वेद पाठशाळेमध्ये अध्यापन करीत संस्कृत शिक्षण घेतले. उत्तर मध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. सध्या हैदराबाद येथे पौरोहित्य करीत आईचा सांभाळ करीत आहे.

## ४०६. वेदान्ताचार्य श्री मंजुनाथ स्वामीजी



नियोजित मराठा मठाधिपती,
श्री गोसावी महासंस्थानमठ,
श्री भवानीपीठ, गविपुरम् बेंगळूरु (कर्नाटक)
स्थिरभाष : ०८० २६६७५१७६
चरभाष : ९५९०२४३४८१

श्री मंजुनाथ स्वामींचा जन्म पूर्वाश्रमामध्ये बी.के. हळ्ळी, (ता. हळियाळ, जि. उत्तर कन्नड) गावचे देमण्णा आणि सौ. यल्लव्वया या मराठा दांपत्याच्या पुण्यगर्भी १९८० मध्ये झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. वयाच्या बाराव्या वर्षी त्यांनी नारायण महाराज या गुरुवर्याकडून भगवद्गीता आदी वेदान्त ग्रंथांचे अध्ययन केले. नंतर त्यांच्या मार्गदर्शनाखाली हळियाळ तालुक्यातील अनेक गावांमध्ये कीर्तन-भजन करू लागले. वयाच्या पंधराव्या वर्षी वैराग्यवृत्तीने गृहत्याग केला.

त्यानंतर आडिक्षेत्री (जि. बेळगाव) येथील परमात्मराज महाराज यांच्या सान्निध्यात राहून वेदान्ताचे अध्ययन केले. पुढे पं. अरुण कुलकर्णी आणि पं. मधुकर लकडे यांच्याकडे शास्त्रीय संगीताचा अभ्यास केला. पं. महादेव मोरे यांच्याकडून ते तबलावादन शिकले. त्यामधील विशारद पदवी प्राप्त केली. नंतर उच्च शिक्षणासाठी ते काशीला आले. काशी येथील परमार्थ साधक संघामध्ये प्रवेश मिळवून संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयामध्ये वेदान्तदर्शनाचे अध्ययन करून वेदान्ताचार्य पदवी संपादन केली.

दि. ५.३.२०१५ रोजी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे राहून विविध दर्शनांच्या अध्ययनाबरोबर अखिल भारतीय गंधर्व महाविद्यालय, मुंबई येथून संगीत विशारद आणि संगीत अलंकार या पदव्या मिळविल्या.

अत्यंत मधुर कंठ असलेल्या श्री मंजुनाथ स्वामी यांनी देशविदेशामध्ये संगीत कार्यक्रम करून प्रसिद्धी मिळविली. पं. भीमसेन जोशी, पद्मभूषण

छन्नुलाल मिश्र आणि योगगुरू बाबा रामदेव यांच्या संपर्कात येऊन त्यांनी अनेक प्रशस्ती मिळविल्या. त्यांनी काशी येथील दशाश्वमेध घाटावरील गंगा आरतीमध्ये अनेक वर्षे गायनसेवा केली.

एकांतप्रिय असलेल्या या महाराजांनी हळियाळ गावातील तुळजाभवानी मंदिरामध्ये तीन महिने मौनव्रत करून त्रिकोटी जपयज्ञ पूर्ण केला. त्याच्या पूर्णाहुतीला श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींना आमंत्रित केले आणि त्यांचे भव्य स्वागत करून आशीर्वाद घेतला. त्यांची विरक्त वृत्ती, तपोनिष्ठा आणि विद्वत्ता पाहून मराठा समाजाच्या गोसावी महासंस्थान मठ बेंगळूरुच्या सर्व विश्वस्तांनी मराठा पीठावर उत्तराधिकारी म्हणून त्यांचा स्वीकार केला आहे. भविष्यामध्ये त्यांचा पीठारोहण समारंभ होणार आहे. सध्या श्री मंजुनाथ स्वामी बेंगळूरुच्या गोसावी मठसंस्थानमध्ये निवास करून तेथील व्यवस्था पाहत आहेत.

## ४०७. श्री विजय बच्चुराम जंगम

भक्तपूर, नेपाळ. चरभाष : ८६०१९२११२३६



नेपाळ येथील भक्तपूर जंगममठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. भक्तपूरमध्ये शंभरपेक्षा अधिक जंगम परिवार राहतात. त्यातील श्री. बच्चुराम आणि सौ. लक्ष्मी या जंगम दांपत्याच्या पुण्यगर्भी द्वितीय पुत्ररूपाने चि. विजय यांचा जन्म झाला. त्यांनी भक्तपुरात प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर त्यांनी श्रीकेदारजगद्गुरू भीमाशंकरलिंग शिवाचार्य महास्वामीजींकडून भक्तपुरात लिंगदीक्षा घेतली.

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या आदेशानुसार दि. २८.६.२०१५ रोजी काशीत येऊन त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयात तीन वर्षे संस्कृत डिप्लोमा कोर्स पूर्ण केला. या परीक्षेत ते सर्वप्रथम आले. त्यासाठी त्यांना सुवर्णपदक मिळाले. सध्या याच विश्वविद्यालयामध्ये साहित्यशास्त्री द्वितीय वर्षात प्रवेश घेऊन ते अध्ययन करीत आहेत.

## ४०८. श्री वे.मू. बसवराज गुरुपादप्पा मठवाले

मु.पो.ता. देगलूर, जि. नांदेड (महाराष्ट्र)



वे.मू. बसवराज मठवाले हे देगलूरचे गुरुपादप्पा मठवाले व सौ. अन्नपूर्णा यांच्या पुण्यगर्भी दि. १४.२.२००२ दिवशी क्षीरसागर येथे जन्मले. देगलूर येथे यांचे प्राथमिक शिक्षण पूर्ण झाले. त्यानंतर संस्कृत अध्ययनासाठी बार्शी दहिवडकर मठाचे श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्य महाराजांच्या प्रेरणेने ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ५.७.२०१५ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला.

येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयामध्ये प्रवेश घेऊन साहित्य व्याकरण घेऊन पूर्व मध्यमा उत्तीर्ण झाले. तसेच काशीपीठाच्या वेदगुरुकुलामध्ये श्री ष.ब्र. गुरुसिद्ध मणिकंठ शिवाचार्यांकडून वेदाध्ययन करून आता देगलूरला परत गेले आहेत.

## ४०९. श्री वे.मू. मल्लिकार्जुन स्वामी वीरशेखर स्वामी जंगम

मु. मुत्तुकूरु, ता. पत्तिकोंडा,
जि. कर्नूल (आंध्र प्रदेश)



श्री वे.मू. मल्लिकार्जुन स्वामी हे मुत्तुकूरु गावचे श्री. वे.मू. वीरशेखर स्वामी व सौ. वीणा यांचे ज्येष्ठ पुत्र असून दि. १०.९.१९९९ रोजी त्यांचा जन्म झाला. त्यांचे प्राथमिक शिक्षण जन्मगावी झाले. पुढे माध्यमिक शिक्षण चिल्लेकल्लु (जि. कर्नूल) येथे झाले. त्यानंतर श्रीशैलक्षेत्रातील वीरशैव गुरुकुलामध्ये प्रवेश घेऊन त्या गुरुकुलाचे संस्थापक श्री ष.ब्र. चंद्रशेखर शिवाचार्य यांचे शिष्यत्व स्वीकारून त्यांनी सहा वर्षे वेदाध्ययन केले. नंतर आपल्या गुरूच्या मार्गदर्शनाने उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीस आले.

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने त्यांनी दि. २९.७.२०१५ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील दयाळू संस्कृत महाविद्यालयात पूर्व मध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. सध्या उत्तर मध्यमा द्वितीय वर्षाचा अभ्यास करीत आहेत.

ते उत्तम वेदपंडित असून काशीपीठाच्या वेदविद्यालयामध्ये विद्यार्थ्यांना वेद शिकवीत आहेत. जिज्ञासू आणि निष्ठावंत विद्यार्थी असल्यामुळे भविष्यकाळामध्ये संस्कृत भाषा आणि वेदविद्येमध्ये पारंगत होऊन अनेक विद्यार्थ्यांना विद्यादान करण्याची त्यांची उत्कट इच्छा आहे.

## ४१०. श्री पूर्णानंद स्वामी

चिदंबराश्रम, सिद्धारूढ मठ,
मु.पो.ता.जि. बीदर (कर्नाटक)



यळवंतगी (ता.जि. कलबुर्गी) या गावचे श्री. शिवशंकर व सौ. विमलाबाई यांच्या पवित्र गर्भी दि. ८.१०.१९७८ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे नागभूषण असे नाव ठेवले. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. माध्यमिक शिक्षण सावळगी या गावी घेतले. त्यानंतर आपल्या जन्मगावी बीदरचे शिवकुमार स्वामीजींचे प्रवचन ऐकून ते प्रभावित झाले. त्यावेळी त्यांनी आपले घर त्यागून बीदरच्या चिदंबराश्रमामध्ये प्रवेश घेतला. तेथे निजगुण शिवयोगींच्या षट्शास्त्रांचे सहा वर्षे अध्ययन केले. त्यानंतर हरिद्वारमध्ये राहून संस्कृत व्याकरण आणि प्रस्थानत्रयीचा अभ्यास केला.

बीदरच्या शिवकुमार स्वामीजींच्या आज्ञेनुसार ते काशीला आले. येथे जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १३.१०.२०१५ रोजी प्रवेश घेतला. येथे चार वर्षे आपले वेदान्ताचे अध्ययन पूर्ण करून सध्या ते बीदरच्या चिदंबराश्रमात परत गेले आहेत.

## ४११. श्री चिदानंदय्या शशिधरय्या टी. एस.

मु.पो. मारवळ्ळी, ता. शिकारीपूर,
जि. शिवमोग्गा (कर्नाटक)



चि. चिदानंदय्या टी. एस. मारवळ्ळी गावचे श्री. शशिधरय्या व सौ. लता यांचे ज्येष्ठ पुत्र म्हणून जन्माला आले. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर वेदाध्ययनासाठी श्रीशैल येथील वीरशैव गुरुकुलात प्रवेश घेतला. तेथे एक वर्षभर अध्ययन करून पुढील वेदाध्ययनासाठी ते काशीला आले.

श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १७.१२.२०१५ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीपीठाच्या वेद गुरुकुलामध्ये पं. सुधीरशास्त्रींकडे वेदाध्ययन केले. तसेच थोडेफार संस्कृतदेखील शिकले. सध्या ते आपल्या गावी राहून पौरोहित्य करीत आहेत.

## ४१२. श्री विश्वाराध्य गंगाधर हिरेमठ

मु. किट्टदहळ्ळी, ता. शिकारीपूर,
जि. शिवमोग्गा (कर्नाटक)



चि. विश्वाराध्य हे मासूर हिरेमठाचे वंशज श्री. गंगाधर स्वामी हिरेमठ आणि सौ. सुमलता हिरेमठ या माहेश्वर दंपतीच्या पुण्यगर्भी द्वितीय पुत्र म्हणून दि. २९.९.१९९७ रोजी जन्माला आले. त्यांनी आपल्या जन्मगावी आणि शिकारीपूर येथे प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर वेदाध्ययनासाठी आंध्र प्रदेशातील श्रीशैलक्षेत्राच्या वीरशैव गुरुकुलामध्ये प्रवेश घेतला. तेथे पं. मल्लिकार्जुन स्वामी यांच्याकडे एक वर्ष वेदाध्ययन केले.

पुढील वेदाध्ययनासाठी आणि संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १७.१२.२०१५ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी वैदिक गुरुकुलात पं. सुधीर शास्त्रींकडे संपूर्ण वेदाध्ययन करीत उत्तर मध्यमा परीक्षेत उत्तीर्ण झाले. सध्या पुढील ज्योतिषाच्या अध्ययनासाठी हलगुरू बृहन्मठाचे श्री ष.ब्र. रुद्रमुनी शिवाचार्य स्वामीजींकडे ज्योतिषाचा अभ्यास करीत आहेत.

## ४१३. श्री सिद्धलिंगय्या गुरुशांतय्या कल्मठ

मु.पो. ऐहोळे, ता. बदामी,
जि. बागलकोट (कर्नाटक)



बदामी तालुक्यातील ऐहोळे हे गाव मलप्रभा नदीच्या काठी असून इतिहासप्रसिद्ध आहे. तेथे अनेक पुरातन मंदिरे अजूनही विद्यमान असून ती पाहण्यासाठी देशविदेशांतील पर्यटक निरंतर येत असतात. वीरशैवदर्शनाचा प्रसिद्ध ग्रंथ 'अनुभवसूत्र' याचे रचयिता श्रीमायिदेवांचा या गावातच जन्म झाला होता. इतिहासप्रसिद्ध या ऐहोळे गावामध्ये एक प्राचीन कल्मठ आहे. या मठाचे माहेश्वर मूर्ती या गावचे आणि सर्व आजुबाजूच्या गावचे सर्व विधिविधान पार पाडतात.

सुप्रसिद्ध कल्मठ वंशामध्ये श्री वे.मू. गुरुशांतय्या व सौ. शांतव्वा यांच्या पवित्र गर्भी चि. सिद्धलिंगय्यांचा जन्म दि. १.६.१९९१ या दिवशी झाला. जन्मगावीच त्यांनी प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण पूर्ण करून पदवीपूर्व शिक्षण कमतगी (जि. बागलकोट) येथील शांकबरी पदवीपूर्व कॉलेजमध्ये घेतले. त्यानंतर बागलकोट येथील बसवेश्वर वीरशैव विद्यावर्धक संघाच्या बसवेश्वर कॉमर्स अँड बी.बी.ए. कॉलेजमध्ये बी.बी.ए. पदवी २०१४ मध्ये प्राप्त केली. त्यानंतर एम.बी.ए.च्या इंटरन्स परीक्षेच्या अभ्यासासाठी दि. १८.२.२०१६ रोजी काशीला येऊन त्यांनी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. त्यानंतर काशी हिंदू विश्वविद्यालयामध्ये एक वर्ष प्रशिक्षण घेऊन नंतर बेंगळूरु येथील क्राईस्ट विश्वविद्यालयामध्ये २०१७ मध्ये एम.बी.ए. साठी प्रवेश मिळविला. तेथे २ वर्षे अध्ययन करून २०१९ मध्ये एम.बी.ए. पूर्ण केले असून सध्या आपल्या गावी राहून नोकरीसाठी प्रयत्नशील आहेत.

## ४१४. श्री सौरभ राजबीर पवार

मु.पो. गडिरोडान, ता. तेहवा,
जि. कुरुक्षेत्र (हरियाणा)



चि. सौरभ हे गडिरोडान (ता. तेहवा, जि. कुरुक्षेत्र) या गावचे श्री. राजबीर व सौ. संतोषदेवी यांचे द्वितीय पुत्र असून त्यांचा जन्म दि. ३.३.२००२ रोजी झाला. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. दिल्ली येथील शिवचरण जंगम यांच्या प्रेरणेने संस्कृत अध्ययनासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ७.७.२०१६ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे सनातन धर्म इंटरकॉलेजमध्ये संस्कृत हा मुख्य विषय घेऊन १० वी आणि पदवीपूर्व शिक्षण पूर्ण केले. तसेच काशीपीठाच्या वेदगुरुकुलामध्ये पं. सुधीरशास्त्रींकडे वेदाध्ययन करून सध्या स्वग्रामी परतले आहेत.

## ४१५. श्री मोहित शर्मा

मु. भोरसैदा, ता. तेहवा,
जि. कुरुक्षेत्र (हरियाणा)



मोहित शर्मा हे मूळचे हरियाणा राज्यातील कुरुक्षेत्र भोरसैदा ग्रामनिवासी आहेत. या गावचे श्री. विक्रम शर्मा व सौ. लक्ष्मीदेवी यांचे ते सुपुत्र असून दि. ९.६.२००० रोजी कर्नाल गावी त्यांचा जन्म झाला. आपल्या मूळ गावी भोरसैदामध्ये त्यांनी प्राथमिक शिक्षण घेतले. कुरुक्षेत्राजवळ असलेले सुक्षेत्र तेहवा येथे श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या धार्मिक समारंभात भाग घेऊन त्यावेळी महास्वामीजींकडून इष्टलिंगदीक्षा घेतली. नंतर श्रीकाशीजगद्गुरू महास्वामीजींच्या आदेशानुसार त्यांनी दि. ८.१०.२०१६ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील काटियाबाबा आश्रम विद्यालयात उत्तरमध्यमा द्वितीय वर्षामध्ये अध्ययन करीत असून शुक्ल यजुर्वेदाचे आणि ज्योतिषशास्त्राचे अध्ययन करीत आहेत. हे जन्मतः ब्राह्मण असूनसुद्धा इष्टलिंगदीक्षा घेऊन वीरशैव-धर्मातील आचारविचारांचे अनुसरण करीत काशी गुरुकुलात अभ्यास करीत आहेत.

## ४१६. श्री विरूपाक्ष देव राजशेखरय्या हिरेमठ

मु. पो. गंव्हार, ता. जेवरगी,
जि. कलबुर्गी (कर्नाटक)



गंव्हार गावचा हिरेमठ हा काशीपीठाचा शाखामठ आहे. या मठाचे श्री. वे. राजशेखरय्या स्वामी व सौ. सरोजिनी हिरेमठ यांच्या पवित्र गर्भी दि. ३.७.१९८८ रोजी तृतीय पुत्र म्हणून विरूपाक्षदेव यांचा जन्म झाला. त्यांनी जन्मगावी प्राथमिक शिक्षण घेतले. आठव्या वर्षी जालहळ्ळी हिरेमठाचे जयशांतेश्वर शिवाचार्यांकडून त्यांना अय्याचार संस्कार झाला. नंदूर येथे श्री चंद्रमौळीश्वर शिवाचार्य यांच्या आश्रयास राहून त्यांनी माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर त्यांनी गदग येथील श्री जगद्गुरू पंचाचार्य वेदागम संस्कृत पाठशाळेत पंडित चरंतय्या शास्त्रींकडे वेदाध्ययन केले. शिरपडगी (ता. सवनूर, जि. हावेरी) या गावी वे.मू. शरणय्या शास्त्रींकडे ज्योतिषशास्त्राचा अभ्यास केला. नंतर बीदरच्या चिदंबर आश्रमात राहून वेदान्ताचे अध्ययन केले.

पुढे श्री ष.ब्र. चरंतेश्वर शिवाचार्यांच्या मार्गदर्शनाने उच्च संस्कृत अध्ययनासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २०.१.२०१७ रोजी त्यांनी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथील आदर्श सांगवेद ब्रह्मविद्या महाविद्यालयात प्रवेश घेऊन उत्तर मध्यमा परीक्षेत ते उत्तीर्ण झाले. पुढील पदवीसाठी वेदान्त, न्याय, व्याकरण या शास्त्रांचे अध्ययन करीत आहेत.

## ४१७. श्री अय्यप्पा संगय्या जवळी

मु.पो. चाकलब्बी,
ता. कुंदगोळ, जि. धारवाड (कर्नाटक)



चाकलब्बी गावचे श्री वे.मू. संगय्या व सौ. कविता यांच्या पुण्यगर्भी दि. १९.१०.१९९९ रोजी तिर्लापूर (ता. नवलगुंद) येथे ज्येष्ठ पुत्ररूपाने यांचा जन्म झाला. त्यांचे अय्यप्पा असे नामकरण करण्यात आले. त्यांनी तिर्लापूर येथे प्राथमिक शिक्षण पूर्ण केले. नंतर संशि (जि. धारवाड) येथे माध्यमिक शिक्षण पूर्ण केले. पुढे गदग येथील श्रीजगद्गुरू पंचाचार्य वेदागम संस्कृत पाठशाळेत वेदविद्येचे अध्ययन केले. त्यानंतर दोन वर्षे श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजी यांचे पूजासेवक म्हणून कार्य केले. महास्वामीजींच्या कृपाशीर्वादाने संस्कृत आणि वेद यांच्या अध्ययनासाठी त्यांनी दि. १०.२.२०१७ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीपीठाच्या वेद गुरुकुलामध्ये पंडित मल्लिकार्जुन शास्त्रींकडे ते वेदाध्ययनाबरोबर संस्कृतचे अध्ययन करीत आहेत.

## ४१८. 'वैद्यश्री' श्री ष.ब्र. सद्योजात रेणुक शिवाचार्य स्वामीजी



संगमेश्वर संस्थान हिरेमठ, मु. मुद्दडग,
ता. आळंद, जि. कलबुर्गी (कर्नाटक)

हे पूर्वाश्रमामध्ये कोटरगी (जि. कलबुर्गी) येथील श्री. रुद्रय्या स्वामी व सौ. मल्लम्मा यांचे ज्येष्ठ पुत्र म्हणून जन्मास आले. त्यावेळी त्यांचे रामलिंगय्या असे नामकरण करण्यात आले. त्यांचे प्राथमिक शिक्षण बाळ्ली (ता. आळंद, जि. कलबुर्गी) येथे झाले. श्रीमद् वीरशैव शिवयोग मंदिरामध्ये काही काळ राहून त्यांनी आचारविचारासंबंधी ज्ञान प्राप्त करून घेतले. गदगचे पुट्टराज कवी गवई आश्रमामध्ये सहा वर्षे अध्ययन करून पुराणप्रवचन कला हस्तगत केली. नंतर धारवाड येथे वैद्यकीय अध्ययन करून आयुर्वेदाचे ज्ञान प्राप्त केले.

त्यानंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी काशीला येऊन श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ४.८.२०१७ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. पुढे आपल्या मुद्दडग गावच्या पुत्रवर्गीय संगमेश्वर संस्थान हिरेमठाच्या गादीवर त्यांचा पट्टाभिषेक झाला. त्यावेळी त्यांचे 'श्री ष.ब्र. सद्योजात रेणुक शिवाचार्य' असे नामकरण करण्यात आले. त्यानंतर पुन्हा काशीमध्ये राहून ते संस्कृत-योग-ज्योतिषाचे अध्ययन करीत आहेत.

## ४१९. श्री कार्तिक मठपती

मु. राजापूर, ता.जि.कलबुर्गी (कर्नाटक)



राजापूरचे श्री. पर्वतय्या आणि सौ. बसम्मा या माहेश्वर दंपतीच्या गर्भी १५.३.१९८९ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे चि. कार्तिक असे नामकरण करण्यात आले. त्यांनी राजापूर येथे प्राथमिक अध्ययन केले. नंतर बाळेहोन्नूर पीठामध्ये माध्यमिक शिक्षण घेतले. श्रीशैलक्षेत्रातील माणिकेश्वरी वैदिक पाठशाळेमध्ये वेदाध्ययन केले.

नंतर दि. १३.८.२०१७ रोजी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे जंगमवाडी मठाचे पं. सुधीर शास्त्री आणि पं. मल्लिकार्जुन शास्त्री यांच्या गुरुत्वाखाली वैदिक अध्ययन पूर्ण केले. सध्या ते आपल्या गावी परत गेले असून कलबुर्गी जिल्ह्यामध्ये वैदिक विधिविधान करीत आहेत.

## ४२०. श्री सतीशचंद्रगौड पाटील

चिदंबराश्रम, मु.पो.ता.जि. बीदर (कर्नाटक)



कमडोळ्ळी (ता. कुंदगोळ, जि. धारवाड) येथील श्री ईश्वरगौडा व सौ. रत्ना पाटील यांच्या पवित्र गर्भी २३.३.१९९४ मध्ये यांचा जन्म झाला. त्यावेळी त्यांचे सतीशचंद्र असे नामकरण करण्यात आले. त्यांनी जन्मगावी कमडोळ्ळी येथे प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. नंतर हुब्बळी येथे हायस्कूल आणि पदवीपूर्व शिक्षण घेतले. नंतर कर्नाटक विश्वविद्यालय, धारवाड येथून एम्.कॉम. पदवी प्राप्त केली. त्यानंतर बीदरचे श्री श्रो.ब्र. शिवकुमार स्वामीजींच्या आज्ञेनुसार ७.९.२०१७ रोजी काशीक्षेत्री येऊन श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशीक्षेत्री दोन वर्षे अध्ययन करून सध्या कोल्हापूर जिल्ह्यातील कण्हेरी सिद्धगिरी मठामध्ये वेदान्ताध्ययन करीत आहेत.

## ४२१. श्री प्रभुदेव स्वामी

चिदंबराश्रम, मु.पो.ता.जि. बीदर (कर्नाटक)



शिरसी औराद (ता.जि. बीदर) येथील श्री. विरूपाक्षय्या स्वामी (गुरुमूर्ती) सौ. ललितादेवी यांच्या पवित्र गर्भी १०.११.१९८९ रोजी यांचा जन्म झाला. त्यांचे प्रभुदेव असे नामकरण करण्यात आले. जन्मगावी प्राथमिक शिक्षण पूर्ण करून बीदरमध्ये पदवीपूर्व अध्ययन तसेच बीदरच्या गुरु नानकदेव इंजिनिअरिंग कॉलेजमधून बी.ई. पदवी संपादन केली. बीदरचे श्रो.ब्र. शिवकुमार स्वामींच्या आदेशानुसार हरिद्वारमध्ये राहून तेथील साधनसदन आश्रमात वेदान्ताध्ययन केले. नंतर उच्च संस्कृत अध्ययनासाठी बीदर शिवकुमार महाराजांच्या आदेशानुसार ७.९.२०१७ या दिवशी श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. काशी येथील वेदान्त आणि व्याकरण या शास्त्रांतील विद्वानांकडून ब्रह्मसूत्रे, उपनिषदे आणि भगवद्गीतेचे अध्ययन करीत आहेत.

## ४२२. श्री शंकर देव

(शंकर कल्लप्पा इंगळगी)

चिदंबराश्रम, सिद्धारूढ मठ, बीदर (कर्नाटक)



श्री. शंकर कल्लप्पा इंगळगी हे मूळचे बागलकोट गावचे आहेत. त्यांचे वडील सोलापूरला सरकारी नोकरी करतात. श्री. कल्लप्पा आणि सौ. धानेश्वरी यांच्या पुण्यगर्भी दि. ७.७.१९८७ रोजी यांचा जन्म सोलापूर येथे झाला. सोलापुरात प्राथमिक व माध्यमिक शिक्षण पूर्ण करून तेथील सिंहगड कॉलेजमध्ये एम.बी.ए.पर्यंत अध्ययन केले. सोलापूरच्या सात रस्त्याजवळ असलेल्या श्री सिद्धारूढ मठामध्ये बीदर चिदंबर आश्रमाच्या शिवकुमार स्वामीजींच्या ते संपर्कात आले आणि वैराग्यवृत्ती जागून घर सोडून बीदरच्या चिदंबराश्रमात गेले. तेथे वेदान्ताचा अभ्यास केला. नंतर शिवकुमार स्वामीजींच्या आदेशानुसार हरिद्वारमध्ये २ वर्षे राहून वेदान्ताचे अध्ययन केले.

पुढे संस्कृत अध्ययनासाठी शिवकुमार स्वामीजींच्या आदेशानुसार काशीक्षेत्री आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. ७.९.२०१७ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. येथे दोन वर्षे राहून उपनिषदे, गीता, ब्रह्मसूत्रे आदी ग्रंथांचे अध्ययन केले. सध्या पुढील वेदान्ताच्या अध्ययनासाठी कोल्हापूरच्या कण्हेरी काडसिद्धेश्वर मठामध्ये राहून अध्ययन करीत आहेत.

## ४२३. श्री वे.मू. सिद्धराम गुरय्या हिरेमठ

मु.पो. फिरोजाबाद,

ता.जि. कलबुर्गी (कर्नाटक)



वे.मू. सिद्धराम हिरेमठ यांचा फिरोजाबादचे श्री वे.मू. गुरय्या हिरेमठ व सौ. निंगम्मा यांच्या पुण्यगर्भी ज्येष्ठ पुत्ररूपाने दि. २.६.१९९५ रोजी शाखापूर (ता. जेवरगी, जि. कलबुर्गी) येथे जन्म झाला. प्राथमिक अध्ययन शाखापुरात पूर्ण करून ते औराद येथे दहावी उत्तीर्ण झाले. नंतर यड्रूर येथील श्री सिद्धलिंग शिवाचार्य वेदागम पाठशाळेत २०१४ मध्ये त्यांनी प्रवेश घेतला. तेथे चार वर्षे राहून पं. श्रीशैलशास्त्री यांच्याकडे वेदाध्ययन केले. त्यानंतर शाखापूर तपोवन मठाचे श्री ष.ब्र. डॉ. सिद्धराम शिवाचार्य स्वामीजींच्या आदेशानुसार पुढील वेदाध्ययन आणि संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १४.२.२०१८ रोजी त्यांनी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. सध्या जगद्गुरू महास्वामीजींच्या पूजेची सेवा करीत काशीपीठाच्या वेदपाठशाळेमध्ये पं. मल्लिकार्जुन शास्त्रींकडे वेदाध्ययन तसेच संस्कृताध्ययन करीत आहेत.

## ४२४. श्री चेतन देव

कोडीमठ संस्थान, मु.पो. हारनहळ्ळी,
ता. अरसिकेरे, जि. हासन (कर्नाटक)



हारनहळ्ळी येथील श्री. विजयकुमार व सौ. पार्वतम्मा या माहेश्वर दंपतीच्या पवित्र गर्भी दि. ३०.५.१९९३ रोजी श्री चेतन देव यांचा जन्म कोडीमठात झाला. त्यांनी हारनहळ्ळीमध्ये प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेतले. नंतर कोडीमठाचे डॉ. शिवानंद शिवयोगी राजेंद्र महास्वामीजी यांनी चेतनदेव यांना आपले उत्तराधिकारी म्हणून स्वीकारले. आपल्या गुरुमहाराजांच्या आदेशानुसार त्यांनी बागलकोट येथील चरंतीमठामध्ये निवास करून पदवीपूर्व शिक्षण घेतले. निडसोसी श्री जगद्गुरू पंचम शिवलिंगेश्वर महाराजांच्या आश्रयास राहून राणी चन्नम्मा विश्वविद्यालय, बेळगाव येथून बी.ए. आणि एम्.ए. या पदव्या संपादन केल्या. हरिद्वार येथील पतंजली विश्वविद्यालयात प्रवेश घेऊन योगविषयातील पी.जी. डिप्लोमा केला.

त्यानंतर आपल्या गुरुमहाराजांच्या आदेशानुसार आणि चन्नगिरी विरक्त मठाचे डॉ. चंद्रमोहन देव यांच्या सहयोगाने संस्कृत उच्च शिक्षणासाठी ते काशीला आले. येथे श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १५.७.२०१९ रोजी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. सध्या येथील विविध गुरुकुलांमध्ये साहित्य, व्याकरण आणि वेदान्ताचे अध्ययन करीत आहेत.

४२५. **श्री वे.मू. शिवमूर्तय्या सिद्धलिंगय्या हिरेमठ**

मु. पो. आस्तिकट्टी, ता. कलघटगी,
जि. धारवाड (कर्नाटक)



श्री. वे.मू. शिवमूर्तय्या यांचा आस्तिकट्टी हिरेमठाचे श्री. वे.मू. सिद्धलिंगय्या सौ. शोभा यांच्या पुण्यगर्भी दि. २.८२००१ रोजी यांचा जन्म झाला. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. नंतर माध्यमिक शिक्षण घेण्यासाठी आणि वेद व संस्कृत शिकण्यासाठी बिसनळ्ळी (ता. शिग्गाव जि. हावेरी) येथील काशीपीठाच्या श्री जगद्गुरू पंचाचार्य वेद-आगम-संस्कृत पाठशाळेमध्ये प्रवेश घेऊन दहावीचे अध्ययन पूर्ण केले.

काशीपीठात पूजापाठ सेवा करण्यासाठी ते काशीला आले. श्रीकाशीजगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. १९.७.२०१९ रोजी त्यांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. सध्या संस्कृत शिक्षणाबरोबर काशीपीठातील वेदपाठशाळेत श्री वे.पं. मल्लिकार्जुन स्वामींकडे वेदाध्ययन करीत आहेत.

## ४२६. श्री पंचलिंगय्या शिवानंद स्वामी

मु.पो. आहेरवाडी,
ता.जि. सोलापूर (महाराष्ट्र)



आहेरवाडी गावचे वे.मू. शिवानंद स्वामी व सौ. जयश्री यांच्या पुण्यगर्भी तृतीय पुत्ररूपाने चि. पंचलिंगय्यांचा दि. १७.८.१९९९ रोजी आहेरवाडी येथे जन्म झाला. त्यांनी आपल्या जन्मगावी प्राथमिक आणि माध्यमिक शिक्षण घेतले. त्यानंतर वेदाध्ययनासाठी यड्डूर येथील श्री सिद्धलिंग शिवाचार्य वेदागम संस्कृत पाठशाळेत प्रवेश घेऊन तेथील पं. श्रीशैलशास्त्री या अध्यापकाकडे तीन वर्षे वेदाध्ययन केले. पुढील वेद आणि संस्कृत अध्ययनासाठी ते काशीत आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या अनुमतीने दि. २२.९.२०१९ रोजी जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेतला. सध्या काशीपीठातील वेदविद्यालयामध्ये पं. मल्लिकार्जुन शास्त्रीकडून वेदाध्ययन आणि संस्कृत भाषेचे अध्ययनासोबत महास्वामीजींची सेवा करीत आहेत.

## ४२७. श्री वे.मू. बसय्या मल्लय्या नावलगिमठ

मु.पो. हेब्बाळू, ता.जि. दावणगेरे (कर्नाटक)



श्री वे.मू. बसय्या हे हेब्बाळू गावचे वे.मू. मल्लय्या व सौ. शांतव्वा नावलगिमठ या माहेश्वरांच्या पवित्र गर्भी द्वितीय पुत्ररूपाने १०.७.१९९५ रोजी मळ्ळीगाव (ता. मुधोळ, जि. बागलकोट) येथे जन्माला आले. जन्मगावी व नागराळ येथे त्यांनी प्राथमिक अध्ययन पूर्ण केले. नंतर हेब्बाळू (जि. दावणगेरे) येथील रुद्रेश्वर हायस्कूलमध्ये दहावी आणि तसेच रुद्रेश्वर पदवीपूर्व महाविद्यालयामध्ये पदवीपूर्व शिक्षण घेतले. त्यावेळी हेब्बाळू येथील रुद्रेश्वर विरक्त मठामध्ये त्यांना आश्रय मिळाला होता. नंतर त्यांनी दावणगेरे येथील शासकीय महाविद्यालयात बी.ए. आणि दावणगेरे विश्वविद्यालयात अर्थशास्त्रामध्ये एम.ए. केले. त्यानंतर तिपटूर येथील जयदेव वेद संस्कृत पाठशाळेमध्ये वर्षभर राहून वेदाध्ययन केले.

नंतर हेब्बाळू विरक्त मठाचे श्री म.नि.प्र. महांत रुद्रेश्वर महाराजांच्या आदेशानुसार उच्च संस्कृत शिक्षणासाठी ते काशीला आले. श्री १००८ जगद्गुरू डॉ. चंद्रशेखर शिवाचार्य महास्वामीजींच्या आदेशानुसार दि. २१.१०.२०१९ रोजी श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलात प्रवेश घेऊन त्यांनी संस्कृत आणि वेदाध्ययनाचा शुभारंभ केला.

# Exhibit - 40

## No. 640A-1.-Grant made by Maharaja Bhawa Singh Deva to Goshain Arjun

25

(FROM ORIGINAL.)

Shri

Seal.

Shri Vishweshwar

*Sahi pat* (certified to be correct.)

Siddhi Shri Maharajadhiraj Shri Maharaja Bhawa Singh Deva orders that the entire village Khari in the pargana of Bhagdeura has been given for religious purposes to you Gosain Arjun Malla of Jangam Jamaya (body). They shall continue to be benefited thereby always generation after generation. Whoever there is in our family shall continue to protect this village, for (the credit) of living in Kashi. This has been given for our satisfaction. Anybody who goes against what is written herein is bound by Shapath (religious vow). Hence this Pat (deed of gift) has been written. Baisakh Sudi 2, Sunday, Sambat 1740.

Written by Ghansur Kayasth at Kashi.

Anybody who takes the land which has been gifted by him himself or by anyone else becomes a worm in the filth for sixty thousand years. protecting the gift made by others one earns double the merit of making gift by himself. By snatching the gift made by others he looses the merit gained by his own gifts.

Siddhi Shri Maharajdahiraj Shri Maharaja Shri Avadh Singh Deva made a gift of village Khari. They may continue to be benefited generation after generation. For pleasing Shri Kashi Vishwanath.

Seen.

(Sd.) ILLEGIBLE (in English).

* * *

In the Court of the Additional Subordinate Judge of Benares.

Suit No. 12 of 1932.

Mallikarjun Jangam VS Nishi Kant and others.

Filed by the plaintiff on 22nd September.

Exhibit 40.

Admitted against the defendant.

(Sd.) B.P.,

A. S. J.

5th October, 1933.

Not admitted.

(Sd.) DEVI NARAYAN, Advocate.

3rd March, 1933.

(Translated by H. B. JOSHI in the presence of expert RAM CHANDRA PRASAD.)

■■

परिशिष्ट ३ :

## श्री काशीपीठातील ठळक घटना

१. काशीनरेश जयनंददेव यांनी पंचक्रोशीतील कर्दमेश्वर महादेव मंदिरापासून गंगातीरापर्यंत असलेल्या जमिनीमधून ८०० परग पूर्व पश्चिम, ८०० परग उत्तर दक्षिण (सुमारे ३६५ एकर) भूमी दान केली. विक्रम संवत् ६३१ (इ.स. ५७४) कार्तिक शुद्ध एकादशी.

२. नेपाळचे राजा विश्वमल्ल महाराज यांनी नेपाळ देशात भक्तपूरमध्ये असलेल्या जंगमवाडी मठाला भूदान करून शिलाशासन केले. विक्रत संवत् ६९२ (इ.स. ६३५) ज्येष्ठ शुद्ध अष्टमी.

३. मोगल बादशहा शहाजहान, अकबर, औरंगजेब आदींनी काशीपीठाला भूदान करून ३० पेक्षा अधिक फर्माने दिली. (इ.स. १५३० ते १६६८)

४. मैसूरचे महाराजा मुम्मडी कृष्णराज वडेयर यांनी काशीपीठाला दान देऊन ताम्रपत्रावर लिहून दिले. दि. १०.७.१८४६.

५. कोडगूची महाराणी श्रीमती नंजम्मा यांनी आपले पती कोडगूचे अंतिम राजा चिक्कवीर राजेंद्र यांची समाधी काशी जंगमवाडी मठामध्ये करून त्यावर एक सुंदर शिलामंदिर निर्माण केले. त्या मंदिरामध्ये विश्वेश्वर लिंगाची प्रतिष्ठापना केली. दि. १२.२.१८६२.

६. काशी ज. राजेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी काशी येथील महामहोपाध्याय पं. शिवकुमार मिश्र यांच्याकडून 'लिंगधारण चंद्रिका' या संस्कृत ग्रंथावर विद्वत्पूर्ण संस्कृत व्याख्यान लिहवून घेऊन प्रथम प्रकाशन केले. १९०५.

७. श्री ज. शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी काशीपीठात वीरशैव विद्याभिवृद्धी फंडाची स्थापना केली. इ.स.१९१०, महाशिवरात्री.

८. ज. शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांनी काशी हिंदू विश्वविश्वविद्यालयाच्या स्थापनेसाठी पं. मदनमोहन मालवीय यांना ७५ एकर जमीन दान केली. इ.स. १९१६.

९. काशी येथे श्री ज. पंचाचार्यांचे प्रथम संमेलन संपन्न झाले. दि. १३ ते १६ मार्च इ.स. १९१८.

१०. श्री ज. पंचाचार्यांच्या संमेलनाचे स्मारक म्हणून श्री ज. विश्वाराध्य गुरुकुलाचे नामकरण व शिलास्थापना.. दि. २३.३.१९१८.

११. मोगल बादशहा औरंगजेबासमक्ष तत्कालीन काशीपीठाधिपती यांनी आकाशगमन लीला केल्याचा उल्लेख. बनारस गॅझिटिअर इ.स. १९२२ पृ. १२३.

१२. काशी नरेश प्रभुनारायण सिंह यांनी आपले पूर्वज राजा जयनंददेवाने लिहून दिलेले कागदावरील दानपत्र पाहून त्याला यथावत् ताम्रपत्रावर लिहून स्वतःचे हस्ताक्षर करून दिले. विक्रम संवत् १९८२ (इ.स. १९२५) आषाढ वद्य अष्टमी.

१३. काशीपीठामध्ये श्री ज. शिवलिंग शिवाचार्य महास्वामी यांनी पहिल्यांदा वीरभद्र अग्निकुंडाचे प्रदर्शन केले. इ.स. १९२९, महाशिवरात्री.

१४. परळी येथे वीरशैवांना वेदाधिकार मिळालेल्या विजयोत्सवाच्या निमित्ताने काशी जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींचा अड्डपालखी महोत्सव अत्यंत वैभवाने संपन्न झाला. दि. १७.५.१९३०.

१५. श्री ज. विश्वाराध्य बँकेवर ठेवीदारांनी दि. १४.३.१९३२ रोजी दाखल केलेल्या तक्रारीवर अलाहाबाद उच्च न्यायालयाने पीठातील सर्व दानपत्रांचे सर्वेक्षण करून काशीपीठाच्या बाजूने निर्णय देऊन पीठाला विजय मिळवून दिला. दि. ६.२.१९४२.

१६. काशीपीठाचे १००८ ज. द्वितीय वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींनी काशीपीठामध्ये ज्ञानमंदिर ग्रंथालय निर्माण करून त्याचे उद्घाटन केले. २.३.१९४६, महाशिवरात्र.

१७. पुणे येथे श्री ज. विश्वाराध्य विद्यार्थी निलयाची स्थापना. दि. २२.५.१९६५.

१८. श्री १००८ ज. विश्वेश्वर शिवाचार्य महास्वामीजींनी काशीपीठाला शाश्वत उत्पन्नासाठी विश्वाराध्य मार्केट निर्माण करून त्याचे उद्घाटन

केले. इ.स.१९६८.

१९. काशी येथील संपूर्णानंद संस्कृत विश्वविद्यालयाच्या वेदान्त विभागामध्ये शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताच्या अध्यासनाची स्थापना. इ.स. १९८४.

२०. काशीक्षेत्री यात्रेकरूंसाठी श्री ज. विश्वेश्वर नित्य अन्नदासोहाचा शुभारंभ. इ.स.१९९०.

२१. विद्यार्थ्यांसाठी शिष्यवृत्ती योजनेचा शुभारंभ. इ.स. १९९०.

२२. परंपरागत संस्कृत विद्वानांचा प्रतिवर्षी गौरव करण्यासाठी श्री ज. विश्वाराध्य विश्वभारती पुरस्कार योजनेचा शुभारंभ, इ.स. १९९७.

२३. बेंगळूरु येथे वीरशैव अनुसंधान संस्थानची स्थापना, इ.स. १९९८.

२४. कर्नाटकातील गदग येथे श्री ज. पंचाचार्य वेद, आगम, ज्योतिष पाठशालेची स्थापना, इ.स. २०००.

२५. काशी हिंदू विश्वविद्यालयाच्या धर्मागम विभागामध्ये वीरशैव आगम अध्यासनाची स्थापना, इ.स. २०००.

२६. कोल्हापूर येथे काशी ज. विश्वाराध्य होमिओपॅथी मेडिकल कॉलेजची स्थापना, इ.स. २०००.

२७. डॉ. चंद्रशेखर कपाळे साहित्य पुरस्काराचा सोलापूर येथे शुभारंभ, इ.स. २००२.

२८. लातूर येथे श्री ज. विश्वाराध्य विद्यार्थी निलयाची स्थापना. इ.स. २००२.

२९. पुणे नगरीमध्ये काशी विश्वेश्वर आंग्ल माध्यम शाळेची स्थापना, इ.स. २००२.

३०. तोगुणसी (ता. बदामी, जि. बागलकोट) या गावामध्ये श्री ज. विश्वाराध्य सरकारी प्राथमिक आरोग्य केंद्राची स्थापना, इ.स. २००२.

३१. बेंगळूरु येथे शिवकमल साहित्य पुरस्काराचा शुभारंभ, इ.स. २००४.

३२. वीरसंगय्या आदर्श शिक्षक पुरस्काराचा शुभारंभ, इ.स. २००६.

३३. काशीपीठामध्ये भक्तांना निवासासाठी भक्तनिवासाचे निर्माण कार्य शुभारंभ, इ.स. १९९७.

**परिशिष्ट ४ :**

## श्री जगद्गुरू पंचाचार्य संमेलन (इ.स. १९१८)

श्रीक्षेत्र काशी येथे जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या नेतृत्वाखाली १३ ते १६ मार्च १९१८ या काळात हे संमेलन घेण्यात आले. श्रीमद् रंभापुरी वीरसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी, श्रीमद् उज्जयिनी सद्धर्म सिंहासनाधीश्वर १००८ जगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजी, श्रीमद् श्रीशैल सूर्यसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू वीरभिक्षावृत्ती शिवाचार्य महास्वामीजी यांच्या स्वागतासाठी आणि दर्शनाशीर्वाद घेण्यासाठी ५००० पेक्षा अधिक भक्तगण जमले होते. जगद्गुरूंचे दर्शन झाल्याबरोबर सर्वांनी एकमुखाने 'श्री जगद्गुरू पंचाचार्य महाराज की जय' असा जयघोष केला. श्रीकाशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी तेथपर्यंत येऊन सगळ्यांना पुष्पमाला अर्पण करून काशीपीठातर्फे सर्वांचे विधिवत् स्वागत केले.

पारंपरिक वेशभूषेत दुपारी ३.३० वाजता विविध अलंकारांनी अलंकृत रजत अड्डपालखीमध्ये सर्व जगद्गुरू विराजमान झाले. प्रत्येक पालखीसमोर नंदिध्वज, श्वेतछत्र व दिवट्या घेतलेले अनेक भक्त आणि प्रत्येक पीठाची पारंपरिक शस्त्रे हाती घेऊन सेवक प्रत्येक पालखीपुढे उभे होते. वीरशैव पंडित आणि वेदपाठी सस्वर वेदघोष करीत होते. विविध वाद्यवृंद व सोनेचांदीच्या आभरणांनी सजलेले घोडे उत्सवात सहभागी झाले होते. ब्रिटीश शासनाकडून सुरक्षेसाठी आलेले अश्वारोही पोलीसदल, काशीनरेश आणि विजयनगर महाराजांकडून आलेले आठ अलंकृत हत्ती उत्सवाच्या पुढे चालत होते. महाराजांच्या पालख्यांमागे अनेक सजवलेले रथ होते. सनातन भारत धर्ममहामंडलापासून अड्डपालखी महोत्सवाचा शुभारंभ झाला. कबीर चौराहा, राधास्वामी सत्संग, टाऊनहॉलपर्यंत येईतो सूर्यास्त झाला. त्यावेळी अनेक विद्युत्दीपांची व्यवस्था केली होती. उत्सवमार्गातील सर्व भक्तांनी आपापल्या दुकानांसमोर आणि घरांसमोर रोषणाई केली होती. रस्त्याच्या दोन्ही बाजूंनी भक्त पालख्यांवर पुष्पवृष्टी करीत होते. ही मिरवणूक हेड पोस्ट ऑफिस, कार मायकल लायब्ररी, विश्वेश्वर थिएटर अशा मुख्य महामार्गाने चालत गोदोलिया मार्गाने रात्री ८ वाजता जंगमवाडी मठात पोहोचली. गोदोलियापासून जंगमवाडी

मठापर्यंत मोठमोठ्या पुष्पांच्या कमानींवर 'जगद्गुरू पंचाचार्यांचे सुस्वागत' असे लिहिले होते. मठात आल्यावर महाद्वारामध्ये गंगाजलाने जगद्गुरू पंचाचार्यांचे पादप्रक्षालन व विधिवत् पूजाआरती करून व पुष्पमाला घालून स्वागत करण्यात आले. सर्व जगद्गुरूंनी कैलासमंटपात श्रीजगद्गुरू मल्लिकार्जुन भगवत्पादांच्या संजीवन समाधीची महामंगलारती केली. दर्शन घेऊन सगळ्यांनी निवासस्थानाकडे प्रस्थान केले.

दि. ११.३.१९९८ सोमवारी महाशिवरात्रीच्या पर्वकाळी सकाळच्या पूजेनंतर नूतन निर्माण केलेल्या चांदीच्या रथामध्ये जगद्गुरू विश्वाराध्यांची उत्सवमूर्ती ठेवण्यात आली. रथ ओढण्यासाठी दोन हत्ती जोडले होते. या उत्सवाबरोबर सर्व जगद्गुरूंचा गजमहोत्सव करण्यात आला. काशीनरेश आणि विजयनगर महाराजांनी दिलेल्या चार हत्तींवरील सोन्याच्या अंबाऱ्यांत रंभापुरी, उज्जयिनी, श्रीशैल आणि काशी हे जगद्गुरू विराजमान झाले. काशीनरेश प्रभुनारायणसिंह यांनी राजपरिवारासह येऊन सर्व जगद्गुरूंचे दर्शन घेऊन उत्सवाला प्रारंभ केला. दुपारी बारा वाजता निघालेला उत्सव गोदोलिया, व्हिक्टोरिया महाराणी पार्क, म्युनिसिपल ऑफिस, हथवा बाजार, सनातन धर्म महामंडल, टाऊनहॉल, गोदोलिया या मार्गे दशाश्वमेघ घाटावर पोहोचला. सर्व जगद्गुरूंनी हत्तींवरून उतरून रथातील विश्वाराध्य उत्सवमूर्तींचे स्वागत करून मूर्तींस गंगाजलाने अभिषेक केला. विधिवत् पूजा, महामंगलारती झाल्यानंतर मूर्तींची पुन्हा रथामध्ये स्थापना केली. सर्व जगद्गुरू पुन्हा हत्तींवर आरूढ झाले. गंगाघाटावरून निघालेला हा उत्सव संध्या. ५ वाजता जंगमवाडी मठात पोहोचला. महाशिवरात्रीच्या निमित्ताने सर्व सद्भक्तांची सामूहिक इष्टलिंगपूजा झाली. जगद्गुरू महास्वामीजींनी सामूहिक इष्टलिंगपूजेमध्ये येऊन सर्वांना मंगल दर्शन दिले. काशीपीठातील विद्यार्थिगण वेदघोष करीत होते. पूजेत बसलेल्या सर्व सद्भक्तांना गुरु-लिंग-जंगमाचे एकाच वेळी दर्शन घेण्याचे महद्भाग्य प्राप्त झाले. रात्री महाशिवरात्री निमित्त कीर्तन, भजन, धर्मसभा, जागरण झाले.

दि. १२.३.१९९८ रोजी आलेल्या सर्व सद्भक्तांना उपवासाच्या पारण्यानिमित्त महाप्रसादाची व्यवस्था केली होती. दि. १३.३.१९९८ रोजी काशीपीठातील चित्रशाळा हॉलमध्ये भव्य सभामंटपात पाच चांदीची सिंहासने ठेवली होती. सर्व जगद्गुरूंना वेदविद्वानांनी वेदघोष करीत सभामंटपापर्यंत आणले. जगद्गुरू सिंहासनांवर विराजमान झाले. सायं. ५ वाजता धर्मसभेचा शुभारंभ झाला. त्या

धर्मसभेसाठी केदारच्या वैराग्यसिंहासनाचे विश्वलिंग शिवाचार्य महास्वामीजी शारीरिक अस्वास्थ्यामुळे आले नव्हते. त्यांच्या सिंहासनावर त्यांचे सुंदर भावचित्र ठेवले होते. जमलेल्या हजारो सद्‌भक्तांनी जगद्‌गुरू पंचाचार्यांचा, काशी विश्वनाथाचा, जगद्‌गुरू विश्वाराध्यांचा उच्चस्वराने जयघोष केला. काशीक्षेत्री विश्वनाथांच्या सान्निध्यात जगद्‌गुरू पंचाचार्य स्थानापन्न झाल्यानंतर खरोखर कैलास भूलोकात अवतरल्यासारखे दिसत होते. सर्व जगद्‌गुरू स्थानापन्न झाल्यानंतर सर्वांचे पुष्पमाला अर्पून स्वागत करण्यात आले. काशीपीठाचे विद्वान विद्यार्थी अब्बिगेरी हिरेमठाचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. वीरभद्र शिवाचार्य स्वामीजींनी स्वागतपर विद्वत्तापूर्ण भाषण केले. केदारपीठाचे जगद्‌गुरू विश्वलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी पाठवलेल्या आशीर्वादपत्राचे वाचन झाले. शारीरिक अस्वास्थ्यामुळे तीव्र इच्छा असूनही मी येऊ शकलो नाही तरी काशीच्या सभेमध्ये समान चार पीठाचार्य जो निर्णय घेतील त्याला माझी पूर्ण संमती आहे, असा त्या पत्रात मजकूर होता.

त्यानंतर रा.ब. शांतवीरअप्पा मेणसिनकाई, धारवाड; श्री महारुद्रप्पा रेवप्पा साखरे; एन.आर. करिबसव शास्त्रीजी, मैसूरु; श्री. बंडप्पण्णा काडादी, सोलापूर; धर्मतरंगिणी पत्रिकेचे संपादक शिवलिंग शास्त्री, धारवाड; श्रीगुरुसिद्धप्पा शिवबसप्पा सांब्राणी, धारवाड आदी लोकांनी पाठविलेल्या शुभेच्छा पत्रांचे आणि तारसंदेशांचे वाचन करण्यात आले. त्या दिवशी सभाध्यक्षस्थान रंभापुरी पीठाचे जगद्‌गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींनी भूषविले होते. श्री रंभापुरी जगद्‌गुरू महास्वामीजींचे लिखित भाषण सभेचे सेक्रेटरी नागनूर बृहन्मठाध्यक्ष साहित्यतीर्थ काशीनाथशास्त्री यांनी सुश्राव्य रितीने वाचून दाखविले. पत्रामध्ये प्रारंभी मैसूरचे महाराज कृष्णराज वडियर आणि काशीराजा प्रभुनारायणसिंह या दोघांना त्यांच्या सर्वांगीण अभिवृद्धीसाठी मंगलाशीर्वाद देऊन त्यांनी पुढे लिहिले होते की, सर्व प्रजाननांच्या मुलांच्या अध्ययनासाठी महाराजांनी जातीने लक्ष घातले पाहिजे. वीरशैवधर्माच्या प्राचीन धर्मग्रंथांच्या मुद्रणासाठी श्रीजगद्‌गुरू पंचाचार्यांच्या नावे एका मोठ्या निधीची व्यवस्था केली पाहिजे. काशी जंगमवाडी मठातील व्यवस्थेला गुरुकुलस्वरूप प्रदान करणे, धर्मातील विद्वानांना तयार करून त्यांना पदवी प्रदान करणे इत्यादी विषय लिखित भाषणामध्ये होते. अध्यक्षीय भाषणाचे वाचन केल्यानंतर काशीपीठाचे विद्यार्थी हूली हिरेमठाचे श्री ष.ब्र. नीलकंठ शिवाचार्य स्वामीजींनी कन्नड भाषेत

आचार्यांच्या कर्तव्याबद्दल सुंदर भाषण केले. त्यानंतर उमरावतीचे भीमाशंकर स्वामीजी आदींनी मराठीमध्ये भाषणे केली. पंचाचार्यांच्या जयघोषाने सभेची सांगता झाली.

दि. १४.३.१९१८ रोजी सायं. ४ वाजता सभेचा शुभारंभ झाला. सर्व पीठाधिपती आपापल्या सिंहासनावर स्थानापन्न झाले. सभेचे अध्यक्षस्थान श्रीमद् उज्जयिनी सद्धर्मसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू सिद्धलिंग राजदेशिकेंद्र शिवाचार्य महास्वामीजींनी भूषविले होते. श्रीमहास्वामीजींच्या लिखित भाषणाचे वाचन हरपनहळ्ळीचे गुरुपाद देवर मठाच्या पट्टाध्यक्षांनी केले. उज्जयिनीपीठाचे एजंट श्री गुरुसिद्ध शास्त्री यांचे भाषण झाले. नागनूर बृहन्मठाचे पं. काशीनाथ शास्त्रीजींनी प्रत्येक मठावर आणि पीठावर उत्तराधिकारी बटूंची निवड कशी केली पाहिजे, याबद्दल सविस्तर भाषण केले. धारवाडचे गुरुसिद्धप्पा शिवबसप्पा सांब्राणी यांच्या लिखित भाषणाचे वाचन करण्यात आले. सामाजिक ऐक्याबद्दल श्री विरूपाक्षय्या हळ्ळीकेरी मठ, बळ्ळूचे चन्नबसव शास्त्रीजी आदींची भाषणे झाली. मंगलारती झाल्यावर जयघोषाने सभेचा समारोप झाला.

दि. १५.३.१९१८ संध्या. ४ वाजता पुन्हा सभेला प्रारंभ झाला. सर्व पीठाचार्य आपापल्या सिंहासनांवर आरूढ झाले. सर्वांचे विधिवत् स्वागत करण्यात आले. त्या दिवशीचे अध्यक्षस्थान श्रीशैल सूर्यसिंहासनाधीश्वर श्री १००८ जगद्गुरू नागलोटी भिक्षावृत्ती शिवाचार्य महास्वामीजींनी भूषविले होते. पूज्य महास्वामीजींच्या संस्कृत भाषणाचे नंदीकोटकूरुचे वैयाकरणी वे.मू. पंडित नीलकंठ शास्त्रीजींनी वाचन केले. संस्कृत भाषणाचा सारांश काशीपीठाचे राजपंडित श्री फालाक्ष शास्त्रीजींनी कन्नड आणि मराठीत समजावून सांगितला. त्यानंतर हिरेबेंडीगेरी संस्कृत पाठशाळेचे प्राध्यापक आणि काशीपीठाचे पूर्व विद्यार्थी पं. हरीश्वर शास्त्रीजी, सोनकल्लबिदरी आणि काशीपीठाचे विद्यार्थी उटगेरीचे बसवलिंग शास्त्री आदींनी आपल्या मनोगतांत संस्कृत भाषा व शास्त्रांच्यो पठणपाठन व्यवस्थेसाठी श्री जगद्गुरू पंचाचार्यांच्या नावाने एक निधी स्थापन करण्यावर जोर दिला. उमरावतीचे भीमाशंकर स्वामींनी मराठीत भाषण केले. काशीपीठामधील गुरुकुलाचे नामकरण करून त्याला व्यापक रूप देणे याविषयी कंपली पाठशालेचे प्राध्यापक जगन्नाथ शास्त्री मगी आदींनी भाषणांत सांगितले. जगद्गुरू पंचाचार्यांची सभा सर्वत्र निरंतर होत राहावी, असे काशीपीठाचे विद्यार्थी कोंगवाडचे पं. वीरभद्र शास्त्रीजी आपल्या भाषणात

म्हणाले. रात्री २ वाजता मंगलारतीने आणि जयघोषाने सभा संपली.

दि. १६.३.१९१८ रोजी जगद्गुरू पंचाचार्यांच्या दिव्य सान्निध्यात काही महत्त्वाचे समाजोपयोगी आणि धर्मोपयोगी ठराव करण्यात आले. पंचाचार्यांनी प्रत्येक युगारंभी वीरशैवधर्माची स्थापना करून समस्त मानवजातीसाठी मोक्षमार्ग प्रशस्त केला आहे. प्राचीन कालापासून आलेले गुरु-शिष्यसंबंधविषयक नियम सर्वांनी आपापल्या शिष्यांना सांगितले पाहिजेत. श्री जगद्गुरू पंचाचार्यांचा लोकांना विसर पडतो आहे. त्यासाठी वारंवार याविषयी सर्वांनी प्रबोधन केले पाहिजे. यासाठी आज जगद्गुरू पंचाचार्य काशीपीठामध्ये एकत्र येऊन काही ठराव पारित करीत आहोत. या सर्व ठरावांना केदारजगद्गुरू विश्वलिंग शिवाचार्य महास्वामीजींची लिखित अनुमती असल्यामुळे हे सर्व ठराव पंचपीठांच्या एकमताने झालेले निर्णय होत.

**ठराव**

१. प्रत्येक गावात, नगरात लिंगदीक्षा आणि विवाह आदी कार्य करीत असताना जगद्गुरू मूल पंचाचार्यांच्या साक्षिभूत असलेल्या पंचकलशांची स्थापना अवश्य करावी. शिवाचार्यांनी दीक्षा, विवाह आदी कार्यात त्या गावातील हिरेमठाचे जंगममूर्ती, गणाचारी आणि मठपती यांचा सहयोग घ्यावा. पंचकलशांसमोर यजमानाच्या शक्त्यनुसार दक्षिणा ठेवून दक्षिणेचे तीन भाग करावेत. त्यामधील पहिल्या भागाचे पाच भाग करून प्रत्येक पीठाला गुरुदक्षिणा म्हणून पाठवून द्यावे. बाकी दोन भागांमधला एक भाग शिवाचार्यांना आणि एक भाग त्या गावातील मठस्थ, मठपती, गणाचार्य यांनी वाटून घ्यावा.

प्रत्येक गावातील पट्टाधिकाऱ्यांना त्या गावातील धर्मासंबंधी सूक्ष्म न्याय निर्णय करण्याचा अधिकार पंचपीठांनी दिलेला आहे. तो निर्णय करताना त्या गावातील प्रमुख पंचांना घेऊन न्यायनिर्णय करावेत. त्या निर्णयावर स्वतःची, गावच्या पंचांची आणि विवादित व्यक्तींची स्वाक्षरी असलेली एक प्रत आपल्याकडे ठेवून एकेक प्रत सर्व पीठांना पाठवून द्यावी.

२. पंचपीठांपैकी कुठल्याही पीठाच्या शाखामठावर बटू निवडताना तो बटू गुरुस्थल वंशोद्भव असून धर्मशास्त्र जाणणारा आणि सर्व शिष्यांना सांभाळण्याचे सामर्थ्य असणारा असावा. त्या त्या मठाचे पुत्रवर्ग वा शिष्यवर्ग संप्रदायाला अनुसरून बटूचे निर्णय करावेत. त्या निर्णयामध्ये वाद उपस्थित झाला तर त्या मठाच्या पीठाधिपतींच्या आदेशानुसार बटूचा निर्णय करावा.

३. समाजामध्ये काही दांभिक लोक मूल पंचपीठांचे नाव वापरून भक्तांकडून धनसंग्रह करतात. त्यासाठी सर्वांनी त्यांच्यावर बंदी घालावी.

४. वीरशैवधर्मामध्ये अनेक पोटभेद आहेत. ते जन्मत: नसून उद्योगामुळे आलेली आडनावे आहेत. त्यासाठी उपजातीच्या लोकांनी परस्पर वैरभाव न करता सर्वांनी सहोदरभावनेने आणि ऐक्यभावनेने राहावे.

५. पंचाचार्यांच्या नावाने स्थापन केल्या जाणाऱ्या निधीविषयी त्याच्या नियम आणि निबंधनाबद्दल पुढील सभेमध्ये निर्णय घेण्यात येईल.

६. काशीपीठामध्ये श्री जगद्गुरू पंचाचार्य संमेलनाचे स्मारक म्हणून प्राचीन गुरुकुलाचे 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे विधिवत् नामकरण करण्यात येत आहे. येथील विद्यार्थ्यांनी काशी हिंदू विश्वविद्यालयामध्ये संस्कृत, इंग्रजी आदी विषयांचे सुद्धा अध्ययन करावे.

७. ह्या वर्षी काशीक्षेत्रातील पंचाचार्यांच्या महासभेमध्ये आपल्या धर्मपंडितांना त्यांच्या योग्यतेनुसार जशा प्रशस्ती प्रदान केल्या आहेत तशा पुढील महासभेमध्ये सुद्धा विद्वानांना देण्यात याव्यात.

८. श्री जगद्गुरू पंचाचार्यांची महासभा प्रतिवर्षी निरंतर चालण्याबद्दल पुढील सभेमध्ये निर्णय घेण्यात येईल.

९. प्रत्येक पीठामध्ये ग्रंथालयाची स्थापना करून त्या ग्रंथालयामध्ये दोन पंडितांना नेमून संशोधनकार्य निरंतर सुरू ठेवावे.

१०. काशीक्षेत्री 'श्रीजगद्गुरू पंचाचार्य मुद्रणालय' स्थापन करण्यात यावे.

११. पंचपीठांमध्ये आणि त्यांच्या शाखामठांमध्ये पट्टाधिकारी आणि चराधिकारी अशा दोन मठाधिपतींची परंपरा अनादी कालापासून चालत आलेली आहे. पीठात आणि मठात दोन धर्माधिकारी असले तर परस्पर सामंजस्याने राहणे अशक्य होते. त्यासाठी पीठात आणि मठात चर आणि पट्टाधिकार एकाच व्यक्तीला देण्यात यावा.

१२. वरील नियमांमध्ये देश आणि कालानुसार सुधारणा करण्याची सोय असून ती सुधारणा पंचपीठाधीश्वरांनी पुन्हा एकत्र येऊनच करावी.

अशा प्रकारचे १२ ठराव लिहून सर्व पीठाचार्यांनी त्यावर स्वाक्षरी केल्यावर त्यांचे वाचन करण्यात आले. ठरावांच्या पाच प्रती तयार करून प्रत्येक पीठाकडे एकेक प्रत देण्यात आली.

या सभेमध्ये उज्जयिनी संस्थानाचे बी. गुरुसिद्ध शास्त्रीजी, जैनापूरचे मल्लिकार्जुन

शास्त्रीजी, कंपली पाठशाळेचे प्राध्यापक पं. जगन्नाथ शास्त्री, उज्जयिनी पीठाचे पंडित वीरभद्र शास्त्री, नंदीकोटकूरुचे वैयाकरणी नीलकंठ शास्त्रीजी, हिरेबेंडिगेरी पाठशालेचे प्राध्यापक पं.हरीश्वर शास्त्री, रंभापुरी पीठाचे पंडित सिद्धान्ती मरिअप्पा हलसूर मठ आणि हळ्ळीकेरी मठाचे विरूपाक्षय्या या सर्वांचा धर्मसुधाकर, धर्मालंकार, धर्मभूषण, धर्मकार्यधुरंधर अशी अक्षरांकित सुवर्णपदके, शाल, श्रीफल देऊन सन्मान करण्यात आला. सर्व शास्त्रीगणांना, पट्टाधिकारी–चरमूर्तींना रेशमी सोवळे प्रदान करून त्यांचा गौरव करण्यात आला. शेवटी महामंगलारती आणि पंचाचार्यांच्या जयघोषाने सभेची सांगता झाली.

दि. २२.३.१९१८ श्री जगद्गुरू पंचाचार्यांच्या अध्यक्षतेखाली विद्वत्सभेचे आयोजन करण्यात आले. या सभेमध्ये काशीमध्ये राहात असलेले महामहोपाध्याय आदी अनेक विद्वत्गण सभास्थानी उपस्थित झाले. त्या सभेत अद्वैतादी सर्व मते आणि शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्त या विषयावर सुदीर्घ शास्त्रार्थ झाला. सभेतील सर्व विद्वानांनी शक्तिविशिष्टाद्वैत वेदान्ताचा समन्वय सिद्धान्त एकमताने मान्य केला. सभेत उपस्थित असलेल्या आणि काशीपीठामध्ये अध्ययन करीत असलेल्या सर्व विद्वानांचा सत्कार करून गौरव करण्यात आला. यावेळी काशीपीठातर्फे श्री जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी सर्वांना चांदीचे पाच रुपये, फलपुष्पे देऊन आशीर्वाद दिले. शेवटी पंचाचार्यांच्या जयघोषाने विद्वत्सभेची सांगता झाली.

दि. २३.३.१९१८ रोजी जगद्गुरू पंचाचार्यांच्या अमृतहस्ते श्री जगद्गुरू पंचाचार्य संमेलनाचे स्मारक म्हणून काशीपीठातील प्राचीन गुरुकुलाचे 'श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे नामकरण करून 'गुरुकुलम्' ही अक्षरे कोरलेला शिलालेख स्थापिला गेला. काशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजी यांनी गुरुकुल निर्मितीसाठी पाच हजार रुपये किंमतीची एक जागा आणि त्याची वास्तू निर्माण करण्यासाठी ७५ हजार रुपये देण्याची घोषणा केली. बाकी सर्व पीठाचार्यांनी विद्यार्थ्यांचा भोजनपुस्तकादी सर्व खर्च वहन करण्याची घोषणा केली.

अशाप्रकारे १९१८ साली श्रीकाशीजगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींच्या प्रयत्नामुळे हे अभूतपूर्व संमेलन पार पडले.

(श्री वे.मू. एच.एस. शिवलिंगशास्त्री, धारवाड संपादित 'धर्मतरंगिणी'तील कन्नड वृत्तांताचा सारांश)

परिशिष्ट ५ :

# श्री काशी वीरशैव विद्वत् संघ

## श्रीकाशी वीरशैव विद्वत्संघाची स्थापना आणि संविधान

काशी ही सकल विद्येचे माहेरघर आहे. अनादिकालापासून जगाच्या कानाकोपऱ्यातून विद्यार्थी विद्याध्ययनासाठी काशीला येत आहेत. आलेल्या विद्यार्थ्यांसाठी काशीमध्ये निवास आणि भोजनाची व्यवस्था करणारी अनेक मठमंदिरे आहेत. त्या सर्व मठांमध्ये श्री जगद्गुरू विश्वाराध्य ज्ञानसिंहासनाचा जंगमवाडी मठ अत्यंत प्राचीन मानला जातो. या मठामध्ये सुद्धा अनादिकालापासून विद्याध्ययनासाठी आलेले सर्वप्रांतीय आणि सर्वधर्मीय विद्यार्थ्यांना निवास, प्रसाद आणि विद्यादानाची व्यवस्था आहे.

या प्राचीन व्यवस्थेला एक चांगले स्वरूप देण्यासाठी काशीपीठाचे ८२ वे काशी पीठाधीश्वर श्री जगद्गुरू शिवलिंग शिवाचार्य महास्वामीजींनी आपल्या कार्यकालामध्ये १९१८ साली काशीमहापीठात श्री जगद्गुरू पंचाचार्यांचे एक ऐतिहासिक संमेलन घडविले. त्या संमेलनामध्ये धर्म, समाज आणि शिक्षणासंबंधी अनेक महत्त्वपूर्ण निर्णय घेतले गेले. त्यामध्ये प्राचीन गुरुकुलाचे 'श्रीजगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुल' असे नामकरण ही महत्त्वाची घटना आहे. या संमेलनामध्ये झालेल्या निर्णयानुसार या गुरुकुलामध्ये उच्च शिक्षणासाठी येणाऱ्या सर्व विद्यार्थ्यांना गुरुकुलामध्ये प्रवेश देऊन विद्यार्थ्यांची संपूर्ण व्यवस्था काशीपीठ करीत आलेले आहे. काही काळानंतर ज. विश्वाराध्य गुरुकुलातील विद्यार्थ्यांनी आपली वक्तृत्व कला वृद्धिंगत करण्याची गरज ओळखून वक्तृत्व कलोत्तेजक संघाची स्थापना केली. या संघाद्वारे भाषण, लेखन, परस्पर चर्चा या विविध कलांची विद्यार्थ्यांमध्ये अभिवृद्धी होऊ लागली. शुक्ल पक्षाची प्रतिपदा आणि कृष्णपक्षाची प्रतिपदा असे प्रत्येकी १५ दिवसाला एक पाक्षिक अधिवेशन सुरू झाले. असे वक्तृत्व कलोत्तेजक संघाद्वारा पाक्षिक अधिवेशन होत असताना सर्वांच्या मनामध्ये एक विचार आला की आपण एक विद्वत् संघ स्थापन करूया. त्यावेळी सर्वानुमताने दि. ५.९.१९३३ रोजी काशी वीरशैव विद्वत् संघाची स्थापना करण्यात आली. संघाचे नियम आणि उद्देश ठरवून सर्वांनी त्यावर संमतिसूचक स्वाक्षऱ्या केल्या.

## काशी विद्वत् संघाची नियमावली

१. १९३० मध्ये स्थापना झालेल्या वक्तृत्व कलोत्तेजक संघ हा आजपासून 'काशी वीरशैव विद्वत् संघ' या नावाने कार्य करील.

२. काशी वीरशैव विद्वत् संघ श्री ज. विश्वाराध्य गुरुकुल जंगमवाडी मठातच राहील.

३. संघाच्या कार्याच्या सर्वांगीण विकासासाठी विश्वाराध्य गुरुकुलाच्या सर्व विद्यार्थ्यांनी आपल्याला मिळत असलेले शिष्यवेतन अथवा सहाय्य धनातील १ पैसा (जुन्या काळातील, सध्याच्या काळातील पाच नवीन पैसे) देणगी द्यावी.

४. आर्थिकदृष्ट्या सबल असणाऱ्या विद्यार्थ्यांनी आपल्याला अनुरूप देणगी द्यावी.

५. जंगमवाडी मठामध्ये यात्रेसाठी आलेल्या यात्रेकरूंकडून सुद्धा संघासाठी देणगी संग्रह करण्यासाठी प्रयत्न करावेत.

६. गुरुकुलात निवास करणारे अन्य धर्मीय भक्तांनी संघाला देणगी दिली तर ती स्वीकारावी.

## काशी वीरशैव विद्वत् संघाचे उद्देश

१. वीरशैव पंडितांचा उत्कर्ष करणे हा संघाचा मुख्य उद्देश असेल.

२. गुरुकुलात प्रशिक्षणासाठी आलेल्या विद्यार्थ्यांमध्ये आर्थिक दृष्ट्या दुर्बल असेल तर सर्वांनी मिळून त्यांना सहाय्यता करणे.

३. काशीक्षेत्री यात्रेसाठी आलेले विविध प्रांतांतील वीरशैव विशिष्ट व्यक्तींचा आदरसत्कार करणे.

४. संघाचे सर्व सदस्यांनी आपले शील, चारित्र्य सांभाळून राहणे.

५. जगद्गुरू विश्वाराध्य सिंहासनाला कोणताही उणेपणा येऊ नये असे आपले वर्तन ठेवणे.

६. संघाचे कार्यकर्त्यांनी सर्वसंमतीने अथवा बहुमताने महत्त्वपूर्ण निर्णय घ्यावेत. यामध्ये काही अडचणी आल्या तर जगद्गुरू महास्वामींचा आदेश अंतिम असेल.

७. संघाचे अधिवेशन शुक्लपक्ष प्रतिपदेच्या आणि कृष्णपक्ष प्रतिपदेच्या दिवशी अवश्य आयोजित करणे. याशिवाय आवश्यक प्रसंगी तत्काळ अधिवेशन

भरवता येईल. या अधिवेशनामध्ये सर्व सदस्यांची उपस्थिती अनिवार्य असेले.

८. अधिवेशनामध्ये उपस्थित होण्यासाठी काही अपरिहार्य अडचण आली तर संघाच्यो कार्यदर्शीकडून अनुमती घ्यावी लागेल.

९. संघाची दान, दक्षिणा इ. धनराशी एका बँकेत ठेवून त्याचे व्यवहार कार्यदर्शींनी करावेत. कार्यदर्शींनी १० रुपयांपेक्षा अधिक रक्कम आपल्या जवळ ठेवू नये.

१०. आर्थिक व्यवहारासंबंधी काही विवाद निर्माण झाले तर जगद्गुरू महास्वामीजींच्या आदेशानुसार सर्वांनी वागावे.

११. काशीपीठाचे तत्कालीन जगद्गुरू काशी वीरशैव विद्वत् संघाचे शाश्वत अध्यक्ष राहतील.

१२. विद्यार्थ्यांमध्ये वरिष्ठ आणि अनुभवी असलेल्या विद्यार्थ्याची उपाध्यक्षपदी सर्व विद्यार्थी अथवा जगद्गुरू महास्वामीजी नेमणूक करतील.

१३. प्रत्येक महिन्यामध्ये होणारी संघाची सार्वजनिक सभा अध्यक्षांच्या आदेशानुसार उपाध्यक्ष आयोजित करतील.

१४. सार्वजनिक सभेमध्ये घेतलेल्या निर्णयामध्ये फेरबदल करण्याचा पूर्ण अधिकार अध्यक्षांना असेल.

१५. उपाध्यक्षांचा काल १ वर्षाचा राहील.

१६. सभेमधील ठरावाच्या स्वीकृतीसाठी जर समान मते पडली तर उपाध्यक्ष आपले एक मत देऊन ठराव पारित करून घेऊ शकतील.

१७. संघाच्या कार्यदर्शीचा कालावधी १ वर्षाचा राहील.

१८. संघामध्ये उपाध्यक्ष, कार्यदर्शी आणि कोषाध्यक्ष अशी तीन पदे राहतील. त्या पदासाठी निवडलेली व्यक्ती संघाची सदस्य असली पाहिजे.

१९. सभेला सर्वांनी निर्दिष्ट वेळेवर उपस्थित राहणे अनिवार्य आहे.

२०. सभेमध्ये योग्य विषयावरच चर्चा करावी. जर नवीन विषय घ्यायचा असेल तर अध्यक्षांची अनुमती घ्यावी लागेल.

२१. संघाच्या सदस्यांनी आपली वार्षिक वर्गणी नियमित वेळेवर द्यावी..

विशेष सूचना : संघाचे उद्देश आणि नियमांमध्ये काही बदल करायचा असेल तर जगद्गुरू महास्वामीजींच्या आदेशानुसार सर्वसाधारण सभा बोलावून संघाचे सदस्य बदल करू शकतील.

**काशी वीरशैव विद्वत् संघाचे संस्थापक सदस्य**

१. श्री ष.ब्र. गुरुदेव शिवाचार्य हिरेमठ, मु. चिक्कमण्णूरु (साहित्यशास्त्री)
२. श्री ष.ब्र. करिबसवेश्वर शिवाचार्य हिरेमठ, महिशाळ (साहित्यतीर्थ)
३. श्री ष.ब्र. गुरुशांत शिवाचार्य हिरेमठ, मुत्तनाळ
४. श्री ष.ब्र. वागीश शिवाचार्य बृहन्मठ, मुदेनूरु
(श्रीशैल जगद्गुरू वागीश पंडिताराध्य शिवाचार्य महास्वामीजी)
५. श्री ष.ब्र. मल्लिकार्जुन शिवाचार्य पूरवर हिरेमठ, मु. चिम्मलगी (न्यायविशारद)
६. श्री ष.ब्र. शिवकुमार शिवाचार्य मुत्तिन कंथी मठ, मु. बेंगळूरु
७. श्री ष.ब्र. अन्नदान शिवाचार्य मुतिन कंथी मठ, मु. जमखंडी
८. श्री ष.ब्र. वृषभलिंग शिवाचार्य बृहन्मठ, मु. गोब्बूरु
९. श्री ष.ब्र. संगमेश्वर शिवाचार्य बृहन्मठ, मु. नारायणपेठ
१०. श्री सिद्धलिंग देव, विरक्त मठ, मु. इनामहोंगल (साहित्यशास्त्री)
११. श्री वेदमूर्ती नीलकंठ शास्त्री सुज्ञान शास्त्री, बृहन्मठ, मु. भानापूर (काव्यतीर्थ, वेदान्ताचार्य)
१२. श्री वीरभद्र शर्मा नागभूषण शास्त्री, चिदरेमठ, मु. नलगोंडा (वेदतीर्थ, काव्यतीर्थ, साहित्यविशारद)
(श्रीकाशीजगद्गुरू द्वितीय वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी)
१३. श्री वे.मू. सदाशिव शर्मा शांतवीर शर्मा, बृहन्मठ, मु. रावलुडकी (काव्यतीर्थ)
१४. श्री चंद्रशेखर शर्मा, आराध्य मठ, मु. सुणकल्बिदरी (काव्यतीर्थ)
१५. श्री मल्लिकार्जुन शर्मा, वीरभिक्षावृत्ती मठ, मु. कुनबेवू
१६. श्री सिद्धलिंग शर्मा, अरळेले मठ, मु. बंकापूर
१७. श्री रुद्राराध्य शर्मा वृषभलिंग, मु. तावरेकेरे
१८. श्री गुरुशांत शर्मा पर्वतशास्त्री हिरेमठ, मु. होळगुंदी
१९. श्री काळाचार्य रामाचार्य शहापूरकर, मु. शिरसंगी
२०. श्री सदाशिव सिद्रामप्पा, मु. बुरकुले
२१. रामराव खंडेराव मुजुमदार, मु. बेळवनकी
२२. शंकर शर्मा गुरुबसय्या, मु. बेकिनाळ
२३. श्री शिवानंद स्वामी गुरुशांतलिंग स्वामी, मु. अहिरवाडी

२४. श्री जयशंकर गुरू रेवणसिद्धय्या स्वामी, मु. अडगाव
२५. श्री गुरुलिंग गुरू सोमय्या स्वामी, मु. यवतमाळ
२६. श्री ष.ब्र. चिक्कवीर शिवाचार्य, पुरदमठ, मु. गुब्बी
२७. श्री ष.ब्र. षडक्षर शिवाचार्य, नंदीमठ, मु. सोलापूर
२८. विरूपाक्ष स्वामी संस्थानमठ, मु. रेकुळगी
(श्री ष.ब्र. विरूपाक्ष शिवाचार्य माणूरकर मठ, माणूर)
२९. श्री चन्नबसव शर्मा गुरुलिंगय्या स्वामी, मु. देवणगाव
३०. श्री गुरुलिंग शर्मा सदाशिव स्वामी, मु. वावथरे, जि. सातारा

श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाच्या वरील ३० विद्यार्थ्यांनी एकत्र येऊन दि. ५.९.१९३३ रोजी मठात संपन्न झालेल्या वक्तृत्व कलोत्तेजक संघाच्या पाक्षिक बैठकीत चर्चा करून त्या दिवशी 'श्री काशी वीरशैव विद्वत् संघा'ची स्थापना केली. त्या सभेत सर्वसंमतीने महिशाळचे पट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. करिबसवेश्वर शिवाचार्य यांना प्रथम कार्यदर्शी नेमण्यात आले.

त्याच सभेत विद्वत्संघाच्या नियमाप्रमाणे कार्यदर्शीसहित सर्व सदस्यांनी काशीपीठाचे जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजींना संघाचे प्रथम शाश्वत अध्यक्षपद स्वीकारावे, अशी विनंती केली. पूज्य महास्वामीजीनी आपली संमती देऊन सर्वांना शुभाशीर्वाद दिला.

पुढे हा संघ वर्षानुवर्षे उत्तम कार्य करीत जगद्गुरूंच्या आणि समाजाच्या गौरवास पात्र झाला. काही विशेष घटनांचा संक्षेपाने येथे उल्लेख केला आहे. पुढील काळामध्ये बिदरी आराध्य मठाचे चंद्रशेखर शास्त्री, बंकापूरचे श्री सिद्धलिंग शर्मा, मुदेनूरचे वागीश शिवाचार्य, आहेरवाडीचे शिवानंद शिवाचार्य, चिक्कमण्णूरुचे गुरुदेव शिवाचार्य, बेक्कीनहाळचे श्री शंकर शर्मा, जमखंडीचे श्री अन्नदान शिवाचार्य, रेकुडगीचे श्री विरूपाक्ष शिवाचार्य आदी विद्वानांनी १९३३ ते १९४० पर्यंतच्या कालावधीत कार्यदर्शी म्हणून कार्य केले.

१९३५ मध्ये चिक्कमण्णूरुचे गुरुदेव शिवाचार्य कार्यदर्शी असताना दि. ६.१२.१९३५ रोजी संघाच्या ८२ व्या पाक्षिक अधिवेशनामध्ये यात्रेसाठी आलेले काशीपीठाचे शाखानुवर्ती भालकी हिरेमठाचे चरपट्टाध्यक्ष श्री ष.ब्र. चन्नबसव शिवाचार्य स्वामीजींनी त्या सभेचे अध्यक्षस्थान भूषविले होते. त्या सभेत चिम्मलगी, बिच्चाली, महिशाळ, मुदेनूर, चिक्कमण्णूर येथील स्वामीजींनी विविध विषयांवर प्रवचने केली. त्यावेळी अध्यक्षस्थानावरून बोलताना

भालकीच्या पट्टाध्यक्षांनी श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलाची आणि काशी वीरशैव विद्वत् संघाची प्रशंसा केली.

दि. १९.११.१९३५ रोजी झालेल्या संघाच्या ७८ व्या अधिवेशनामध्ये काशी वीरशैव विद्वत्संघाचे ज्येष्ठ संशोधक पं. वीरभद्र शास्त्री यांचा सन्मान करण्यात आला. त्यासभेत चिम्मलगी, मुदेनूर, बिच्चाली, म्हैशाळ, चिक्कमण्णूरु, उटइंचगेरी, नारायणपेठ, मुतनाळ, पळगुंदी, बेकिनाळ, रावलुडकी, बंकापूर आदी गावचे शिवाचार्य आणि शास्त्रीगणांनी पं. वीरभद्र शास्त्रींची (काशी जगद्गुरू वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजी) त्यांच्या विद्वत्तेबद्दल मुक्तकंठाने प्रशंसा केली. सर्वांनी पुष्पगुच्छ देऊन त्यांचा गौरव केला.

दि.१७.१.१९३६ रोजी संघाच्या ८६ व्या अधिवेशनामध्ये उज्जयिनीपीठाचे जगद्गुरू सिद्धलिंग शिवाचार्य महास्वामीजी दि. १३.१.१९३५ रोजी लिंगैक्य झाल्याबद्दल श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

दि. ४.२.१९३६ रोजी ८७ व्या अधिवेशनामध्ये काशी जगद्गुरू पंचाक्षर शिवाचार्य महास्वामीजी यांच्या पीठारोहणाचा पाचवा वर्धन्ती महोत्सव साजरा करण्यात आला.

दि. ४.१२.१९३७ रोजी १०० व्या अधिवेशनामध्ये निजामाबाद बेगमपेठ येथील नंदलुमठाध्यक्ष श्री आनंद देशिक महाराज शिवैक्य झाल्याबद्दल त्यांना श्रद्धांजली अर्पण करण्यात आली.

### ज्ञानमंदिर ग्रंथालयाची स्थापना

दि. १.५.१९३८ रोजी झालेल्या विद्वत्सभेच्या पाक्षिक अधिवेशनामध्ये एक वाचनालय स्थापना करण्याचा निर्णय घेण्यात आला. दि. ४.५.१९३८ रोजी जगद्गुरू दारुकाचार्य जयंती महोत्सवाच्या निमित्ताने झालेल्या संघाच्या अधिवेशनामध्ये सर्व विद्यार्थ्यांनी मिळून 'जगद्गुरू विश्वाराध्य वाचनालया'ची स्थापना करण्यात आली. कालांतराने ते वाचनालय श्रीकाशीजगद्गुरू द्वितीय वीरभद्र शिवाचार्य महास्वामीजींनी त्यांच्या कार्यकाळात दि. २.३.१९४६ रोजी महाशिवरात्रीच्या पर्वकाळी 'ज्ञानमंदिर ग्रंथालया'त परिवर्तित केले. त्यांनी विद्यार्थी अवस्थेत संग्रह केलेले सर्व ग्रंथ आणि ताडपत्र ग्रंथ ज्ञानमंदिर ग्रंथालयाला समर्पित केले. हे जंगमवाडी मठामधील एक समृद्ध ग्रंथालय म्हणून ओळखले जाते.

दि. २.८.१९४० रोजी श्रीशैल जगद्गुरू भिक्षावर्ती शिवाचार्य महास्वामीजी लिंगैक्य झाल्याबद्दल श्रद्धांजली सभा आयोजित करण्यात आली. त्यासभेत अहमदपूरचे शिवलिंग शिवाचार्य, रावलुडकीचे पं. सदाशिव शास्त्री यांनी लिंगैक्य जगद्गुरूबद्दल आपले विचार व्यक्त केले. शेवटी सर्वांनी उभे राहून मौन राहून श्रद्धांजली अर्पण केली.

अशा रीतीने काशी वीरशैव विद्वत् संघाचे सर्व पदाधिकारी पाक्षिक सभेचे आयोजन करून विविध विषयांवर चर्चा, भाषण करीत आपले ज्ञान वृद्धिंगत करतात. पीठामध्ये आलेल्या विशिष्ट व्यक्तींचा सत्कार, लिंगैक्य व्यक्तींना श्रद्धांजली, तसेच दरवर्षी होणाऱ्या जगद्गुरू रेणुकाचार्य जयंती, जगद्गुरू दारुकाचार्य जयंती, एकोरामाराध्य जयंती, जगद्गुरू पंडिताराध्य जयंती आणि जगद्गुरू विश्वाराध्य जयंती त्या त्या तिथींप्रमाणे संघाचे पदाधिकारी आणि सदस्य साजरी करतात. स्थापनेच्या वर्षापासून २०२० पर्यंत गेली ८७ वर्षे संघाचे कार्य अखंड चालू आहे. पुढे अनंतकालपर्यंत चालू राहणार आहे.

अशा रीतीने काशीपीठातील श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलामुळे विद्यार्थ्यांच्या उत्साहामध्ये उल्लेखनीय वाढ झालेली असून प्रत्येक विद्यार्थी विविध भाषांत आणि विविध शास्त्रांमध्ये प्रखर पांडित्य मिळवून आपापल्या प्रदेशामध्ये धार्मिक, सामाजिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक कार्य करून समाजामध्ये धर्म, अध्यात्म व शिक्षणाबद्दल भरपूर जागृती करीत आहे. त्यामुळे सर्वत्र काशीपीठाचा गौरव वाढत आहे, ही संतोषदायक घटना होय.

■■

परिशिष्ट ६ :

## श्री जगद्गुरू विश्वाराध्य गुरुकुलातील विद्यार्थ्यांची सूची

(विद्यार्थ्यांच्या नावाच्या पहिल्या अक्षराच्या आधाराने सूची तयार केली आहे. त्यांचा अनुक्रमांक, नाव, गाव आणि पृष्ठसंख्या दिली आहे. नावाच्या आधी 'श्री' अथवा कुठलीही उपाधी लावलेली नाही.)

■■

## आधारग्रंथ

१. पंचाचार्य प्रभा, १९२९
२. पुण्यश्लोक वारद, १९४९
३. गुरुवर्ग दर्पण, १९५३
४. शिवयोग मंदिर बेळगु, १९६०
५. शिवबसव स्मारक संचिके हुक्केरिमठ हावेरी, १९७१
६. गवि दीप्ती, १९७६
७. बबलेश्वर शिवयोगीगळु, १९७६
८. विद्यानिधी लिंगैक्य जगद्गुरू गंगाधर महास्वामीगळु, मूरुसाविर मठ, हुब्बळ्ळें, १९८२
९. वीरशैव पंचपीठ परंपरे, १९८८, २००७
१०. पंडित रेवणसिद्ध शास्त्रीजी, १९९०
११. बागलकोटेय श्री पट्टदार्यरु, २००६

(विविध स्रोतांकडून व लेखकांकडून माहिती संग्रहित केली आहे. त्या सर्व लेखकांचे आम्ही ऋणी आहोत. -संपादक)

